# डॉक्टर कादंबरी

एक सामाजिक कादंबरी

[ तिन्ही भाग एकत्र ]

लेखक

**नाथमाधव**

नवभारत प्रकाशनसंस्था मुंबई, ४.

# डॉक्टर कादंबरी

## भाग पहिला

### उपोद्घात

" बहिणभावंडांचं काय एवढं हितगुज चाललं आहे ? "

" हितगुज कसलं ! मी भाऊला म्हणतें कीं, आतां आल्यासारखा रहा एकदोन दिवस. "

" छे ! छे ! मनुताई, आतां अगदीं आग्रह करूं नकोस. सध्यां कामानें मी अगदीं चेपलों आहें. "

" रघू, तूं तरी सांग आपल्या मामाला रहा म्हणून ! " आपल्या मांडीवर शांतपणें झोंप घेत असलेल्या बालकाकडे पहात मनुताई लडिवाळपणानें म्हणाली.

तो भाऊबिजेचा दिवस होता. आज चार वर्षांनीं जयरामपंत आपल्या बहिणीला भेटण्याकरितां हरिपुरास आले होते. आले होते म्हणण्यापेक्षां मनुताईनें पत्रांचा सेतु बांधला तेव्हां नाइलाजास्तव भाच्याला पाहण्याच्या आणि त्यांतल्या-त्यांत भाऊबिजेचा सण साजरा करण्याकरितां ते पुण्याहून आले होते.

" भाऊ, आतां हें असेंच कायरे व्हायचं ? " क्षणभरानें मनुताईनें विचारलें.

" काय व्हायचं ? " घांस तोंडांत टाकण्याकरितां उचललेला हात थांबवून जयरामपंतांनीं विचारलें.

" व्हायचं म्हणजे असं कीं, तुझी माझी भेट आतां केव्हां कपिलाषष्ठीनें होईल तेव्हां होईल. "

" असं कां बरं म्हणतेस मनुताई ? "

" कां म्हणतेस म्हणजे ? तुझी ही अशी सरकारी नोकरी ! आज पुण्यास तर उद्यां मुंबईस ! तुला होऊन कांहीं यायला व्हायचं नाहीं. आणि आमच्या घरांतून घरचा उद्योगधंदा सोडून तुमच्या येथें जायला व्हायचं नाहीं.

" होय बुवा ! " दरवाजांत उभे असलेले गणेशपंत म्हणाले, " आम्ही बोलून चालून शेतकरी मंडळी. रात्रंदिवस शेतांत खपूं तेव्हां आमचा चरितार्थ चालणार. भेटण्याच्या निमित्तानें पुण्यास यावयाचें म्हटलें तरी पांचपंचवीस रुपये

खराब होतात आणि घरचा उद्योग बुडतो तो निराळा ! हिला दोन दिवस माहेर-वासाकरितां तुमच्याकडे पाठवायची तर तीही सोयी नाहीं. घरांत सगळीच अडचण ! "

" होय. असं आहे खरं ! "

" मग आतां तुझ्या माझ्या भेटींत असं अंतर पडतां पडतां आपलं भाऊ-बहिणीचं नातंहि आपण विसरून जाऊं. आणि पुढें आपलीं मुलं मोठीं झाल्यावर त्यांची ओळख देखील रहाणार नाहीं. "

" असं होईल खरंच ! पण मी त्याला युक्ति सांगतों—" गणेशपंत मध्येंच म्हणाले, तेव्हां मनुताई आपल्या पतीकडे उत्कंठेनें पाहूं लागली. " हें पहा जयरामपंत—" ते पुढें म्हणाले, " ही आपल्या घराण्यांची ओळख बुजूं नये अशी जर तुमची इच्छा असेल तर त्याला एक युक्ति आहे. पण ती तुम्हांला कितपत मानवेल हा प्रश्न आहे ! "

" कां बरं ? असं कां म्हणतां गणेशपंत ? "

" कां म्हणतां म्हणजे ? अहो आम्ही बोलून चालून शेतकरी, मूर्ख आणि अशिक्षित असे ह्या खेड्यांत राहणारे आणि तुम्ही शिकलेले, सरकारी बडे अंमलदार शहरांशहरांतून राहणारे ! "

" मग त्यांत काय आहे ? अशी जर पूर्वींच शंका उद्भवती तर मग आमच्या वडिलांनीं मनुताईला तुमच्या घरीं दिलीच नसती. "

" अहो, ती जुन्या काळची मंडळी होती. आपला जांवई दरमहा नोकरींत काय पगार पाडतो हें पहाण्यापेक्षां त्याची शेतजमीन किती आहे इकडे त्यांचें जास्त लक्ष असे. कोठून तरी नवऱ्याच्या मागें मुलीला अन्नवस्त्राला तूट पडूं नये हा त्यांचा उद्देश असे. "

" आणि तो सर्वतोपरी चांगला असे. पण गणेशपंत तुम्ही कोणती युक्ति सांगतां ? "

" सांगतों पण मान्य कराल ? "

" हो. "

" पहा बरं ?—तुम्हांला मुलगी झाली तर आमच्या ह्या रघुनाथाला—आपल्या भाच्याला देऊन आपला संबंध असाच कायम ठेवा. "

" होय होय. भाऊ ही खाशी तोड काढिली आहे. " आनंदित स्वरानें मनुताईनें आपल्या मांडीवर निजलेल्या रघुनाथाला उठविलें आणि त्याचें चुंबन घेऊन ती पुढें म्हणाली. " माझ्या ह्या रघुला तुझी मुलगी बायको कर. होयनारे

रघू ! तुला मामाची मुलगी पाहिजेना ? मग किनई भाऊ, मी माझ्या सुनेचं नांव सीता असें ठेवीन."

"का जयरामपंत, असे विचारांत कां पडलां ? मी म्हटलंच कीं, तुम्हांला माझी युक्ति मानवणार नाहीं. म्हणून !"

"तसं नव्हे हो ! हा मानवण्याचा प्रश्न नाहीं. पण अझून कशाला कांहीं ठिकाण नाहीं, अद्यापि मुलीचा जन्म नाहीं—"

"मग त्यांत काय झालं ? आपण हें आतांच ठरवून ठेवूं !"

"ठीक आहे. आपण आतां ठरवून ठेवलं आणि पुढं मला मुलगी झाल्यावर ती जर आंधळी किंवा थोटी अथवा मुकी झाली तर ?",

"आम्हांला चालेल." एकदम मनुताई म्हणाली. "चालेलना रे रघुनाथ तुला अशी बायको ?" असें म्हणून त्या प्रेमळ मातेनें आपल्या अर्भकाचे पटापट मुके घेतले.

"मग ठरलं तर जयरामपंत ? पहा बरं तुम्ही आतां अन्नावर बसलां आहांत !"

"हो हो ठरलं !"

---

## १........ म्हातारीची पिरपिर

उपोद्घातांत वर्णन केलेल्या गोष्टीला आज जवळ जवळ अठरा वर्षे लोटलीं होतीं. जयरामपंत आतां एक बडे अंमलदार बनले होते. ते स्वतःला पूर्ण सुखी असें समजत असत. त्यांच्या घरांत एकंदर चार माणसें होतीं. ते स्वतः त्यांची वृद्ध मातुःश्री, त्यांची पत्नी सुमतीबाई आणि सहा मुलांतून जगलेली एकुलती एक मुलगी कमलिनी. शिवाय आचारी, पाणके, पुजारी वगैरे पांच सहा आश्रित होते. जयरामपंतांची वृद्ध माता घरांत होती म्हणून त्यांच्या घरांत देवाधर्माचें बंड होतें अशांतला प्रकार नाहीं. ते स्वतः जरी सुधारक मतांचे होते, तरी पाजील सुधारक मात्र नव्हते. परिस्थित्यनुरूप कालमानाकडे पाहून आपल्या सारासार विचाराला पटतील तितक्याच गोष्टी त्यांनीं अमलांत आणिल्या होत्या. सुमतीबाई अद्यापि आपल्या सासूच्या शिक्षेत असल्यामुळें त्यांच्या घरांतील शिस्त खरोखरीच वाखाणण्यासारखी होती. आपल्या पतीला मोठा पगार आहे, त्यांनीं सरकार दरबारांत मोठा नांवलौकिक मिळविला आहे आणि लोकांतहि त्यांची मानमान्यता चांगली आहे, ह्या अनुकूल गोष्टींनीं शेफारून जाऊन सुमतीबाईनें सुधार-

कीचे भलतेच ढंगसंग घरांत शिरूं दिले नाहींत. तिचें माहेरहि चांगलें बडें होतें तथापि मुळांत तिच्या आईची गृहशिक्षा तिला चांगली होती आणि तेंच वळण तिनें आपल्या एकुलत्या एक मुलीला लावलें होतें.

कमलिनी आतां बारा वर्षांची झाली होती. तिनें इंग्रजी दुसरें पुस्तक संपवून नुकतेंच तिसरें पुस्तक घेतलें होतें. ती स्वरूपानें सुंदर, सुदृढ आणि चलाख अशी चुणचुणीत पोर होती. जयरामपंत रोज रात्रीं जेवल्यानंतर तिला जवळ घेऊन बसत असत. त्यामुळें तिचा शाळेंतील अभ्यास उत्तम रीतीनें होत असे. अलीकडे म्हातारीनें आपल्या मुलाच्या मागें तिच्या लग्नाचा धोशा लाविला होता. ' पोरीला आतां बारावें वर्ष लागलें; तिच्या लग्नाची कोणीच गोष्ट काढीत नाहीं' अशी तिची रोज पिरपिर सुरू असे.

एके दिवशीं पतिपत्नी शयनगृहांत असतांना कमलिनीविषयीं गोष्टी निघाल्या. तेव्हां सुमतीबाई म्हणाली, " आपण कांहीं बोलत नाहीं पण सासूबाईंनीं कमलिनीच्या लग्नाबद्दल रोज सारखा जप चालविला आहे. "

" करूं ग ! काय इतकी घाई लागली आहे ? अद्यापि तिचं बारावं वर्ष पुरं झालं नाहीं. आणि इतक्यातंच काय लग्न करायचं आहे? होऊं दे जरा तिला मोठी."

" मोठी ती आणखी किती होऊं द्यायची ? सासूबाईंना आतां ती मोठीच दिसूं लागली आहे. "

" अग तीं म्हातारीं माणसं, तिला तसं वाटायचंच ! पण—"

" पण काय ? आज त्या श्रीधरपंत परांजप्यांच्या घरच्या बायका आल्या होत्या हळदीकुंकवाच्या आमंत्रणाला, तेव्हां गोष्ट निघतां निघतां त्यांनीं रावबहादुर जोशाचं स्थळ सासूबाईंना सुचविलं. मुलगा सध्यां कॉलेजांत असून चांगला देखणा, अंगानें बांधेसूद आहे. "

" बरं मग ? मुलगा चांगला आहे कळलं पुढं काय म्हणणं आहे ? "

" म्हणणं काय असायचं दुसरं ?—ते मुलाची पत्रिका पाठवितील काय असं सासूबाईंनीं त्यांना विचारण्यास सांगितलं आहे. "

" वाः येथपर्यंत का आईची मजल गेली ! मुलगा आपण पाहिला आहे, सर्वांना पसंत आहे मग आतां ही काय भानगड करते आई ? "

" कोणता मुलगा पाहिला आहे ? "

" कोणता म्हणजे—आपल्या मनुताईचा रघुनाथ. "

" ही काय बरं अशी थट्टा ! "

" थट्टा ? तुला अद्यापि ही थट्टाच वाटते काय ? अग, मी मनुताईला वचनबद्ध झालों आहे ना ? "

" तो तुमचा थट्टेनें विनोद होता."

" नाहीं. तुला आणि आईला त्यावेळीं मीं सांगितलं तेव्हां तो विनोद असेल अशी तुमची कल्पना झाली. पण नाहीं. ती थट्टा नव्हे आणि विनोदहि नव्हे. त्यावेळीं मजपुढें अन्न होतें. आणि त्यां अन्नाला साक्ष ठेऊनच गणेशपंतांनीं मला वचनबद्ध केलें. बरं वचनबद्ध नसतों तरी रघुनाथ कांहीं आपल्याला परका नाहीं. उत्तम कुलशील, देण्याघेण्याची कुरकूर नाहीं, कांहीं नाहीं. अगदीं डोळे झांकून दोघांचें लग्न करून टाकूं. मी आणखी दोन वर्षं गप्प बसणार होतों. पण आतां आई इकडे तिकडे धांवाधांव करूं लागली आहे, तेव्हां आतां स्वस्थ बसून उपयोगाचें नाहीं. उद्यां तिला मी हें पुनः सांगणार. अगदीं जवळ-घरांत मुलगा असून ही शोधाशोध कशाला ? म्हणून तिला विचारणार आणि ती थांबली तर ठीकच आहे. दोन वर्षांनीं पुढें करूं. नाहींच तर मग उरकून टाकूं झालं ह्याच वर्षी ! "

सुमतीबाई कांहींच बोलली नाहीं. अठरा वर्षांपूर्वी भाऊबिजेकरितां जाऊन परत आल्यावर जयरामपंतांनीं स्वतः वचनबद्ध झाल्याची हकीगत तिला सांगितली होती. परंतु तो केवळ विनोदाचा प्रकार आहे असेंच ती समजली. त्यानंतर सबंध अठरा वर्षांत मनुताई एकदांच पुण्यास आपल्या भावाकडे आईला भेटण्याकरितां आली होती. तिच्या घरची ती एकटीच असल्यामुळें घर टाकून तिला कुठेंच बाहेर जातां येत नसे. जयरामपंत मात्र दोनदां वेळांत वेळ काढून तिला भेटून आले होते. नाहीं म्हणायला वर्ष सहा महिन्यांनीं परस्परांचा खुशालीबद्दल पत्रव्यवहार होत असे तितकाच ! सुमतीबाईला आपल्या पतीचें भाषण ऐकून जास्त बोलतांच येईना. तिनें आपल्या भाचाला एकदांच–तो सहा वर्षांचा असतांना आपल्या आईबरोबर त्यांच्या घरीं आला असतांना पाहिलें होतें. तो काळा सांवळा आहे हें तिच्या लक्षांत होतें. त्याच्यापेक्षां रावबहादुर जोशांचा मुलगा फार चांगला असें तिला वाटलें. आणि तोच मुलगा तिला पसंत होता. परंतु –! मनुवन्संच्या मुलाविरुद्ध ब्र काढण्याची तिला छाती नव्हती. ती कांहीं कोणी परकी होती किंवा त्यांच्या घरीं गरिबी होती अशांतला प्रश्न नव्हता. बोलून चालून तीं सख्खी बहिण भावंडें ! त्यांतून आपल्या पतीचें मनुताईवर किती प्रेम आहे हें तिला चांगलें माहित होतें. आतां परस्पर बहिणभावंडांची परिस्थिती-

मुळें वरचेवर भेट होत नव्हती तो प्रश्न निराळा! तथापि प्रत्येक पत्रांत त्यांच्या गाढ बंधुभगिनीप्रेमाचें दिग्दर्शन होत असे.

रावबहादुर जोशांचा आणि त्यांचा चांगलाच घरोबा होता. जोशांच्या घराची शिस्तहि थेट जयरामपंतांच्या घरासारखीच होती. तेथें आपली मुलगी पडावी: वसंत आपणास जांवई मिळावा, अशी सुमतीबाईची फार इच्छा होती. आज तिनें पतीजवळ बोलतांना सासूचें नांव पुढें करून जोशांच्या घराचा उल्लेख केला होता. परंतु खरी वस्तुस्थिति निराळी होती. रमाबाईजवळ–रावबहादुर जोशांच्या पत्नीजवळ-तिनें ही गोष्ट पूर्वीच काढून ठेविली होती. आणि ती गोष्ट त्यांनाहि मानवली होती.

दुसऱ्या दिवशीं रात्रीं जेवणावर म्हतारीनें मुलीच्या लग्नाची गोष्ट काढलीच! 'मी आहें तोंवर मुलीचे सुखसोहळे पाहीन असं फार म्हणतें पण माझ्या म्हातारीच्या नशिबीं असेल तेव्हांना? आतां पुण्यामुंबईत काय किंवा कुठें काय? सर्वत्र हाच मामला! जिकडे पाहवं तिकडे घोड नवऱ्या! हें का स्वयंवर म्हणायचं? सोडला–ह्या ब्राह्मणांनीं अगदींच ताळ सोडला. गेलं तें पूर्वीचं बालबोध वळण आणि जिकडे तिकडे हा धांगडधिंगा मात्र सुरू झाला. असं नव्हतं कांहीं पूर्वीं! जो तो आपापली पायरी ओळखून वागत असे. पण आतां सगळीच सुधारणा! आपली सांगली अद्यापि चांगली होती पण आतां घरीं दारीं सगळी-कडे इंग्रजी झालं! आमच्या राज्यांत घरोघरीं त्रिकाल पाठ ऐकूं यायचे. जरा इकडे तिकडे झालं तर प्रायश्चित्तापर्यंत मजल यायची. तें आतां सगळं गेलं आणि झाली इंग्रजी सुरू! मेल्यांनो! तुम्हीं शिका इंग्रजी. पण बायकापोरींना काय शिकवितां इंग्रजी?'

"आई, आजचा काळ हा ज्ञानाचा काळ आहे." आपण आतांच बोललों नाहीं तर म्हातारीची बडबड खंड न पडतां सारखी चालू राहील असें पाहून जयरामपंत म्हणाले, "आजकाल प्रत्येकानें ज्ञानाचा लाभ करून घेतला पाहिजे."

"हो खरंच! इंग्रजी शिकलं नाहीं तर घरांत चूल कशी पेटल?"

"खरंच नाहीं पेटायची! मी इंग्रजी शिकलों म्हणूनच पसाभर रुपये घरांत येतात आणि तुमची चूल पेटते नाहींतर आज चूल पेटण्याची कोण मारामार पडती! आई, आतां तो पूर्वीचा काळ बदलला. आतां कोणीं म्हणेल कीं, मी आतां वेदव्याकरण शिकून शालजोडी पांघरून मिरवीन तर ते दिवस आतां गेले."

" होय तें मी समजतें. काळ बदलला तर तुम्ही इंग्रजी शिका. आतां उदर निर्वाहाचं तें साधनच झालं आहे हें मी समजत. पण बायकांना काय नोकऱ्या करायच्या आहेत कीं वर्तमानपत्रं चालवायचीं आहेत ? "

" वाः चालविलीं तर काय वाईट ? उत्तमच." असें म्हणून आपल्या बाजूला जेवायला बसलेल्या कमलिनीला जयरामपंत म्हणाले, " कायग कमलिनी, तूं चालविशील कीं नाहीं एखादं वर्तमानपत्र ? "

" हो तिला शिकव म्हणजे चालवील ती !" म्हातारी रागांत पण ठसक्यानें म्हणाली, " आतां बायका तुमचीं कामं करूं लागल्या मग तुम्हीं —पुरुष काय करणार ? "

" भाकऱ्या भाजणार ? " असें विनोदानें म्हणून जयरामपंत मोठ्यानें हांसले. कमलिनी आणि दरवाजा आड उभी असलेली सुमतीबाईहि हांसली. परंतु म्हातारीचा मात्र राग भडकला. तिला राग आला हें जयरामपंतांच्या लक्षांत आलें. परंतु त्याचें त्यांना कांहीं वाटलें नाहीं तिचा राग कसा घालवावा हें त्यांना चांगलें माहित होतें. ते म्हणाले, " आई, जाऊं दे आतां त्या गोष्टी ! बायकांना शिक्षण द्यावं कीं नाहीं, द्यावं तर तें कोणतं शिक्षण द्यावं. याबद्दल आजकाल विद्वान् मंडळींत फारच कडाक्यानें चर्चा चालू आहे. पण तें जाऊं दे आतां. पण मी आतां तुला विचारणार होतों, कीं, तूं आपल्या कमलिनीच्या लग्नाची काय खटपट चालविली आहेस ? ती अद्यापि लहान आहे—"

" तर तर ! अगदीं रांगतं बाळच कीं नाहीं " ह्या वाक्याच्या उच्चारावरून म्हातारीला आलेल्या रागाचा अवशिष्ट भाग संपला असं पाहून पंत पुढें म्हणाले " अग आपलीं मुलं आपल्याला केव्हांहि लहानच आहेत. मी नाहींका तुला अद्यापि लहान ? " पित्याचें हें शेवटचे वाक्य ऐकून कमलिनी पुनः हसूं लागली, तेव्हां तिच्याकडे पाहून ते म्हणाले, " बरं तर आई, तुझ्या नातीचं लग्न आतांच व्हावं अशी इच्छा आहेना ?—ठीक आहे. पण तूं काय योजना योजून ठेविली आहेस, ती तरी कळूं दे."

" योजना कसली ? मी फक्त त्या जोशांच्या रमाबाईजवळ गोष्ट काढून ठेविली आहे."

" काय म्हणतेस ? गोष्ट देखील काढून ठेविलीस ? पण मी म्हणतों, घरांतला हिरा टाकून बाजारांत चौकशी कशाला ? आपल्या यमुताईच्या रघुनाथासारखा मुलगा जवळ असून ही तुझी शोधाशोध कशाला ? ताईचं आणि माझं ह्या बाबतींत केव्हांच ठरून चुकलं आहे."

" ठरलं काय ?—तुझी आपली सगळीच थट्टा ?"

" थट्टा ? आई, तूं देखील हिच्या सारखीच ह्या गोष्टीला थट्टा म्हणतेस का ? गोष्ट जुनी झाली म्हणून वचन देखील जुनें होतें काय ? ती गोष्ट काल गेल्या भाऊबिजेलाच झाली कीं काय इतकी मला नवी वाटते. ओवाळणी वगैरे होऊन मी फराळाला बसलों होतों, ताई जवळच धाकट्या रघूला घेऊन बसली होती ती मला एकसारखा राहण्याचा आग्रह करीत होती. इतक्यांत तेथें गणेशपंत आले, चार वर्षांनीं माझी आणि मनुताईची भेट झाल्यामुळें तिला त्यावेळीं फार वाईट वाटत होतें. आणि त्याबद्दलच ती बोलत होती. मनुताई त्यावेळीं जें बोलत होती त्याची मला आतां पूर्ण सत्यता पटत आहे. गेल्या सतरा अठरा वर्षांत ती एकदांच येथें आली. नाहीं म्हणायला आम्ही फक्त नांवाला बहिण भावंडं आहोंत. अशी दहादहा पंधरा पंधरा वर्षें आमची भेट नाहीं मग आमचीं ही नातीं असून नसून सारखींच !"

" होय. पण त्याला कांहीं इलाज आहे का ? तुला तुझ्या कचेरीच्या कामामुळें जेवायची फुरसूद नाहीं. रघूच्या मुंजीमध्यें देखील तुला जायला मिळालं नाहीं; मग एरव्ही जाण्याची गोष्ट कशाला ! आणि ती बोलून चालून घरची एकटीच."

" म्हणूनच तिनें ही तोड काढिली. मला होणारी मुलगी मी तिच्या मुलाला—रघुला देऊन आपलं नातं, संबंध आणि प्रेम कायम रहावं म्हणून गणेशपंतांनीं ही युक्ति काढिली. मी ती गोष्ट त्या वेळीं कबूल केली. आतां मी माझ्या शब्दाला फिरूं का ? मी त्यावेळीं असाच-आतां जेवायला बसलों आहे असाच अन्नावर बसलों होंतो आणि आमचे करारमदार झाले."

" असं जर आहे. तर त्यांत मला आनंदच आहे. रघू का कोणी आपल्याला परका आहे ?"

" मग आतां आई, तूंच सांग, इकडे तिकडे धांवाधांव करण्याची कांहीं जरूरी आहे का ? जोशांचा वसंत कांहीं वाईट आहे असें मी म्हणत नाहीं. पण आपला रघू काय कमी आहे ? किती झालं तरी तो आपला आहे."

कमलिनी ह्या सर्व गोष्टी ऐकत होती. अद्यापि आवडनिवड करण्यापर्यंत तिच्या बुद्धीची मजल पोंचली नव्हती. तथापि आपल्या वडील माणसांना जें चांगलें वाटलें तें चांगलेंच असलें पाहिजे इतकें तिला कळत होतें. आणि त्या दृष्टीनें तिच्या मनावर वरील भाषणानें जो परिणाम झाला तो अनुकूलच झाला. तिनें रघुनाथाला एकदांच पाहिलें होतें. त्यावरून तो कसा आहे याची तिला कांहीं

कल्पना करतां येणें शक्य नव्हतें. कारण त्यावेळीं ती अगदीं लहान होती. परंतु आजपासून तिच्या कोवळया मनाला हा एक नवीन विषय मिळाला. आपला भावी पति निश्चित झाला, असें समजतांच त्याच्याविषयीं तिचें मन विचार करूं लागलें. तो रूपानें, गुणानें आणि शरीरानें कसा असेल याविषयीं जरी तिला कांहीं कल्पना करतां येत नव्हती, तरी तो चांगला आहे अशी तिची ठाम समजूत मात्र झाली. बालविवाह करणें सध्यांच्या पालटलेल्या मनूंत कदाचित् अहितकारक असेल, तथापि कमलिनीच्या उदाहरणावरून मुलीच्या त्या वयांत शरीरसंबंध जुळवून ठेवणें मात्र त्यांच्या सुखाच्या दृष्टीनें विचार करतां हितकारकच आहे असें म्हटलें पाहिजे. कारण अशा रीतीनें पूर्वीं ठरलेलें असल्यामुळें आपला भावी पति, त्याची आवडनिवड, आपल्या श्वशूरगृहींच्या मंडळींचे गुणदोष, त्यांची वागण्याची पद्धत इत्यादि गोष्टी समजून घेण्याकडे मुलींच्या मनाचा स्वाभाविक कल होतो. आणि आपणास पुढें सुख होईल अशा प्रकारचें वर्तन ठेवण्याची स्वतःला संवयी लावून घेण्याकडे त्यांचें लक्ष वेधतें. त्याचप्रमाणें त्यांच्या घरांतील मंडळींकडूनहि त्याच्या मनाच्या तयारीला अनुकूल अशीच मदत होत असते. आपल्या मुलीला सुख मिळावें, अशी प्रत्येक प्रेमळ मातेची अंतःकरणापासून इच्छा असते. आपली मुलगी श्रीमंत घराण्यांत पडावी, आपला जांवई चांगला सुशिक्षित, सुंदर आणि प्रेमळ असावा, आणि सासरीं आपल्या मुलीला सर्वांनीं प्रेमानें वागवावें, अशी तिची फार इच्छा असते. आमच्या ह्या विचारसरणीला सुमतीबाई अपवाद होती असें नाहीं. अलीकडे तिच्या सासूनें कमलिनीच्या लग्नाची पिरपिर सुरू केल्यापासून हेच विचार तिच्या मनांत रात्रंदिवस घोळत होते. रावबहादुर जोशांचा वसंत तिनें आपला भावी जांवई म्हणून पसंत केला होता. परंतु पतीच्या वचनपूर्ततेकरितां तिला वसंतावरून आपली दृष्टि काढून रघुनाथाकडे वळवावी लागली. म्हातारीला तर ह्या गोष्टीपासून अत्यानंद झाला. ह्या पूर्वीं एकदां सहज गोष्टी निघाल्या असतांना कमलिनी रघुनाथाला द्यावयाची असें पंत तिच्याजवळ बोलले होते. परंतु आपला मुलगा केवळ थट्टेनें बोलत आहे, असें ती समजली. आणि तिनें त्या भाषणाकडे दुर्लक्ष केलें. परंतु आज तिच्या मनाची पूर्ण खात्री झाली. तिच्या अगदीं मनासारखें झालें. तथापि ' कमलिनी अद्यापि लहान आहे. दोन तीन वर्षें जाऊं दे, ' हें आपल्या मुलाचें म्हणणें मात्र तिनें कबूल केलें नाहीं. पंतांनीं आपल्या वृद्ध मातेची समजूत करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. ' आतां मुलगा

ठरला आहे, तो आपल्या सर्वांच्या पसंतीला उतरला आहे, मग आतां घाई कशाला ? दोघेंहि अद्यापि लहान आहेत. दोन तीन वर्षांनीं त्यांना समजूं लागेल मग आपण लग्न उरकून घेऊं ' इत्यादि पुष्कळ गोष्टी त्यांनीं जेवतांना आपल्या आईला सांगितल्या पण ' माझा आतां वृद्धापकाळ झाला आहे. माझा घडीचा भरंवसा नाहीं ' ह्या सबबीवर तिनें मुलाला गप्प बसायला लाविलें.

आई आपला हेका सोडिना असें पाहून जयरामपंतांनीं मनुताईला पत्र लिहिण्याचा विचार केला. आणि जेवण झाल्यावर दिवाणखान्यांत शतपावली करीत असतां पत्रांत काय काय लिहावयाचें तें ठरविलें. आजपर्यंत त्या बहिणभावंडांत जो पत्रव्यवहार होत होता, त्यांत खुशाली शिवाय इतर मजकूर नसे, त्यामुळें आजच्या पत्राकरितां पंतांना विशेष विचार करणें भाग पडलें. त्यांनीं अर्धें अधिक पत्र लिहिलें इतक्यांत दिवाणखान्यांत एक गृहस्थ आले. त्यांच्याकडे पाहून पंत म्हणाले, " या—शंकरराव, काय खबर आहे ? जेवण झालं का ? "

" होय. नुकतंच झालं ! आणि सिगारेट पेटवून हा तुमच्याकडे आलों. पण आज हें काय चाललं आहे ? ऑफिसचें काम आणलें आहे वाटतं घरीं ?

" छे ! हें पत्र लिहितों आहे आमच्या बहिणीला. " असें म्हणून पंतांनीं बाजूच्या आरामखुर्चीकडे बोट दाखविलें. " बसा. माझं आतां थोडं राहिलं आहे लिहावयाचं ! "

शंकरराव आराम खुर्चीवर बसले आणि पाय ताणून धुराचे लोट वातावरणांत सोडूं लागले ते पंतांच्याच वाड्यांत रहात असत. स्वतःला ते सुधारक म्हणवीत असत त्यामुळें त्यांच्या घरांत तेंच वळण लागलें होतें त्यांना सव्वाशें रुपये पगार मिळत असे. त्यामुळें त्यांना स्वतःचे आणि मुलांचे चोचले पुरविण्यास फारसें जड जात नसे. त्यांना यशवंत आणि शांता अशीं दोन मुलें होतीं. यशवंताचें वय एकोणीस आणि शांतीचें वय चौदा वर्षांचें होतें. यशवंत आणि रावबहादुर जोशांचा वसंत हे सहाध्यायी होते. यंदा प्रवेश परिक्षेला बसण्याची त्यांची तयारी होती. शांता ही कमलिनीपेक्षां दोन वर्षांनीं वडील होती तरी शिकण्यांत कच्ची होती. नुकत्याच झालेल्या परीक्षेंत कमलिनीनें तिला तिसऱ्या इयत्तेंत गांठलें होतें. शांतीची आई पार्वतीबाई बिचारी अगदीं साधी बायको होती. तथापि नवऱ्याच्या आवडीप्रमाणें तिला वागावें लागत असे. असो. हातांतील पत्र लिहून संपल्यावर तें पाकिटांत घालतांना जयरामपंत बाजूला वळून शंकररावांना म्हणाले, " आज हें पत्र मी आमच्या बहिणीला अगदीं मनाविरुद्ध लिहित आहे. केवळ आमच्या आईचा हेका म्हणून मला हें पत्र लिहावं लागलं. "

" कां बरं ? असं काय आहे त्या पत्रांत ? "

" आमच्या कमलिनीच्या लग्नासंबंधीं आहे. आमच्या भाचालाच ती द्याव-याचं ठरलं आहे. माझ्या मनांतून आणखी दोन तीन वर्षे तरी थांबावयाचं होतं पण आमची आई—"

" मग काय तुम्ही आपल्या कमूचं लग्न इतक्या लवकरच करणार कीं काय छे छे ! मला नाहीं हें पसंत ! मी तर माझ्या शांतीचं लग्न ती मॅट्रीक झाल्या-शिवाय करणारच नाहीं. आम्ही कंठशोष करून ' स्त्रीशिक्षण पाहिजे ' अशी-त्यांच्या वतीनें तरफदारी करतों आणी स्वतः मात्र तसें वागत नाहीं. इतक्या लवकर त्यांचीं लग्नें केल्यावर त्यांचं शिक्षण तरी काय होणार आणी प्रौढ विवा-हाची ओरड करून तरी काय उपयोग ? "

" होय हो. त्या सर्व गोष्टी खऱ्या. पण वडील माणसांच्या शब्दांकरितां कांहीं गोष्टी आपणाला स्वतःच्या मताविरूद्ध कराव्या लागतात."



## २........ मंडळी आली

जयरामपंतांनीं आपल्या बहिणीला–मनुताईला लिहिलेल्या पत्राचें उत्तर तिच्या पतीनें--गणेशपंतांनी ताबडतोब पाठविलें. मजकूर थोडक्यांत आटोपसर होता, ' आपण ची. कमलिनीला पदरांत घेतां का म्हणून पत्रांत विचारतां ? परंतु आतां विचारण्याचें कारणच उरलें नाहीं. ह्यासंबंधीं आपली आणभाक पूर्वीच झाली आहे. हा ऋणानुबंध विधिलिखितच आहे असें आम्ही समजतों. आपल्या ती. मातुःश्री लग्नाची निकड लावीत आहेत, तर त्याला आमची तयारी आहे. येत्या वैशाखांत उरकून टाकूं. अद्यापि दोन महिन्याची अवधि आहे तेव्हां उभयपक्षीं तयारीला मुबलक वेळ आहे. लग्नसमारंभ येथें व्हावा अशी आपल्या भगिनीची–आमच्या सौभाग्यवतीची इच्छा आहे. पुण्यापेक्षां येथें खर्च कमी होईल. ह्या ऊपर आपली इच्छा. ' असें तें पत्र थोडक्यांत लिहिलें होतें. हें पत्र पंतांनीं आपल्या आईला वाचून दाखवितांच तिला आनंद झाला आणि तिनें लग्नाच्या सामानाची यादी तयार करण्याची घाई लाविली. वधूचें आणि वराचें हीं दोन्ही घरें आपलींच आणि ह्या दोन्हीं घरांत आपल्या आयुष्यांतील हें शेवटचें एकच कार्य तेव्हां तें विशेष थाटामाटानें पुण्यांतच व्हावें असें म्हातारीचें

मत पडलें पंतांनींहि आपल्या वृद्ध मातेला न दुखविण्याचा निश्चय केला होता. तेव्हां ते ती म्हणेल त्याला आपली मान तुकवीत होते.

हळू हळू लग्नाची तयारी होऊं लागली. धान्याची सांठवण, निसणेंटिपणें, त्याचप्रमाणें पापड—लोणचें घालणें यांत सुमतीबाईचा वेळ जाऊं लागला. शेजारपाजारच्या बायका तिच्या मदतीला येत असत परंतु शांतीची आई पार्वतीबाई जणूं काय हें आपल्या घरचेंच कार्य आहे असें समजून आंग मोडून सुमतीबाईला मदत करीत होती. आज त्यांनीं पापडाची तयारी चालविली होती. पार्वतीबाईनें इकडे तिकडे पाहून सुमतीबाईला विचारलें, "काय हो वहिनीबाई, तुमच्या सासूबाई नाहींत कुठें दिसत ? निजल्या आहेत वाटतें ?"

"नाहीं. त्यांची झोंप झाली. जेवल्यावर कुठें जरा पांच दहा मिनीटं पडतात. आतां त्यांचा रामायणाचा एक अध्याय वाचून झाला म्हणजे त्या येतील इकडेच. तोंपर्यंत आपलं हें मळणं होईल."

"खरंच बाई, इतक्या ह्या वाड्यांत चार बिऱ्हाडं आहेत. पण बाळबोध वळण असें हें तुमच्याच घरीं दिसतं. मला किनई वहिनीबाई, तुमच्या घराची शिस्त पाहून किती समाधान होतं म्हणून सांगूं! नाहींतर आमचं घर ! तेवढा दिवाणखाना पाहून घ्यावा. घरांत दोन मुलं आहेत पण त्यांचा पसारा उपसतां उपसतां माझा जीव कसा मत्यास आला आहे. आतां आमचीं मुलं लहान कांहो आहेत ? पण त्यांच्यावर माझी इतकी देखील सत्ता चालत नाहीं. मुलांना कांहीं काम सांगेन म्हटलं तर तें आमच्या घरांत खपत नाहीं. म्हणतात हा वेळ त्यांचा शिकण्याचा त्यांच्या अभ्यासांत बिलकूल व्यत्यय आणतां उपयोगी नाहीं. पण अशा ह्या लाडामुळें आमच्या शांतीला तांब्या उचलून द्यायला देखील मोलकरीण लागते. परवां मला शिवायचं नव्हतं आणि एक दिवस आमची मोलकरीण आली नाहीं. पण त्या एकाच दिवसांत ह्या पोरांच्या पायीं मी अगदीं रडकुंडीस आलें."

"छे बाई ! हें नाहीं चांगलं ! मुलांना अशी भलतीच शिस्त लावणं म्हणजे त्यांच्या पुढल्या आयुष्याकरतां दुःखाचा संग्रह करून ठेवणें होय. मुलाची गोष्ट एक असो पण मुलीच्या बाबतींत आईनें फार जपलं पाहिजे. आपल्या घरीं ती आहे तोपर्यंत आपण तिचे लाड करूं उद्यां ती सासरीं गेल्यावर !"

"पण मुलींना इंग्रजी शिकवून करायचं काय ?"

"काय करायचं तें त्या पुरुषांनाच माहित ! पण आमच्या कमूच्या बाबतींत

मला जें करायचं तेंच मीं करतें. मला माझ्या आईनें जी शिक्षा लाविली तीच मी तिला लावणार. आणि तीच शिक्षा ह्या इंग्रजी शिक्षणापेक्षां तिला सासरीं जास्त उपयोगी पडेल अशी माझी स्वतःच्या अनुभवावरून खात्री आहे. ह्या इंग्रजी शिक्षणांत मुलांना काय आणि मुलींना काय, धार्मिक आणि नैतिक शिक्षण मिळतच नाहीं. मग आमचीं मुलें शीलसंपन्न निपजावीं कशीं ? मी म्हणतें मुलांचं नैतिक आचरण, त्यांचं शील, त्यांचं धार्मिक वर्तन यांकडे घरांतल्या मंडळींनीं विशेष लक्ष पुरविलं पाहिजे."

सुमतीबाईंच्या ह्या वाक्यांत किती तरी गंभीर आणि खोल अर्थ भरला आहे बरें ? पण त्यांचा आजकाल कोणी मननपूर्वक विचार करतो काय ? जुन्या मतांचा निष्कारण अभिमान धरणारे दुराग्रही लोक वाटेल तें बडबडोत पण स्त्रीशिक्षणासारखी महत्त्वाची सुधारणा झालीच पाहिजे असे उद्गार आज सर्वत्र ऐकूं येतात. आणि आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ कांहीं पुराण प्रसिद्ध शिकलेल्या स्त्रियांचीं नांवें ते पुढें करतात. परंतु त्यांच्या शिक्षणांत धार्मिक–नैतिक शिक्षण प्राधान्य होतें आणि अलीकडील स्त्रीशिक्षणांत त्याचा पूर्ण अभाव आहे हें ते कसें विसरतात याचेंच आश्चर्य वाटतें. सद्वर्तन, सच्छील संपन्नता, नैतिक आणि धार्मिक श्रेष्ठता इत्यादि आर्यसंकृतीच्या अमोलिक गुणांनीं मंडित होऊन स्त्रिया ज्ञानसंपन्न व्हाव्या ह्या उच्च हेतूनेंच स्त्रीशिक्षणाच्या पुरस्कर्त्यांनीं ही स्त्रीशिक्षणाची चळवळ प्रथम सुरू केली, ही गोष्ट आम्हाला मान्य आहे. परन्तु आजकालची स्त्रीशिक्षणाची स्थिति कशी आहे ?

हा शिक्षणाचा प्रश्न निघतांच आपल्या भावी जांवयाचें शिक्षण किती झालें आहे ? हा प्रश्न सुमतीबाईंच्या मनांत उभा राहिला. आतांपर्यंत तिनें आपल्या पतीजवळ ह्याविषयीं कांहींच चौकशी केली नव्हती. आणि पंतानीं देखील ह्यापूर्वी कोणत्याहि पत्रांत आपल्या बहिणीला रघुनाथाच्या शिक्षणाचा खुलासा विचारला नव्हता. रात्रीं झोंपतांना ह्या गोष्टी निघाल्या तेव्हां आपण ह्या महत्त्वाच्या गोष्टीची अजूनपर्यंत नीट चौकशी केली नाहीं, याबद्दल पंतांना वाईट वाटलें. त्यांनीं दुसऱ्या दिवशीं आपल्या बहिणीला पत्र लिहून रघुनाथाच्या शिक्षणाची माहिती मागविली आणि 'लग्नविधि पुण्यांतच करण्याचा आईचा आग्रह आहे, करितां आपण केव्हां येणार तें कळवावें. आपणांस उतरण्याकरितां स्वतंत्र जागा पाहून ठेविली आहे' असें कळविलें. त्या पत्राचें चौथ्या दिवशीं उत्तर आलें त्यांत गणेशपंतांनीं लिहिलें होतें कीं, 'ची. रघुनाथाचा अभ्यास मराठी सहा यत्तापर्यंत

पूर्ण झाला आहे. तीर्थरूपाच्या निधनामुळें माझ्या एकट्यावर शेताचा आणि घरच्या सावकारीच्या कामाचा एकदम बोजा पडल्यामुळें त्याला इंग्रजी शिकण्याकरितां शाळेंत न घालतां मी हाताशीं धरलें. आतां तो शेताचें आणि सावकारीचें काम चोख रीतीनें करतो. आम्ही पुण्यांतच येण्याचा दिवस अद्यापि मुकरर केला नाहीं आमची लग्नाची तयारी होतांच आणि येथील आमची व्यवस्था लागतांच आम्ही सर्वजण निघून येतों. येण्यापूर्वी कळवितों; कळावें.'

रघुनाथच्या शिक्षणासंबंधीं मजकूर वाचून जयरामपंतांना वाईट वाटलें. मुलाला इंग्रजी शाळेंत घातला नाहीं म्हणून त्यांनीं आपल्या मेहुण्यास दोष दिला. तेव्हां सुमतीबाई म्हणाली, " त्यांनीं मुलाला इंग्रजी शाळेंत नाहीं घातलं म्हणून आतां हळहळून काय उपयोग ! आहे यांतच आतां समाधान मानून घेतलं पाहिजे. शिवाय मी म्हणतें, तो इंग्रजी शिकला नाहीं म्हणून त्यांच्या घरच्या धंद्याला कांहीं बाध येत नाहीं ना? मग उगाच हा इंग्रजी शिकण्याचा हट्ट कशाला?"

पंताला आपल्या पत्नीचें बोलणें पटलें. पुष्कळ वेळ विचार केल्यावर आपल्या मेहुण्याच्या पश्चात् देखील रघुनाथाला इंग्रजी येत नसलें तरी घरचा धंदा उत्तम रीतीनें चालवितां येण्यासारखा आहे, त्याचें कोठेंहि अडण्यासारखें नाहीं हे विचार मनांत येऊन पंत गप्प राहिले. परंतु जांवईबुवांना इंग्रजीचा बिलकूल गंध नाहीं, असें पंतांच्या मित्रमंडळींना कळतांच त्यांनीं मात्र नांवें ठेविलीं. शंकरराव तर पंतांच्या तोंडावर उघड बोलले देखील !

" कायहो पंत तुमचें हें बहिणीचें घर म्हणजे आतां तुमचे पुढें होणारे हे व्याही अगदीं पेशव्यांच्या काळचे दिसतात. सध्यां जगांत काय उलाढाल चालली आहे याची त्यांना कल्पना देखील नाहीं असं दिसतं. कापण मी आतां ऐकलं कीं, तुमच्या जांवईबापूंना इंग्रजीचा गंध देखील नाहीं ! छे बुवा ! आपल्याला नाहीं हें पसंत. तुम्हीं आतां लग्न झाल्यावर मुलाला आपल्या घरीं ठेऊन घेऊन त्याच्या इंग्रजी शिक्षणाची तयारी करा. वास्तविक तुमच्यासारख्यांचा जांवई म्हणजे कोणीतरी बी. ए. एम. ए. असा एखादा ग्रॅज्यूएट पाहिजे होता. "

" पाहिजे होता परंतु आमचा जांवई तसा नाहीं त्याला आतां काय करायचं ? तेवढ्याकरितां हा संबंध तर मोडतां येत नाहीं ना ? "

" कां नाहीं ? अहो, ही अनायासें मिळालेली सबब तुम्हीं तें त्रेतायुगांत बहिणीला दिलेलें वचन धाब्यावर बसवायला फार चांगली आहे. "

" छे ! शंकरराव, हेंच काय पण याहिपेक्षां एखादें मोठें कारण असतें तरी

मी वचन मोडलें नसतें. मला स्वतःच्या शब्दाचें महत्त्व फार आहे. बरं तुम्ही म्हणतां तसा एखादा ग्रॅज्यूएट जांवई मिळाला तरी त्यांत विशेष काय आहे ? तो आपल्या शिक्षणाचा उपयोग उदरभरणार्थच करणार ना ? मग त्याच्यांत आणि आमच्या भावी जांवयांत काय फरक होणार आहे ? उदरभरणाकरितांच जर शिक्षणाची जरूरी असेल तर त्यांची सावकारी जाहे, शेतजमीन आहे आणि चांगलं उत्पन्न आहे. मुख्य प्रश्न असा आहे कीं, आपल्या मुलीला सासरीं सुख होईल किंवा नाहीं ? त्या दृष्टीनें विचार केला तर सध्यांच्या स्थळासंबंधीं कुरकुर करण्यास आम्हांला बिलकूल जागा नाहीं. त्यांची सांपत्तिक स्थिति उत्तम आहे शिवाय तें प्रत्यक्ष माझ्या बहिणीचें घर आहे. ”

शंकरराव कांहीं बोलले नाहींत परंतु पंतांचें हें समर्थन त्यांना रुचलें नाहीं असें दिसतें आणि रुचणार तरी कसें ? त्यांच्या सारख्या बाह्य भपक्याला भुलणाऱ्या सुधारकांना जांवई पसंत पडायचा म्हणजे तो एखादा बी. ए. किंवा एम्. एच ! मग तो ग्रॅज्यूएट पोष्टांत का नोकर असेना ? फक्त तो ग्रॅज्यूएट आहे यांतच ते समाधान मानणार ? पंत जर पूर्वीपासून आपल्या शब्दानें बांधले गेले नसते तर त्यांना ग्रॅज्यूएट जांवई नको होता अशांतला प्रश्न नाहीं. तथापि एवढी गोष्ट मात्र खरी कीं, जांवयाची निवड करतांना त्यांनीं सारासार विचार केला असता.

असो. हळुहळू दिवस सरून व्याही मंडळी हरिपुराहून पुण्यांत आली. गणेशपंतांचा खुद्द सांगलींत एक वाडा होता परंतु वडील निवर्तल्यावर ते हरिपुरांत रहावयास आले. तेथें जुन्या वस्तींत त्यांचें एक घर होतें. आणि तेथें रहाणें त्यांच्या घरच्या सावकारी धंद्याला फार श्रेयस्कर पडत असे. त्यांना हरिपुरकर सावकार म्हणत असत, खुद्द गणेशपंतांचें शिक्षणहि कामा पुरतेंच होतें. त्यामुळें त्यांनीं रघुनाथाच्या शिक्षणाकडे दुर्लक्ष केलें असें मात्र नाहीं. त्यावेळीं सांगलींत इंग्रजी शिक्षण इतकें सवंग झालें नव्हतें. प्राथमिक शिक्षणाच्या एक दोन शाळा होत्या. परंतु त्याच संधीला ते हरिपुरांत आल्यामुळें मुलाला इतक्या लांब कोण पाठवितो अशा विचारांत तो प्रश्न तसाच राहिला. शिवाय त्या शिक्षणावांचून त्याचें कांहीं अडण्यासारखेंहि नव्हतें. गणेशपंत पुण्यांत आल्यावर त्यांचें व त्यांच्या बरोबर आलेल्या वऱ्हाडी मंडळीचें तें खेडेगांवचें वळण पाहून सर्वांना आश्चर्य वाटलें. जयरामपंत चांगले सुशिक्षित हुद्देदार असे असून त्यांनीं आपली बहिण अशा खेडवळाच्या घरीं कशी दिली याचें मंडळींना आश्चर्य वाटलें यांत विशेष नवल नाहीं. परंतु खरी वस्तुस्थिति अशी होती कीं, जयरामपंतांचे वडील

पूर्वी सांगली संस्थानांत नोकरीस होते. त्यावेळीं त्यांचा आणि रामकृष्णपंत साव-कार यांचा स्नेह जुळला. पुढें ह्या स्नेहसंबंधाचें स्थित्यंतर शरीरसंबंधांत झालें. त्यांनीं आपली मुलगी मनुताई त्यांच्या मुलाला-गणेशपंतांना दिली. त्यावेळीं सांगलींत इंग्रजी शाळाच नव्हती. त्यामुळें गणेशपंत इंग्रजी शिक्षणाला पारखे झाले. जयरामपंतांना मात्र त्यांच्या वडिलांनीं शिक्षणाकरितां पुण्यांत ठेवलें. आपल्या मुलाबरोबर जांवयासहि पुण्याला पाठवावें अशी त्यांची इच्छा होती परंतु घरच्या उद्योगधंद्यामुळें रामकृष्णपंतांनीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. असो.

जयरामपंतांना स्वतःच्या घरची व्यवस्था करणें असल्यामुळें व्याह्यांचा परामर्ष घेण्याचें काम त्यांनीं शंकररावांकडे सोंपविलें होतें. ती मंडळी आली त्याच दिवशीं रात्रीं त्यांची व्यवस्था लावून शंकरराव घरीं आल्यावर जवतांना त्यांच्या गोष्टी निघाल्या. त्यावेळीं त्यांचीं दोन्हीं मुलें, यशवंत आणि शांता हीं सारखीं हांसूं लागलीं. तें पाहून शंकरराव आपल्या पत्नीला म्हणाले, " पंतांनीं जांवयाची निवड केली पण ती आपणांला नाहीं पसंत. अगदींच तीं माणसं जंगली दिसतात. "

" असं कसं भलतंच बोलणं हें ! " पार्वतीबाई म्हणाली, " किती झालं तरी तो त्यांचा प्रत्यक्ष भाचा आहे त्याला जंगली असायला काय झालं ? "

" अग आई, तूं अद्यापि त्याला पाहिलें नाहीं म्हणून ! " यशवंत मध्येंच म्हणाला, " ह्या शांतोला विचार त्या नवरदेवाचा पोषाख कसा आहे तो ? काय बाळ लग्नाला यायचं म्हणून सजलं होतं ! "

" मला वाटलं, कमूला सासर श्रीमंत पाहिलं आहे तेव्हां तिचा नवरा चांगला असेल पण पाहते तों काय ?—बाबा म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. जंगलीं माणसं नाहीं तर काय ? "

" पण शांते नवरदेवाचा पोषाख कसा होता तें सांग आईला म्हणजे तिला समजेल," यशवंत म्हणाला, " त्याचा तो गबाळासारखा पोषाख आणि लहान पोरासारखे दागिने ! त्याला पाहून आमचीं दोघाचीं हांसून हांसून पोटं दुखलीं."

यशवंत सांगत होता त्यांत अतिशयोक्ति नव्हती. परंतु त्याबद्दल त्या मंडळींना हांसण्याचें कांहीं कारण नव्हतें. बूट-सूट आणि नेकटाय्-कॉलर ह्या सुधारकी पोषाखाचा मुंबई–पुण्यांत जो सर्वत्र प्रेग भडकला आहे, त्याचा वारा अद्यापि हरिपुरांत गेला नव्हता त्यामुळें ती मंडळी पोषाखांत साधी दिसली यांत नवल तें काय ? पोषाखावरून दुसऱ्याला गबाळ म्हणणाऱ्या ह्या पोषाखी सुधारकांची

‘ अंदरकी बात ’ कोण जाणे ! त्यांच्या त्या दिखाऊ थाटमाटाला भुलून जर एखादा उंदिर त्यांच्या घरीं पाहुणा गेला तर तो उपाशींच मरायचा !

“ बरं आतां पुष्कळ हांसलांत. ” थोड्या वेळानें शंकरराव म्हणाले. “ हं पहा यशवंत, तुला उद्यांपासून इस्टरची रजा आहे तेव्हां तूं त्या मुलांना पर्वती, बंड तसेंच एके दिवशीं चतरसिंगी हीं स्थळं दाखवून आण. येथें अल्यासारखं ते पुणं तरी पाहतील. ”

“ मी नाहीं–मी नाहीं ! बाबा, मला तें काम सांगू नका. त्यांना अशा गचाळ पोषाखांत बरोबर घेऊन मी फिरायला लागलों तर मला लोक हांसतील. ”

वाचकहो ! शंकररावांच्या मुलांच्या मनावर झालेले संस्कार चांगले किंवा वाईट याचा आपणच विचार करा. आजकाल शहरांत राहाणाऱ्यांस–स्वतःला सुधारक म्हणवून घेणाऱ्या ह्या मंडळीस, लोकांना [illegible] किंवा स्वतःच्या आवडीकरितां आपल्या घरादारांत सर्व सुधारकी थाट करणं कदाचित् अवश्य असेल, त्याबद्दल त्यांना दोष देणें चालू मन्वंतरांत चुकीचें होईल किंवा कदाचित् तो अपराध म्हणून देखील गणला जाईल. परंतु आमचा असा प्रश्न आहे कीं, पोषाखांत सुधारणा नसल्यामुळें त्याच्या [illegible] त्यांच्या बरोबर शरीरसंबंध तर राहोच पण त्यांच्याबरोबर रस्त्यांतून जाण्यासहि अशा मंडळींना संकट पडावें काय ? आतांपर्यंतच्या वरील वर्णनावरून आणि पार्वतीबाईनें आपल्या झकपक दिवाणखान्याचें सुमतीबाईजवळ केलेल्या वर्णनावरून शंकररावाचें वागणें व राहणें अगदीं ‘ अप् टु डेट फयाशनचें’ होतें अशी आपली खात्री झालीच असेल. अशा एखाद्या सुधारकाचें चित्र काढून आपणास वरील प्रश्नाचें उत्तर काय मिळतें तें पाहूं या. समजा कीं, एक सुधारक गृहस्थ एका रविवारीं आपल्या दिवाणखान्यांत मित्रमंडळीबरोबर गप्पा मारीत वातावरणांत चिरूटाचा धूर सोडीत इझिचेअरवर बसले आहेत. त्यांच्या अंगांत कॉलर लावलेले शर्ट, डोळ्याला सोनेरी फ्रेमचा चष्मा, सोगा सोडलेलें धोतर आणि खालीं सतरंजी आंथरलेली होती तरी पायांत पातळ जोडे अशा थाटांत बसले असतां त्यांचे तीन पिढ्यांपूर्वींचे कोकणांत रहाणारे पूर्वज आपल्या त्यावेळच्या सभ्य आणि भारदस्त पोषाखांत—अंगांत बनातीचे बाराबंदीचें कुडतें, खांद्यावर एक फडकें, डोक्यावर चक्रीसारखें एक पागोटें, आणि गुडघ्यापर्यंत पंचा अशा थाटांत त्यांच्याजवळ येऊन उभे राहिले तर त्या सुधारक गृहस्थाच्या मनाची काय स्थिति होईल बरें ? आपले हे पूर्वज आहेत, असें आपल्या मित्रमंडळींना

कळण्यापूर्वीच आपणास मरण येईल तर बरें! असेच विचार त्यांच्या मनांत खास येतील, असें आम्हांला वाटतें. असे हे वडिलांची-केवळ त्यांच्या पोषाखा-मुळें–ओळख देण्यास नाखुष असलेले सुधारक आपल्या गरीब देशबंधूबरोबर कसे वागत असतील हें उघडच दिसत आहे. पोषाखांत सुधारणा झाली म्हणजे देश सुधारत नाहीं. खरी सुधारणा ही नव्हे. सुधारक म्हणविणारे आपल्या पोषाखा-बरोबर आपल्या मनाची सुधारणा करतील तरच ते खरे सुधारक!

## ३........ स्त्रीविरुद्ध

लग्न आटोपलें. चार दिवस गडबडीचे गेले गणेशपंतांनीं आपणाबरोबर आणलेल्या वऱ्हाडी मंडळींत रघुनाथाचे दोन समवयस्क मित्र गण्या बापू आणि श्रीधर मन्या हे होते. आणि ते होते म्हणूनच त्यांच्या धीरावर आणि त्यांच्या संगतींत हे रघुनाथाचे गडबडीचे दिवस पार पडले. कारण यशवंत आणि शांता त्याची पावलों पावलीं थट्टा करीत होते. पंतांनीं आपल्या जांवईबुवांना लग्नांत पोषाख दिला होता, तो पोषाख घालून रघुनाथ श्वशुरगृहीं जेवणाकरितां आज आला होता. सर्व मंडळी दिवाणखान्यांत बसली होती. थट्टा करण्याकरितां कांहीं साधन मिळेल तर पहावें म्हणून इकडे तिकडे पहात यशवंत जवळच बसला होता इतक्यांत रघुनाथानें अंगांत घातलेल्या रेशमी कोटाकडे त्यांची नजर गेली. घाईघाईनें कोटाचीं बटणें घालतांना वर खालीं झालीं होतीं. शिवाय आंत असलेल्या शर्टची कॉलर वर आली होती. तें पाहून यशवंत म्हणाला, "अहो जांवईबुवा, ह्या बंडीची गुंडी अशी नाहीं घालायची!" ही कांहीं तुमच्या सांगलीच्या शिंपीदादानें शिवलेली बाराबंदी नव्हे! त्याला पारशीफ्याशन कोट म्हणतात बरें! आणि ह्या आंत घातलेल्या विलायती कुडत्याची गळपट्टी ही अशी वर नाहीं येऊं द्यायची! आतां पुढल्या खेपेस पुण्यास याल तेव्हां कमू-जवळून चांगलें शिकून या–She will be your master to teach you the fashion."

यशवंताच्या मनासारखें झालें! त्याच्या ह्या भाषणानें मंडळींत हंशा पिकला. परंतु बिचारा रघुनाथ अगदीं खजील झाला. आपण व्याही मंडळीची, विशेषतः जांवईबापूची थट्टा करतो त्याचा परिणाम पुढें काय होणार आहे, याची एकाला

देखील त्या वेळीं कल्पना झाली नाहीं. गणेशपंत ही सर्व थट्टा हांसण्यावर घालवीत होते. परंतु रघुनाथ मात्र अगदीं रडकुंडीस आला होता. आपण हरिपुरास केव्हां जातों असें त्याला झालें होतें.

शेवटीं मंडळी हरिपुरास परत जाण्याचा दिवस उजाडला. नवीन सुनबाईस आपल्याबरोबर न्यावें अशी प्रथम गणेशपंतांची इच्छा होती. परंतु कांहीं कारणामुळें तो बेत रहीत झाला. सर्व मंडळी स्टेशनवर आली. रघुनाथ आणि त्याचे मित्र एका डब्यांत बसले. तेव्हां गण्या बापू म्हणाला, " रघुनाथ, आतां तुला कसं वाटतंरे ?–पिंजऱ्यांतून बाहेर पडलेल्या पक्ष्यासारखें वाटतें ना ? "

" खरंच बुवा. आतां कुठें माझा जीव थंड झाला. त्या मंडळींनीं मला अगदीं सळो कीं पळो करून सोडलें होतें. "

" खरंच सांगूं तुला रघुनाथ—" मध्येंच श्रीधर मन्या म्हणाला, " हें तुझं लग्न आपल्या हरिपुरास व्हावयास पाहिजे होतें, म्हणजे त्या येश्याची थट्टा आम्ही चांगलीच जिरविली असती. पण काय करणार ? नाइलाज झाला. आपण त्यांच्या गांवीं गेल्यामुळें पूर्ण कचाट्यांत सांपडलों गेलों आपल्या हरिपुरांत जर हें लग्न झालं असतं तर त्याच्या प्रत्येक शब्दाला मी त्याच्या डोळ्यापुढें काजवे चमकाविले असते. "

" बाकी तूं कांहीं म्हण रघुनाथ. ही तुझ्या मामाची मुलगी आहे म्हणून आम्ही जास्त बोलत नाहीं. तरी पण तूं हें लग्न करून फसलास. तिचींहि म्हणे इंग्रजी दोनचार पुस्तकें झालीं आहेत. तेव्हां तीहि त्या शांतीसारखीच फटकळ असणार. "

" यांत काय संशय ! त्या लग्नाच्या गडबडींत आपल्याला तिचे गुण दिसून आले नाहींत पण आतां लवकरच ती हरिपुरास आल्यावर दिसतील. किती झालं तरी ती पुण्यासारख्या शहरांत वाढलेली आहे, आणि त्यांतून ती इंग्रजी शिकलेली आहे. आणि तुला तर इंग्रजीचा गंध नाहीं तेव्हां मी खात्रीनें सांगतों रघुनाथ, ती तुझ्या डोक्यावर खास मिरी वाटील. "

रघुनाथ आपल्या मित्राचें भाषण मुकाट्यानें ऐकत होता. ते म्हणतात ती प्रत्येक गोष्ट खरी आहे, असें त्याला वाटूं लागलें आपण आपल्या आईचें ऐकून मामाच्या मुलीबरोबर लग्न करण्यास ' हो ' म्हटलें, ही [illegible] मोठी चुक झाली आणि त्या चुकीचा परिणाम आपण आपल्या गळ्यांत एक घोरपड बांधून घेतली हा विचार त्याच्या मनांत येऊन त्याचें मन अस्वस्थ झालें. हरिपुरांत

येईपर्यंत त्याचें चित्त ठिकाणावर नव्हतें. परंतु हरिपुरांत पाय टेवतांच त्याच्या मनाची अस्वस्थता एकदम नाहींशी झाली. आपण एकदां नदींत केव्हां पोहायला जातों असें त्याला झालें. एखादा चुकलेला पाडा आपला कळप दृष्टीला पडतांच जसा आनंदित होतो तशी स्थिति नदी दृष्टीस पडतांच रघुनाथाची झाली. स्वच्छंदानें आपल्या मित्रांसह रोज तासदोनतास कृष्णा नदींत डुंबल्याशिवाय तसेंच बोरें, करवंदं, चिंचा, यांच्या प्राप्तीसाठीं रोज दोनचार झाडांवर चढल्याशिवाय ज्याचा एक दिवसहि जात नसे त्यानें लग्नाप्रीत्यर्थ कां होईना, गेले आठ दहा दिवस पुण्यांत कसे बरें काढले असतील ?—केवळ तोंड दाबून बुक्यांचाच मार तो.

रघुनाथाला नुकतेंच अटरावें वर्ष संपून एकोणिसावें वर्ष लागलें होतें. तो रूपानें निमगोरा असून शरिरानें सदृढ होता. स्वभावानें मात्र तो फार हट्टी आणि धाडशी होता. कोणतीहि एखादी अवघड गोष्ट करायची झाली आणि ती आपणांकडून होणार नाहीं असें वाटलें म्हणजे त्याची मित्रमंडळी ती गोष्ट त्याच्या मनांत भरवून देत असत. आणि रघुनाथहि आपल्या स्वभावानुरूप ती गोष्ट वाटेल तें करून पार पाडीत असे. सकाळीं दोन चार कुळांकडे पैशाच्या वसुलीकरितां किंवा वसुली नसल्यास वडिलांजवळ बसून रोजखर्ड्यावरून जमाखर्च तपशीलवार आणि सुरेख अक्षरांत पान अर्धा पान कीर्द लिहून झाली कीं तो मोकळा होत असे. दुपारच्या प्रहरीं शेतावर किंवा मळयांत घटका दोन घटका घालविल्यावर त्याची मित्रमंडळी आपापले उद्योग आटोपून त्याच्याकडे येऊन एकत्र जमत असत. मग लंगोरी, विटीदांडू, पोहणें इत्यादि अनेक खेळांपैकीं बहुमतानें जें कांहीं टरेल तो खेळ काळोख होईपर्यंत चालायचा. मग तेथून घरीं आल्यावर देवाचा धूपदीप होऊन जेवण आटोपल्यावर दुसऱ्या दिवशीं करायचें एखादं विशेष काम असल्यास गणेशपंत त्याला हांक मारीत असत. नाहींतर तो खुशाल झोंपत असे. असा हा आठ महिने चाललेला त्याचा दिनक्रम शेतकीच्या दिवसांत मात्र बदलत असे. असो.

घरीं येतांच रघुनाथाचें मन पुनः आपल्या नित्य व्यवसायांत गुंतलें. आपलें लग्न झालें आतां आपणावर एक मोठी जबाबदारी येऊन पडली आहे, याची त्याला एकदां देखील कल्पना झाली नाहीं. अशा रीतीनें दिवसामागून आठवडे आणि महिने लोटतां लोटतां दिवाळीचा सण जवळ आला. मध्यंतरी गणपति-उत्सवाकरितां चार दिवस रघुनाथाला पुण्यास पाठवावें अशा अर्थाचें पंतांनीं

मनुताईला पत्र लिहिलें होतें. परंतु घरचा गणपति उत्सव सोडून रघुनाथाला जातां येणं शक्य नव्हतें. त्यानंतर हा दिवाळ सण आला. ह्या सणाचें खरें महत्त्व खेड्यापाड्यांतील लोकांना जितकें वाटतें तितकें तें शहरांतील लोकांना वाटत नाहीं. मुंबईसारख्या शहरांत दिव्याची रोशनाई होते, तशी जरी खेड्यापाड्यांतील लोकांना करतां येणें शक्य नसलें तरी त्यांना आनंद देणाऱ्या गोष्टी कांहीं निराळयाच असतात. महिन्याच्या पगाराच्या आठवड्यांत दिवाळी आली तर शहरच्या लोकांची दिवाळी असते पण शेतकरी वर्गाची दिवाळी मेघराजानें पूर्ण कृपा केलेली असल्यास किती अवर्णनीय होत असेल बरें ! यंदा चांगला पाऊस पडून सर्व पीक हातीं आलें असल्यामुळें गणेशपंतांचीं सर्व कुळें खुषींत होतीं. त्या सर्वांनीं 'नव्या वहिनीबाईना दिवाळ सणाकरितां येथें आणवा' असा आग्रह केल्यावरून नाइलाजास्तव गणेशपंतांनीं पुण्यास पत्र लिहिलें. वास्तविक जांवयाला दिवाळसणाकरितां जावयाचें असतें आणि त्याप्रमाणें पंतांनीं रघुनाथला बोलाविण्याकरितां मनुष्य पाठविण्याची तयारीहि केली होती. इतक्यांत गणेशपंतांचें पत्र आलें. पत्रांत 'रूढीविरुद्ध आपण मुलीला बोलावीत आहोंत पण यंदा पिकपाणी उत्तम असून सर्व कुळें आनंदांत आहेत आणि त्यांना नव्या 'नोवरी' ला पाहण्याची उत्कंठा आहे, तेव्हां आपण रूढीकडे लक्ष न देतां केवळ कुळांच्या आनंदाकरितां मुलीला पाठवावें. आमची कुळें आनंदी तर आम्ही आनंदी हें आपण विसरूं नये.' असा आग्रह पाहून रूढीकडे लक्ष न देतां दोन नोकर बरोबर देऊन पंतांनीं कमलिनीला पाठवून दिलें. परंतु पाठविण्यापूर्वी सुमतीबाईनें तिला सासरीं गेल्यावर कसें वागायचें याचा पहिला धडा दिला होता. आणि कमलिनीनें सासरीं आल्यावर तो धडा योग्य रीतीनें गिरविलाहि. कमलिनीचें सासरचें नांव सीता असें ठेविलें होतें. परंतु रघुनाथची मित्रमंडळी तिला इतर कुळांप्रमाणें 'वहिनीबाई' असें न म्हणतां त्यांनीं तिचें नांव 'पंडिताबाई' असें ठेविलें होतें.

ती येणार असें कळतांच सर्वांना तो एक थट्टेचा विषय सांपडला 'आतां पंडिताबाई आल्यावर त्यांच्या तैनातींत तुझा सर्व दिवस जाईल. आतां तुला आमच्याबरोबर बोलायला फुरसद देखील मिळायची नाहीं' असें प्रत्येकजण रघुनाथाला बोलूं लागला. परंतु आपली बायको आल्यानंतर कसें वागायचें तें त्यानें मनांत ठरवून ठेविलें होतें. गण्या बापू आणि श्रीधर मन्या हे दोघे रघुनाथाचे मित्र आपल्या वहिनीला आणण्याकरितां गाडी घेऊन सांगली स्टेशनावर गेले होते. कमलिनीला

पाहतांच आपण तिला 'पंडिताबाई' हें नांव अगदीं यथार्थ दिलें असेंच त्यांना वाटलें तिनें अंगांत फुगऱ्या हाताचा पोलका घातला होता. पायांत जांभळया मखमालीचा बूट असून ती रेशमी लुगडें नेसली होती, तिनें पोलक्याच्या खिशांत ठेवलेला रुमाल स्पष्ट दिसत होता. तसेंच तिनें सैल बुचडा बांधला असून अंगावर दोनच पण ठळक दागिने घातले होते. स्टेशनावर उतरल्यापासून सर्वजण तिच्याकडे टकमक पाहूं लागले. हरीपुरांत त्यांची गाडी येतांच तिला पाहून तिच्या पोषाखाचेंच सर्वांना कौतुक वाटूं लागलें. तिचा लांब आणि फुगऱ्या हाताचा पोलका पाहून बायकाही पुरुषासारखी बंडी घालतात व पायांत पुरुषाप्रमाणें बूट घालतात हें पाहून त्या खेडवळ स्त्रियांना आश्चर्य कां वाटूं नये ? ती गाडींतून उतरून घरांत येतांच तिच्या मागें शेजार पाजारच्या बायकांचा आणि मुलींचा घोळका जमला त्यामुळें कमलिनी अगदीं गोंधळून गेली. तिनें त्या गोंधळलेल्या स्थितींत आपल्या सासुसासऱ्याच्या चरणांचें वंदन केलें. तेव्हां गणेशपंतांनीं तिला मामुली-आठ पुत्र होण्याचा आशीर्वाद दिला. परंतु त्यांना तिचा पोषाख आवडला नाहीं असें त्यांच्या मुद्रेवरून दिसलें. मनुताई कांहीं बोलली नाहीं. कमलिनी आपलीच आहे तेव्हां तिला आपण आपल्या वळणांत सहज घेऊं अशी तिची खात्री होती. तिच्या बरोबर पंतांनीं आपल्या ताईला एक पत्र दिलें होतें. त्यांत 'मुलीला चार दिवसांनीं परत पाठवावें नाहीं तर तिची शाळा बुडेल' अशा अर्थाचा मजकूर होता. त्याप्रमाणें रात्रीं तिनें आपल्या पतीजवळ गोष्ट काढिली. आतां मुलीनें इंग्रजी शाळेंत जाऊं नये असें त्याचें मत होतें. परंतु बराच वेळ त्या गोष्टीचा खल झाल्यावर गणेशपंत म्हणाले, "तूं तिची तरफदारी करणारच ! तुझ्या भावाचीच मुलगी ती, तेव्हां तिचा कड तुला यायचाच ? बरं तुझी इच्छाच असेल तर ती घरीं असेपर्यंत तिला शिकूं दे. शिकली म्हणून कांहीं वाईट नाहीं. विद्याच आहे ती !"

कमलिनी चार दिवस राहिली. मनुताईनें तिला चार दिवसांत घरची आठवण होऊं दिली नाहीं तरी देखील तिला करमलें नाहीं; परंतु एक गोष्ट मात्र तिला करतां आली. ती सासरीं येतांना तिला सुमतीबाईनें ज्या अनेक गोष्टी शिकवून ठेविल्या होत्या, त्यांत हा तुझा सासरी जाण्याचा पहिलाच प्रसंग आहे; तेव्हां तेथें गेल्यावर तुला आपल्या सासरची शिस्त कशी आहे, मंडळीची वागण्याची पद्धत कशी आहे, घरांत विशेष चालीरीति कोणत्या आहेत, इत्यादि सर्व गोष्टी तूं नीट अवलोकन करून ठेव, म्हणजे पुढल्या खेपेस तूं सासरीं जाशील तेव्हां तुला स्वतःचें धोरण कसें ठेवावें हें कळेल.' इत्यादि गोष्टी सांगितल्या होत्या. त्याप्रमाणें चार

दिवस कमलिनीनें आपल्या संसारचें निरीक्षण चालविलें होतें. शिवाय तिला पाहण्याकरितां गणेशपंतांचीं कुळें रोज येत असत. ती सर्व अज्ञान मंडळी खरी ! तथापि आपल्या सासऱ्यावर त्या सर्वांचें इतकें प्रेम पाहून तिला एक प्रकारचा आनंद झाला. मनुताईहि त्या सर्वांना प्रेमानें वागवित असे आणि आपल्या कुळाकरितां तिला प्रत्येक दिवाळींत फार मोठ्या प्रमाणावर दिवाळीचें तळण काढावें लागे. ह्या वर्षी दिवाळीची मिठाई कुळांच्या पदरांत घालायचें काम ' नव्या वहिनीबाई 'कडे होतें आणि ती तें काम मोठ्या प्रेमानें करीत होती. ह्या चार दिवसांत रघुनाथाचा घरांत विशेष पाय ठरला नहीं. परंतु मनुताईनें तिकडे लक्ष दिलें नाहीं. सून घरांत येण्याचा हा पहिलाच प्रसंग आहे तेव्हां मुलाकडून लज्जेमुळें असें वर्तन होणें साहजिक आहे असें समजून ती कांहीं बोलली नाहीं. परंतु त्याची मित्र मंडळी त्याला फार बोलत होती.

" रघुनाथ, तूं असा आमच्या मध्यें येऊन बसतोस म्हणून आम्हाला आनंदच आहे पण तूं मात्र स्वतःचें फार मोठें नुकसान करून घेतोस. वास्तविक आतां पंडिताबाई तुझ्या घरीं आल्या आहेत. तेव्हां त्यांच्या पायाजवळ बसून त्या अतिशहाण्या यशवंतरावानें सांगितल्याप्रमाणें ' फ्याशन ' कशी असते, ती सर्व तूं शिकून घेतलेली पाहिजे. " अशा रीतीनें सर्वजण रघुनाथाची पाठ पुरवीत होते. परंतु त्यानें मुक्याचें व्रत धारण केलें होतें. फार झालें तर तो सर्व गोष्टी हासण्यावर घालवी.

चौथ्या दिवशीं गणेशपंतांनीं मुलीच्या अंगावर एक ठळक दागिना घातला आणि उंची खणलुगडें देऊन त्याचप्रमाणें तिच्याबरोबर आलेल्या दोन नोकरांस धोतरें आणि पैरणी देऊन तिची परत रवानगी केली. शांती तर तिची अगदीं चातकपक्षासारखी वाट पहात होती. दिवाळीसारख्या मोठ्या आणि पहिल्याच सणाला जांवयाला न बोलावितां उलट मुलीला सासरीं पाठविली, म्हणून शेजार-पाजारच्या बायका सुमतीबाईला दोष देऊं लागल्या. परंतु ' आतां एक लग्न झालं म्हणून ! नाहीं तरी मनुवन्संचं घर आम्हांला कांहीं परकं आहे का ? ' असें उलट विचारून तिनें त्या बायकांना गप्प बसायला लावलें. कमलिनी परत आल्यावर आईनें तिला सर्व हकीकत विचारून घेतली. पंतांनीं कांहीं प्रश्न विचारून आपल्या बहिणीची खबरबात विचारली. नंतर शांतीनें तिला आपल्या घरीं नेलें. तिन चार दिवस कसे घालविले ? तें घर किती मोठें आहे ? तें किती खणाचें आहे ? खुर्च्या, टेबल इत्यादि वस्तूंनीं दिवाणखाना

कसा सजविला आहे ? इत्यादि अनेक प्रश्न करून शांती तिच्या सासरची हकीकत विचारून घेत होती. यशवंत जवळच एका आराम खुर्चीवर बसून इंग्रजी कादंबरी वाचीत होता. आणि मधून मधून तिला प्रश्न विचारीत होता. यंदा तो आणि वसंत असे दोघेही प्रवेश परिक्षेला बसले होते. कालच त्यांची परीक्षा आटोपून तो आज सकाळीं मुंबईहून आला होता.

" मग कमू, तुझी बसायू उठायची अगदीं अडचण झाली असेल ? " शांतीनें विचारलें, " खुर्च्या नाहींत कांहीं नाहींत, मग ती मंडळी काय जमिनीवरचे बसतात ? " कमलिनीच्या सासरीं खुर्च्या, टेबलें नाहींत हें ऐकून तिला फार आश्चर्य वाटलें. ती पुढें म्हणाली, " इश्श ! मला जर असं सासर मिळालं तर मी नाहीं पुनः त्या घरीं जायची ! "

" पण तूं लग्न तरी करणार आहेस का ? " कमलिनीनें हांसत विचारलें.

" तोहि एक प्रश्नच आहे. पण सांगतें, यदाकदाचित् लग्न केलें आणि—"

" शांते, तूं त्याची नको काळजी करूं. बाबा कांहीं तुला अशा 'इडिअट' ( वेड्या ) जंगली माणसांच्या घरीं देत नाहींत ही खात्री ठेव." मध्येंच यशवंत म्हणाला.

" तें कांहीं जरी असलें तरी माझ्या 'चॉईस' ( आवडी ) शिवाय मी कांहीं लग्न करणार नाहीं. "

" बरं पण कमू, तो तुझा 'इडिअट' नवरा चार दिवसांत कांहीं बोलला का तुझ्याबरोबर ? "

यशवंताचा हा प्रश्न ऐकतांच कमलिनीला राग आला. ती कांहींच बोलली नाहीं. तेव्हां त्यानें पुनः विचारलें, " तो कसला तुझ्याबरोबर बोलणार ? बोलून चालून तो इडिअटच ! "

" दादा ! "—शांती आपल्या भावाला दादा म्हणत असे म्हणून कमलिनीहि यशवंताला त्याच नांवानें हांका मारी. ती आतां रागानें एकदम उठून म्हणाली, " दादा ! अशीं भलतीं सलतीं नांवं ठेऊन असे भलते सलते प्रश्न विचारणें तुला शोभत नाहीं ! शांते ! जातें आतां मी. आतां मी तुझ्याकडे नाहीं यायची असे भलते प्रश्न ऐकायला ! " असें म्हणून रागानें ती तेथून निघाली.

---

नाताळची रजा आली. चार दिवस रघुनाथाला पुण्यास पाठवावें असें पंतांनीं आपल्या मेहुण्यास पत्र लिहिलें. दिवाळींत आलेल्या जांवयाला जें कांहीं द्यावयाचें तें आतां आपण जांवयाला बोलावून देऊं अशी सुमतीबाईची इच्छा होती. मुलाला पाठवून द्यावें असें पत्र आल्यावर गणेशपंतांनीं आपल्या मुलाला पुण्यास जाण्याची तयारी करण्यास सांगितलें. परंतु रघुनाथ पुण्यास जाण्यास तयार होईना. त्याला श्वशूरगृहीं जाण्यास एक प्रकारची भीति वाटत होती. आपण पुण्यास जात नाहीं, असें त्यानें आपल्या आईला सांगितलें. मनुताईनें त्याची पुष्कळ प्रकारें समजूत केली. परंतु तो ऐकेना. शेवटीं मुलगा पुण्यास जात नाहीं, ही गोष्ट तिनें पतीच्या कानावर घातली. गणेशपंतांना अतिशय राग आला 'तुला गेलेंच पाहिजे. माझ्या पत्राला मान देऊन दिवाळींत चालीरीतीला न जुमानतां त्यांनीं मुलीला पाठविलें आणि आतां ते तुला बोलावित आहेत, तेव्हां तुला जायला काय होतें ? ते कांहीं कुणी परके आहेत काय ? मामाच्या घरीं जाण्यास तुला लाज कसली ?' अशा रीतीनें रागानें पण सामोपचारानें सांगून त्यानीं रडतराऊत पुण्यास जाण्यास तयार केला. रघुनाथाची कुरकुर सुरूच होती. लग्नांत आलेल्या अनुभवावरून आतां आपण एकटेच पुण्यास गेल्यास आपली स्थिति काय होईल याचें चित्र त्याला डोळयापुढें दिसूं लागलें. शेवटीं 'श्रीधर मन्या किंवा गण्या बापू ह्यांच्या पैकीं कोणीतरी आपल्याबरोबर पुण्यास पाठवा' असा त्यानें आईजवळ हट्ट घेतला. आणि गणेशपंतांनीं नाइलाजास्तव तें कबूल केलें.

दुसऱ्या दिवशीं रघुनाथ आणि त्याचे दोन मित्र पुण्यास जाण्याच्या तयारीला लागले. गणेशपंतांनीं त्याप्रमाणें पुण्यास पत्र लिहिलें, हें पत्र त्यांनीं पोष्टांत टाकून मुलांची रवानगी केली गाडींत त्यांची थट्टामस्करी चालू होती तथापि रघुनाथाच्या पोटांत एक मोठा गोळा उठला होता, त्याच्या मनांत नाना-प्रकारचे विचार येत होते. आपण पुण्यास जाण्याकरितां होय म्हटलें ही मोठी चुकी केली असें आतां त्याला वाटूं लागलें. होतां होतां ते तिघेजण संध्याकाळीं पुण्याच्या स्टेशनवर उतरले. आतां पुढें काय करायचें त्याबद्दल त्या तिघांत चर्चा सुरू झाली. गण्याबापू म्हणाला, 'हें पहा रघुनाथ, तुझ्या बाबांनीं जरी आम्हांला तुझ्याबरोबर पाठविलें आहे तरी आम्ही तुझ्या सासरीं मात्र येणार नाहीं. तेथें जवळच एक खाणावळ आहे तुझ्या लग्नांत येथें आलों होतों तेव्हां मी एक

खाणावळ पाहून ठेविली आहे. आपण बुवा तेथें जाणार. तुझ्या पंडिताबाईच्या घरीं आम्हीं आलों तर तेथें आमची रेवडी उडवितील. तुला पाहिजे तर तुला तुझ्या मामाचें घर आम्ही लांबून दाखवितों. मग आम्हीं रात्रीं थोडा वेळ येऊं पाहिजे तर ! ”

“ होय बुवा, मलाहि असेंच वाटतं ! ” श्रीधर मन्या म्हणाला.

रघुनाथाला मोठा पेंच पडला. आपण सोबत म्हणून आपल्या मित्रांना बरोबर आणलें, परंतु ऐन वेळीं ते माघार घेतात हें पाहून त्याला कांहीं सुचेना. त्यानें आपल्या मित्रांना समजाविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला परंतु ते कांहीं केल्या ऐकेनात. तो म्हणाला, “ श्रीधर, गणू , हें कांहीं चांगलं नाहीं. मी तुम्हांला बरोबर कां आणलें आहे हें तुम्हांला माहिती असूनही तुम्ही आतां माघार घेतां हें तुम्हांला चांगलं दिसतं ना ? मी एकटा मामाच्या घरीं जाण्यास भितों असें नाहीं. पण-पण—”

“ त्या पंडिताबाईची तुला भीति वाटते काय ? अहारे वेड्या, बायकोला भितोस—”

“ भिण्याचा प्रश्न नाहीं. बायकोला काय भ्यायचं ! पण—”

“ पण तो यशवंत आणि ती शांती तुझी टर उडवितात म्हणून तुला काळजी पडली आहे वाटतं—”

अरे, त्या पहा–त्या पहा पंडिताबाई ! कसा तांडाच्या तांडा चालला आहे !” गण्याबापूनें पुलावरून शाळेंतून सुटून मुली घरीं जात होत्या त्यांच्याकडे बोट दाखवून म्हटलें.

गण्याबापूनें पंडिताबाई म्हणतांच रघुनाथाच्या छातींत एकदम धस्स झालें ! त्याच्या मनाची अशी स्थिति कां व्हावी हें कळत नाहीं. परंतु हा सर्व दोष त्याच्या मित्रांचा होता. ‘ तुझी बायको इंग्रजी शिकलेली आहे, ती तुझ्या डोक्यावर मिरी वाटील, ’ ह्या एका वाक्याचा हा सर्व परिणाम होता. रघुनाथानें बाजूला वळून पाहिलें तों खरोखरीच त्या सर्व मुली त्याला ‘ पंडिता ’ दिसल्या. उद्यापासून नाताळाची रजा असल्यामुळें आतां त्या मुली मोठ्या आनंदानें रमत रमत चालल्या होत्या. बहुतेक सर्व जणींच्या पोषाखाचा नमुना एकच होता. त्यांच्याकडे पहात रघुनाथ त्या मुलींची आणि आपल्या गांवच्या मुलींची मनांत तुलना करूं लागला. त्या मुली विनयशील आणि ह्या मुली त्याला छिचोर दिसूं लागल्या. त्यानें अद्यापि आपल्या बायकोला नीटपणें पाहिलें नव्हतें तरीं त्याच्या

मित्रांच्या सांगण्यावरून त्या ‘ पंडिताबाई ’ अशाच नटव्या आहेत अशी त्याच्या मनाची ठाम समजूत झाली. बराच वेळ त्या स्वछंदानें चाललेल्या मुलींकडे पाहून रघुनाथाच्या मनांत कांहीं विचार आला. इतक्यांत गण्याबापू म्हणाला, “ हं रघुनाथ. हें घे तुझं बोचकें. तो समोर दिसतो तो तुझ्या मामाचा वाडा. जा–” असें त्यानें म्हणतांच श्रीधर म्हणाला, “ आणि खिडकींत कोणी उभं आहे वाटतं ! हो–तुझ्या पंडिताबाईच त्या ! जा–रघुनाथ जा. त्या तुझं स्वागत करण्याकरितांच उभ्या आहेत. ”

त्यावेळीं खरोखरीच कमलिनी खिडकींत उभी होती. तिनें त्या तिघां मित्रांना पाहिलें परंतु तिला ओळख मात्र पटली नाहीं. त्या आठ दिवसांच्या लग्न गडबडींत तिनें आपल्या पतीचा चेहरा दोन चारदां पाहिला होता. परंतु मुंडावळी बांधलेल्या असल्यामुळें तो चेहरा तिच्या लक्षांत राहिला नव्हता. आपणांस पाहूनहि आपली बायको धिटाईनें खिडकींतच उभी आहे हें पाहून रघुनाथाला थोडेसें चमत्कारीक वाटलें. तो म्हणाला, “ गणू, तुम्हीं खाणावळींत जाणार तर. मला ती खाणावळ दाखवून ठेवा. ती पाहून मग मी मामाच्या घरीं जाईन.”

त्यांनीं पूर्वी पाहून ठेविलेली खाणावळ फार दूर नव्हती. तेथें जाऊन आपली व्यवस्था करून घेतल्यावर ‘ आम्ही रात्रीं येऊन तुला भेटूं ’ असें गणूनें सांगितल्यावर रघुनाथ बाहेर पडला. आतां पुढें काय करावें हें त्याला सुचेना. हळुहळू तो मामाच्या वाड्याजवळ आला. इतक्यांत समोरून यशवंत हातांत सायकल धरून हळुहळू येत असलेला त्याच्या दृष्टीस पडला. त्याच्याबरोबर वसंत होता. ते दोघे बोलण्याच्या नादांत असल्यामुळें आणि त्यांना पाहतांच चटकन् तोंड फिरवून रघुनाथ बाजूला वळल्यामुळें त्यांनीं त्याला ओळखलें नाहीं. त्या दोघांना चुकवून रघुनाथ बाजूच्या बोळांत शिरला. आपणास त्यांनीं पाहिलें नाहीं असें पाहून आपण मोठ्या संकटांतून सुटलों असें त्याला वाटलें. तो विचार करीत तसाच सरळ रस्त्यानें चालला होता. त्याच्या मनांत काय विचार चालले होते, तें कळण्याला मार्ग नव्हता, तरी त्याच्या चालण्याच्या गतीवरून तो परत फिरून मामाच्या घरीं जाईल असें मात्र दिसत नव्हतें त्याला पुण्याच्या रस्त्यांची बिलकूल माहिती नव्हती. लग्नांत तो आठ दिवस पुण्यांत होता. परंतु पर्वती व बंडगार्डन हीं दोन स्थळें पाहण्याकरितां तो टांग्यानेंच गेला होता. त्यामुळें कोणताहि रस्ता त्याच्या लक्षांत राहिला नव्हता. जातां जातां त्याला मोठी सडक लागली. आपण कुठें जात आहोंत हेंच त्याला कळेना. ह्या

मोठ्या रस्त्यावर टांगे, बायसिकली आणि मोटार गाड्या यांची रहदारी विशेष होती. बरेंच पुढें चालून गेल्यावर रस्त्याला लागूनच असलेल्या बागेंत टेनिस कोर्टवर कांहीं स्त्री पुरुष मंडळी टेनिस खेळतांना त्याच्या दृष्टीस पडली. दक्षिणी बायका कांस मारून पुरुषांच्या बरोबर चेंडू खेळतांना त्यानें आज प्रथमच पाहिलें. त्याला खेळत असलेल्या बायकांचें कौतुक वाटून बराच वेळ सडकेच्या कडेला उभें राहून त्यानें तो खेळ पाहिला. त्या खेळणाऱ्या स्त्रियाचें मोठमोठ्यानें बोलणें, पुरुषांच्या अंगाला चिटकून धांवणें, इंग्रजींत बोलून मोठ्यानें हांसणें इत्यादि प्रकार पाहून त्याला त्या बायकांचा तिरस्कार वाटला. इंग्रजी शिकलेल्या बायका असें अमर्याद वर्तन करतात, त्याचें हें चित्र आज त्यानें पाहिलें. आपली बायकोहि इंग्रजी शिकलेली आहे. तेव्हां तिच्या बाबतींतहि असाच प्रकार होणार आणि गण्याबापूनें म्हटल्याप्रमाणें 'ती आपल्या डोक्यावर मिरी वाटणार' हें भविष्य खरें होईल असें त्याला वाटूं लागलें. असो.

रात्रीं आठाच्या सुमारास श्रीधर आणि गणपति आपलें खाणावळींतील जेवण वगैरे आटोपून रघुनाथला कबूल केल्याप्रमाणें जयरामपंताच्या घरीं यावयास निघाले. वाड्याजवळ येतांच एकदम आंत जावें किंवा जाऊं नये असा त्यांना विचार पडला. बराच वेळ ते वाड्याच्या दरवाजाजवळ उभे राहिले. आपण आलों कीं नाहीं हें पाहण्याकरितां कदाचित् रघुनाथ खिडकींत येईल असें वाटून ते एकसारखे खिडकीकडे दृष्टि ठेऊन उभे होते. पुष्कळ वेळ झाला परंतु खिडकींत कोणीच येईना असें पाहून गणपतीनें हळूंच 'रघुनाथ' अशा हांका मारिल्या, त्यावेळीं जयरामपंत नुकतेच जेऊन विडा खात [illegible] बसले होते. बऱ्याच वेळानें बाहेर कोणी हांका मारित आहे असें त्यांना वाटलें. तेव्हां कोण आहे तें पाहण्याकरितां ते उठून खिडकीजवळ आले. गणपति आणि श्रीधर दरवाजाजवळ उभे होते, पंतांनीं त्यांना 'कोण पाहिजे ?' असें खिडकींतून विचारलें. तेव्हां त्यांनीं 'रघुनाथ आहे काय ?' असा उलट प्रश्न केला.

"रघुनाथ कोण ?"

"रघुनाथ हरिपूरकर."

आपल्या जांवयाचें नांव ऐकतांच पंत गोंधळले. मनुताईकडून आलेल्या पत्राप्रमाणें ते संध्याकाळपासून त्याचीच वाट पहात होते. त्यांनीं स्टेशनवर घरचा टांगा देखील पाठविला होता. दोन गाड्या येईपर्यंत वाट पाहून दिवे लावण्याच्या सुमारास टांगा परत आला आणि जांवईबुवा आले नाहींत असें घोडेवाल्यानें

सांगितलें. तेव्हां पत्र लिहिल्यानंतर कांहीं अकल्पित अडचण आल्यामुळें मुलाला आज पाठविलें नसेल असें समजून पंतांनीं आपलें भोजन नुकतेंच आटोपलें होतें. परंतु आतां कोणी रघुनाथाची चौकशी करीत आले आहेत असें पाहून त्यांना आश्चर्य वाटलें. त्यांनीं त्या मित्रद्वयांना वर बोलाविलें. त्यावेळीं कमलिनी दिवाणखान्यांतच होती. आपल्या पतीचें नांव ऐकतांच ती चटकन् आंत आली. आणि वर कोण येत आहे तें दरवाजाच्या फटींतून पाहूं लागली. थोडया वेळानें गणपति आणि श्रीधर वर आले. त्या दोघांना तिनें दिवाळींत सासरीं असतांना एकदोनदां पाहिलें होतें. ते आंत येतांच पंतांनींहि त्यांना ओळखलें.

"रघुनाथ कुठें आहे ?" असें नमस्कार करून गणपतीनें विचारलें.

"रघुनाथ कुठें आहे म्हणजे ? तो आज येणार होता परंतु आला नाहीं. तुम्हीं केव्हां सांगलीहून आलांत ?"

"आम्ही आणि तो आज बरोबरच आलों. आम्हीं खानावळींत गेलों आणि तो येथें आला."

"येथें आला ?—केव्हां ?" पंतांनीं आश्चर्यानें विचारलें.

"आम्ही पांचाच्या गाडीनें येथें आलों."

"मी स्टेशनवर टांगा पाठविला होता पण —"

आम्ही पायींच आलों, येथें आल्यावर आम्ही त्याला सांगूनच खाणावळींत गेलों. तोहि आमच्याबरोबर होता. आमची खाणावळ पाहून मग तो येथें येण्याकरितां निघाला. आम्ही खाणावळींत आमची व्यवस्था लावून आतां जेवण झाल्यावर त्याला कबूल केल्याप्रमाणें येथें आलों."

"पण तो येथें आला नाहीं आम्ही इतका वेळ त्याची वाट पाहिली. दोन गाड्या येईपर्यंत टांगा स्टेशनावर उभा होता. शेवटीं तो आज येत नाहीं असें आम्हांला वाटलें पण तुम्हीं आलांत मग खाणावळींत उतरण्याचें काय कारण होतें ?" असें म्हणून पंत थोडा वेळ गप्प राहिले. इतक्यांत त्याची आई, आणि तिच्या मागून सुमतीबाई तेथें आल्या, त्यांच्याकडे पहात पंत म्हणाले, "आई. ही पाहिलीस का मौज ? रघुनाथ संध्याकाळींच आला आहे पण अद्यापि तो येथें आला नाहीं. काय चमत्कारिक मुलगा आहे हा !"

सर्व मंडळींना रघुनाथाचें एक मोठें कोडें पडलें. शेवटीं पंतांनीं विचारल्यावरून गणपतीनें त्यांना सर्व हकीकत सांगितली. तेव्हां पंत म्हणाले, "काय वेडा मुलगा आहे हा ! इंगजी येत नाहीं म्हणून, तसंच आपल्या पोषाखावरून लोक आपली

थट्टा करतील म्हणून लाजण्याचें किंवा भिण्याचं काय कारण होतं ? अरे, तुम्ही आतां लहान अहांत म्हणून कोणीहि तुमची थट्टा करील, त्यांत काय मोठंसं ? इंग्रजी शिकलं म्हणजेच तो विद्वान होतो किंवा चांगले कपडे घातले म्हणजेच त्याला कोणी शहाणा म्हणतात असं थोडंच आहे ! काय वेडगळ समजूत ही ! पण आतां ह्याचा शोध तरी कसा करावा ? रस्ता चुकून हा भलतीकडेच तर नाहींना गेला ? " असें म्हणून पंत उठले. इतक्यांत शंकरराव सिगारेटचा धूर सोडीत आंत आले.

" काय हो पंत, आले का तुमचे जांवई ? "

" अहो कुठें आले आहेत जांवई ? हा सर्व त्यांनीं गोंधळ करून ठेवला आहे पहा !" असें म्हणून त्यांनीं शंकररावांना सर्व वृत्तांत निवेदन केला. आणि पुढें काय करावें म्हणून त्याचें मत विचारलें. परंतु ' मनुष्य पाठवून शोध करा आणि पत्ता लागला नाहीं तर सांगलीस तार करा ' ह्याशिवाय ते जास्त तें काय सांगणार ? पंतांनीं तात्काळ आपल्या नोकरांना पाठवून गणपति आणि श्रीधर यांना बरोबर घेऊन तेहि स्वतः बाहेर पडले. परंतु प्रथम त्यांनीं नोकराकडून त्या मित्रद्वयांचें सामान [illegible] आपल्या घरीं पाठविलें. नंतर ते मोठ्या सडकेवरून शोध करीत निघाले. रात्रीं अकरा वाजेपर्यंत त्यांनीं सर्व पुणं पालथें घातलें. नाक्या नाक्यावर पहारा करीत असलेल्या पोलिसाजवळ चौकशी केली. परंतु रघुनाथाचा त्यांना पत्ता लागला नाहीं. शेवटीं सकाळपर्यंत रघुनाथ येतो किंवा नाहीं तें पाहून तो आला नाहीं तर हरिपुरास तार करावयाची असें त्यांनीं ठरविलें. इकडे शंकरराव आपल्या घरीं आल्यावर त्यांनीं आपल्या मुलांना ती हकीकत सांगितली आणि म्हणाले, " यशवंत, हा तुझ्या आणि शांतीच्या थट्टेचा परिणाम बरं ? आणि त्यामुळें तो तेथे आला नाहीं. "

" आम्हीं काय केलं बाबा ? तो आहेच तसा ' इडिअट ' ! "

" तो कसाहि कां असेना, तुम्हाला त्याच्याशीं काय करायचं आहे ? आतां तुम्हाला सांगून ठेवतों तो जर आतां आला तर तुम्ही त्याच्या वाटेला जाऊं नका."

" आमचं काय अडलं आहे ! त्यादिवशीं दादा जरा बोलला तर ती कमू त्याच्यावर किती फणफणली आणि तोऱ्यानें निघून गेली. काय पण नवरा ! अहाहा ! दिवे ओवाळा दिवे ! "

" अग तो बोलून चालून इडिअट ! त्याला कसले ओवाळतेस दिवे ? "

" बरं बरं पुष्कळ झालं ! " शंकरराव किंचित् रागानें म्हणाले, " पण आतां पुनः सांगतों त्याच्याशीं तुम्हांला कांहीं एक कर्तव्य नाहीं. "

इकडे दुसऱ्या दिवशीं सकाळीं पुनः पंतांनीं रघुनाथाच्या शोधाला सुरवात केली. दहा वाजेपर्यंत त्यांनीं आपली शिकस्त केली. आणि शेवटीं हरिपुरास तार केली. सर्व मंडळींना ही एक व्यर्थ चिंता लागून राहिली.

दुपारीं एक वाजण्याचा सुमार झाला होता. गणेशपंत थोडा वेळ वामकुक्षि करून मळ्यावर जाण्याच्या तयारींत होते. आज रघुनाथ नसल्यामुळें तें काम त्यांच्याकडे आलें होतें. ते बाहेर पडणार इतक्यांत तार घेऊन पोष्टाचा शिपाई आला. आजपर्यंत त्यांच्या हयातींत त्यांना ही पहिलीच तार आली होती. कांहीं तरी कमी अधिक प्रकार असल्याशिवाय तार पाठवीत नाहींत हें त्यांना माहित होतें. त्यामुळें तार पाहून ते स्वाभाविकच घाबरले. मनुताईचीहि तीच स्थिति झाली. काल रघुनाथ येथून गेला आहे तेव्हां त्याला कांहीं झालें किंवा गाडीला अपघात झाला अगर गाडींत त्याला चोरानें मारलें, कीं काय झालें असें शेंकडों कुतर्क तिच्या डोक्यांत आले. गणेशपंतांना इंग्रजी येत नसल्यामुळें तारेंतील मजकूर कोणी तरी वाचून दाखवीपर्यंत त्यांना कांहीं एक कळण्याला मार्ग न व्हता. नाहीं म्हणायला पोष्टाच्या शिपायानें तार पुण्याहून आली आहे इतकेंच त्यांना सांगितलें. शेवटीं तारेंतील मजकुराचा उलगडा करून घेण्याकरितां गणेशपंत पोष्टांत जाण्याकरितां निघाले. ते जाऊन थोडा वेळ झाला नाहीं तोंच रघुनाथ घरीं आला. त्याला पाहतांच मनुताईला अत्यंत आश्चर्य वाटलें.

"अरे, तूं कसा आलास इतक्यांत ? भाऊकडे चार दिवस राहण्याकरितां ना गेला होतास तूं ?"

"कां आलो तें मला विचारूं नकोस. पण आई मला प्रथम कांहींतरी खायाला दे. मला अतिशय भूक लागली आहे."

"पण तूं आलास कां ? अरे मला कळूं तरी दे काय झालं तें ? ती आतां पुण्याहून तार आली. ती घेऊन ते गेले आहेत पोष्टांत. पण तूं आलास कां ? सांग ?"

"सांगितलं ना कीं मला कांहीं विचारूं नको म्हणून !" असें म्हणून त्यानें हातांतील बोचकें आणि टोपी कोपऱ्यांत फेंकून दिली आणि कपडे काढून तो विहीरीवर स्नानाकरितां गेला. मनुताई त्याच्याकडे पहातच राहिली. मुलगा पुण्यास जाऊन तेथें कांहीं तरी गडबड होऊनच तो परत आला आहे आणि त्याकरितांच भाऊनें तार पाठविली असावी असें तिला वाटलें. परंतु खरा प्रकार काय आहे, तो रघुनाथाशिवाय कळणें शक्य नाहीं. आणि तो तर रागांत दिसतो. तर प्रथम त्याच्या भुकेची व्यवस्था करावी आणि मग सामोपचारानें त्याच्याकडून

सर्व हकीकत काढून घ्यावी असा विचार करून ती स्वयंपाकघरांत गेली. थोडा वेळ झाला नाहीं तोंच गणेशपंत परत आले आणि स्वयंपाकघरांत जाऊन म्हणाले, " ऐकलंस का ? ही पुण्याहून पंतांनीं तार पाठविली आहे. ते म्हणतात, काल गणू आणि श्रीधर त्यांच्या घरीं आले पण रघ्याचा मात्र पत्ता नाहीं. सर्व शहरभर रात्रीपासून शोधाशोध चालविली आहे पण—"

" रघु आतांच आला घरीं—"

" काय रघ्या इकडे आला ? कुठें आहे तो ? "

" तो विहीरीवर गेला आहे स्नानाला. पण थांबा आतांच नका त्याला बोलूं तो रागांत आहे—"

पण गणेशपंतांनीं पत्नीच्या भाषणाकडे लक्ष दिलें नाहीं. त्यांनीं माजघरांतूनच ' रघुनाथ ' अशी मोठ्यानें पण रागानें हांक मारिली. रघुनाथानें नुकतीच स्नानाला सुरवात केली होती. परंतु वडिलांचा शब्द ऐकतांच तो तसाच आंत आला आणि दरवाजाजवळ उभा राहिला.

" कायरे रघुनाथ, ही काय भानगड आहे ? तूं पुण्याला गेला होतास आणि मामाकडे कां गेलास नाहीं ?—तुला पुण्यांत पाठविलं होतं कशाला ?—कां आलास परत ?—बोल ? आतां कशानें तुझें तोंड शिवलं ? कायरे उभा राहिलास दगडा सारखा ! तुला एवढं पुण्यांत पाठविलं तें असा पाजीपण करायला पाठविलं होतं का ! बोल–का गेलास नाहींस मामाकडे ? कायरे ए घंढा—थोबड कशानें मिटलं ! एवढा तूं पुण्यास गेला, त्या दोघांना पुढं पाठविलंस आणि तूं का गेला नाहींस ? काय—सांगतोस आतां मुकाट्यानें, कीं हालवूं तुझी बत्तिशी ?—

" रघू असा उभा राहून काय करतोस ? " मनुताई पुढं होऊन म्हणाली, " तूं का गेला नाहींस ? काय झालं तें सांग ? तूं सांगितल्याशिवाय तरी खरी हकीकत आम्हाला कशी कळावी ? "

" कायरे, बोलतोस की रंगवूं मुस्कट ! " असें म्हणून गणेशपंत रागानें पुढें झाले तेव्हां मनुताई मध्यस्थी होऊन तिनें रघुनाथाला मागें केलें.

रघुनाथ त्या वेळीं तर बोलला नाहींच परंतु त्यापुढें केव्हांहि, पुण्याहून एकाएकीं परत येण्याचें कारण त्यानें कोणालाहि सांगितलें नाहीं. तो कांहींच सांगत नाहीं असें पाहून शेवटीं निरुपायास्तव गोपाळपंत पुनः पोष्टांत गेले आणि ' रघुनाथ येथें परत आला. आपण काळजी करूं नये ' अशी त्यांनीं जयरामपंतांना उलट तार केली.

दुसऱ्या दिवशीं गणपति आणि श्रीधर परत आले.

---

सणामागून सण जाऊं लागले. दुसरी दिवाळी होऊन गेली. पंत आपल्या जांवयाला बोलाविण्याचे नांव काढीनात किंवा गणेशपंत आपल्या सुनेला पाठवा असें पत्र लिहिनात ! बाकी त्यांचा नेहमींप्रमाणें पत्रव्यवहार सुरू होता, पण ‘ येथील क्षेम आहे. आपली खुशाली कळवा. आशीर्वाद–नमस्कार इ. ’ औपचारिक मजकूर त्या पत्रांत असे. आपण बोलाविल्याप्रमाणें जांवई पुण्यांत येऊन आपल्या घरीं आला नाहीं, व तो कां आला नाहीं याचीं पंतांना अद्यापि कारणें कळलीं नव्हतीं. त्यामुळेंच रागानेंच त्यांनीं जांवयाला बोलाविण्याचें नांव काढलें नाहीं. परंतु म्हातारी आणि सुमतीबाई मधून मधून जांवयाला पुनः एखाद्या सणाकरितां बोलाविण्याचा आग्रह करीत असत. इकडे गणेशपंतांचीहि तशीच स्थिति झाली होती.

कमलिनी पांचव्या इयत्तेंत चढली होती. तिचा अभ्यास फारच उत्तम प्रकारें चालला होता. शांति तिच्याच वर्गांत होती. परंतु त्या दोघींमध्यें पुष्कळ तफावत दिसून येत असे. शांति जितकी मानी पोषाखाची शोकी होती, तितकीच कमलिनी मन मिळाऊ आणि पोषाखांत साधी होती. आणि हें साधें वळण तिला सुमतीबाईकडून मिळालें होतें. रघुनाथ पुण्यांत येऊन तो आपणाकडे आला नाहीं, त्यावेळीं त्याच्या मित्रांना पंतांनीं तो न येण्याचें कारण विचारलें. तेव्हां जी हकीगत सांगितली, त्यावरून सुमतीबाईनें धोरण बांधून ठेविलें होतें. कमलिनीचें इंग्रजी शिक्षण, तिचा पोषाख ह्यावर जांवईबुवांचा कटाक्ष आहे असें जाणून तिनें मुलीच्या पोषाखाचें वळण बदललें. परंतु इंग्रजी शिक्षणांत तिला बदल करतां येईना. कारण मुलीचा इंग्रजी शिक्षणाकडे पहिल्यापासूनच जास्त ओढा होता. त्यामुळें तिला शाळेंत जाऊं देणें त्यांना भाग पडलें. तथापि तिचा भावी आयुष्यक्रम सुखाचा व्हावा म्हणून सासरीं तिला कसें वागलें पाहिजे, त्याच-प्रमाणें त्या मंडळीच्या चालीरीति, वागण्याची तऱ्हा, त्यांचे स्वभाव इत्यादि सर्व गोष्टींचा विचार करून ती आपल्या मुलीला वेळोवेळीं कथापुराणांतील गोष्टी सांगत असे.

एके दिवशीं जयरामपंत नेहमींप्रमाणें कचेरींतून आल्यावर त्यांनीं एक आनंदाची बातमी सांगितली. आपल्या पतीची मोठ्या पगारावर पुढल्या महिन्यापासून मुंबईत बदली झाली आहे हें आनंदाचें वृत्त ऐकून तितक्याच

आनंदानें सुमतीबाई म्हणाली, " तुम्हीं आम्हाला ही जितकी आनंदाची गोष्ट सांगितली तितकीच आनंदाची गोष्ट मी तुम्हांला सांगतें. "

" सांग –आजचा आनंदाचा दिवस आहे म्हणायचा ! पण कमू कुठें आहे ?"

" ती–ती–तिला–" असें अडखळत म्हणत सुमतीबाईनें आपल्या पतीच्या अगदीं जवळ जाऊन कांहीं शब्द उच्चारले त्याबरोबर पंत म्हणाले, " वा: मग तर आजच्या आज मनुताईला पत्र लिहिलं पाहिजे . "

" अरे जयराम, तुला कळली का बातमी ? " आपला मुलगा कचेरींतून आला असें कळतांच म्हातारी बाहेर येऊन म्हणाली.

" कळली, ही आतांच हिनें सांगितली. "

" आतां एकदां माझी बाय नवऱ्याबरोबर चांगली नांदायली लागली आणि मी तें ऐकलं म्हणजे माझा–म्हातारीचा जीव शांत होईल. "

" आई म्हाताऱ्या माणसांच्या आशा अशा मारुतीच्या शेंपटासारख्या वाढत्या असतात का ग ? " आपल्या वडिलांचा हा चमत्कारिक प्रश्न ऐकून इतका वेळ दरवाजा आड लपलेली कमलिनी पुढें झाली तेव्हां तिच्याकडे पहात पंत पुढें म्हणाले, " दोन वर्षांपूर्वीं हिच्या लग्नांत तुझी आशा गुंतली होती. त्यावेळीं तूंच म्हणत होतीस माझा घडीचा भरंवसा नाहीं. आणि आतां पुनः मारुतीच्या शेंपटासारखी तुझी आशा आहेच ! "

" आहे म्हणजे !–माझ्या बायला उदंड आयुष्य आणि अखंड सुख मिळेल बरं !"

" तथास्तु ! " शंकरराव आंत येऊन म्हणाले, ' वडील माणसांचा आशीर्वाद फलद्रुप व्हावयाचाच ! पण काय हो पंत, आज तुम्हाला नातु झाला म्हणे ? तुम्ही आणि मी असे दोघेहि आज एकाच दिवशीं आजोबा झालों म्हणायचें ! "

" म्हणजे ?—"

" आज आमच्या शांतीनेंहि—"

" काय म्हणतां ! वा; आनंद आहे. आतां तिसरी आनंदाची गोष्ट सांगतों. माझी पुढल्या महिन्यापासून साडेतिनश्यांवर ++ ऑफिसमध्यें बदली झाली."

" ओः !–मग मी मनापासून आपलें अभिनंदन करतों पण पंत हें ऑफिस कुठलं म्हणलंत ? "

" ++ ऑफिस. मुंबईत जाणार आम्हीं आतां ! "

" अरेरे ! तुम्ही आम्हाला सोडून जाणार तर ? "

त्याच रात्रीं पंतांनीं आपल्या बहिणीला पत्र लिहिलें. रघुनाथ पुण्याहून येऊन

गेल्यानंतर इतकें मोठें पत्र त्यांनीं हें पहिलेंच लिहिलें होतें. पत्र फार मोठें होतें खरें परंतु मुख्य मुद्दे दोनच होते. पहिला–कमलिनीला ऋतुदर्शन आणि दुसरा–मुंबईस बढतीवर बदली. शिवाय पत्रांत असें लिहिलें होतें कीं, ‘ इतके दिवस आपण मुलीला घरीं बोलाविलें नाहीं, त्याचें आम्हांला कांहीं विशेष वाटलें नाहीं. परंतु आतां मात्र मुलीला येथें ठेवतां येत नाहीं. ती इंग्रजी शिकलेली आहे. याबद्दल जर चि. रघुनाथाच्या मनांत कांहीं विकल्प असेल, तर तो फोल आहे.

त्या शिक्षणाबरोबर अलीकडे कांहीं मुलींच्या अंगीं नटवेपणा आणि छिचोरपणा यांचा वारा शिरतो, त्यापासून ती अलिप्त आहे. सौभाग्यवतीनें आणि मी ह्याबद्दल शक्य तितकी काळजी घेतली असून आपल्या घराण्यानें बालबोध वळणांत मिळविलेला लौकिक कायम राखला आहे. आतां ह्या महिन्याच्या अखेर आम्हीं मुंबईस जाणार तेव्हां तिला नव्या घरीं नेऊन तेथून एखादा चांगला दिवस पाहून आपणाकडे पाठवून देऊं. इत्यादि.’ मजकूर होता.

दुसऱ्या दिवसापासून त्यांची मुंबईंत जाण्याच्या तयारीची सुरवात झाली. पंतांनीं आपल्या एक दोन मुंबईकर मित्रांना पत्रें लिहून आपणाकरितां जागा पाहण्यास सांगितलें. कमलिनी आतां शाळेंत जाण्याची बंद झाली. ती आतां जाणार म्हणून शांतीला एक प्रकारचा आनंद झाला. जरी ती कमलिनीला आपली मैत्रीण म्हणून म्हणत असे; तथापि त्या एकाच वर्गांत असून जवळ जवळ रहात असल्यामुळें अभ्यासाची गोष्ट निघतांच प्रथम कमलिनीचें नांव निघे. त्यामुळें आणि तिच्या विनयशील व साध्या वर्तनाबद्दल होत असलेल्या प्रशंसेमुळें शांतीच्या मनांत मत्सरानें शिरकाव केला होता.

दुसऱ्या दिवशीं पंत आपलें पुण्यातलें बिऱ्हाड मोडून मुंबईस जाणार त्याच्या आधल्या दिवशीं शंकररावांनीं त्यांना आपल्या घरीं मेजवानी दिली. त्या वेळीं रात्रीं जेवण झाल्यावर पंतांनीं विचारलें, “ पण शंकरराव, शांतीच्या लग्नाचा केव्हां विचार करणार ? ”

अद्यापि थोडा अवकाश आहे. मी प्रौढ विवाहाच्या मताचा मनुष्य, तिचं एवढ्या लवकर लग्न करीन असं का तुम्हांला वाटतं ? तिनं स्वतःच आपला नवरा पसंत करावा अशी माझी इच्छा आहे, आणि अशाच रीतीनें परस्परांच्या आवडीनें विवाह झाले पाहिजेत आणि जोंपर्यंत असे विवाह होणार नाहींत तोंपर्यंत आपली पुढील पिढी कर्तृत्ववान्, कसदार आणि हिमती निघावी अशी आशा करणें व्यर्थ आहे.”

" हे आपले विचार उत्तम आहेत आणि माझींहि तींच मतें आहेत. परंतु तुमचा एक विचार मात्र मला पसंत नाहीं."

" कोणता ? "

" मुलांच्या आवडीवर त्यांच्या विवाहाचा प्रश्न सोंपविणें. मुलगा किंवा मुलगी प्रौढ जरी झाली तरी त्यांना अनुभव काय असणार ? आजकाल आपण जर एखाद्या शिकलेल्या प्रौढ मुलाला स्वतःची वधू पसंत करण्यास सांगितलें तर तो आपल्यासारखीच शिकलेली पण सुंदर मुलगी पसंत करील त्याचप्रमाणें मुलीचा प्रकार. तीहि स्वतःच्या मताप्रमाणें शिकलेला, सुंदर आणि आपल्या इच्छा पुऱ्या करणारा नवरा पसंत करील. परंतु त्या पसंतींत अनुभवाच्या अभावीं मुलीला किंवा मुलाला तिचा किंवा त्याचा स्वभाव, सवयी वागणुक इत्यादि महत्त्वाच्या बाबी कळत नाहींत आणि त्याचमुळें प्रौढ विवाहापासून आपण योजलेली कार्यसिद्धि न होतां भलताच परिणाम आपल्या दृष्टीस पडतो. प्रौढ विवाह वाईट असें मी केव्हांही म्हणणार नाहीं. उलट सध्यांच्या काळीं तो अगदीं अवश्य आहे. तथापि मी आतां सांगितलेल्या–स्वभाव सवयी आणि वागणूक ह्या महत्त्वाच्या बाबीकडे किंचितहि दुर्लक्ष होतां उपयोगी नाहीं. आणि असें जर दुर्लक्ष झालें तर परिणाम काय होतो हें, आम्ही ह्या प्रौढ विवाहांत ज्यांचें अनुकरण करतों त्यांचेंच उदाहरण पहा! पाश्चात्य वधुवरें प्रौढवयस्क असतात, लग्नापूर्वी ती एकमेकांचें प्रेम संपादन करण्यांत कित्येक दिवस घालवितात. तीं परस्परांस प्राणाहून प्रिय वाटतात, लग्न करण्यास उभयतांची पूर्ण संमत्ति असते, आणि तीं परस्परांच्या बंधनांत जर आपल्या राजीखुषीनें लग्नानें बद्ध होतात, तर मग त्यांची काडी मोडणारांची संख्या कां मोठी ! याचें कारण मी सांगितलेल्या वरील महत्त्वाच्या बाबी होत. तीं वधुवरें प्रौढवयस्क असतात, एकमेकांच्या परिचयांत-कोर्टिंगमध्यें-पुष्कळ दिवस घालवितात. पण आपणाला हीच बायको मिळावी किंवा हाच नवरा मिळावा म्हणून आपला मूळ स्वभाव, सवयी आणि वागणूक प्रगट न करतां फक्त आपल्या प्रेमाचेंच प्रदर्शन करतात. आणि लग्न झाल्यावर निष्काळजी होतात तेव्हां त्यांचे खरे गुणदोष बाहेर पडतात आणि त्याचें पर्यवसान काडी मोडण्यांत होतें. आमच्या समाजांत कोर्टिंग करण्यापर्यंत मजल आली नाहीं. बाप कितीहि सुधारलेला असो, तो आपल्या प्रौढ मुलीला तिनें पसंत केलेल्या तरुणाबरोबर लग्नापूर्वी पाश्चात्य वधुवराप्रमाणें परस्पराचें प्रेम संपादन करण्याचे स्वच्छंदी चाळे करूं देणार नाहीं. अशी जर खरी वस्तुस्थिति आहे तर मग प्रौढविवाह होऊनहि त्यांचे

स्वभावमिलन व्हावें केव्हां ? आजकाल आम्ही बालविवाहापासून आपण पुष्कळ तोटे दाखवितों परंतु त्या विवाहापासून हा मोठा फायदा होत असे. लग्न झाल्यापासून वधुवरांच्या एकत्र मिलनाच्या दिवसापर्यंत मध्यंतरीं जो चार दोन वर्षांचा काळ जातो तितक्या अवधींत तीं परस्परांचा स्वभाव-आवडी निवडी यांचा अभ्यास करीत असतात, आपलेपणाची त्यांना जाणीव होत असते. परंतु मुख्य मुद्याची गोष्ट ह्याहिपेक्षां अगदीं निराळी आहे स्थितिपरत्वें तुम्ही आज बालविवाह चालू ठेवा किंवा प्रौढविवाह प्रचारांत आणा. परंतु जोंपर्यंत मातापित्यानें किंवा वडील मंडळीनें आपल्या मुलांमुलींना आर्यसंस्कृतीची गृहशिक्षा देण्याची जबाबदारी ओळखली नाहीं तोंपर्यंत हा गोंधळ चालायचाच अशी माझी खात्री आहे."

पंतांचें सर्व भाषण शंकररावांनीं मुकाट्यानें ऐकून घेतलें. त्यांना पंतांचा प्रत्येक मुद्दा पटला. आणि स्वतःची चुकी त्यांना स्पष्ट दिसूं लागली. आपला मुलगा यशवंत आणि मुलगी शांती कॉलेजांत आणि शाळेंत जाऊन शिकतात पण त्यांना आपणाकडून गृहशिक्षण नाहीं हे विचार त्यांच्या मनांत येतांच त्यांचें मन गडबडलें ! वाचकहो, तुम्ही आपल्या मुलामुलींना वाटेल तितकें शिकवा पण त्याबरोबर आपल्या गृहशिक्षणाला खळ पडूं देऊं नका.

"पंत, आपण म्हणतां तें अक्षरशः खरें आहे." बऱ्याच वेळानें शंकरराव म्हणाले, "आमचा यशवंत आतां दोन वर्षांनीं ग्रॅज्यूएट होईल. तेव्हां स्वतःचें हिताहित कळण्यापर्यंत त्याची बुद्धि पक्क झाली आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आतां राहिला प्रश्न शांतीचा. पण तिच्याकरितां मी वर योजना करून ठेविली आहे. जोशांचा वसंत आमच्याकडे नेहमीं येत असतो. तो काय वाईट आहे ?"

तो वाईट आहे असं मी केव्हां म्हटलं ? मला तर त्याचा अभिमान आहे. फक्त माझं म्हणणं इतकंच कीं, ह्या अलीकडे मिळत असलेल्या एकांगी शिक्षणावर भिस्त न ठेवतां प्रत्येक मातापित्यानें गृहशिक्षणावर जास्त भिस्त ठेविली पाहिजे. आणि पुढें मुलांमुलींचें कल्याण करील तर हेंच शिक्षण करील." अशा-रीतीनें बोलण्यांत बरीच रात्र झाली असें पाहून पंत उठले.

पंतांनीं मुंबईत भर वस्तीमध्यें गिरगांवांत एक स्वतंत्र बंगला घेतला होता आणि तो त्यांच्या इतमामाला साजेसा होता. त्यांच्या मित्रांनीं बंगल्यांत सर्व व्यवस्था करून ठेविल्यामुळें पंत आपल्या मंडळीसह येतांच त्यांना कोणत्याच

प्रकारची तेथें न्यूनता वाटली नहीं. दोन दिवस ह्या नव्या स्थलाचें नाविन्य अनुभवून होतांच पंतांचा दिनक्रम पुनः पूर्ववत् सुरू झाला. तिसऱ्या दिवशीं ते आपल्या नव्या कचेरींत कामावर रुजू झाले. इतक्यांत 'मुलीला पाठवून द्यावी' अशा अर्थाचें गणेशपंतांचें हरिपुराहून पत्र आलें तेव्हां कमलिनीला पाठविण्या-करितां पंतांनीं दिवस पाहिला. त्यावरून तिला सासरीं जाण्यास अद्यापि पंधरा दिवसाचा अवकाश होता. तोंपर्यंत तिचा सर्व वेळ आई आणि आजी यांच्याजवळ बसून कांहीं तरी संसारोपयोगी शिकण्यांत गेला. सुमतीबाईनें तितक्या अवधींत तिच्याकडून सावित्री, सीमंतिनी, दमयंती इत्यादि पतिसेवातत्पर साध्वींचीं चरित्रें-आख्यानें वाचून घेतलीं. शेवटीं तिचा सासरीं जाण्याचा दिवस उगवला. पंतांनीं योग्य सोबत देऊन तिची रवानगी केली.

---

## दे......... पहिली रात्र

धरावं तर चावतं, सोडावं तर बाधतं ! अशी चमत्कारिक स्थिति रघुनाथची झाली. कमलिनी सासरीं येऊन आज सहा दिवस झाले होते. गेले पांच दिवस त्यानें बाहेरच्या बाहेर काढले. फक्त कामापुरता त्याचा पाय घरांत ठरत होता. परंतु आज मात्र त्याचा नाइलाज झाला. आज घरांत ऋतुशांतीचा विधि व्हाव-याचा होता. तेव्हां आज घरांतून बाहेर पडलास तर तूं आपला विचार करून ठेव' अशी गणेशपंतांनीं त्याला सकाळींच तंबी दिली होती व मनुताईनें शक्य तितकें करून समजाविण्याचा प्रयत्न करून शेवटीं डोळयांत पाणी आणलें होतें त्यामुळें तो अडला होता. अखेर होणारा विधि कसाबसा एकदांचा पार पडला.

रात्रीं दहाचा सुमार झाला होता. रघुनाथ आज आला नाहीं म्हणून गणपति आणि श्रीधर आपल्या इतर मित्रमंडळींना घेऊन त्याच्या घरीं आले होते. रघुनाथची थट्टा करण्यास त्यांना आजच्यासारखा दुसरा प्रसंग केव्हां येणार ! त्यांच्या थट्टेचा विषय अरे रघुनाथ, जा बुवा तूं आतां. त्या पंडिताबाई तुझी सारखी वाट पहात असतील. अरे वेड्या, आज तुझी-' हा होता. अशा ह्या थट्टेंत दहा वाजले. गणेशपंत आंतल्या बाजूला झोंपले होते. मनुताई मात्र जागी होती. त्यांच्या घरांत आजुबाजूच्या जमलेल्या बायका आणि मुली केव्हांच आपापल्या घरीं गेल्या होत्या. खेडेगांवांत आठ वाजले म्हणजे फार रात्र झाली

असें लोक समजतात. त्याप्रमाणें जेवण वगैरे उरकून आठांच्या आंत बायका मुली निघून गेल्या. पुढें नेहमीच्या संवयीप्रमाणें गणेशपंतहि झोंपले.

" अरे गणू, आतां किती वेळ तुम्ही बसणार ? " शेवटीं मनुताई बाहेर येऊन म्हणाली "

" नाहीं—आम्हीं केव्हांच जाणार होतों पण हा तुमचा रघुनाथच आम्हांला सोडीत नाहीं "

" काय खोटं बोलतोस गण्या ? "

आपल्या थट्टेची समाप्ति करून थोड्या वेळानें रघुनाथाची मित्रमंडळी निघून गेल्यावर मनुताईनें त्याला आंत आणलें. ' मी येथेंच झोंपतों ' अशी त्याची गुणगुण चालली होती. परंतु मोठ्या मिनतवारीनें त्याला वर पाठवून मनुताईनें दरवाजा बंद करून घेतला. वाचकहो ! आजच्या दिवसाचें खरें महत्त्व जाणून आपण थोडावेळ माडीवर जाऊं या. ती पहा कमलिनी खोलींत घडवंचीजवळ जाजमावर बसली आहे. गणेशपंत सावकार होते. परंतु त्यांच्या घरीं खुर्च्या टेब- लांचा थाट नव्हता. आज जमलेल्या शेजारपाजारच्या मुली आणि बायका आठ वाजेपर्यंत तिची करमणूक करण्याकरितां होत्या. त्यांच्या बरोबर कमलिनी अगदीं मोकळया मनानें बोलण्याचा प्रयत्न करीत होती. परंतु त्या सर्वजणींच्या मनांत तिच्या विषयीं एक प्रकारची दहशत बसली होती. पूर्वी दिवाळींत ती आली होती त्या वेळीं ती लहानच दिसत होती. परंतु आतां तिच्यांत पुष्कळ फरक पडला होता. आतां ती वयांत आल्यामुळें तिचा तो भारदस्त शरीरबांधा, शहरांतलें वळण आणि पोषाख पाहून आणि ती इंग्रजी शिकली आहे, ' ती मोठी पंडिता आहे ' ही गांवांत उठलेली हूल ऐकून त्यांना दहशत बसली यांत नवल नाहीं. शांती सारख्या तिच्या परिचयाच्या मुली जर आज तेथें असल्या तर त्यांनीं थट्टा विनोदाचे काय काय प्रकार केले असते त्याची गणतीच करतां येईना ! परंतु आज कमलिनीजवळ जमलेल्या बायका मुली अगदीं नवख्या. परिचय होऊन चारच दिवस झालेले. आणि त्यांतून त्यांच्या मनावर ' पंडिताबाई ' विषयीं दहशत बसलेली. असो. रात्र होतांच सर्वजणीं निघून गेल्यावर कमलिनी एकटीच राहिली. तेव्हां आईच्या सांगण्याप्रमाणें ' आजपासून आपणाकडे गृहिणि- पदाची भूमिका आली, आपल्या नव्या आयुष्याला सुरवात झाली ' हे विचार तिच्या मनांत घोळूं लागले. आपणाविषयीं—आपल्या शिक्षणाच्या पोषाखाच्या वगैरे बाबतींत पतीचें मन कलुषित झालें आहे, याची तिला कल्पना देखील

नव्हता. सुमतीबाई आणि पंत याना रघुनाथाच्या वर्तनावरून किंचित् संशय आला होता परंतु त्यांनीं आपल्या मुलीला मात्र त्या संशयाची जाणीव होऊं दिली नव्हती. ' तुझ्या सासरचें वळण अगदीं बालबोध आहे, तेव्हां तुला अगदीं साध्या रीतीनें राहण्याची संवय केली पाहिजे. ह्या मुख्य मुद्यावर सुमतीबाईनें तिची मनो-भूमी तयार केली होती लहान असतांना तिच्या इंग्रजी शिक्षणाला सुरवात झाली त्यावेळी ती इतर मुलींसारखी स्वाभावीकच शेफारली होती आजीनें तिला एकादें काम सांगितलें, किंवा एखाद्या वेळीं देवाचें गंध उगाळून ठेववयास सांगितलें. अथवा चार तुळशीची पानें आणावयास सांगितलीं तर 'मला नाहीं वेळ मला अभ्यास करायचा आहे, असें ती उत्तर देत असे. अशा रीतीनें उत्तर देऊन तिनें काम केलें नाहीं तरी घरांत नोकर चाकर अस-ल्यामुळें म्हातारीचें काम अडत नसे, त्यामुळें, ' पोरीची जात आहे ! ' असें म्हणून ती कमलिनीच्या त्या वर्तनाकडे दुर्लक्ष करीत असे. परंतु हा प्रकार सुमतीबाईच्या लक्षांत येतांच ती मुलीला तिचें शेफारलेलें किंवा दांडगेपणाचें उत्तर ऐकतांच मोडून काढूं लागली. तथापि त्याचाही कांहीं परिणाम झाला नाहीं शाळेतून घरीं आल्यावर किंवा रजा असेल त्या दिवशीं तिचा आणि शांतीचा धांगडधिंगा चालू असे. पंतांची ती लाडकी असल्यामुळें ते तिला कांहीं बोलत नसत. परंतु पुढें असाच एक प्रसंग आला कीं त्यामुळें आपली आई किंवा आजी आपणास जें सांगतात तें आपल्या हिताचें आहे अशी तिची पूर्ण खात्री झाली आणि तिनें आपलें वर्तन सुधारलें. तो प्रसंग असा—

कमलिनीच्या उजव्या हाताच्या मनगटावर थोड्या पुळया उठल्या. त्या जागेला अतिशय कंडू सुटून एकदोन दिवसांत तेथें एक मोठा नायटा दिसूं लागला. प्रथम तिनें त्याकडे दुर्लक्ष केलें. परंतु कंड फार होऊं लागल्यामुळें तिनें आईला सांगितलें. सुमतीबाईनें ' थोडी तुळशींतील माती लाव म्हणजे बरा होईल. ' असा साधा उपाय सांगितला. पण ' मातीनें काय होणार ? असें समजून तिनें वडिलांना सांगितलें. त्यांनीं कचेरींतून येतांना डॉक्टरकडून मलम आणलें. दोन चार दिवस झाले, कंडू कमी न होतां उलट नायटा पसरत चालला. तेव्हां एके दिवशीं सकाळीं पंतांनीं तिला डॉक्टरकडे नेली. त्यानें दुसरें मलम आणि पोटांत रक्तशुद्धीकरितां औषध दिलें. आणखी चार सहा दिवस गेले. नायटा कमी न होतां तो वाढतच चालला. कमलिनी अगदीं कंटाळली. पुढें एके दिवशीं ती आजीजवळ बसून मलम चोळीत होती. तें पाहून म्हातारीनें

विचारलें, " कमू, तुझ्या हाताला झालंय काय ? " तेव्हां तिनें हात पुढें केला. म्हातारीनें तो नायटा आहे असें तत्काळ ओळखलें आणि ती म्हणाली " पोरी, हा नायटा ! पाहिलंस–मी सांगतें तें तुला खरं वाटत नाहीं. पण हा पहा, आलाना प्रत्यय ! अग हा अनाचार बरं ! ह्याला मलम लावून काय होणार आहे तुम्हांला देव नको धर्म नको त्याचं हें फळ. शाळेंतून आल्यावर नाहीं परकर सोडायचा, नाहीं पाय धुवायचे आणि त्याच वस्त्रांनीं सर्व घरभर नाचायचं हें का चांगलं ! तुझी पोरीची जात. तुला किती जपून वागलं पाहिजे. जा–आतां तो शाळेंत नेसून गेलेला परकर सोड. ते कपडे बदल आणि पाय धुवून ये. उठ–" कमलिनी नायट्याला त्रासलीच होती तेव्हां मुकाट्यानें उठून आजीनें सांगितल्याप्रमाणें तिनें केलें. ती पुनः जवळ आल्यावर आजीनें तिला मागीलदारीं नेलें आणि तुळशी-पुढें उभें राहून म्हातारी हात जोडून म्हणाली, " आई–माते ! पोरीच्या हातून कांहीं अनाचार झाला असेल तर तो तिला क्षमा कर. तिचा नायटा बरा होऊं दे. उद्यांपासून ती तुला अकरा प्रदक्षिणा घालील इ० " असें म्हणून तिनें कम-लिनीला पायां पडायला सांगितलें. नंतर तिनें तुळशीचीं चार पानें तोडून तीं मातींत कुसकुरलीं आणि तीं चोळून कमलिनीच्या हाताला लावलीं. हा आजीनें केलेला प्रकार तिच्या मनांत ठसला. त्याचा परिणाम तिच्या हातावर झाला. त्या रात्रीं तिच्या हाताची कंडू पुष्कळ कमी झाली. दुसऱ्या दिवशीं पाहते तों नायट्या-वर खपली धरलेली तिच्या दृष्टीस पडली. इतका तात्काळ अनुभव येतांच त्या पोरीची श्रद्धा का बसणार नाहीं ! आजी आणि आई सांगते त्याप्रमाणें खरो-खरीच आपणाकडून भ्रष्टाकार होतो असें तिला वाटून साहाजिकच तिच्या वर्तनाची दिशा बदलली. ती नियमानें स्नान केल्यावर तुळशीला प्रदक्षिणा घालूं लागली. पुढें दोन तीन दिवसांत खरोखरीच तिचा नायटा बरा झाला, तेव्हां तर तिची पूर्ण श्रद्धा बसली. हाच तिला धार्मिक शिक्षणाचा मिळालेला पहिला धडा. मुलीच्या वर्तनाचा हा बदलेला कल पाहून तो कल कसा बदलला याचा सुमतीबाईनें विचार केला. तेव्हां तिला स्वतःची चूक आढळून आली. आपण धाक दपटशा देऊन तिला वळविण्याचा प्रयत्न करीत होतों, तो मार्ग चुकीचा असून तिच्या मनाला धार्मिक बंधनांनीं बांधलें असतां कार्यसिद्धि सहज होईल असें तिच्या लक्षांत येतांच कमलिनीला कांहीं विशेष सांगावयाचें झालें म्हणजे ती कथा-पुराणांतील धार्मिक दृष्टांत देई . मग ' असं वागलं किंवा केलं म्हणजे हित होईल ' असें सांगे. आपण मुलीला दिलेलें शिक्षण तिचें कल्याणच करील अशी

सुमतीबाईची खात्री होती. आतां ती सासरीं येतांना तिला तिनें पुष्कळच गोष्टी सांगितल्या होत्या. ' पति हेंच स्त्रियांचें दैवत ' अशी तिची पूर्ण भावना झाली होती आणि आतां आपलें दैवत वर येईल म्हणून ती मोठ्या उत्कंठेनें रघुनाथाची वाट पहात होती. शेजारपाजारच्या बायका मुली निघून गेल्यावर पुष्कळ वेळ झाला ती एकटीच खोलींत बसली होती हें तर सांगितलेंच आहे. परंतु तिची छाती धडधडत होती कां बरें ?

ती खोली मोठी होती. सर्व जमिनीवर जाजम पसरलें होतें. आणि एका कोपऱ्यांत बिछाना केला होता. त्याच खोलींत नोकरानें तिची ट्रंक ठेविली होती. शिवाय खुंटीवर रघुनाथाचे कपडे टांगलेले दिसत होते. कोपऱ्यांत तिवईवर दिवा आणि जवळच घडवंची ठेविली होती. कमलिनी त्या घडवंची जवळच बसली होती. पुष्कळ वेळ झाला, सर्वत्र सामसूम झाली. आतां इतक्यांत आपले पतिराज वर येतील, तेव्हां आपण त्यांच्या पायाचें वंदन करूं हा विचार तिच्या मनांत घोळत होता. आणखी थोडा वेळ गेला तेव्हां तिनें सहज घडवंची उघडली. आंत रघुनाथाची मराठी शाळेंतील पुस्तकें अस्ताव्यस्त होतीं तिनें वरच असलेलें मोठें पुस्तक काढलें आणि उघडलें. तें फाटलेलें नवनीताचें पुस्तक होतें. नंतर तिनें दिवा जवळ केला आणि उघडलेलें पान वाचण्यास सुरवात केली. तें मोरोपंतकृत नलोपाख्यान होतें.—

**अजि नाथ ! अहो[1] नरवर ! अजि इकडे एकवेळ हेरां हो ! ।**
**एकाकी[2] जाल कसे ? दासी सेवा करील हे[3], राहो[4] ॥**
**चुकल्यें, क्षमा करा, जी ! न चुकेन पुढें कदापि सत्कार्या[5], ।**
**त्यजिली दया अकस्मात्, त्यागार्हा[6] काय तीहि सत्कार्या[7] ? ॥**
**माझें मन बहु तुमचा चिंतूनि असाधुवाद[8] तळमळतें, ।**
**अजि ! पुण्यश्लोक ! पहा मत्यागें[9] कीर्तिपादतळ[10] मळतें; ॥**

थोड्या वेळांत तिचें मन त्यांत रमलें. इतक्यांत दरवाजा वाजल्याचा आवाज झाला. तिनें चटकन् तोंड फिरवून दरवाजाकडे पाहिलें, परंतु दरवाजा बंद असलेला दिसला. तेव्हां तिनें पुनः वाचण्यास सुरवात केली. थोड्या वेळानें पुनः दरवाजा वाजला. तेव्हां तिनें ' कोण आहे ? ' असें विचारलें. परंतु दरवाजा

---

१ पहा २ एकटे ३ ही दमयंती दासी ४ राहूं द्या ५ उत्तम कार्याला ६ त्यागास योग्य ७ सत्कारायास योग्य ८ शपथ भंग ९ माझ्या त्यागानें १० कीर्तिरूप पायाचें तळ.

उघडा नाहीं, किंवा तिच्या प्रश्नाला उत्तरहि मिळालें नाहीं. तथापी रघुनाथ बाहेरच्या बाजूला उभा होता. मनुताईनें त्याला माडीवर पाठविलें होतें, त्याचा वर उल्लेख केलेलाच आहे. तो मोठ्या जुलमानें वर आला. दरवाजा लोटलेला होता. म्हणून त्यानें आंत पाहण्याकरितां फट करण्यासाठीं हळूच तो लोटला; परंतु आंतली साखळी वाजतांच झटकन तो मागें सरला. पुनः थोड्या वेळानें त्यानें दरवाजा लोटला. तेव्हां आंतून कमलिनीनें 'कोण आहे ?' असा विचारलेला प्रश्न त्याला स्पष्ट ऐकूं आला. इतकेंच नव्हे तर तो प्रश्न 'रागानें विचारला आहे. असा त्याचा समज झाला. तो जागच्या जागींच थबकला. पुढें काय करावें. हें त्याला सुचेना. खालीं जावें तर आईनें दरवाजा बंद करून घेतलेला ! तेव्हां आतां मनाचा हिय्या करून आंत जावें आणि मुकाट्यानें झोंपावें असा विचार करून त्यानें पुनः दरवाजा लोटला.

कमलिनी एकटीच खोलींत असल्यामुळें दरवाजा दोन तीनदां वाजलेला ऐकून थोडी घाबरली. तिनें पुनः जरा मोठ्यानें "कोण आहे ?" असा प्रश्न केला. त्याबरोबर दरवाजा उघडून रघुनाथ एकदम आंत आला. कोपऱ्यांत आंथरलेला बिछाना पाहून इकडे तिकडे न पाहतां तो तडक बिछान्याकडे गेला आणि एकदम डोक्यावरून पांघरूण घेऊन तो निजला. पतीला आंत आलेला पाहून कमलिनीच्या छातींत एकदम विलक्षण आघात झाला; परंतु तो आघात भीतीचा मात्र नव्हता. ती धडपडत एकदम उठली आणि पदर सावरूं लागली. तितक्या अवधींत रघुनाथानें डोक्यावरून पांघरूण देखील घेतलें. आपल्या पतीचें हें चमत्कारिक वर्तन पाहून ती अगदीं स्तंभित झाली. 'तुझा पति जवळ येतांच प्रथम त्याच्या पायाचें वंदन कर; कारण तेंच तुझें दैवत आहे. नंतर ते विचारतील त्या प्रश्नाचीं सरळ व स्पष्ट उत्तरें दे. एकांतांत त्यांना भिण्याचें कांहीं कारण नाहीं. प्रथम भेटीच्या वेळीं तूं आपल्या पतीबरोबर संकोचवृत्ति सोडून मर्यादेनें बोल. नंतर ते शयन करतील तेव्हां त्यांची चरणसेवा कर. इ.' बऱ्याच गोष्टी सुमतीबाईनें तिला सांगितल्या होत्या. त्या सर्व तिच्या लक्षांत होत्या. परंतु रघुनाथाच्या ह्या चमत्कारिक वर्तनामुळें तिला त्यांपैकीं एकहि गोष्ट करतां आली नाहीं. उलट तिनें 'कोण आहे ?' ह्या पुनः विचारलेल्या प्रश्नामुळें त्यानें आपल्या मनाचा भलताच ग्रह करून घेतला. आपली बायको शहरात वाढलेली शिकलेली आहे, तेव्हां ती घमेंडीखोर असणार अशी त्याची मित्रमंडळीच्या सांगण्यावरून कल्पना झाली होती, ती ह्या प्रश्नानें दृढ झाली. वाचकहो ! आतांपर्यंतच्या वर्णनावरून

रघुनाथाच्या मागें लागलेलें भ्रामक कल्पनांचें पिशाच्च त्याला आपल्या पाशांत कसें घट्ट अडकवून घेत होतें, तें आपल्या लक्षांत आलेंच असेल.

पुष्कळ वेळ झाला. रघुनाथ कांहींच हालचाल करीना. बिचारी कमलिनी मुकाट्यानें उभी होती. तिचें मन अगदीं गोंधळून गेलें. काय करावें हेंच तिला सुचेना. तिनें अलिकडे प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्या वाचलेल्या असत्या तर अशा वेळीं काय करावें, अशी तिला काळजीच पडली नसती. तिनें चटकन पुढें होऊन 'मजशीं बोलायचं नाहीं का गडे!' म्हणून धिटाईनें प्रश्न केला असता. परंतु तिचें शील तसें नव्हतें. हळुहळू मध्यरात्र झाली. उभें राहून तिचे पाय दुखूं लागले. तिनें कैक वेळां बोलण्याचा प्रयत्न केला परंतु तिचा शब्द उलटेना. शेवटीं पतीला झोंप लागली आहे असें समजून हळूच ती बिछान्याजवळ गेली आणि पतीच्या पायांना थोड्या अंतरावरून वंदन करून तेथेंच बसली. तिच्या मनांत अनेक विचार घोळूं लागले. एका मागून एक विचार येतां येतां तिला झोपेनें घेरलें. शेवटीं तीन चाराच्या सुमारास तिनें आपली मान गुढग्यावर टेंकली आणि तिला त्याच स्थितींत झोंप लागली. रघुनाथ अंगावर पांघरूण घेऊन बिछान्यावर झोंपला, परंतु त्याला झोंप लागली नाहीं. त्यानें शरीराची किंचितही हालचाल केली नाहीं. त्याच्याही मनांत अनेक विचारांचें काहूर माजलें होतें. आपली बायको काय करीत आहे हें पहावें अशी मधून मधून त्याला इच्छा होत होती. परंतु डोक्यावरून पांघरूण काढण्यास त्याला धीर होईना. कदाचित् बायकोच्या बांगड्यांचा आवाज तरी ऐकूं येईल म्हणून तो कान देऊन ऐकत होता परंतु तोहि आवाज होईना. सर्वत्र अगदीं शांतता होती. मध्यरात्र उलटून गेल्यावर हळुहळू त्यालाहि झोंप आली. परंतु त्याची झोंप फार सावध होती. पहाटेच्या सुमारास तो एकदम जागा झाला. त्याबरोबर त्यानें तोंडावरून पांघरूण दूर केलें. आणि इकडे तिकडे पाहिलें अद्यापि खोलींत कोपऱ्यांत असलेला तिवईवरील दिवा जळत होता. नंतर त्यानें मान वर करून पाहिलें तों आपली बायको आपल्या पायाजवळ गुढघ्यांत डोकें खुपसून झोंप घेत आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. आतां काय करावें असा त्याला विचार पडला त्यानें पुनः पूर्ववत् डोक्यावरून पांघरूण घेतलें. त्याच संधीला मनुताई उठली होती तिनें हळूच माडीवर जाण्याच्या जिन्याला असलेल्या दरवाजाची रात्रीं लावलेली कडी काढली. सर्व रात्रभर तिला देखील स्वस्थपणें झोंप लागली नव्हती. तिच्या मनाला एक प्रकारची हुरहुर वाटत होती. आणि

तशा स्थितींत तिनें सर्व रात्र काढिली होती. शेवटी पहाटेस घरांत नोकरमाणसांचा वावर सुरू होतांच ती उठली. आणि वर लिहिल्या प्रमाणें तिनें दरवाजाची कडी काढिली. नंतर तिच्या मनांत काय विचार आले असतील ते असोत. ती हळूच जिना चढून वर आली. माडीवर येतांच खोलीचा दरवाजा उघडा पाहून तिला आश्चर्य वाटलें. तिनें पाय न वाजविता पुढें होऊन खोलींत डोकावून पाहिलें. तो तेथें वर उल्लेख केल्याप्रमाणें प्रकार तिच्या दृष्टीस पडला त्याबरोबर तिची चर्या सर्कन उतरली. बिछान्यावर डोक्यावरून पांघरूण घेऊन रघुनाथ निजला आहे आणि त्याच्या पायाजवळ आपली सून-सीता गुडघ्यावर मान टेकून बसली आहे. हा देखावा पाहून ती क्षणभर तेथेंच उभी राहिली. रघुनाथ रात्रीं वर गेल्या-नंतर काय प्रकार घडला असेल याची तिला सहज कल्पना झाली. आतां येथें जास्त वेळ रहाणें चांगलें नाहीं असा विचार करून ती पुनः हळूच मागें फिरून जिना उतरून खालीं आली.

इकडे रघुनाथानें थोडावेळ विचार करून पुनः आपल्या तोंडावरून पांघरूण दूर केलें. नंतर तो हळूच बिछान्यावरून उठला आणि पाय न वाजवितां खोलींतून बाहेर पडला. तो गेल्यानंतर थोड्या वेळानें कमलिनी जागी झाली. बसून बसून तिची पाठ दुखूं लागली होती. तिनें आजुबाजूला पाहिलें. परंतु खोलींत कोणी नव्हतें. तिनें प्रथम दिवा विझविला. नंतर बिछान्याची गुंडाळी करून तो कोंप-ऱ्यांत ठेविला.

कमलिनी ! खरोखर तूं दुर्दैवी म्हणायची ! तूं अनुभवलेली रात्र म्हणजे तुझ्या आयुष्यांतील अत्यंत महत्त्वाची आणि सुखाची अशी जावयास पाहिजे होती. पण—

---

## ७........ ती बायको नको.

आतां हें कोर्ट आपणाला खालीं पहायला लावील दुसरं काय ? पण तीं दोघेजणं एकत्र होतीं ना ?"

" एकत्र असून काय ? तो कुंभकर्णासारखा खुशाल बिछान्यावर घोरत होता आणि ती पोर त्याच्या पायगत गुडघ्यांत मान घालून होती. माझी खात्री आहे तिनें सर्व रात्र तशी बसून काढली असेल. मनुताईनें सकाळीं उठतांच

माडीवर जाऊन पाहिलेला सर्व प्रकार आपल्या पतीला सांगितला. बराच वेळ त्यांच्या गोष्टी झाल्या. परंतु पुढें काय करावें हें त्यांना सुचेना. दोघेंहि मोठ्या चिंतेंत पडलीं. शेवटी मनुताई उठून बाहेर आली आणि केंस विंचरण्याकरितां माजघरांत बसली. थोड्यावेळानें कमलिनी खालीं आली. तिची मुद्रा अगदीं उतरलेली दिसत होती. मनुताईनें तिच्या मुखाकडे पाहिलें. तेव्हां तिचें म्लानवदन पाहून तिला फार वाईट वाटलें. ती म्हणाली " सिता ये बैस येथें. तुझे मी केंस विंचरते. पण कायग, तूं केंस विंचरून आलीस वाटतं ? "

कमलिनीनें केंस विंचरले नव्हते. आदल्या दिवशीं तिचे विंचरलेले केंस तसेच होते. ती जर बिछान्यावर निजलीच नाहीं तर तिचे केंस विसकटणार कोठून ? तिच्या डोक्यांतील वेणी देखील तशीच होती परंतु वेणींतील फुलें मात्र तिच्या मुखकमलाप्रमाणें कोमेजलेलीं होतीं. ती आपल्या सासूच्या प्रश्नाला काय उत्तर देणार ? फक्त ' नाहीं ' म्हणून ती म्हणाली. तेव्हां तिला जवळ बसवून मनुताई तिच्या पाठीवर हात फिरवीत म्हणाली " कमू तूं रात्रीं निजली नाहींस का ? तुझे डोळे अगदीं तर तारवटलेले दिसतात. कां बरं असं ? तुला रघुनाथनें झोंपूं दिलं नाहीं का ? तो कांहीं बोलला का ?—सांग ? "

" नाहीं. " बऱ्याच वेळानें खालच्या मानेनें कमलिनी म्हणाली.

" तो बोलला नाहीं मग तुझें तोंड असें उतुरलेलें का ? सांग-कमू, अशी लाजूं नकोस. अग मी तुझी आत्याना ? " असें म्हणून तिनें कमलिनीला आपल्या-जवळ ओढलें.

आतेच्या सहानुभूतीवर आणि मायेच्या हृदयाशीं तिचें हृदय भिडतांच कमलिनीला एकदम उमाळा आला. ती हळूहळू हुंदके देऊं लागली. तेव्हां मनुताईनें तिची पुष्कळ समजूत केली. तेव्हां ' ते आले तसेंच झोंपले. माझ्याशीं एक शब्दहि बोलले नाहींत ' इतकेंच तिनें सांगितलें. शेवटीं ' कमू, बाळे तूं असं वाईट वाटून घेऊं नकोस. मी त्याचा बंदोबस्त करतें, अशी मनुताईनें तिची समजूत केली.

आज नेहमींप्रमाणें रघुनाथ सकाळीं पेढीवर येऊन बसला नाहीं ' हें पाहून गणेशपंतांनीं त्याची चौकशी केली. सकाळीं उठतांच पत्निकडून त्याचें एक गाऱ्हाणें त्यांच्याकडे आलेंच होतें त्यामुळें ते जरा रागांतच होते. एक दोनदां त्यांनीं स्वतः रघुनाथाला हांका मारल्या. नंतर एका नोकराला चौकशी करण्यास सांगितलें. परंतु तो घरांतच नसल्यामुळें त्याचा शोध तरी लागावा कसा ? दहा

वाजले गणेशपंतांचें स्नान झालें, जेवणाची तयारी झाली, तरी रघुनाथाचा पत्ता नव्हता. शेवटीं त्यांनीं त्याच्या मित्रांकडे—गणपति आणि श्रीधर यांच्याकडे—चौकशीकरितां मनुष्य पाठविला परंतु रघुनाथ त्यांच्याकडेहि नव्हता. नोकर परत आला आणि त्याच्या मागून थोड्या वेळानें गणपति आला. आणि सांगूं लागला कीं, "रघुनाथ सकाळपासून मळ्यावरच आहे. आणि त्यानें असें सांगितलें आहे कीं, जोंपर्यंत आपली बायको घरांत आहे तोंपर्यंत आपण घरीं येणार नाहीं."

" जा—त्याला सांग कीं आतां फार शहाणा होऊं नकोस. मुकाट्यानें घरीं ये. मी जेवणाकरितां खोळंबलों आहें.

गणेशपंतांनीं रागानें सांगितलेला निरोप घेऊन गणपती मळ्यावर गेला. गणेशपंतांनीं आपल्या शेतजमिनीला लागूनच हा मळा तयार केला होता. येथें सर्व प्रकारचीं फळझाडें होतीं. ह्या मळ्यांत एक झोंपडीवजा घरहि बांधलेलें होतें. रघुनाथ सकाळपासून येथेंच होता. तो झोंपून उठला तो तडक येथें आला. गणपति मळ्यावर आला, त्यावेळीं तो विहिरीवर स्नान करीत होता. गणपतीनें त्याला बाबांचा निरोप कळविला परंतु रघुनाथानें तिकडे लक्षच दिलें नाहीं. गणपतीनें पुष्कळ प्रकारें त्याला सांगून पाहिलें परंतु छे ! ‘ ती घरांत आहे तोंपर्यंत मी घरांत पाऊल ठेवणार नाहीं ’ असें त्यांनीं स्पष्ट सांगितलें तेव्हां गणपती परत आला. मुलाचें उत्तर ऐकून गणेशपंतांचा राग भडकला. ते स्वतः मळ्यावर जाण्याकरितां निघाले. गणपतीहि त्यांच्याबरोबर होता. आतां बरीच खडाजंगी उडणार असें त्याला वाटलें. ते मळ्यावर आले त्यावेळीं रघुनाथ धोतर वाळविण्याच्या उद्योगांत होता. आपले वडील येथपर्यंत येतील असें त्याला वाटलें नव्हतें. तो घरांत एकटाच मुलगा असल्यामुळें तो लाडांतच वाढला होता. गणेशपंत त्याला सहसा बोलत नसत. परंतु त्याचा स्वभाव थोडा रागीटच होता. एकदां वळले तर सुतासारखे वळत असत, आणि बिघडले तर मात्र ते कोणाचेच होत नसत. आजचा प्रसंग त्यांतलाच होता. सकाळपासून ते रागांतच होते. त्यांतून आपण दोनदां बोलावणें पाठविलें असतां मुलगा आला नाहीं, तेव्हां तर ते जास्तच खवळले. मळ्यावर येतांच त्यांनीं रघुनाथाला हांक मारली. आणि घरीं न येण्याचें कारण विचारलें. रघुनाथ मुकाट्यानें खालीं मान घालून उभा होता. गणेशपंत रागारागानें बोलत होते. शेवटीं ते म्हणाले, " रघ्या, हा तुझा शहाणपणा चांगला नाहीं. गोष्टी फार विकोपाला गेल्या आहेत. लक्षांत ठेव. मुकाट्यानें आतां मजबरोबर घरीं चल. नाहीं तर मी तुला घरांत घेणार नाहीं."

परंतु रघुनाथ कांहींच उत्तर देईना. त्यामुळें त्यांचा राग जास्त चढत चालला. त्यांचे ओंठ थरथरूं लागले. ते म्हणाले, "तूं आतां माझ्या तोंडाला काळोखी फासणार! चांडाळा, तुला घरीं न यायला झालंय तरी काय? बोल—रघ्या—" असें म्हणून त्यांनीं त्या रागाच्या आवेशांत रघुनाथाच्या फाडकन् तोंडांत मारली. त्याबरोबर क्षणभर त्याच्या डोळ्यापुढें काजवे चकाकले. "चल, हो चालता. माझ्या दृष्टिसमोर देखील उभा राहूं नकोस." असें म्हणून गणेशपंत मागें फिरले आणि तडक घरच्या रस्त्याला लागले. रघुनाथ त्यांच्या मागें क्षणभर उभा होता. गणपतीहि त्याच्याजवळ होता. परंतु त्याच्याबरोबर कांहीं एक न बोलतां रघुनाथनें वाळत घातलेलें धोतर ओढून तसेंच गुंडाळलें आणि पंचा खांद्यावर टाकून तोहि आपल्या वडिलांच्या मागें परंतु विरुद्ध दिशेनें निघाला. तें पाहून गणपती म्हणाला, "रघुनाथ, तूं हा अगदीं वेडेपणा करतोस. हें कांहीं चांगलं नाहीं. आतां माझं ऐक. आणि घरीं चल. मी बाबांना समजावितों."

"आतां ती गोष्ट होणें शक्य नाहीं."

"मग तूं चाललास कुठें?"

"जिथें रस्ता फुटेल तिथ।"

गणपतीनें आपल्या मित्राला अडविण्याचा प्रयत्न केला परंतु तो ऐकेना. शेवटीं तो कुठें जातो, हें पाहण्याकरितां मळ्यांतील एका मनुष्याला त्याच्या मागून जाण्यास सांगून गणपती घराकडे वळला. रघुनाथाच्या मागून जावें असें त्याच्या मनांतून फार होतें. परंतु त्याचें अद्यापि जेवण व्हावयाचें होतें. इकडे गणेशपंत घरीं आले. आणि त्यांनीं स्वतःचें ताट वाढण्यास सांगितलें. तेव्हां मनुताईनें 'रघुनाथ येत नाहीं!' असें विचारलें.

"त्या कारट्याचें नांवसुद्धां काढूं नकोस!" असें रागानें उत्तर दिलें. पतीचें जेवण होतांच मनुताईनें कमलिनीला वाढण्याकरितां ताट घेतलें, तेव्हां ती हळूच म्हणाली, "मी कशी जेवूं?"

मनुताई तिला 'कां?' म्हणून विचारणार इतक्यांत तिच्या म्हणण्याचा भावार्थ लक्षांत आला. पति जेवला नाहीं, तो उपाशी आहे असें माहीत असतां पत्नी–कमलिनी कशी बरें जेवणार? आणि 'तूं जेव' असें आपल्या सुनेला मनुताई तरी कोठल्या तोंडानें सांगणार? अर्थात् हा तिला मोठा बिकट प्रश्न पडला. तिनें वाढण्याकरितां हातांत घेतलेलें ताट तसेंच ठेवून ती बाहेर आली. गणेशपंत बैठकीवर बसून पानाला चुना लावीत होते. तेव्हां दरवाजाजवळ उभी

राहून मनुताई म्हणाली, "ऐकलं का ? तो रघु रागानें गेला पण त्यानें घरांत एक संकट मात्र उपस्थित करून ठेवलं ! "

"तुला एकदां सांगितलं ना कीं, त्या कार्ट्याचें नांव मजपुढें काढूं नको म्हणून ! "

"नांव काढूं नको खरं ! पण घरांत ती पोर जेवत नाहीं, त्याला काय तोंड काढायची ? "

"कां ? तिला काय झालं न जेवायला ? "

"कशी जेवेल ती ? नवरा उपाशी आणि ती त्याच्या मागें एकटीच जेवेल का ? "

गणेशपंतांचेंहि तोंड बंद झालें. कांहीं वेळ विचार करीत त्यांनीं हातांतील पानांची चाळवाचाळव चालविली. नंतर ते म्हणाले, "तिला मजकडे पाठवून दे. मी तिची समजूत घालतों. हें घे—ही चुन्याची डबी जा आणि तींत थोडें पाणी घालून तिच्या बरोबर पाठवून दे. " थोड्या वेळानें डबी घेऊन कमलिनी मर्यादेनें आंत आली. तेव्हां तिच्याकडून डबी घेऊन गणेशपंत म्हणाले, "सीता, तू अजून जेवली नाहींस ना ?—वेडी आहेस तूं ! जा जेव जा, असा वेडेपणा करूं नकोस ! "

कमलिनी कांहीं न बोलतां खालच्या मानेनें बाहेर आली. सासऱ्यानें तिला जेवणाची आज्ञा केली त्यामुळें तिला कैचींत सांपडल्यासारखें झालें. आज सर्व घरांत औदासीन्य पसरलें होतें. बिचारी कमलिनी दरवाजामागें चिमणीसारखें तोंड करून उभी राहिली. मनुताईच्या घरीं चहा घेण्याचा प्रघात नव्हता. परंतु कमलिनी आल्यापासून तिच्या घरीं चहा घेण्याचा परिपाठ आहे हें जाणून तिच्यासाठीं सकाळ संध्याकाळ मनुताई चहा करूं लागली होती. आज सकाळ-पासून ती फक्त चहावरच आहे हें पाहून मनुताईचा जीव तीळ तीळ तुटूं लागला. सुनेला टाकून तिलाहि जेवतां येत नव्हतें, अशा रीतीनें ती देखील पेंचांत सांपडली होती. होतां होतां दुपारचे तीन वाजले. मुलगी जेवत नाहीं, तेव्हां तिला हट्टानें देखील जेव म्हणून सांगतां येईना. कारण ती बाब फार नाजूक होती. शेवटीं नाइलाजास्तव रघुनाथाला बोलाविण्याकरितां गणेशपंतांनीं पुनः मळयावर मनुष्य पाठविला. परंतु लवकरच तो परत येऊन 'बाबूराव मळयावर नाहींत. ते केव्हांच तेथून गेले' असें सांगूं लागला. रघुनाथ हट्टी आहे हें त्यांना माहित होतें. आपण त्याच्या तोंडांत मारिली, इतकेंच नव्हे तर 'तुला

घरांत घेणार नाहीं ' अशी दहशत घातली, ती खरी समजून तें हट्टी पोर कुठें निघून गेलें असेल कीं काय ? अशी गणेशपंतांना भीति वाटूं लागली. इतर प्रसंगीं तो घरांतून निघून गेला असता तर त्यांना विशेष कांहीं वाटलें नसतें परंतु आज त्याच्यामुळें दुसऱ्याची पोर सकाळपासून उपाशी आहे, त्याकरितां त्यांना चिंता लागून राहिली. चार वाजण्याचा सुमार झाला तेव्हां मनुताईनें पुनः चहा केला. तो देखील घेण्यास कमलिनी कांकूं करूं लागली. तेव्हां ' तूं घेतला नाहींस तर मीही घेणार नाहीं ! ' असें संकट घातलें म्हणून तिनें थोडासा चहा घेतला. इतक्यांत गणपती आला. त्याच्या बरोबर त्यानें रघुनाथच्या मागून जाण्यास सांगितलेला नोकरहि होता. गणपति वर येतांच गणेशपंतांनीं रघुनाथाची चौकशी केली. तेव्हां तो म्हणाला, " रघुनाथ सांगलीस गेला. तुम्हीं सकाळीं मळ्यावरून आलांत तेव्हां तुमच्या मागूनच तो बाहेर पडला. मी त्याला पुष्कळ सांगून पाहिलें पण त्यानें माझें ऐकलें नाहीं. मला वाट फुटेल तिथें मी जाईन, असें म्हणून तो तडक निघालाच. तेव्हां मी ह्या तुमच्या भाग्याला त्याच्या मागून पाठविलें. तो आतांच परत आला. रघुनाथ सांगलीस तुमच्याच वाड्यांत गेला आहे असें तो सांगतो. "

ह्या गोष्टीवर पुष्कळ वेळ त्यांचा खल झाला. शेवटीं मनुताई म्हणाली, " तो फार हेकट आहे. मनुष्य पाठवून तो कांहीं यायचा नाहीं. तुम्ही स्वतः जाल तर तो डोकें फिरवून भलतीकडे जाईल. तर मीच ह्या गणपतीला घेऊन जातें. आणि समजावून घेऊन येतें-

हा पत्नीचा विचार गणेशपंतांना पटला. त्यांनीं गाडी जोडण्यास सांगितलें. मनुताईनें एका डब्यांत थोडासा फराळ भरून घेतला. आणि ' मी आतां रघूला आणण्याकरितां स्वतः जातें तूं पुनः चहा घे. ' असें म्हणून कमलिनीला तिनें चहा दिला. नंतर ती आणि गणपति गाडींत जाऊन बसलीं. वाटेंत त्यांच्या गोष्टी चालल्या होत्या. रघुनाथानें अशी डोक्यांत एकदम राख कां घातली, याचें कारण गणपतीच्या सांगण्यावरून तिच्या चांगलें लक्षांत आलें. अर्ध्या तासांत त्यांची गाडी सांगलींत आली. तेथें त्यांचा वाडा होता. मध्यंतरी तो भाड्यानें दिला होता. परंतु हल्लीं तो रिकामाच होता. वाड्यांत सामानसुमान असून त्याची देखरेख करण्याकरितां आणि फळझाडांची निगा राखण्याकरितां गणेशपंतांनीं तेथें दोन नोकर ठेविले होते. रघुनाथ वाड्यांत आला आणि त्यानें घराची चावी घेऊन तें उघडलें. आपले धाकटे धनीसाहेब नेहमीं येतात त्याचप्रमाणें आतां

आले असतील असें तेथील नोकर समजले. रघुनाथानें घर उघडल्यावर कांहीं फळें तोडून आणण्यास सांगितलें. आणि तीं आणल्यावर खावून तो घरांत जाऊन जाजमावर स्वस्थ निजला. मनुताईची गाडी आली त्यावेळीं तो निजलेलाच होता. परंतु गाडीचा आवाज ऐकतांच उठला आणि आईला पाहतांच तो बाहेर आला.

" रघू हें करणं तुला बरं दिसतं कां ! तूं असा हा खेळ मांडला आहेस पण तिकडे कुणाचा जीव जातो आहे तें तुला कांहीं कळतं का ! ती दुसऱ्याची पोर सकाळपासून उपाशी आहे, त्याचा कांहीं विचार करशील कीं नाहीं ! चल, माझं तुला ऐकायचं ना ? अरे, ती वाईट का आहे ! आपल्या घरची लक्ष्मी ती ! किती मुलगी सालस आणि मर्यादशील आहे म्हणून सांगूं ! पण तूं मात्र हा भलताच ग्रह करून घेतला आहेस. खरंच सांगतें रघुनाथ, तुझं पूर्वपुण्य म्हणूनच असें रत्न तुला लाभलं आहे. ती इंग्रजी शिकली आहे पण तिला काडीइतका देखील गर्व नाहीं. किती पोरीचं हें साधं वर्तन ! हेंच पहाना, तूं जेवला नाहींस म्हणून ती जेवत नाहीं. किती ही मर्यादा !—मग काय येतोसना ? चल—"

" मी एकदां सांगितलं कीं घरीं यायचा नाहीं. ती घरांत आहे तोंपर्यंत माझा प्राण गेला तरी मी घरांत पाऊल टाकणार नाहीं."

" रघू, हा हट्ट चांगला नाहीं बरं ! पहा तुझ्या हट्टाचा परिणाम फार वाईट होईल हें लक्षांत ठेव. माझ्या तोंडाला काळोखी येईल ! भाऊचं घर मला वर्ज होईल, मला तोंड वर करायला जागा राहणार नाहीं, याचा विचार कर. आतां हें भलतंच वेड तुझ्या डोक्यांत शिरलं आहे, पण पुढें तुला पश्चात्ताप करण्याची पाळी येईल. पहा नीट विचार कर. अजून कांहीं फार बिघडलं नाहीं."

" मी घरीं यायचा नाहीं. मला ती बायको नको."

" कां नको ? अरे तुझ्या काय शंका असतील त्या सांग. मी त्याचं निरसन करतें."

" माझ्या कांहीं शंका नाहींत. आणि मला कांहीं सांगायचं नाहीं."

शेवटीं मनुताईनें डोळयांत पाणी आणून त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. गणपतीनें आग्रहानें शिकस्त केली परंतु रघुनाथ ऐकेना !

मनुताई परत घरीं आली त्यावेळीं दिवे लागले होते. गणेशपंत बाहेरच बैठकीवर बसले होते. त्यांच्याजवळ कांहीं कुळें बसलीं होतीं. म्हणून मनुताई एकदम घरांत गेली. गणपतीनें सर्व हकीकत गणेशपंतांना सांगितली. ती त्यानीं

मुकाट्यानें ऐकून घेऊन एक दीर्घश्वास मात्र सोडला. मनुताई आंत आल्यावर कमलिनीची समजूत करून 'तो मूर्ख आहे पण तूं कां उगाच आपले हाल करून घेतेस! त्यानें मी येथून नेलेला फराळ केला. आतां तुला जेवायला कांहीं हरकत नाहीं,' असें म्हणून तिला जेवणाचा आग्रह केला. तिनें 'होय' म्हणून म्हटलें. शेवटीं सासूचा अतिशय आग्रह झाल्यावर थोडासा फराळ केला. रात्रीं झोंपण्यापूर्वी मनुताई आपल्या पतीजवळ बसून 'पुढें काय करावें?' हा प्रश्न सोडवीत होती. शेवटीं दुसऱ्या दिवशीं गणेशपंतांनीं स्वतः जाऊन रघुनाथाला सामोपचारानें वळवून घरीं आणावयाचें, आणि तो आला नाहीं तर कमलिनीला मुंबईस तिच्या वडिलांच्या घरीं घेऊन जावयाचें असें ठरविलें.

ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं सकाळीं गणेशपंत सांगलीस गेले. परंतु रघुनाथानें त्यांची भेटच घेतली नाहीं. ते येत आहेत असें कळतांच तो वाड्यांतून निसटला. ते वाड्यांत आल्यावर शोध करूं लागले तेव्हां 'बाबूराव तुम्हांला येतांना पाहून मागल्या फाटकानें निघून गेले,' असें नोकरांनीं सांगितलें. तेव्हां रघुनाथ आपली भेट घेऊं इच्छित नाहीं असें पाहून गणेशपंत त्याचा जास्त शोध न करितां परत आले. आदल्या दिवसापासून त्यांची प्रकृति थोडी नादुरुस्त झाली होती. परंतु तिकडे दुर्लक्ष करून घरांत चाललेल्या गोंधळाचा एकदांचा शेवट लावावा असा त्यांनीं विचार केला.

"मी स्वतःच जातों सीतेला घेऊन परत! आतां जयरामभाऊ काय बोलतील तें मुकाट्यानें ऐकून घेतलें पाहिजे. ह्या कार्ट्या रघ्यानें ही नसती विवंचना मागें लावली आहे. कालपासून डोकं तापून आज असें दुखतं आहे कीं—"

"मग आजच कशाला जाण्याचं करतां? प्रकृति नाहीं बरी तर—"

"नको—आतां एकदांच जाऊन येतोंच. एकदां पोरीला नेऊन तेथें पोंचविली कीं मग आपण आपलं पाहून घेऊं."

"काय हा व्याप तरी! मेला आपला दामच खोटा—!"

त्याच दिवशीं सायंकाळीं गणेशपंत आपल्या सुनेला घेऊन मुंबईस जाण्याकरितां निघाले.

---

सकाळपासून सुमतीबाईचें मन अगदीं अस्वस्थ झालें होतें. आज तिला बिलकूल उत्साह वाटत नव्हता. सकाळपासून तिचा उजवा डोळा एकसारखा उडत होता तीच स्थिति म्हातारीची झाली होती. ती देवपूजा करीत असतांना तिच्या हातून देव्हाऱ्यांतील देव दोनदां पडले, तेव्हां 'कां बाबा एवढा कोपलास?' असें म्हातारीनें उच्चारलेलें सुमतीबाईनें ऐकलें होतें. पुढें त्या दोघी जेवायला बसल्या तेव्हां सुमतीबाईचा प्रत्येक घास अडूं लागला. इकडे म्हतारीलाहि पाणी पितांना ठसका लागला. तेव्हां ती म्हणाली, "आज झालंय् तरी काय? कोण आठवण करतें आहे? पोर गेली आहे सासरीं. तीच आठवण करीत असेल झालं?"

सर्व दिवस सुमतीबाईनें विचारांत घालविला. तिला प्रत्येक घडीला आपल्या मुलीची आठवण होत होती. संध्याकाळीं पंत घरीं आल्यावर चहा घेऊन पुनः फिरावयास जात असत. त्यांनीं आतां स्वतःच गाडी घोडा ठेवला होता. सुमतीबाई दिवाणखान्यांत बसली असतांना शिपायानें ब्याग आणून टेबलावर ठेविली. थोड्या वेळानें पंतहि वर आले. तेव्हां आचाऱ्यानें फराळाचें लहान ताट आणि चहाचा कप आणला. आज सकाळीं त्यांना देखील पोटभर जेवण गेलें नव्हतें त्यामुळें त्यांना आतां भूक लागली होती. ते फराळ करीत असतांना सुमतीबाई म्हणाली, "आज विठोबा येऊन चार दिवस झाले. कमूची कांहीं खबर कळली नाहीं, तेव्हां म्हटलं आज पत्र लिहायचं होतं."

"अग तिला चार दिवस झाले नाहींत जाऊन तों तुझा जीव खालींवर होऊं लागला मग—" इतकें बोलून पंतांनीं चहाचा पेला तोंडाला लावला. चहाचे एक दोन घोट घेतले नाहीं तोंच त्यांना एकदम ठसका लागला. त्याबरोबर सुमतीबाई उठून त्यांच्याजवळ गेली आणि पतीच्या हातांतील पेला घेऊन ती म्हणाली, "हें पहा, आज हें असें चाललं आहे! सासूबाईनाहि जेवतांजेवतांहि असंच झालं. सकाळीं त्यांच्या हातून एकदोनदां देव पडले. माझाहि सकाळपासून हा उजवा डोळा सारखा लवतो आहे. जेवायला बसलें तों सारखा घास अडूं लागला म्हणून म्हणतें तेथें कमूची काय खबर आहे हरी जाणे?"

पंतांनीं फराळाचें ताट दूर करून म्हटलें, "मलाहि कांहीं सकाळीं जेवण गेलं नाहीं. आतां लिहितोंच तर मनुताईला पत्र!"

त्या रात्रीं म्हणण्यासारखा विशेष कांहीं प्रकार घडला नाहीं. परंतु दुसऱ्या दिवशीं सकाळीं पंत चहा घेत बसले असतांना त्यांच्या दरवाजांत व्हिक्टोरिया येऊन उभी राहिली. आपणास भेटण्याकरितां कोणी तरी आलें असावें असें वाटून त्यांनीं नोकराला हांक मारिली आणि टेबलावर असलेला चहाचा पेला उचलून नेण्यास सांगितलें. इतक्यांत दूसरा नोकर डोक्यावर ट्रंक घेऊन आंत आला. ' कोण आलें ? म्हणून पंत त्याला विचारणार तोंच गणेशपंत आणि त्यांच्या मागून कमलिनी आंत आली. त्यांना पाहतांच पंतांना अत्यंत आश्चर्य वाटलं. तीच स्थिति कमलिनीला पाहून सुमतीबाईची झाली. आई दृष्टीस पडतांच तिनें चटकन् जाऊन आईच्या गळ्याला एकदम मिठी मारली, तिला एक सारखे हुंदके येऊं लागले. सुमतीबाई अगदीं किंकर्तव्यमूढ झाली. मुलीबरोबर तिच्याहि डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. आपणांस काल जे अपशकून झाले ते आपल्या मुलीबद्दलच सूचक होते अशी आतां तिची खात्री झाली. तिनें मुलीला समजाविण्याचा प्रयत्न केला.

" कमू, काय झालं तें मला सांग ? तूं अशी एकाएकी आलीस कां ? तूं रडतेस का ? आणि हें तुझं आंग तरी किती तापलं आहे ! तुला ताप आला होता काय ?"

" आई, आतां माझं कसंग होईल ? " हुंदके देत कमलिनी म्हणाली. इतक्यांत स्नान करून आजी आंत आली, आणि तिनेंहि आश्चर्यानें ' पोरी कधीं आलीस तूं ? ' असा प्रश्न केला. इकडे गणेशपंत आंत येतांच नमस्कार चमत्कार होऊन पंतांनीं त्यांचें योग्य स्वागत केलें. कपडे काढल्यावर बराच वेळ गणेशपंत मुख्य गोष्टीविषयीं कांहीं विशेष बोलले नाहींत. परंतु असें किती वेळ चालणार ? शेवटीं ते म्हणाले, " जयरामभाऊ, तुमच्याजवळ बोलायला मला तोंडच नाहीं, अशा कांहीं चमत्कारिक स्थितींत मी येऊन पडलों आहें. त्या आमच्या रध्यानें ही आम्हांला खालीं पहाण्याची वेळ आणली आहे. मागें तुम्ही बोलाविलें असतां त्या गाढवानें कसें चमत्कारिक वर्तन केलं तें तुम्हाला माहित आहेच. आतां परवां घरीं ऋतुशांतीचा विधि झाला त्यावेळींहि त्या कारट्यानें तसेंच डोकें फिरविलें परंतु मी दाबला तेव्हां तो विधि कुठें पार पडला. नंतर त्या रात्रीं तो बायकोबरोबर एक चकार शब्दहि बोलला नाहीं. आणि दुसऱ्या दिवशीं उठून म्हणजे परवां सकाळीं तो घरांतून चालता झाला. जेवणाच्या वेळेपर्यंत माझ्या कांहीं तें लक्षांत आलें नाहीं. नंतर मी त्याच्या शोधाला मनुष्य पाठविला.

तेव्हां तो आमच्या मळ्यावर आहे असें कळलें. मी त्याला बोलावण्याकरितां पुनः मनुष्य पाठविला तेव्हां त्यानें ' बायको घरांत आहे तोंपर्यंत घरीं येणार नाहीं ' असा निरोप पाठविला. नंतर मी स्वतः गेलों. त्याला समजाविण्याचा प्रयत्न केला परंतु कार्टा माझेंहि ऐकेना. मग मी त्याला मारलं आणि रागानें परत घरीं आलों. माझें एकट्याचें भोजन झालें. परंतु नवरा जेवला नाहीं तेव्हां मुलगीहि जेवीना. मी तिला बोलावून समजाविलें. तथापि तें काय ? तिनें आपली मर्यादा सोडली नाहीं म्हणून मी तिला कसा बरं दोष देऊं ? शेवटीं तुमची बहीण आपल्या दीडशहाण्या मुलाची समजूत करण्याकरितां निघाली. त्यावेळी माझ्या मारामुळें रागावून रघ्या सांगलीस चालता झाला. तेथें ती गेली. त्याची पुष्कळ समजूत केली. पण तो पाजी कार्टा आपला हेका सोडीना. इकडे मुलीला सबंध दिवस उपास पडला. मग मी पुनः स्वतः काल सकाळीं सांगलीस गेलों. मला पाहतांच तो मागल्या परसांतून माझा डोळा चुकवून निघून गेला. तेव्हां माझा सर्वस्वी नाइलाज झाला. जयरामपंत, ही ह्या कार्ट्यानें माझ्या तोंडाला काळोखी आणली. मी आतां काय करूं तें मला सांगा ? मुलीला घरीं ठेवावी तर ती जेवीना. तिचा तरी काय बोल आहे. शेवटीं दुपारीं तिला घेऊन निघालों. आतां आपल्या विचाराला काय येतं तें सांगा ? तुम्ही आम्ही कांहीं निराळे नाहीं, आणि आपला आहे हा संबंध कायम रहावा म्हणून हा संबंध जुळविला. पण पहा त्याचा परिणाम कसा विपरित झाला तो ! "

पंतांनीं मुकाट्यानें ही सर्व हकीकत ऐकून घेतली, त्यांची चर्या गंभीर दिसूं लागली. ते कांहींच बोलले नाहींत. पुढें असलेल्या टेबलावर कोंपर टेंकून दोन्ही हातांनीं त्यांनीं आपलें कपाळ धरलें होतें. आपल्या एकुलत्या एक जिला त्यांनीं आपल्या तळहाताच्या फोडाप्रमाणें वाढविलें होतें, जिला दुसऱ्या ठिकाणीं दिली असतां तेथें तिला कसें वागवितील ही मनाला चिंता नसावी म्हणून खात्रीचें स्थळ पाहून–प्रत्यक्ष आपल्या बहिणीच्या घरीं दिली परंतु तेथें हा प्रकार ! त्यांच्या मनाला मोठा धक्का बसला. त्यांना कांहीं सुचेना. पुष्कळ वेळ झाला, ते कांहीं बोलत नाहीं असें पाहून गणेशपंत म्हणाले, " जयरामभाऊ, ह्या बाबतींत तुम्हांला जितकं वाईट वाटतं तितकंच मला वाटतं. आपण केलं तें चांगल्याकरितां केलं पण शेवट पहा कसा झाला तो ! मी तर कालपासून अगदीं वेडा झालों आहें. एकदां वाटतं कीं, त्या कार्ट्याला चांगला थोबाडून आठ पंधरा दिवस उपाशीं ठेवावा म्हणजे तो वठणीस येईल. पुनः वाटतं कीं त्यामुळें गोष्ट जास्त विकोपाला

मात्र जाईल, असा हा मला पेंच पडला आहे. काय करावं तें कांहींच सुचत नाहीं. आतां तुमच्या पुढें सरळ—सर्व गोष्टी मांडल्या आहेत. तुम्हीच यांतून कांहीं मार्ग काढाल तो खरा!"

पंत तरी काय मार्ग काढणार! आपल्या लाडक्या मुलीच्या सुखदुःखाचा प्रश्न त्यांना अशा बिकट परिस्थितींत तडकाफडकीं थोडाच सुटणार! शेवटीं त्यांनीं एक दीर्घश्वास सोडून उत्तर दिलें. "गणेशपंत, हा प्रश्न फार बिकट आहे. आपणांला ह्याचा चांगला विचार केला पाहिजे. आतां माझी कचेरीची वेळ भरत आली. तुम्हीहि गर्दीच्या प्रवासानें त्रासलेले आहांत. तर आतां स्नान वगैरे आटोपून जेवून थोडी विश्रांति घ्या. मी आज लवकरच येईन आणि मग आपण स्वस्थपणें बसून याचा विचार करूं." असें म्हणून ते उठले. आणि गणेशपंतांच्या स्नानाची व्यवस्था करण्याकरितां आंत गेले.

पंत आंत आले त्या वेळीं आपल्या आई आणि आजी जवळ दुःखाश्रू गाळीत बसलेली कमलिनी त्यांच्या दृष्टीस पडली. मुलाला पाहतांच म्हातारी म्हणाली. "अरे जयराम हें काय झालं पाहिलंस ना! आतां ह्या गोष्टीला करायचं काय."

"करायचं काय! कांहीं तरी केलं पाहिजे खरं! आपलेच दांत आणि आपलेच ओंठ!"

नेहमींप्रमाणें जयरामपंत कचेरींत निघून गेले. आज त्यांना अन्न देखील गोड लागलें नाहीं. तोच प्रकार घरांतील इतर मंडळीचा झाला. गणेशपंत जेवल्यावर दिवाणखान्यांत येऊन झोंपले. त्यांचें दोन दिवस डोकें दुखतच होतें, त्यांतून गाडीच्या त्रासामुळें त्यांचें सर्वांग कडमडून हळुहळू त्यांना ताप भरला. पंत दुपारीं घरीं आले आणि पाहतात तों घरांत गणेशपंत आणि कमलिनी ह्यांना ताप आला आहे. ताबडतोब त्यांनीं आपल्या एका डॉक्टर मित्राला बोलाविणें पाठविलें. संध्याकाळपर्यंत दोघांचाहि ताप बराच चढला. आपण घरीं आल्यावर सर्वजण एकत्र बसून पुढें असलेल्या प्रश्नाचा कांहीं तरी विचार करूं म्हणून पंत लवकर आले होते. परंतु ती मुख्य गोष्ट बाजूलाच राहिली. रात्रीपर्यंत गणेशपंतांचा ताप जरा कमी झाला. तेव्हां ते सांगलीला जाण्याचा विचार करूं लागले. मला एकदां घरच्या घरीं सांगलीस जाऊंद्या' असें ते पंताजवळ बोलूं लागले. 'तुम्ही दोन दिवस रहा. येथें परकेपणा नाहीं. जरा बरं वाटल्यानंतर जा.' असें पंतांनीं त्याचप्रमाणें म्हातारीनेंहि त्यांना परोपरीनें सांगून पाहिलें. परंतु त्यांना आपलें भविष्य कळलें होतें म्हणूनच कीं काय त्यांनीं सांगलीस जाण्याचा हट्ट घेतला.

शेवटीं नाइलाजास्तव दुसऱ्या दिवशीं सकाळीं पंतांनीं आपला आचारी आणि एक नोकर बरोबर देऊन त्यांची रवानगी केली. गाडींत बसल्यावर पुनः त्यांचा ताप भडकत चालला. सांगलीला येईपर्यंत तापानें त्यांची अगदीं शोचनीय स्थिति केली. स्टेशनवरून त्यांना उचलून टांग्यांत बसवावें लागलें.

अद्यापि रघुनाथ घरीं आला नव्हता. सांगलीस तो आपल्या एका मित्राकडे राहिला होता. आपल्या बायकोला घेऊन वडील गेले, ही बातमी त्याला कळली नव्हती. दोन दिवस तो सारखे मनांत विचार योजित होता. आतां परत घरीं न जातां मुंबईस जावें आणि कांहीं तरी उद्योग पहावा असा त्यानें विचार केला होता. तो ज्या मित्राकडे राहिला होता, त्याच्या मामाचें पुण्यांत कापडाचें दुकान होतें. तेथें रघुनाथाची व्यवस्था होण्यासारखी होती. परंतु पुण्याची त्याला जबरदस्त दहशत बसली होती. शेवटीं आज त्यानें आपल्या मित्राजवळ दहा रुपये उसने मागितले. आणि ते घेऊन तो स्टेशनवर आला. तेथें रस्त्यावर एका टांग्याजवळ बरीच गर्दी झालेली त्याला दिसली. तेव्हां साहजिकच तो काय प्रकार आहे हें पाहण्याच्या उद्देशानें तो पुढें झाला. टांग्याखालीं कोणीतरी मनुष्य सांपडला असावा असें त्याला प्रथम वाटलें. परंतु तो गर्दींतून पुढ होऊन पहातो तों प्रत्यक्ष आपल्या वडिलांनाच मंडळी टांग्यांत बसवीत आहेत हा काय प्रकार आहे हें त्याच्या लक्षांत येईना. आपल्या वडिलांची अशी स्थिति कशानें झाली ? ते येथें कां आले ? त्यांच्याबरोबर ही परकी मंडळी कोण ? हें त्याच्या कांहींच लक्षांत यईना. शेवटीं तो पुढें झाला. गणेशपंतांनीं त्याला ओळखलें नाहीं. ते त्यावेळीं जवळ जवळ बेशुद्ध स्थितींतच होते.

घरीं येतांच सर्वांची एकच गडबड उडाली. रघुनाथानें गांवांतील वैद्याला बोलावून आणलें. त्यानें रात्रीपर्यंत शक्य तितके उपचार करून पाहिले, परंतु गणेशपंतांच्या स्थितींत फरक पडेना. मनुताई अगदीं घाबरून गेली. रात्रीं गणेशपंतांची बडबड सुरू झाली. शेवटीं सांगलीहून हॉस्पिटलचा मोठा डॉक्टर बोलाविला. त्यानेंहि आपल्या आटोक्यांतील सर्व उपाय करून पाहिले परंतु गणेशपंतांच्या डोक्यांत चढलेली तापाची उष्णता उतरेना. सर्व रात्र त्यांच्या शरिराची तळमळ चालली होती. दुसरा दिवसहि त्याच स्थितींत गेला. सायंकाळच्या सुमारास ती तळमळ बंद होत होत रविअस्ताबरोबर मनुताईचा सौभाग्यरवि मावळला !

सर्व घरांत हाहाःकार उडाला ! एका दिवसांत त्या घराचा नूर बदलला !

मनुताईवर आकाशाची कुऱ्हाड कोसळली! गणेशपंतांबरोबर पंतांनीं आपला आचारी आणि नोकर पाठविले होते. ते अद्यापि हरिपुरांतच होते. त्यांनीं आपल्या यजमानास मुंबईंत तार केली. परंतु पंतांना हरिपुरास येणें शक्य नव्हतें. कारण कमलिनीहि बरीच आजारी झाली होती. त्यांना तार पोंचली त्याचवेळीं त्यांच्या घरीं तिला पाहण्याकरितां डॉक्टर आला होता. तार वाचून पाहतांच पंतांना एकदम धक्का बसला. आतां पुढें काय करावें हा त्यांना विचार पडला. शेवटीं आपल्या पत्नीला एका बाजूला नेऊन त्यांनीं तारेचा मजकूर सांगितला आणि ठरविलें कीं कांहीं दिवस ही गोष्ट घरांत कळवावयाची नाहीं. कारण ही गोष्ट आईच्या कानावर गेली तर ती रडून गोंधळ करील आणि त्यामुळें कमलिनीला कळेल. करितां दोन दिवस कमलिनीची प्रकृति थोडी सुधारेपर्यंत ही गोष्ट गुप्त ठेवावयाची!

तिसऱ्या दिवशीं कमलिनीची प्रकृति पुष्कळ सुधारली. तेव्हां त्यांनीं आपल्या मेहुण्याच्या निधनाची गोष्ट आईला सांगितली. त्याबरोबर त्यांनीं भविष्य केल्याप्रमाणें म्हातारीनें आकांत केलाच! पंतांना त्या दुःखांत किंचित् समाधान वाटलें तें इतकेंच कीं गणेशपंतांना आपण ठेऊन घेतलें नाहीं. त्यांचा बरा वाईट प्रकार आपल्या घरीं झाला असता म्हणजे सर्व खापर आपणावर फुटलें असतें. आणि ह्याच गोष्टींत म्हातारीनेंहि आपल्या दुःखांत थोडेंसें सुख मानून घेतलें. कमलिनीलाहि आपल्या श्वशुर निधनाची गोष्ट ऐकून थोडा धक्का बसला. परंतु तिच्या मनावर विशेष परिणाम झाला नाहीं. तिचा ताप आतां साफ बरा झाला होता. तथापि ती फारच अशक्त झाली होती. चार दिवसांनीं ती हिंडूं फिरूं लागतांच पंत तिला बरोबर घेऊन आपल्या बहिणीच्या शांतवनाकरितां हरिपुरास आले. त्यांनीं दोन दिवसांची रजा घेतली होती. आतां आपण प्रत्यक्ष रघुनाथाला भेटल्यावर त्याची समजूत करूं. आणि कमलिनीला सासरीं ठेऊनच येऊं असा त्यांनीं विचार केला होता. परंतु तो साध्य झाला नाहीं. कारण मामा येतांच त्यानें मळ्याचा रस्ता धरला. बिचारी मनुताई तर अंधारांत बसली. प्रथमपासून तिचा मुलावर विशेष दाब नव्हता. त्यांतून आतां तो सत्ताधारी झाला होता.

गणेशपंत मुलीला घेऊन मुंबईंत आले आणि त्यांनीं सर्व वृत्तांत सांगितला परंतु पुढें काय करावें याचा विचार झाला नव्हता. पंत त्या दिवशीं दुपारीं कचेरींतून लौकर आले परंतु त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. हें वर सांगितलेंच आहे आतां ते प्रत्यक्षच हरिपुरास आले होते. त्यांचा पहिला दिवस बहिणीच्या दुःखाचें

शांतवन करण्यांत आणि तिच्या दुःखाचा वाटा घेण्यांत गेला. परंतु सर्व दिवस रघुनाथ मात्र घरीं आला नाहीं, तें पाहून रात्रीं मनुताई पंतांना म्हणाली "पाहिलेंस ना भाऊ, हा त्यानें असा प्रकार मांडला आहे. त्याच्या मनांत काय आहे, तें देखील कळत नाहीं. त्या दिवशीं मीं दातांच्या कण्या केल्या, पण कांहीं केल्या तो ऐकेना कि मनांतलें कांहीं सांगेना. इकडच्या मनावर ह्याच गोष्टीचा विशेष परिणाम झाला होता. तापांत रात्रीं बडबडतांना 'रघ्या, अशानें तूं माझ्या नांवाला काळोखी आणशील ?' असं त्यांचं बोलणें मी दोन चारदां ऐकलं. भाऊ आतां पुढें काय करायचं रे ? हा पोर कसा शुद्धीवर येईल ?"

"आतां रघुनाथ जेवायला येईल ना ?"

"काय सांगाव ?"

पंतांनीं मळ्यावर मुद्दाम मनुष्य पाठविला, परंतु रघुनाथ आला नाहीं. उलट 'मला आपणाबरोबर कांहीं काम नाहीं.' असा त्यानें पंतांना निरोप पाठविला आणि आईला असें सांगून पाठविलें की, 'तुझी पांढऱ्या पायाची सून जर तूं घरांत ठेवून घेतलीस तर मी स्वतःचं काळं करीन !' हाहि निरोप नोकरानें पंतांच्या समक्षच मनुताईला सांगितला. हा निरोप ऐकून पंतांची अगदींच निराशा झाली. आपण रघुनाथाला भेटून चार गोष्टी सांगूं, त्याचें मन वळवूं आणि मुलीला येथेंच ठेऊं अशी जी त्यांना उमेद होती ती खचली. दुसऱ्या दिवशीं ते स्वतः रघुनाथाला भेटण्याकरितां मळ्यावर गेले. परंतु रघुनाथ तेथें नव्हता. आपला निरोप ऐकून मामा स्वतः येतील असें त्यानें पूर्वींच भविष्य केलें होतें. आणि त्यांची भेट होऊं नये म्हणून तो रात्रींच सांगलीला निघून गेला. पंत मुकाट्यानें परत आले. आणि मनुताईला म्हणाले, "ताई, आतां ह्या गोष्टी चावून चिकट करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तो एकदां मला भेटला असता म्हणजे कांहींतरी शहानिशा केली असता. पण तो भेटतच नाहीं, तेव्हां काय करायचं ! आतां मी कमलिनीला बरोबर घेऊन जाईन. तिला येथें ठेऊन कांहीं उपयोग नाहीं. कारण ती येथें असली तर तो घरीं येणार नाहीं."

"कसा हा माझा प्राक्तनाचा भोग उभा राहिला आहे पहा. पोरीला मात्र व्यर्थ नाडली !"

"त्याला आतां काय उपाय आहे. नशीब पोरीचं दुसरं काय ?"

कमलिनीला घेऊन मुंबईस परत जाण्याचा पंतांनीं विचार केला आणि त्याप्रमाणें मनुताईला त्यांनीं सांगितलें, तरी आल्यासारखें पुनः एकदां रघुनाथाच्या

बाबतींत प्रयत्न करून पहावा असा विचार करून त्यांनीं नोकरांकडून रघुनाथाच्या मित्रांना बोलाविणें पाठविलें. रघुनाथाचे मित्र म्हणजे श्रीधर आणि गणपति. त्या दोघांजवळ खोदखोदून चौकशी करतां रघुनाथाच्या मनाचा कल असा विपरीत कां झाला हें त्यांच्या लक्षांत आलें. तेव्हां त्यांनीं आपल्या मुलीच्या शिक्षणामुळें ती केव्हांहि डोईजड होणार नाहीं. अशी त्या दोघांची खात्री पटवून त्या दोघांना मुद्दाम रघुनाथाला समजावून आणण्याकरितां संध्याकाळीं सांगलीस पाठविलें. त्याप्रमाणें ते दोघे सांगलीस गेले, त्यांनीं रघुनाथाची भेट घेतली, त्याची पुष्कळ रीतीनें समजूत केली, तरी रघुनाथ परत येण्यास कबूल होईना. उलट तो म्हणाला, आतां तुम्हीं कोणत्या तोंडानें बोलतां ? माझी बायको कशी आहे हें तुम्हांला पूर्णपणें माहीत आहे. तुम्हींच प्रथम ती कशी 'पंडिता' आहे आणि ती पुढें माझ्या डोक्यावर मिरीं वाटेल हें मला सांगितलें. त्याप्रमाणें मी स्वतः अनुभवहि घेतला. आतां तुम्हीं रदबदली करतां, पण त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. मामांनीं तुम्हांला शिकवून पाठविलें आहे, हें मी जाणून आहे. मला तुम्हीं फसविण्याचा प्रयत्न केला तरी मी फसणार नाहीं—जा तुम्हीं आलांत तसें परत जाऊन मामांना सांगा कीं, आपण आपल्या पांढऱ्या पायांच्या मुलीला घेऊन परत जा. मी एक गांवढळ मनुष्य आहें. तुमची इंग्रजी शिकलेली मुलगी मला पचायची नाहीं. ह्यापुढें मी तिचं तोंड पहाण्यासहि खुषी नाहीं. जा— असा माझा स्पष्ट निरोप तुम्हीं मामांना सांगा. आणि आईलाहि असं सांगा कीं, तुला जर आपल्या मुलानें यावें अशी इच्छा असेल तर त्या विद्वान् सूनबाईना घरांत थारा देऊं नकोस. ती पांढऱ्या पायाची घरांत येतांच तुला वैधव्य आलं. आतां ती जर घरांत चिकटली तर तुला मला सर्वांना नदीवर जळक्या गोवऱ्यांत जाऊन पडावं लागेल. ती बया आपल्या घरादाराचं निसंतान करील. आणि इतकं समजूनहि जर तू भावाच्या गोड गोड थापांना भुलून तिला घरांत ठेवलेंस तर मी तुला अंतरलों म्हणून समज. जा हे दोन निरोप घेऊन परत जा—"

रघुनाथाकडून हा निरोप आलेला ऐकून पंतांना फारच वाईट वाटलें. मुलीबद्दल त्यांची सर्वस्वी निराशा झाली आणि रघुनाथाचा त्यांना अतिशय रागहि आला. आतां ह्यापुढें आपण मुलीला येथें केव्हांहि पाठवावयाचें नाहीं असा दृढ निश्चय करून त्यांनीं मनुताईची रजा घेतली आणि कमलिनीला घेऊन ते परत मुंबईस जाण्याच्या तयारीला लागले.

---

" हें पाहिलंस ना प्रत्यक्ष उदाहरण ! इतक्याच करितां आम्हीं बालविवाहाचा निषेध करतों बरं ! ह्या घरांतल्या बायकांच्या नादीं लागून पंतांनीं आपल्या कमलिनीचं लग्न केलं आणि त्याचा परिणाम हा पहा कसा झाला तो ! टाकलीना आतां त्या पोरीला नवऱ्यानें !"

" आणि प्रौढविवाह करून असं व्हायचं नाहीं अशी तुम्ही तरी काय खात्री देतां ?"

" त्यांत खात्री द्यायलाच नको. प्रौढवयांत लग्न केल्यावर दोघंही समंजस असतात. त्यांच्याकडून हा असला जंगली प्रकार व्हावयाची भीतिच नाहीं."

" मग त्या तुमच्या प्रोफेसरांनीं कां आपल्या शिकलेल्या बायकोला टाकली ? ते दोघेहि चांगले शिकलेसवरलेले, विद्वान् मग—"

" कारण ते दोघेहि अति शहाणे आणि हेकेखोर म्हणून !"

" तें कांहीं नाहीं. बालविवाह करा कीं प्रौढविवाह करा,-सर्व कांहीं दैवानुसार घडणार !"

" तुमच्यासारख्या दैववाद्यांबरोबर बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं." असें म्हणून शंकररावांनीं सिगारेट जोरानें ओढिला.

" बरं पण आतां शांतीच्या लग्नाचा काय विचार ? अद्यापि ती लहानच का आहे ? परवां तिला सतरावं वर्ष लागेल. आतां आणखी किती थांबायचं ?"

" आहें—मी त्याच विचारांत आहें.माझा डोळा त्या जोशांच्या वसंतावर आहे. त्याचा स्वतःचा कल कसा काय आहे हें पाहण्यास मी आपल्या यशवंताला सांगितलं आहे."

वसंताचें नांव ऐकतांच पार्वतीबाईला आनंद झाला. आपणांस तो जांवई मिळावा अशी तिची फार इच्छा होती. तो यशवंताबरोबर नेहमीं त्यांच्या घरीं येत असे. त्या दोघांची चांगली मैत्री जुळली होती. समानशील असल्याशिवाय मैत्री जुळत नाहीं असें म्हणतात. आणि क्वचित् प्रसंगीं जुळली तर ती कांहीं कार्य साधण्यापुरतीच असते. यशवंत आणि वसंत यांच्या मैत्रीचा प्रकार निराळाच होता. वसंत जितका साधा होता तितकाच यशवंत आढ्यतेनें वागणारा होता. वसंताचा स्वभाव भिडस्त आणि मनमिळाऊ होता, परंतु यशवंत त्याच्या अगदीं उलट ! एखाद्याची मानखंडणा करण्यांत त्याचा अगदीं पहिला नंबर होता.

दोघेहि आपापल्या वडिलांना त्यांच्या पश्चात् जिंदगीला एकटेच मालक होते, तरी वसंताच्या वाट्याला येणाऱ्या श्रीमंतीच्या मानानें यशवंताची श्रीमंती गरिबींतच गणली जाणार होती. नाहीं म्हणायला दोघेही सारखेच चलाख असून क्लासांत चढाओढीनें अभ्यास करीत असत. आणि हेंच त्यांच्या मैत्रीचें कारण होतें.

ज्या दिवशीं वर लिहिलेला संवाद पतिपत्नींत झाला, त्याच दिवशीं आणखी दोन गोष्टी घडल्या. चहा घेऊन झाल्यावर शांती उठून बाहेर जाऊं लागली. तेव्हां पार्वतीबाई म्हणाली, "शांते, तीं भांडीं तशीच टाकून चाललीस ना? तेवढी दोन भांडीं विसळून आणलींस तर! पण नाहीं. कसं होईल तुझं सासरीं?"

"आई, त्याची नको तुला काळजी–" चहा पितांना मध्येंच यशवंत म्हणाला, "आमच्या शांताबाईंना असं फर्मास सासर पाहणार आहे कीं, पाटावरून ताटा-वर आणि ताटावरून पाटावर!"

शांतीनें आपल्या भावाकडे आकुंचित भुंवया करून पाहिलें आणि क्षणकाऱ्यानें उठून ती बाहेर गेली. यशवंत कोणत्या स्थळाला उद्देशून बोलला हें पार्वती-बाईच्या लक्षांत आलें आणि शांतेच्याहि लक्षांत आलें. वसंत बहुतेक करून एकदोन दिवसा आड त्यांच्या घरीं येत असल्यामुळें तो एक आपल्या घरांतलाच आहे असें शांतीला वाटे. ती त्याच्याबरोबर अगदीं मोकळया मनानें वागत असे, तथापि तिच्या स्वभावाची अद्यापि पूर्ण ओळख झाली नव्हती. ती आपल्या भावासारखी थोडी हेकेखोर आणि आळशी असून तिला अली-कडच्या 'फ्याशन' च्या पोषाखाची फार आवड आहे, असें त्याला वाटत होतें. ह्यापेक्षां तिच्याविषयीं त्यानें केव्हांहि जास्त विचार केला नव्हता. त्याचप्रमाणें शांतीनेंहि वसंत म्हणजे आपल्या दादाचा मित्र, सुंदर आणि घरचा श्रीमंत आहे ह्या पलीकडे जास्त विचार केला नव्हता. तथापि इतकी गोष्ट मात्र खरी कीं, तो जेव्हां जेव्हां त्यांच्या घरीं येई, तेव्हां तेव्हां ती त्याच्या पुढें पुढें होत असे. असें करण्यांत तिचा कांहीं स्वार्थ होता अशांतला कांहीं प्रकार नव्हता. कारण तसें जर असतें तर यशवंताचे दुसरे कांहीं मित्र कधीं कधीं घरीं येत, त्याचप्रमाणें शंकर-रावांचे ऑफिसांतील, क्लबमधील आणि दुसरे स्नेही केव्हां केव्हां येत असत, त्यांच्यापुढें देखील तिचें वागणें तसेंच असे. फक्त आपला नटवेपणा त्यांच्या दृष्टीस पडावा हाच तिचा असें वागण्याचा हेतु असे. असो.

शांती क्षणकाऱ्यानें बाहेर पडली. यशवंतहि तिच्या मागेंच होता. तीं दोघें वर येतांच यशवंत तिला म्हणाला, "शांते रागावलीस वाटतं? पण मी कांहीं

तुझी थट्टा करीत नाहीं. तूं वसंताबरोबर लग्न करावेंस अशी माझीच काय, पण बाबांची देखील इच्छा आहे. तो तुला आवडत नाहीं का ?"

"हेंरे काय दादा ! मला नको विचारूंस जा !—मला आपला अभ्यास करूं दे—सांगतें !" असें म्हणून शांतीनें एक पुस्तक उघडलें. परंतु वाचण्याकडे तिचें लक्ष लागेना. वसंत हा तिच्या विचाराचा आज प्रधान विषय बनला. तो तिला आवडत होता. परंतु त्याच्यावर तिचें प्रेम नव्हतें. अद्यापि तिला प्रेमाची ओळख झालेली नव्हती. त्यांच्या घरीं येणाऱ्या मंडळीपैकीं जे तिची प्रशंसा करीत, तिच्या तोंडावर गोड बोलत ती सर्वच मंडळी तिला आवडत असत. परंतु त्यांतल्या त्यांत वसंत नेहमीं येणारा असल्यामुळें तो तिला विशेष आवडत असे इतकेंच ! आज तिनें वसंताविषयीं पुष्कळ विचार केला. त्याच्या घरीं गाडी घोडा आहे, घरांत नोकर चाकर पुष्कळ आहेत. तेव्हां आपण वसंताबरोबर लग्न केलें तर घरच्यापेक्षां आपणास तेथें जास्त सुख होईल, ह्याच मनोराज्यांत ती दंग झाली. अशा रीतीनें ती स्वतःबरोबर विचार करीत बसली असतां पलीकडच्या खोलींतून वसंताचा आवाज तिला ऐकूं आला. तो तिच्या नेहमींच्या परिचयांतील आवाज होता, तरी आज प्रथमच त्या आवाजांत कांहींतरी आकर्षण करण्याची शक्ति आहे असा तिला भास होऊन तिच्या अंतःकरणांत एकप्रकारचे रोमांच उभे राहिले. वसंत त्यांच्या घरीं आला म्हणजे ती कांहीं तरी निमित्त काढून—एखादें पुस्तक घेऊन कांहीं विचारण्याच्या उद्देशानें त्याच्यापुढें जात असे. परंतु आज त्याच्यापुढें जाण्यास तिला धीर होईना. इतकेंच नव्हे तर शेजारच्या खोलींत बसणेंहि तिला अप्रशस्त वाटूं लागलें. ती हळूंच उठून बाहेर आली आणि खालीं गेली. त्यावेळीं शेजारच्या खोलींत यशवंत आणि वसंत यांच्या कमलिनीविषयीं गोष्टी चालल्या होत्या. वसंत म्हणाला, खरोखर "कमलिनीची ही हकीकत ऐकून मला अत्यंत वाईट वाटतें. त्या अशिक्षित मूर्खाला त्या रत्नाची किंमत काय कळणार ?"

"हा सर्व दोष जयरामपंतांचा आहे. आपला भाचा झाला म्हणून काय झालं ! तो मूर्ख, अशिक्षित आणि खेडवळ आहे हें माहीत असूनहि त्यांनीं हें लग्न जुळविलं. प्रथम कमलिनीच्या आईची आणि आजीची इच्छा ती तुमच्या घरीं द्यावी अशी होती. आणि तसं जर जुळलं असतं तर ती खरोखरीच आतां सुखी असती. पण म्हणतात ना ह्या नशीबाच्या गोष्टी आहेत. पण कायरे वसंत समज कीं, ती तुझी बायको झाली असती तर तूं तिला कसं वागविलं असतंस ?"

" यशवंत, असा प्रश्न विचारण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तथापि इतकी गोष्ट मात्र खरी कीं, वडिलांच्या पूर्ण संमतीनें जिचें मी पाणिग्रहण करीन, तिच्याशीं वागतांना मी स्वतःला परिकर्तव्याचें कधींहि विस्मरण होऊं देणार नाहीं."

" एकूण तुझ्या वधूची पसंती वडिलांच्या आवडीनिवडीवर अवलंबून आहे म्हणायची ! मी तर ही गोष्ट केव्हांहि पसंत करणार नाहीं. वडिलांच्या आवडी-निवडीचा परिणाम काय होतो, याचें कमलिनी हें एक प्रत्यक्ष उदाहरण आपल्या-पुढें असून तूं देखील तीच चुकी करावीस हें अगदीं गैर आहे. मी तर ह्या गोष्टीत वडिलांना बिलकूल हात घालूं देणार नाहीं. माझ्या 'चॉइस' प्रमाणेंच मी लग्न करणार !

" आणि मी कुठें असं म्हणतों कीं मी माझ्या 'चॉइस' प्रमाणें लग्न कर-णार नाहीं म्हणून ! परंतु आपल्या 'चॉइस' ला वडिलांच्या अनुभवाची जोड मिळाली म्हणजे ठीक !"

" मला हीहि गोष्ट पसंत नाहीं. वडिलांना ह्या बाबतींत थोडीहि जरी ढवळा-ढवळ करूं दिली, तर मग आपला 'चॉइस' तो काय ?"

" मग असा तुझा 'चॉइस' तरी काय आहे तो तरी मला कळूं दे."

" माझा चॉइस म्हणजे She must be very beautiful and up-to date in all the present fashions ती अत्यंत सुंदर आणि आज कालच्या सर्व सुधारणांत ती पूर्ण तरबेज असली पाहिजे !"

" अशी मुलगी आपल्या समाजांत मिळणें कठीण ! एकंदरींत तुझा 'चॉइस' फार मोठा आहे.

" बरं पण मी आतां असं विचारतों कीं, आतां तुझी ही बी. ए. ची परीक्षा झाल्यावर तुझें लग्न करण्याचा रावबहादुरांचा विचार आहे, ही गोष्ट खरी ना ?— तेव्हां मी जर तुला एखादी तुझ्या 'चॉइस' बरहुकूम मुलगी सुचविली तर ती तुला पसंत पडेल काय ? बोल—आमच्या शांती संबंधीं तुझं मत काय आहे ?"

" माझं मत काय असायचं ?—चांगलं आहे."

" ती तुला पसंत आहे का ?"

यशवंताचा हा दुसरा प्रश्न ऐकून वसंत क्षणभर विचार करीत राहिला. पहिल्या प्रश्नाचें त्यानें उत्तर चटकन् दिलें परंतु दुसरा प्रश्न तसा नव्हता. शांता स्वरूपानें सुंदर असून चांगली सुदृढ होती. ती इंग्रजी सहावी यत्ता शिकत होती. ह्या इतक्या सर्व गोष्टी त्याच्या 'चॉइस' प्रमाणें होत्या तथापि ती आपली पत्नी

व्हावी असें मात्र त्याला वाटेना. आज इतक्या दिवसांच्या सहवासामुळें तिचे गुणदोष त्याला माहित झाले होते. त्यामुळें यशवंताच्या प्रश्नाला उत्तर देण्यास त्याला विचार पडला. ' पसंत नाहीं ' असें जर आपण उत्तर दिलें तर आपल्या मित्राला राग येईल. आणि ' पसंत आहे ' असें म्हटल्यास आपल्या मना विरुद्ध गोष्टी घडतील अशी त्याला काळजी पडली. तो बराच वेळ उत्तर देत नाहीं असें पाहून यशवंत म्हणाला, " तूं असा विचारांत कां पडलास ? मी तुझ्या जवळ ही गोष्ट स्वतः होऊन कांहीं काढली नाहीं. बाबांच्या सांगण्यावरून मी तुला विचारीत आहें. "

यशवंताचें हें वाक्य ऐकून तो जास्तच विचारांत पडला. आपण नाहीं म्हटलें तर एकट्या आपल्या मित्राला वाईट वाटणार नसून त्याबरोबर त्याच्या वडिलांनाहि वाईट वाटेल असा विचार त्याच्या मनांत येऊन केवळ भिडेखातर तो अडखळत म्हणाला, " यशवंत, शांता मला आवडत नाहीं असें नाहीं पण तिचा स्वभाव जरा एककल्ली आहे. "

" हं—त्यांत काय मोठंस ! तिचा हा स्वभाव पुढें तुला सहज बदलतां येईल. "

इतक्यांत दरवाजा उघडून शंकरराव दरवाजांत येऊन उभे राहिले आणि म्हणाले, " कायरे यशवंत, आज शांती कां वर येत नाहीं ? रोज तुम्हाला ती चहा घेऊन वर येते ना ? मग आज काय झालं तिला ? "

" नाहींच यायची ! आजपासून वसंतरावांची ती भावी वधू झाली. "

" असं काय ? " वाः—असें म्हणून शंकररावांनीं वसंतापुढें हात करून म्हटलें, " वसंतराव, तुम्ही ही आमच्या शांतीची केलेली निवड ऐकून मला फार फार आनंद झाला. "

शंकररावांच्या ह्या एका वाक्यानें सर्व गोष्टी बहुतेक ठरल्या सारख्याच झाल्या. वसंत अगदीं गप्प राहिला. त्याला एक शब्दहि बोलण्याचें धैर्य होईना. हा सर्व प्रकार केवळ त्याच्या भिडस्त स्वभावामुळें झाला. शंकरराव त्याच दिवशीं रात्री रावबहादुरांच्या घरीं गेले. आणि त्यांची संमति घेऊन आले. रावबहादुरांचा आपल्या मुलावर पूर्ण विश्वास होता. तो कोणतीहि गोष्ट योग्य विचार केल्याशिवाय करणार नाहीं अशी त्यांची खात्री होती. जयरामपंत पुण्यास होते, त्यावेळीं सुमतीबाई त्यांच्याकडे जात असे. त्याचप्रमाणें रावबहादुरांचें कुटुंब-रमाबाई देखील केव्हां केव्हां सुमतीबाईकडे येत असे. तेव्हां तिनें कमलिनीबरोबर खेळतांना शांतीला पाहिलें होतें. शिवाय शाळेंत जातां येतां ती रमाबाईच्या कैक

वेळां दृष्टीस पडली होती. तिचाहि पतीप्रमाणेंच आपल्या मुलावर पूर्ण विश्वास होता. तेव्हां पतीच्या संमतीबरोबर तिचीहि मुलाच्या वधूपसंतीला संमति मिळाली. ते वसंताच्या शिक्षणाकरितांच केवळ पुण्यांत येऊन राहिले होते. त्याची बी. एची परीक्षा आटोपल्यावर ते आपल्या गांवीं—भोरास जाणार होते.

परंतु मध्यंतरी ह्या वसंताच्या लग्नाचा बूट निघाल्यामुळें परीक्षा झाल्यावर त्याचें लग्न करून नवीन सून घेऊनच भोरास जाऊं असें रावबहादुरांनीं ठरविलें. शंकरराव येऊन गेले त्याच दिवशीं रात्रीं जेवतांना रावबहादुरांनीं वसंताजवळ त्याच्या परिक्षेची गोष्ट काढिली आणि म्हणाले, " तूं आणि यशवंत मुंबईस परीक्षेकरीतां जाणार तर जयरामपंताकडेच उतरा. मला त्यांचं आजच पत्र आलं आहे. 'मुलांनीं माझ्या घरींच यावं आणि तीं जर दुसऱ्या ठिकाणीं उतरतील तर मला मोठा राग येईल असें त्यांनीं पत्रांत लिहिलं आहे. तेव्हां तुम्हीं परवां येथून जाल त्यावेळीं त्यांच्याच घरीं जा. त्यांच्या मुली विषयीं तुला हकीकत कळलीच असेल. मला ती हकीकत वाचून फार वाईट वाटलं. आतां तिला शक्य तितकं शिक्षण द्याव-याचं असा पंतांनीं विचार केला आहे. मला ही त्यांची योजना आवडली. कारण शिक्षणांत मन गुंतल्यावर तिला स्वतःच्या दुःखाचा थोडा तरी विसर पडेल असें मला वाटतं. एकंदरींत नवऱ्यानें तिला टाकली ही गोष्ट फार वाईट झाली. नशीब तिचं, दुसरं काय ! "

जयरामपंतांनीं रावबहादुरांना पत्रांत लिहिल्याप्रमाणेंच आपल्या मुलीची व्यवस्था केली होती. हरिपुराहून आल्यानंतर थोड्या दिवसांनीं त्यांनीं कमलि-नीला सोसायटीच्या शाळेंत घातलें. ती नुकतीच सातव्या यत्तेंत गेली होती. वसंत आणि यशवंत परीक्षेकरितां मुंबईंत आले आणि पंधरा दिवस त्यांच्या घरीं राहिले. ते दोन आठवडे तिचे फार आनंदांत गेले. शांती आणि वसंत यांचें लग्न निश्चित झालें आहे हें ऐकून तिला आनंद झाला. आणि स्वतःबद्दल थोडेसें वाईटहि वाटलें. वसंताच्या संगतींत शांती पूर्ण सुखी होईल ह्याच विचारानें तिला आनंद झाला. तिनें शांतीच्या अभ्यासाची वसंताजवळ पांच सहादा चौकशी केली परंतु तो विशेष मोकळ्या मनानें बोलला नाहीं. तेव्हां कमलिनीला एक प्रकारची शंका येऊं लागली. शांतीविषयीं गोष्ट निघाली म्हणजे वसंत थोडा दुःखी दिसतो, असें तिच्या लक्षांत आलें. तेव्हां मनाची खात्री करून घेण्या-करितां परीक्षा आटोपल्यावर ते दोघे जाण्यापूर्वी एके दिवशीं रात्रीं ती सर्व मंडळी दिवाणखान्यांत बसली असतां कमलिनी म्हणाली, " मग वसंतराव तुमचं लग्न झाल्यावर शांतीबाईला तुम्हीं पुढें शिकवाल किंवा तिचं शिक्षण बंद कराल ? "

" तो तिच्या इच्छेचा प्रश्न आहे. तिची पुढें शिकण्याची इच्छा असेल तर मी तिच्या शिक्षणाच्या आड केव्हांहि येणार नाहीं. पण ह्या पुढल्या गोष्टींची आतांच वाच्यता कशाला ! वास्तविक ती तुमच्या पुढें होती. आतां ह्या वर्षी तिनें मॅट्रिकला बसायला पाहिजे होतें. पण—"

" वसंतराव, हें तुम्ही बोलतां, हें आपल्या भावी वधूच्या शिक्षणाबद्दल निराशेनें बोलतां किंवा तिची बाजू सांवरून धरण्याकरितां विरोधी बोलतां ? "

" खरं आहे तें बोलतों, मग तें तुम्ही कोणत्याहि अर्थी धरा ! पण जाऊंद्या ती गोष्ट. तुम्हीं आतां मॅट्रिक झाल्यावर पुढें कोणता कोर्स घेणार तें सांगा ? "

" ' मेडिकल लाईन ' घ्यावी अशी माझी इच्छा आहे. "

कमलिनीला आलेली शंका खरी होती. वसंताला अलीकडे बराच एकांत प्रिय झाला होता. त्याचा पूर्वींचा आनंदी स्वभाव बदलला होता. असा हा त्याच्या स्वभावांत फरक पडलेला होता. परंतु परीक्षा जवळ आली आहे त्यामुळें अभ्यासाच्या काळजींत तो असेल असें समजून मंडळीनें त्याकडे दुर्लक्ष केलें. परंतु परीक्षा होऊन तो परत पुण्यांत आल्यावर त्याची एकांत प्रियता अधिक वाढली. आणि त्याचें कारणही तसेंच होतें. कांहीं वर्षांपूर्वी कमलिनी त्याला वधू म्हणून सांगून आली होती. हें त्याला माहित होतें. त्यावेळीं तो तिच्याबरोबर बोलत असे, तरी आतां मुंबईत असतांना जसे दोन आठवडे तिच्या सान्निध्यांत घालवावयास मिळाले तसा प्रसंग पूर्वी कधीं आला नव्हता. त्यामुळें तिच्या स्वभावाची त्याला चांगलीशी ओळख पटली नव्हती. परंतु आतां पंधरा दिवसांत तिचे अनेक प्रशंसनीय गुण त्याच्या दृष्टीस पडले आणि साहजिक त्याचें मन तिची आणि आपल्या भावी वधूची प्रत्येक गुणांत तुलना करूं लागलें. परंतु अशी तुलना करून निष्कर्ष काय निघणार होता ? उलट त्यानें स्वतःला दुःखी मात्र करून घेतलें. कारण कांहीं विशिष्ट गुणांमुळें शांती त्याला पसंत नव्हती. इतकेंच नव्हे तर ती आपली वधू झाल्यावर तिचे कांहीं गुण आपल्या बालबोध वळणाच्या घरांत खपण्यासारखे नसून ते गुण आपणाबरोबर आपल्या प्रिय मातापितरांच्याहि दुःखाला कारण होतील. असें जरी त्याला आतां चांगलें कळून चुकलें होतें तरी ' शांती मला वधू नको ' असें त्याच्या भिडस्त स्वभावामुळें स्पष्ट बोलण्याचें त्याला धैर्य नव्हतें. असो.

मुंबईहून आल्यापासून वसंताच्या वागण्यांत फरक पडला. ही गोष्ट रमाबाई आणि रावबहादूर यांच्या लक्षांत आली. अलीकडे तो कोणाबरोबर मोकळ्या मनानें बोलत नसे. बाहेरहि फिरावयास क्वचित् जात असे. जेवतांना देखील

विचारलेल्या प्रश्नाच्या उत्तरापलीकडे तो फारसा बोलत नसे. ही त्याची वृत्ति पाहून एके दिवशीं रमाबाई म्हणाली, "अलीकडे मुंबईहून [illegible] आपल्या वसंताच्या वर्तनांत तुम्हांला कांहीं फरक दिसतो काय ?"

"होय." रावबहादुरांनीं उत्तर दिलें, "तो अलीकडे आपल्या खोलींत बसून असतो."

"असं होण्याला काय बरं कारण असावं ?"

"कारण कसलं !-आतां नुकतीच परीक्षा झाली आहे तेव्हां परीक्षेचा निकाल लागेपर्यंत त्याच्या मनाची अशी चलबिचल होणं साहजिक आहे. आपण पास होऊं अशी जरी मनाची खात्री असली तरी मुलांची वृत्ति अशी बनायचीच !"

"पण आपला वसंत पास होईल ना ?"

होईल अशी आपण खात्री बाळगायची ! पण निकालावर सर्व अवलंबून आहे.

पुढें एका महिन्यानें वसंत चतुर्भुज झाला. ज्या दिवशीं वसंत आणि शांता यांचें कडाक्यानें लग्न झालें त्याच दिवशीं उभयतांच्या आनंदांत भर घालणारी 'वसंत आणि यशवंत पास झाले,' ही पंतांनीं केलेली तार आली. सर्व मित्र-मंडळींनीं वसंताचें अभिनंदन केलें आणि त्यानें केलेला हा प्रीतिविवाह सुखकर होईल अशी खात्रीपूर्वक आशा दर्शविली. परंतु 'जसें दिसतें तसें तें नसतें म्हणून जग फसतें !' हा तत्त्ववेत्त्यांचा सिद्धान्त खोटा कसा ठरणार ?

---

## १०........ गृहशिक्षणाच्या अभावीं

रावबहादुर जोशांनीं आपलें पुण्याचें बिऱ्हाड साफ मोडलें. ज्या उद्देशाकरितां ते पुण्यास येऊन राहिले होते तो त्यांचा उद्देश सफल झाला होता. मुलानें विश्व-विद्यालयाचें उच्च शिक्षण घ्यावें, हा त्यांचा उद्देश होता. त्याप्रमाणें वसंत बी. ए. झाला. ह्यापुढें मुलानें शिकूं नये किंवा त्यानें पुढें शिकण्याची इच्छा दर्शविली असती तर रावबहादुर त्याच्या विरुद्ध गेले असते असें मात्र नाहीं. फक्त आपल्या नांवलौकिकाप्रमाणें आपल्या मुलाचें शिक्षण असावें अशी त्यांची इच्छा होती.

आपणांस सूनहि मनाप्रमाणें मिळाली म्हणून रमाबाईना रावबहादुर साहेबां-प्रमाणेंच आनंद झाला. मुलाच्या पसंतीप्रमाणें सर्व गोष्टी जुळल्या असल्यामुळें

त्याचा विवाह सुखकर होईल अशी त्यांनीं आशा करणें केव्हांहि चूक नव्हतें ! लग्न झाल्यावर शांता चारसहा दिवस सासरीं राहिली. बाकी भोरला जाण्याचा दिवस मुकरर होईपर्यंत महिना सव्वा महिना ती माहेरींच होती. ज्या दिवशीं मंडळी भोरला जाण्याचें ठरलें त्याच्या आदल्या दिवशीं रावबहादुरांनीं आपल्या सुनेला बोलावणें पाठविलें आणि त्याप्रमाणें शांता सासरीं आली. आपल्या पतीबरोबर-वसंताबरोबर बोलण्याला तिला कांहींच संकोच वाटत नव्हता. इतकेंच नव्हे तर सासुसासऱ्याच्या पुढें इकडून तिकडे जाण्याचाहि संकोच वाटत नव्हता. तिचें हें निर्भिड वर्तन पाहून रमाबाइंना जरा चमत्कारिक वाटूं लागलें. वास्तविक नवी सून प्रथम सासरीं येतांच तिचें वर्तन फार मर्यादशील असायचें ! परंतु त्यांच्या सुनेचें वर्तन मात्र तसें नव्हतें. त्या दिवशीं जाण्याच्या तयारींत सर्वजण गुंतल्या-प्रमाणें शांतीचें वर्तन रावबहादुरांच्या लक्षांत आलें नाहीं. परंतु दुसऱ्या दिवशीं गाडीचा प्रवास करीत असतां ती सर्व मंडळी सेकंड क्लासांत बसली होती. एका कोप-ऱ्यांत रावबहादुर आणि रमाबाई, मध्यें थोडेंसें सामान आणि दुसऱ्या कोपऱ्यांत वसंत आणि शांता अशी ती मंडळी बसली होती. लग्न पूर्वी वसंताबरोबर तिचें जसें वर्तन होतें तसेंच तें आतां होतें. त्यांत कांहींच फरक नव्हता. पलीकडे आपली सासू आहे, सासरा आहे तेव्हां आपण आपल्या पतीबरोबर इतक्या मोठ्यानें कसें बोलावें, हा प्रश्नहि तिच्या मनांत उद्भवला नाहीं. उलट तिच्या ह्या अशा वर्त-नामुळें वसंताला शरमल्यासारखें झालें. त्यानें दोन चारदां डोळयानें दाबण्याचा प्रयत्न केला. परंतु शांतीनें तिकडे लक्षच दिलें नाहीं. शेवटीं तिच्याबरोबर बोल-ण्याचा प्रसंग टाळण्याकरितां त्यानें ट्रंकमधून एक पुस्तक काढलें. पति आपणाशीं बोलत नाहीं असें पाहून शांता उठून पलीकडच्या खिडकींत रावबहादुरांच्या शेजारीं उभी राहिली आणि सृष्टिसौंदर्य पाहूं लागली. त्यावेळीं रमाबाईला अगदींच बांधल्यासारखें वाटूं लागलें. त्या आपल्या सुनेला 'पलीकडे हो' म्हणून सांगण्याकरितां तोंड उघडणार इतक्यांत बाहेर बोट दाखवून शांता राव-बहादुरांना म्हणाली, "किती सुंदर तो देखावा दिसतो ! अशा ठिकाणीं रोज संध्याकाळीं फिरायला यावं—नाहीं ? मला असं नैसर्गिक सृष्टिसौंदर्य अगदीं मनापासून आवडतें !"

"ईशानिर्मित सौंदर्यच तें ! तें रसिक मनाला आवडणारच !" इतकेंच बोलून रावबहादूर गप्प राहिले. शांता त्यांच्या जवळ येऊन खिडकींत उभी राहिली, त्यावेळीं त्यांना देखील चमत्कारिक वाटलें. ते स्वतः सुधारक मताचे

होते, तथापि त्यांच्या मनावर झालेले बालबोध घराण्याचे संस्कार अगदींच पुसले नव्हते. मुलीचें हें असें निर्भीड वर्तन कां असावें ? आपल्यापुढें ती इतक्या धिटाईनें उभी राहण्यास कशी धजली ? इत्यादि प्रश्न त्यांचे मनांत येऊं लागले आणि त्या सर्व प्रश्नांचें त्यांना एकच उत्तर मिळालें. 'शांता इंग्रजी शिकलेली आहे !'

परंतु ह्या उत्तरानें रावबहादुरांचें समाधान झालें नाहीं. त्यांचें मन जास्त खोल विचार करूं लागलें. मुलीचा विनय सुटण्यास इंग्रजी शिक्षण कारण म्हणावें तर मग आपला मुलगा वसंत बी. ए. झाला असूनहि अद्यापि आपल्या समोर उभा रहात नाहीं. वास्तविक आपल्या पित्यापुढें उभें राहण्यास त्याला कोणताहि संकोच वाटूं नये, असें असताना हा उलट प्रकार कसा ? तो आपल्या बरोबरीचा झाला असून उच्च शिक्षण मिळालेला आहे. तेव्हां त्यानें अगदीं बरोबरीच्या नात्यानें वागावें पण वस्तुस्थिति तशी नसून सर्वच उलट ! तेव्हां शिक्षणामुळें तो विनयशील बनला आहे. मग शांता शिक्षणामुळें विनयशील कां राहूं नये ? वास्तविक विनयशील असणें हा तिचा जन्मसिद्ध हक्क आणि त्यांतून इंग्रजी शिक्षण मिळालें असल्यामुळं तिनें जास्त विनयशील व्हावयाचें, मग हा प्रकार उलट कसा ?

पुष्कळ वेळ रावबहादुरांनीं ह्या प्रश्नाचा विचार केला. परंतु उत्तर म्हणून मिळेना. शेवटीं ह्या विचारांत त्यांचें इच्छित स्टेशन आलें. सर्व मंडळी उतरली. पूर्वी व्यवस्था करून ठेवल्यामुळें त्यांच्या पत्राप्रमाणें कारकून गाड्या घेऊन स्टेशनवर आला होता. योग्य वेळीं सर्व मंडळी घरीं आली. आज रावबहादुरांच्या घरांत नव्या सुनबाईचा—शांतीचा—लक्ष्मीचा प्रवेश झाला.

रावबहादुरांच्या नांवलौकिकाप्रमाणें त्यांचा वाडा मोठा होता. त्यांचें उत्पन्नहि मोठें असून वाड्यांतील इमारतहि मोठीच होती. तळमजल्यावर पुढल्या दालनांत बैठक असून तेथील थाट पेशवाई पद्धतीचा होता. त्यावरून प्रथम आंत शिरतांच तें घर आणि घरांतील वळण जुन्या पद्धतीचें आहे असा ग्रह होत असे. परंतु माडीवर चढतांच दिवाणखान्यांत व्यवस्थेनें मांडलेल्या खुर्च्या, टेबल, कोची, आरसे इत्यादि वस्तु पाहतांच तें सुधारकाचें घर आहे अशीच कल्पना होई. वसंताची खोली वरच्या माडीवर होती. तो नेहमीं आंतल्या बाजूला असे. रावबहादुरांची बैठक दिवाणखान्यांत असे त्यांना भेटण्याकरितां येणारी मंडळी वरच येत असे. रावबहादुर परत आले असें कळतांच गांवांतील मंडळी त्यांना भेटण्याकरितां येऊं लागली. त्या मंडळींना रावबहादुरांची सून पहावयाची इच्छा स्वाभा-

विकच होत असे. आणि त्याप्रमाणें रावबहादुरांच्या हांक मारण्यावरून शांतीला दिवाणखान्यांत वरचेवर यावें लागे. प्रत्येक वेळीं ती दिवाणखान्यांत येतांच अगदीं निर्भीडपणें त्या मंडळीसमोर रावबहादुरांच्या जवळ-टेबलाजवळ-उभी राही. लोकांनीं आपली व आपल्या पोषाखाची स्तुति करावी, म्हणून ती प्रत्येक वेळीं पोषाखाची खबरदारी घेत असे.

भोरला येऊन चार दिवस झाले. सर्व ठाकठीक लागल्यावर आज वसंतानें बाहेर फिरावयास जाण्याचा विचार केला. त्याप्रमाणें संध्याकाळीं चहा घेऊन झाल्यावर तो कपडे घालूं लागला. तेव्हां शांता म्हणाली, " फिरायला जाण्याची तयारी दिसते ? मग मी पण होतें तयार,—थांबा, मी इतक्यांत तयार होऊन येतें—"

" माझ्याबरोबर तूं फिरायला येतेस ? " वसंतानें भीत भीत जरा जोरांत विचारलें.

" येतेस म्हणजे प्रश्न आहे कीं काय ? "

" प्रश्नच आहे म्हणून विचारतों. "

" प्रश्न कसला ?—मी फिरायला येऊं नये वाटतं ? आज चार दिवस घरांतल्या घरांत बसून मला अगदीं कंटाळा आला आहे. "

" पण तूं माझ्याबरोबर फिरायला आलीस तर आई–बाबा काय म्हणतील ? शिवाय गांवांतील लोकहि टीका करतील—"

" कोण बोलतं ?—तुम्हीच कां हे ?—लोक टीका करतील म्हणे ! ह्या गांवढळ लोकांना कळतं काय ? "

" त्यांना कळत नसलं तरी आई—बाबा काय म्हणतील शांता ? "

" कांहीं म्हणत नाहींत; उलट त्यांना आनंदच होईल. "

" तुला तसं वाटतं पण—"

" पण काय ? मी तुमच्याबरोबर फिरायला येऊं नको तर मग परक्या पुरुषाबरोबर फिरायला जात जाऊं का ?—काय बाई तरी ! कसला हा अगदीं भेकड स्वभाव ! "

" काय म्हणतेस हें तूं शांता ? "

" म्हणायचं तेंच म्हणतें. म्हणे फिरायलाच येऊं नकोस ! आई–बाबा काय म्हणतील, गांवांतील लोक टीका करतील; मला असंच वाटतं—मला तसंच वाटतं. "

" पण आतां तूं येऊं नयेस हेंच चांगलें ! पुढें सोईसोईनें पाहूं. अद्यापि येथील लोकांना—"

" हें पहा अशा शंका कुशंका काढण्यांत कांहीं अर्थ नाहीं. मी तुमच्या-बरोबर येणार ! आणि मी बरोबर येऊं नये असें जर वाटत असेल, तर मग तुम्हीहि जाऊं नका. बसा माझ्याजवळ माझी करमणूक करीत; मला एकटीला अगदीं कंटाळा आला आहे. हा कोण मेला त्रास तरी ! "

तिच्यापुढें जास्त बोलण्यास वसंताला धैर्यच होईना. उलट तो बायको आणि ती नवरा असा प्रकार झाला !

सूनबाई फिरायला जातांना आपणांस विचारील असें रमाबाईंना वाटलें होतें. परंतु सासुबाईंना विचारूनच बाहेर जावें लागतें हें जुनें शास्त्र शांतीला थोडेंच कोणी सांगून ठेवलें होतें ! ती दिवाणखान्यांत वाचीत बसलेल्या रावबहादुरांच्या अंगावरून वसंताच्या मागें बाहेर पडली, वसंतानें मात्र कपडे करतांना त्यांना विचारलें होतें. सूनबाई गेल्यावर बराच वेळ झाल्यानंतर रमाबाई वर आल्या. तेव्हां रावबहादुर विचारांत मग्न असलेले तिच्या दृष्टीस पडले. आपले पतिराज कोणत्या विचारांत निमग्न आहेत हें तिनें तत्काळ जाणलें आणि त्या विचारांना उद्देशून ती म्हणाली, " मग आतां पुढें काय ? "

" मी देखील तोच प्रश्न विचारतों ! " पत्नीच्या मुखाकडे पहात रावबहादुर म्हणाले, " ही आपल्या वसंताला डोईजड होईल असं तुला वाटतं का ? "

" होय; मुलीच्या वर्तनावरून असं वाटतं खरं ! आतां जरा हूड आहे. आपल्या घरांत वागली म्हणजे होईल. "

" पण ती कांहीं आतां लहान नाहीं. तिला घरचं वळण नाहीं असं दिसतं. प्रथम हें लग्न जुळलं तेव्हां मला आनंद झाला. कारण, मुलगी सशक्त, सुंदर आणि शिकलेली आहे तेव्हां आपल्या घराण्यांत ती योग्य साजेल असं मला वाटलं; पण आतां अनुभव मात्र निराळाच येऊं लागला आहे ! पण मी म्हणतों हें असं कां असावं ? इंग्रजीचा अभ्यास तिचा चांगला झालेला आहे. तेव्हां तिचं वर्तन विशेष विनयशील, भारदस्त आणि मर्यादेचं असायला पाहिजे होतं ! "

" पाहिजे होतं खरं, पण तसं नाहीं !—मला वाटतं याचं कारण दुसरं तिसरं कांहीं नसून तिला गृहशिक्षण नाहीं हें असेल. मुलीच्या जातीला घरचं शिक्षण नसलं म्हणजे मुली अशाच चवचाल वर्तनाच्या निघायच्या ! "

रमाबाईचें बोलणें रावबहादुरांना पटलें.

गांवांत चर्चा सुरू झाली. रावबहादुरांच्या सुनेवर लोक टीका करूं लागले. हळुहळू त्या टीका रावबहादुरांच्या कानावर येऊं लागल्या. ‘ रावबहादुरांनीं शिकलेली मुलगी सून केली, पण आपल्या बालबोध घराण्यांत आकाबाईचा पाय घुसूं दिला. ही पुण्याची मुलगी त्यांच्या घराचा सत्यानाश करील ’ अशा अर्थाचे स्पष्ट उद्गार त्यांच्या कानीं येऊं लागले, गांवांतील रमाबाईच्या ओळखीच्या आणि विशेष परिचयाच्या बायका देखील स्वतःचीं मतें आणि गांवांतील चर्चा तिला येऊन सांगत असत. ‘ रमाबाई तुम्हीं तरी कशा अगदींच मूग गिळून बसलांत त्यावेळीं ? रावसाहेबांनीं आपल्या मताप्रमाणें शिकलेली बायको पसंत केली तें टीकच आहे. पण तुम्हीं कशी डोळेझांक केली ? आपल्या बाळबोध घराण्यांत—मग तें कोणाचेंहि घराणें असो, आपल्या घराण्यांत पुण्याची मुलगी करणें केव्हांहि घातकच आहे. पुण्यांत आतां धर्म राहिला आहे कीं नीति राहिली आहे ? तें एक अधर्माचें माहेर घर बनलें आहे. तिकडच्या पोरी नट्टापट्टा करण्यांत, चुरूचुरू बोलण्यांत अगदीं पटाईत ! त्यांना भीडमर्यादा कांहीं तरी राहिली आहे का ? त्यापेक्षां तुम्हीं एखादी गरीबाची मुलगी पाहिली असती तर तुमच्या घरांत लक्ष्मी शोभली असती. परवां मी तुमच्या घरीं आलें होतें तेव्हां तुमच्या सूनबाई दरवाजांत उभ्या होत्या, मीं सहज विचारलें, ‘ रमाबाई कुठं आहेत ? ’ तेव्हां तिनें उत्तर दिलें, ‘ मला काय माहीत कुठं आहेत त्या ? मी कांहीं येथें पहारा करायला नाहीं उभी राहिलें ! ! ’ हें तुमच्या सूनबाईचें उत्तर ऐकून मी तर अगदीं थक्क झालें. तुमच्या सूनबाई म्हणजे गांवांतील चटोर लोकांचा बोलण्याचा एक विषय झाला आहे, अशा रीतीनें आपल्या सूनेचें रसभरित वर्णन ऐकून कोणत्या सासूला वाईट वाटणार नाहीं.

शेवटीं वसंतानें एके दिवशीं आपल्या बायकोला आपणाबरोबर फिरावयास येण्याची मनाई केली. तेव्हां शांतीनें आपलें खरें स्वरूप दाखविलें. ती म्हणाली, “ कां मी आज फिरावयास कां येऊं नये ? घरांत बसून मला नाहीं करमत ! मी येणार. तुम्हीं पुरुषांनीं मात्र मोकळया हवेवर फिरावयास जावं आणि आम्ही बायकांनीं कां जाऊं नये ? ”

“ पण गांवांतील लोक टीका करतात ना ? ”

“ मला गांवांतील लोकांशीं काय करायचं आहे ! तुमच्याबरोबर फिरायला मला लोकांची काय चोरी आहे ? आपल्या घरांतून कोणी बोलत नाहीं आणि हे मेले लोक कोण टीका करणार ! ह्या तुमच्या गांवढळ, अशिक्षित आणि मूर्ख लोकांना स्वच्छ हवेंत फिरण्याचं महत्त्व काय कळणार आहे ? ”

"घरांतील मंडळी काय बोलणार ?" क्षणभरानें वसंत म्हणाला, "पण बाबांना आणि आईला हें तुझं माझ्याबरोबर फिरावयास येणं बिलकुल पसंत नाहीं."

"असं का ? मग माझा समज अगदींच चुकला म्हणायचा !-तुमचे बाबा एवढे रावबहादूर होऊन त्यांचींहि मतें गांवढळच आहेत म्हणावयाचीं !"

पत्नीचें हें मर्यादा सोडून पुढें गेलेलें भाषण ऐकून वसंताला राग आला आणि रागाच्या आवेशांत तो म्हणाला, "शांता, तूं कोणाविषयीं बोलतेस याचा कांहीं विचार कर. आपल्या वडिल माणसांना जें आवडत नाहीं, तें आपण करूं नये."

"पण मी न आवडण्यासारखं काय करतें.? मोकळया हवेंत फिरावयास जाणं हें वाईट असेल तर सांगा !"

"तें कांहीं मला कळत नाहीं. पण बाबांना-आईला आवडत नाहीं म्हणून तूं मजबरोबर येऊं नकोस."

ठीक आहे. तुम्हीं जा. पण मोकळया हवेवर फिरावयास जाणं गैर आहे असं मला तुमच्या बाबांकडून कळेपर्यंत मी एकटीच रोज फिरावयास जात जाईन."

---

## ११........ विषारी वल्ली

वसंत मानसिक रोगी बनला. अलीकडे तो आपल्या खोलींतून कारणाशिवाय क्वचितच बाहेर येत असे. त्याचा पूर्वीचा आनंदी स्वभाव आतां पार मावळला. त्यानें शांतीबरोबर केलेलें लग्न हें लग्न नसून मोठें विघ्नच होतें. तो आपल्या वाचनालयांत बसून अष्टौप्रहर विचार करी; परंतु विचार करून त्याचा काय उपयोग ? हा विचार त्यानें पूर्वींच करावयास पाहिजे होता. ऐनवेळीं त्याच्या भिडस्त स्वभावानें त्याला दगा दिला आणि त्याचाच परिणाम तो आतां भोगीत होता. लग्नापूर्वी यशवंतानें त्याला विचारलें, त्याच वेळीं त्यानें आपलें स्पष्ट मत दिलें असतें तर यशवंताला वाईट वाटलें असतें इतकेंच ! परंतु आपल्या मित्राला वाईट वाटेल या गोष्टीचा बागुलबोवा वाटून त्यानें 'होय' म्हटलें आणि त्याचा परिणाम—शांतीबरोबर त्याचें लग्न—हें त्याला जन्मभर दुःखी करण्यास कारण झालें. अशा रीतीनें भिडेला बळी पडलेले कित्येक विवाह आज समाजांत होत आहेत. त्या सर्वच विवाहांचा परिणाम वाईट झाला आहे असें आमचें म्हणणें नाहीं, तथापि बऱ्याच ठिकाणीं त्या दंपत्यांत छत्तिसाचा आंकडा दिसून येतो.

अलीकडे वसंतानें स्वीकारलेला हा एकान्तवास पाहून रमाबाईचा जीव तीळ-तीळ तुटत असे. रावबहादुरांनाही वाईट वाटत असे; परंतु करतात काय ? शांतीला मात्र त्याचें कांहींच वाटत नव्हतें. तिचा कार्यक्रम कांहीं निराळाच होता. सकाळीं ती सर्वांच्या मागून उठत असे; त्यानंतर तोंड धुणें-केंस विंचरणें झाल्यावर तिचें चहापान होत असे. तिनें आपल्या पतीला-वसंताला स्वहस्तानें चहा दिला असा प्रसंग लग्न झाल्यानंतर आलाच नाहीं. कारण, ह्या बाईसाहेब उठण्यापूर्वींच वसंताचा चहा होत असे. नाहीं म्हणायला लग्नापूर्वी तो तिच्या माहेरीं जाई तेव्हां यशवंताबरोबर त्याला चहा घ्यावयास मिळत असे. परंतु लग्न होतांच सर्व मनु बदलला. बरें ! घरांत तिला दुसरीं कांहीं कामें करावीं लागत असत असेंहि नाहीं. कारण, घरांत नोकर चाकर पुष्कळ असल्यामुळें सुनबाईच्या वांट्याला काम येणार कुठून ? त्यांतून ती एकुलती एक, शिकलीसवरलेली सून ? तिला काम सांगायला रमाबाईला देखील धीर होत नसे. रावबहादुरांच्या मनांत तिला एकदां बोलावें असें आलें होतें, परंतु शांतीच्या निर्भीड वर्तनानें त्यांना वचक बसली होती. आपण तिला बोललों आणि तिनें मर्यादा सोडून उत्तर दिलें म्हणजे आपण होऊनच स्वतःचा पाणउतारा करून घेतल्यासारखें होईल, या संकटाला ते भीत होते. अलीकडे वसंत फिरावयास गेला नाहीं तरी ती कोणासहि न विचारतां-वसंताला सुद्धां न विचारतां-एकटीच बाहेर जात असे. तिला एकदां बोलावें आणि तिच्या स्वैरवर्तनाला आळा घालावा असें त्याच्या मनांत रोज येत असे परंतु शांता येऊन त्याच्यापुढें उभी राहिली कीं त्याचे सर्व विचार जागच्या जागींच मावळत असत.

दोनप्रहरीं वसंत आपल्या वाचनालयांत बसून वाचीत होता. इतक्यांत हातांत एक पत्र घेऊन शांता आंत आली. सध्यां उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळे वसंतानें आज सकाळीं दाढी करतांना आपले डोक्याचे केंस न्हाव्याकडून अगदीं बारीक करून घेतले होते. त्यामुळें वसंताच्या चेहऱ्यांत फरक दिसत होता. मानेवरील केंस बारीक केल्यामुळें ती बारीक दिसत होती आणि त्यामुळें तो आजारी दिसत होता. शांता आंत आली ती प्रथम त्याच्या केंसावर घसरली. ती म्हणाली, "हें काय आज केसांचं वाटोळं केलं ? किती घाणेरडं तोंड दिसतं तें आतां ? कसे कुरळे केंस छान होते ते हें काय करून टाकलं ! मेली स्वतःला कशी ती आवडच नाहीं ! हें पहा-दादाचं आतां पत्र आलं आहे. तो उद्यां नाहीं तर परवां येथें येणार आहे आणि त्याच्याबरोबर त्याचा मित्र बाळा देसाईही येणार आहे—"

" कोण, बाळा देसाई ! " वसंतानें एकदम आश्चर्यानें उद्गार काढले.

" कां बरं ? तो तुमच्या ओळखीचा देखील आहे वाटतं ? "

" हो—चांगला ओळखतों त्याला ! तो मनुष्य स्नेह करण्याच्या लायकीचा नाहीं. यशवंतराव त्याला इकडे घेऊन येणार आहेत तेव्हां आश्चर्यच म्हणायचं " असें म्हणून वसंतराव क्षणभर थांबून म्हणाला, " आज मी तुला एक गोष्ट सांगणार आहें. आणि तुझें कर्तव्य समजून तूं ती गोष्ट मान्य करशील अशी मला आशा आहे. मग काय—सांगू ? "

सांगा मी—ऐकतें. "

" हें पहा तुझं हें वर्तन मला बिलकुल पसंत नाहीं. मग तुला वाटेल तर तूं मला जुन्या मताचा म्हण किंवा वाटेल तें म्हण; परंतु जी गोष्ट बाबांना किंवा आईला पसंत नाहीं. ती गोष्ट आपण होऊन मुद्दाम करणें म्हणजे पाप आहे. तूं बाहेर फिरायला जातेस यावर सर्व गांवाची टीका होत आहे. मी तुला सांगून पाहिलं परंतु तूं ऐकत नाहींस. शेवटीं मीच बाहेर जाण्याचं टाकलं परंतु त्याचं तुला कांहींच नाहीं. ! तूं एकटीच जाऊं लागलीस. आतां तर तुझा दादा येणार आहे. आणि त्याच्या बरोबर तो व्रात्य बाळया देसाई येणार आहे. गृहस्थाच्या घराची पायरी चढूं न देण्याच्या योग्यतेचा तो आहे. तेव्हां तो तुझ्या दादाबरोबर येणार आहे हें ऐकून मला ही एक नवीन काळजी उत्पन्न झाली. त्याला पाहतांच त्याच्या एकदोन वाक्यांवरून बाबा त्याची पारख करतील, त्याला कोणतं व्यसन नाहीं ?—सर्व व्यसनांचा तो एक मूर्तिमंत पुतळाच आहे. तो आमच्या बरोबर प्रिव्हिअसपर्यंत होता. नंतर त्यानें कॉलेज सोडलें. मध्यंतरी वर्षभर तो कुठें होता असं कळलं नाहीं. ह्या स्वदेशीच्या चळवळींत तो एक वर्ष खडी फोडायला गेला होता असं कांहींचं म्हणणं आहे. मी मात्र त्याची चौकशी केली नाहीं. "

" मग आतां तो दादाबरोबर आला म्हणजे करा चौकशी. " शांता रागांतच म्हणाली. तिनें वसंताचें भाषण मुकाट्यानें ऐकलें. परंतु तें तिला रुचलें नाहीं. ती क्षणभरानें म्हणाली, " एकंदरीनें तुमचं म्हणणं काय आहे तें मला सांगा ? असं मुळमुळीत नका सांगूं बाबांना आवडत नाहीं—आईलाच राग येतो—लोकच टीका करतात ह्या सबबी पुढें नका करूं. काय असेल तें स्पष्ट सांगा म्हणजे मी देखील तुम्हांला स्पष्ट उत्तर देऊन मोकळी होतें. "

" तूं कोणाबरोबर बोलतेस याचा विचार केलास का ? " जरा रागांतच वसंत म्हणाला.

" केला बरं !–एवढा नको कांहीं नवरेपणाचा हक्क गाजवायला ! "

" शांता, मर्यादा सोडून बोलतेस ! " वसंताला रागच आला आणि त्या रागांत तो हें एकच वाक्य म्हणाला.

रीतीनें उत्तर न देतां ती झणकाऱ्यांत खोलीच्या बाहेर पडली आणि आपल्या खोलींत जाऊन बसली. वसंतराव मात्र मोठ्या विचारांत पडला. बाळ्या देसाई ही व्यक्ति कशी आहे हें त्याला माहीत होतें. असा मनुष्य आपल्या घरीं येणार हा विचारच त्याला सहन होईना. घटकेंत त्याला असें वाटे कीं, आतां आपण आपल्या मेहुण्याला पत्र लिहून त्यांत बाळा देसाई याला बरोबर घेऊन येऊं नये अशी सक्त ताकीद द्यावी आणि घटकेंत वाटे कीं, आपण उघडपणें वडिलांजवळ जाऊन आपल्या मेहुण्याबरोबर येणारा त्याचा मित्र कोणत्या प्रकारचा आहे हें सांगावें. अशा रीतीनें घटकेंत एक तर घटकेंत दुसरा असे विचार त्याच्या डोक्यांत येऊन त्याचें डोकें अगदीं फिरून गेलें. शेवटीं कांहीं एक न करतां अगदीं मौनव्रत धारण करून जें जें होईल तें तें पहात बसण्याचा त्यानें निश्चय ठरविला. इकडे शांता झणकाऱ्यानें निघून गेली ती त्या दिवशीं सोंवळे करी तिला जेवण्याकरितां बोलावण्यासाठीं येईपर्यंत खोलींतून बाहेर पडलीच नाहीं. आज सूनबाई बाहेर फिरावयास गेल्या नाहींत हें पाहून रमाबाईला आश्चर्य वाटलें, परंतु दिवे लागले तरी शांता माडीवरून खालीं आली नाहीं तेव्हां तिला थोडी काळजी वाटूं लागली. पुरुषांची पंगत होऊन गेली तेव्हां रमाबाईनें स्वयंपाक्यास वर पाठविलें. शांता खालीं आल्यावर रमाबाईनें " तुला आज बरं नाहीं का वाटत मुली ? " असें विचारलें. परंतु पतीनें तिच्या केलेल्या अपमानामुळें सासूला उत्तर देऊन तिचा मान राखणें तिला कमीपणाचें वाटूं लागलें. तिनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. हा प्रकार पाहून फिरावयास जाण्याच्या बाबतींत नवराबायकोंत कांहीं तरी खटका उडाला असावा असें तिनें ताडलें आणि रात्रीं झोपतांना तिनें रावबहादुरांजवळ तोच विषय काढला.

" मला मोठी काळजी उत्पन्न झाली आहे,—रावबहादुर गंभीर स्वरांत म्हणाले.

" असा हा सुरवातीलाच त्यांच्यांत रुसवा फुगवा होऊं लागला तर मग हा पुढला पल्ला तीं दोघें गांठणार तरी कसा !—कांहीं बुवा, कांहीं सुचत नाहीं. आपण गेलों सुखासाठीं करायला, पण तेंच आतां दुःखाला कारण झालं आहे ! मला आतां असं वाटतं आहे कीं, आपण मानापमान बाजूला सारून वसंताला

सर्व कांहीं विचारून घ्यावं. बहुत करून हा 'भीडभिकेचा' प्रकार झाला असावा असं मला वाटतं. आपला वसंत लग्नापूर्वी शंकररावांकडे जात येत असे, त्या वेळीं त्यांनीं वसंताच्या भिडस्त स्वभावाचा फायदा घेऊन हा लग्नाचा योग जुळवून आणला असावा."

"मलाहि आतां तेंच वाटूं लागलं आहे. पण आपण एकदां मनाची खात्री करून घ्यावी." रमाबाई म्हणाली, "काय बाई जगाचा उलटा न्याय आहे पहा! ती जयरामपंतांची कमलिनी कशी नक्षत्रासारखी पोर पण काय बिचारीच्या नशिबीं लिहिलें आहे पहा! आणि इकडे आपला वसंत! तिकडे तिचा नवरा वाईट आणि इकडे वसंताची बायको ही अशी!"

अशा रीतीनें त्या वृद्ध जोडप्यांत बराच वेळपर्यंत गोष्टी चालल्या होत्या. शेवटीं दुसऱ्या दिवशीं वसंताला त्याचें हृद्गत विचारून घेण्याचें रावबहादुरांनीं ठरविलें; परंतु दुसऱ्या दिवशीं सकाळींच यशवंतराव आणि त्याचा मित्र बाळा देसाई त्यांच्या घरीं येऊन हजर झाले. अर्थात् रावबहादुरांना आपला विचार मनांतच ठेवावा लागला. आणि पाहुण्यांच्या व्यवस्थेकडे त्यांना लक्ष पुरवावें लागले. त्या सर्व मंडळींचीं दुपारीं जेवणें होईपर्यंत वसंत आणि यशवंत यांना एकत्र बसून स्वस्थ चित्तानें बोलण्यास मिळालें नाहीं. तरी देखील वसंत आणि शांता यांच्या वागण्यावरून नवराबायकोंत कांहींतरी कमी अधिक प्रकार झाला असावा असा यशवंताला संशय आला आणि तो संशय खराहि ठरला. त्याचप्रमाणें वसंताच्या वर्तनावरून त्याला बाळा देसायाचे गुण लागले हेंहि वसंताच्या लक्षांत आलें आणि त्याला एका बाजूला गांठून दोन शब्द सांगावें असें त्यानें ठरविलें. यशवंतहि तीच संधि पहात होता. आपली बहिण अशी रागांत कां? हें वसंताला विचारावें असें त्याच्या मनांत होतें. होतां होतां दोनप्रहरीं बाळा देसाई गोष्टी बोलत असतां झोंपी गेला. ही संधि साधून वसंतानें खूण करून यशवंताला बाहेरच्या गच्चीवर बोलाविलें.

"यशवंत, हा बाळा देसाई तुझ्याबरोबर कसा आला? तो तुझ्याबरोबर येथं येणार आहे हें पत्र वाचून मला मोठें आश्चर्य वाटलं! ह्याची आणि तुझी केव्हां मैत्री जुळली?"

"अरे ती एक वल्ली आहे! त्याच्याबरोबर मैत्री जुळवायलारे काय वेळ?"

"होय. ती वल्ली आहे पण विषारी वल्ली आहे हें तुला ठाऊक नाहीं काय?"

"ठाऊक नाहीं तर काय झालं? पण त्या विषारी वल्लीचा प्रमाणबद्ध उपयोग

केला म्हणाले तीच वल्ली अमृत बनते हें तूं विसरलास वाटतं ? पण वसंत आमची, शांती तुझ्याशीं इतकी भिडस्त केव्हांपासून झाली ? सकाळपासून मी पहात आहें पण एकदां सुद्धां ती पुढें आली नाहीं."

" ती पुढें कां येत नाहीं याचें कारण मला विचारण्यापेक्षां तूं तिलाच विचार."

" पण काय झालं तें तरी कळूं दे!"

" प्रथम तिच्यापासून कळेल तर बरं!"

" एकंदरीनें मला संशय आला तो खरा आहे तर ?"

" तुला कोणता संशय आला ?"

" तुम्हां दोघांत कांहीं तरी भानगड उपस्थित झाली आहे हाच! बरं वसंत, आम्ही आतां उद्यां किंवा परवां येथून हरिपुरास जाणार आहोंत. सात आठ दिवसांपूर्वी मुंबईहून जयरामपंतांचं बाबांना पत्र आलं होतं. त्या पत्रांत त्यांनीं आपल्या जांवयाविषयीं बरंच लिहिलं आहे. आम्हीं आतां अनायासें इकडे आलों आहोंत; तेव्हां विचार केला आहे कीं एकदां हरिपुरास जाऊन जयरामपंताच्या जांवयाची—त्या 'इडिअट' रघुनाथाची भेट घ्यावयाची आणि कमूसारखी 'वेल व्हर्सड् वाईफ' टाकल्याबद्दल त्याची कान उघाडणी करावयाची!"

वसंतानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. फक्त कमलिनीचें नांव निघतांच त्यानें एक दीर्घ श्वास मात्र सोडला. त्याच्या डोळ्यांपुढें कमलिनीची मूर्ति तात्काळ उभी राहिली. मुंबईत परीक्षेकरितां ते गेले असतां पंधरा दिवसांत त्यानें कमलिनीचे अनेक सद्गुण पाहिले होते. ती जर आपणास वधू मिळाली असती तर—परंतु ते विचार अगदीं व्यर्थ होते. तथापि यशवंतानें तिचें नांव काढतांच ती आपणासारखीच दुःखी आहे, याची खरी कल्पना त्याच्या मनांत आली. आपल्या पत्नीमुळें आपणांस जें अननुभूत दुःख होत आहे, त्याचप्रमाणें कमलिनीला पतीमुळें होत असेल हा विचार त्याच्या मनांत येऊन आपण समदुःखी आहोंत, तेव्हां तिला एक पत्र लिहून परस्परांच्या सहानुभूतीची देवघेव करावी असा एक विचार त्याच्या मनांत आला; परंतु अशा रीतीनें तिला आपण पत्र लिहिणें चांगलें का! हाहि त्या बरोबरच दुसरा प्रश्न त्याच्या डोक्यांत आला. इतक्यांत बाळा देसाई बाहेर आला, त्याला पाहातांच वसंतानें नोकराला हांक मारून पाणी आणावयास सांगितलें व स्वतः चहाची व्यवस्था करण्याकरितां तो खालीं गेला.

" कायरे यशवंत, मला झोंप लागलेली पाहून तुम्ही मेहुणे मेहुणे काय

खलबत करीत होतां ! कांहीं तरी माझ्याविरुद्धच त्या वसंतानं तुला सांगितलं असेल ! "

" छे ! तसं कांहीं नाहीं. तो घरची खबरबात विचारीत होता."

" बरं पण यशवंत, आतां पुढला प्रोग्राम काय आहे ? हें तुमच्या ब्याह्याकडलं पुळपुळीत जेवण आपणाला नाहीं बुवा पसंत ! आतां फिरायला जाऊं तेव्हां एखादें हॉटेल पाहिलं पाहिजे ! पण तुझा मेहुणा येईलना बरोबर ! "

" होय, ती एक अडचण आहे खरी ! "

इतक्यांत शांती चहाचे दोन कप घेऊन तेथें आली, त्यामुळें त्यांना विषय बदलावा लागला. बाळा देसाई म्हणाला, " कसं काय शांताबाई ! कशी काय खबर आहे तुमची ? पण मी हें विचारायला कशाला पाहिजे ? तुम्हीं ही आधुनिक सुधारक कंपूंतील मंडळी ! "

" म्हणजे ? " चहा पीत यशवंतानें विचारलें, " आधुनिक सुधारक आणि शांतीची खबरबात यांचा संबंध काय बुवा ? "

" संबंध म्हणजे असा—" शांतीकडे पहात हांसत हांसत देसाई म्हणाला, " अलीकडे आपण कादंबऱ्यांत वाचतां त्याप्रमाणें वसंत हा तुझा कॉलेज–फ्रेन्ड ! तो तुझ्याकडे वरचेवर येत जात असे. तेव्हां ह्या दोघांचं कोर्टिंग होऊन तुम्ही मित्र होतां त्याचे मेहुणे झालां."

शांतीनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. ती देसाईच्या तोंडाकडेच पहात उभी राहिली होती. त्यावेळीं ती त्याच्याकडे अशा भेदक दृष्टीनें पहात होती कीं,देसाईच्या ऐवजीं दुसरा कोण असता तर तिच्या दृष्टीपुढें तो टिकलाच नसता. परंतु देसाई म्हणजे पक्का गुंड ! त्यानें शांतीच्या दृष्टीला दृष्टि दिली. इतकेंच नव्हे तर तिला शहहि दिला. कारण बराच वेळ तिच्याकडे भेदक दृष्टीनें पाहून तो आपली दृष्टि फिरवीना असें पाहून शांतीला आपली मान फिरवावी लागली. परंतु दृष्टि काढतांना तिला किंचित् हंसू आलें. ती हांसलेली पहातांच देसाईहि हांसला आणि त्यानें डोळे मिचकावले !

" तें जाऊं दे रे !—" यशवंत पुढें म्हणाला, " पण शांता, तुमच्या ह्या गांवांत पहाण्यासारखं काय आहे ? "

" ह्या मेल्या भिकारी गांवांत आहे काय पहाण्यासारखं ! " तोंड मुरडून शांतीनें उत्तर दिलें, " मी जातें फिरायला, पण आतां मलाहि कंटाळा आला

आहे. आपल्या पुण्यांत किती चांगलं आहे. वाटेल तर बंडावर जावं, नाहींतर पर्वतीवर जावं,—"

तूं रोज जातेस का फिरायला ?

" आणि वसंतराव येतात का तुमच्याबरोबर ? "

यशवंतानें आणि त्याच्या मागून देसाईनें एका पुढें एक असे तिला प्रश्न विचारले. त्या दोन्ही प्रश्नांचीं उत्तरें तिनें एका वाक्यांत दिलीं. ती म्हणाली, " मी एकटीच रोज फिरावयास जातें. "

" मग आज आमच्याबरोबर याल का ? " देसाईनें तिच्याकडे पहात विचारलें. इतक्यांत वसंत तेथें आला. तेव्हां शांता जरा बाजूला होऊन म्हणाली, " हो न यायला काय झालं ? पण फिरायला जाणार तरी कुठें ? आहे काय इथं ?—लांबचलांब सडका मात्र आहेत. पण त्या देखील धुळीच्या ! "

" कांहो वसंतराव, तुमच्या गांवांत प्रेक्षणीय स्थळं नाहींत वाटतं ? " देसाईनें विचारलें.

" का—नाहींत तर काय झालं ? आमचा गांव म्हणजे ऐतिहासिक स्थळ आहे. येथें किल्ले आहेत—"

" त्यांत काय पहायचं ? माती दगडाच्या त्या ओसाड पडलेल्या भिंतीच पहावयाच्या ना ? " देसाईचें हें रुक्ष उत्तर ऐकून वसंतानें पुढें एक अक्षरहि उच्चारलें नाहीं.

सायंकाळीं मंडळी फिरावयास निघाली. पाहुण्याबरोबर फिरावयास गेलेंच पाहिजे म्हणून वसंत तयार झाला. परंतु तो मनापासून फार दुःखी होता. कारण, त्यांच्या बरोबर शांतीहि फिरावयास येणार होती. एकटा यशवंत असता तर त्याला इतकें वाईट वाटलें नसतें. परंतु देसाईसारखा व्रात्य मनुष्य बरोबर असतां तिनें बरोबर येणें त्याला बिलकुल पसंत नव्हतें. पण करतो काय ? सर्वच बाजूंनीं तो कोंडला गेला होता. ती मंडळी बाहेर पडली त्यावेळीं रावबहादुर दिवाणखान्यांत बसले होते. त्यांनीं मंडळींना ' का फिरावयास जातां का ? ' असें औपचारिक विचारलें. त्यावेळीं वसंतानें आपल्या पित्याकडे अशा दुःखित मुद्रेनें पाहिलें कीं, त्यावरून ' वसंत ह्या मंडळीबरोबर अगदीं नाखुषीनें जात आहे, ' असें रावबहादुरांनीं जाणलें. मंडळी रस्त्यांत आल्यावर त्यांच्या गप्पा गोष्टी सुरू झाल्या. वसंत बाजूबाजूनेंच चालला होता. तो कांहीं बोलत नाहीं असें पाहून

यशवंत त्याच्याजवळून चालूं लागला. अर्थात् ते दोघे एकत्र होतांच शांती आणि देसाई ही जोडी जमली. त्यांच्या गोष्टी चालल्याच होत्या. इकडे यशवंतानें जरा बाजूला जातांच वसंताला विचारलें, " वसंत, तूं शांतीबरोबर बोलत का नाहींस ? आज सकाळपासून मी पहात आहें. काय झालं तें मला सांग; मी तिला बोलतों. "

परंतु वसंतानें त्याला उत्तर दिलें नाहीं. त्याचें सर्व लक्ष मागें रेंगाळत असलेल्या देसाई आणि शांता यांच्या भाषणाकडे होतें. आपण ज्या मनुष्याला हलकट आणि पाजी समजतों, त्या मनुष्याबरोबर आपल्या बायकोनें आपणांसमक्ष हंसावें, खिदळावें, हें पाहून त्याचें रक्त कां बरें तापूं नये ? परंतु त्याला बोलण्याला धीर होईना. तथापि त्यानें दोन चारदां कपाळाला आंठ्या घालून तिरस्कारयुक्त रागाच्या दृष्टीनें शांतीकडे पाहिलें. हा प्रकार शांतीच्या लक्षांत आला आणि तिनें आपल्या पतीला खिजविण्याकरितां मुद्दाम विचारलें, " कायहो बाळासाहेब, बायकांनीं मोकळ्या हवेंत फिरावयास जाण्याबद्दल तुमचें काय मत आहे ? " हा तिनें बाळया देसाईला 'बाळासाहेब' असें बहुमानानें संबोधून विचारलेला प्रश्न ऐकून वसंताचें डोकें तापलें. आणि त्या रागांतच तो म्हणाला, " बरं बरं कळलं बरं मत ! फार शहाणी नको होऊंस ! "

" मी तुम्हांला नाहीं विचारीत. तुमचं मत काय आहे तें मला केव्हांच कळलं आहे. "

ह्या उत्तरानें वसंताच्या रागाचा अगदीं कळस झाला. आपल्या पत्नीनें पाहुण्यासमक्ष आपला अपमान केला ही गोष्ट त्याला अतिशय लागली. तो रागाच्या भरांत तसाच मागें फिरला. आतां आपण मंडळीबरोबर जाऊन शब्दाला शब्द वाढविणें चांगलें नाहीं, असा विचार करून तो परत फिरला. तेव्हां यशवंत त्याला परत आणूं लागला. तें पाहून शांती म्हणाली, " दादा, कशाला उगाच श्रम घेतोस ? त्यांना फिरणं आवडत नाहीं. जाऊं दे त्यांना परत घरीं. आज ते तुम्ही आलां म्हणून आले; पण—"

दिवे लागून गेल्यावर मंडळी परत घरीं आली. वसंत त्यांच्यापूर्वींच घरीं आला होता. तो परत आला हें रावबहादुरांनीं पाहिलें नव्हतें. नाहीं तर मंडळीना सोडून कां आलास वगैरे प्रश्न विचारून त्यांनीं आदल्या दिवशीं रात्रीं ठरवून ठेविल्याप्रमाणें सर्व गोष्टी विचारून घेतल्या असत्या; परंतु तसा प्रसंग आला

नाहीं. वसंत परत आल्यावर आपल्या खोलींत इझेचेअरवर कपाळ धरून विचार करीत बसला. पुष्कळ वेळ विचार करकरून शेवटीं त्यानें ठरविलें कीं, या जन्मांत आपण सुखाला पारखे झालों–विवाह करून आपण फसलों–शांतीपासून आपणांस सुख आणि शांति मिळण्याऐवजीं दुःख आणि चिंता मात्र आपल्या वांट्यास आली! बिचारा दुःखी कष्टी प्राणी आपल्या दुःखांनून चूर होऊन बसला असतां त्याला पुनः कमलिनीची आठवण झाली.–त्याबरोबर तो उठला आणि मेजावर बसून त्यानें पत्र लिहिण्यास सुरवात केली. ' मत्प्रिय भगिनी कमलिनी हा अत्यंत दुःखी असा तुझा भाऊ तुझ्याकडे सहानुभूति मागण्याकरितां आला आहे ! आपण समदुःखी आहोंत–' ह्या दोन ओळी लिहून झाल्या; इतक्यांत फिरावयास गेलेली मंडळी परत आली आणि त्यामुळें त्याला पत्र अपुरें ठेवावें लागलें.

" वसंतराव, तुम्ही अर्ध्या वाटेंतूनच परत फिरलांत हें कांहीं चांगलं केलं नाहींत ! " देसाई म्हणाला.

" मी कां परत फिरलों त्याचं कारण आमच्या कुटुंबानें त्याचवेळीं तुम्हांला सांगितलं. मग आतां तुम्हांला वाईट वाटण्याचं कारण काय ? "

वसंत जास्त न बोलतां उठला आणि बाहेर आला. पलीकडील खोलींत यशवंत आणि शांता बोलत होतीं. ती शांतीची खोली होती परंतु त्यांच्याकडे लक्ष न देतां तो खालीं उतरून गेला. थोड्या वेळानें पानें वाढून झाल्यावर वसंतानें पाहुण्यांना पाय धुण्याकरितां बोलाविण्यास मनुष्य पाठविला तोंपर्यंत कपडे काढून शांतीही खालीं आली. आतां ते दोघे मित्र वर राहिले. त्यावेळीं देसाई ट्रंकजवळ बसला होता आणि यशवंत जवळच उभा होता. देसाई त्याला कांहीं आग्रहानें सांगत होता परंतु यशवंत ' नको–नको ' म्हणून म्हणत होता. तो प्रकार असा—

" यशवंत, तूं अगदीं भित्रा आहेस. मी सांगतों तें ऐक—"

" नकोरे बाबा ! तूं आतां त्याचं अगदीं नांव काढूं नकोस आपल्या पंक्तीला रावबहादुर असतील आणि त्यांना जर का वास आला तर—"

" वास यायला कांहीं ' कंट्री ' नाहीं–असें म्हणून देसाईनें ट्रंक उघडून सर्व कापडाच्या खालीं लपवून ठेवलेली एक चपटी बाटली बाहेर काढली–" हें पहा, तूं थोडी घे. मी वास न येईल अशी व्यवस्था करतों. त्यासाठीं तर मी हीं

गाठ्याभजीं आणलीं आहेत–हीं थोडी खा आणि वास गेला नाहीं तर मला विचार. शिवाय, तुला थोड्या वेळच्याहि चावायाला देतों. हं बैस खालीं चल आटप. पण प्रथम तो दरवाजा बंद करून घे. नाहीं तर तुझा मेहुणा–तो वश्या येईल! पण कायरे यशवंत, तुझी 'सिस्टर' घेईल कारे थोडं?" इतक्यांत वसंत वर आला. त्याला पाहतांच देसाइंची गडबड उडाली. त्यानें चट्कन् हातांतील बाटली ट्रंकमध्यें ठेवून ती बंद केली. तो मनांतल्या मनांत बराच तडफडला. परंतु उपयोग काय? वसंत आल्यामुळें त्या दोघांना मुकाट्यानें उठून खालीं जावें लागलें. मंडळी हातपाय धुऊन जेवावयास बसली. रावबहादुर मधून मधून एखादा दुसरा प्रश्न विचारीत होते. परंतु वसंत मात्र अगदीं गप्प जेवीत होता. आलीकडे त्याच जेवण अगदीं तुटलें होतें.

जेवण आटोपतांच मंडळी दिवाणखान्यांत आली. तेथें थोडा वेळ त्यांच्या गोष्टी झाल्या. यशवंतानें आपण पुढें कुठें जाणार आहोंत तें रावबहादुरांना कळविलें. नंतर थोडा वेळ त्यांच्या इतर कांहीं गोष्टी होऊन ते दोघे मित्र उठले. वसंतानें त्यांच्या झोंपण्याची व्यवस्था आपल्या वाचनालयांत केली होती. दहाच्या सुमारास वसंत उठला आणि म्हणाला, "आतां तुम्ही झोंपा. उद्यां पुनः तुम्हांला जावयाचं आहे."

तो निघून गेल्यावर थोड्या वेळानें देसाई उठला आणि दरवाजा बंद करीत म्हणाला, "कसलं तें मिळमिळीत भिकारी जेवण! आतां तरी तुला घ्यायला कांहीं हरकत नाहीं ना? हें आतां तर पहा—" असें म्हणून त्यानें ट्रंक उघडली आणि पुनः आपल्या ट्रंकमधून ती बाटली आणि सायंकाळीं फिरून परत येत असतां उपहारगृहांत आणलेले जिन्नस—गाठ्याभजीं बाहेर काढलीं. "हं—बैस, आतां तर कोणाच्याहि बापाची भीती नाहीं ना?—चल—" प्रथम देसाईनें पहिल्या सपाट्यांत अर्धी बाटली पात्रांत ओतली आणि ती तोंडाला लाविली. नंतर यशवंताला दिली. त्याचा मात्र खाण्यापिण्याचा सपाटा चालला होता. थोडया वेळानें यशवंत पागल बनला.

रात्रीं बारा वाजून गेले होते. वसंत आणि शांता आपापल्या खोलींत निजलीं होतीं. निजलीं होतीं म्हणण्यापेक्षां बिछान्यावर पडलीं होतीं. कारण दोघेंही जागींच होतीं. वसंताच्या डोक्यांत कोणते विचार चालू होते आणि शांतीच्या डोक्यांत कोणते विचार चालू होते ते सांगतां येणें कठीण होतें. परन्तु तें जोडपें त्यावेळीं

आपापल्या बिछान्यावर तळमळत पडलें होतें, थोड्या वेळानें शेजारच्या दरवा-जावर कोणी टिचक्या मारीत आहे असा वसंताला भास झाला, प्रथम त्यानें तिकडे लक्ष दिलें नाहीं; परंतु कांहीं वेळानें 'शांताबाई' अशी हळूच पण स्पष्ट देसाईनें हांक मारलेली त्याला ऐकूं आली. त्याबरोबर वसंत ताड्कन् आपल्या बिछान्यावरून उठला. त्याच्या मनांत एक विलक्षण शंका आणि कुतर्क आले. एकदम दरवाजा उघडून बाहेर जाणार होता परंतु पुनः त्याचा विचार बदलला. आपल्या मनांत आलेली शंका खरी आहे किंवा हा सर्व देसाईचाच पाजीपणा आहे हें पाहण्यासाठीं तो क्षणभर दरवाजाला कान देऊन तेथेंच उभा राहिला आणखी थोडा वेळ गेला. देसाई पुनः 'शांताबाई' म्हणून हळू हळू हांका मारूं लागला. परंतु तिच्याकडून प्रतिउत्तर येईना; असें पाहून त्याला किंचित् बरें वाटलें आणि हा सर्व देसाईचाच हलकटपणा आहे अशी त्याची खात्री झाली. त्याचा राग भडकला आणि त्या रागाच्या आवेशांत तो चट्कन् दरवाजा उघडून बाहेर आला आणि काळोखांत पुढें होऊन 'कोण आहे ?' असें त्यानें दरडावून विचारलें. देसाईची अगदीं पांचावर धारण बसली. त्यानें हळूच पुनः खोलींत जाण्याचा प्रयत्न केला. परंतु वसंतानें पुढें होऊन त्याची मान धरली आणि जोरानें हिसका देऊन तो म्हणाला, "अरे हरामखोरा ! येथें हें उद्योग आरंभले आहेस काय ? चल–चालता हो–आतांच्या आतां घराबाहेर चालता हो–" इत-क्यांत बाजूच्या खोलींतून 'ओय्–ओय्' करून यशवंताच्या ओकण्याचा आवाज आला. तेव्हां देसाईला सोडून वसंत आंत गेला आणि पहातो तों यशवंत अस्ताव्यस्त पडला असून, ओकत आहे. बाजूला दारूची बाटली, भजीं पडलीं आहेत. सर्व गादी ओकारीनें घाण झाली आहे आणि सर्व खोलींत एकत्र घाण पसरली आहे. हा प्रकार पाहून वसंतानें सर्व गोष्टी ताडल्या. तो मोठ्या विचारांत पडला. इकडे देसाईचा त्याला अत्यंत राग आला होता. परंतु आतां त्याला यशवंताकडे लक्ष देणं भाग पडलें. आतां काय करावें हेंच त्याला सुचेना. प्रथम त्याला वाटलें कीं, आपल्या पत्नीला हांक मारावी. परंतु लगेच तोहि विचार फिरला. तो मनाच्या दोन परस्पर विरुद्ध असणाऱ्या विकारांच्या कैचींत सांपडला. देसाईच्या नीच वर्तनामुळें त्याच्या डोक्यांत त्वेष चढला होता आणि यशवंत दारूच्या निशेंत बेहोष पडल्यामुळें त्याची करुणा येत होती. तो पलीकडे अर्धा बिछान्यावर आणि अर्धा जमिनीवर निश्चेष्टित पडलेल्या यशवंताकडे पहात उभा राहिला. मदतीकरितां कोणाला हाक मारावी तर सर्व घर जागें होऊन यशवंताचें

आपल्या सुशिक्षित मेहुण्याचें हें घाणेरडें वर्तन सर्वांना कळेल, बाबांना अतिशय वाईट वाटेल आणि लोकांनीं चालविलेल्या टीकेंत ही एक मोठी भर पडेल इत्यादि गोष्टी त्याच्या मनांत येऊन तो देसाईकडे वळून रागानें म्हणाला, " हा सर्व प्रकार तुझ्या नीच संगतीमुळें झाला आहे. तुला याबद्दल कांहीं एक वाटावयाचें नाहीं हें मी जाणून आहें. कारण, तूं आतां पक्का बनलेला बेरड आहेस. तुला ह्याच घडीला मी धक्की मारून घरांतून घालवून द्यावयास पाहिजे. पण तसें करण्यापासून उलट लोकांच्या संशयांत भर पडेल. म्हणून तुला मी आतां इतकंच सांगतों कीं, तूं ह्या पलीकडच्या खोलींत जाऊन बैस आणि उद्यां काय करायचं तें मी पाहीन. जा—"

वसंताचा राग अगदीं अनावर झाला होता. परंतु तो विचारी असल्यामुळें त्यानें त्या वेळीं आत्मसंयमन केलें. प्रस्तुत प्रसंगीं वसंताच्या ऐवजीं एखादा तामस वृत्तीचा मनुष्य तेथें असता तर मात्र निराळाच प्रकार घडला असता. देसाईसारख्या नीच मनुष्याची कणीकच मऊ व्हावयाची, परंतु त्याच्या नशिबानें त्याला मवाळ व विवेकी प्रतिस्पर्धी भेटला. तथापि वसंतानें त्याला बाजूच्या खोलींत जाऊन बसावयास सांगितलें, तो हुकूम मात्र त्याला मोडवला नाहीं. कारण वसंताच्या त्या शब्द-उच्चारांत हुकूमीपणा होता. देसाई मुकाट्यानें पलीकडच्या खोलींत गेला तेव्हां तो दृष्टिआड होतांच वसंताचा राग थोडा कमी झाला. तो कांहीं वेळ तेथेंच विचार करीत उभा राहिला, खोलींत यशवंत अस्ताव्यस्त पडला असून त्याला ओकारी होतच होती. आतां घरांतील इतर मंडळींना उठवून आपल्या मेहुण्याचें हें हिडीस रूप त्यांना दाखविण्यापेक्षां शांतीला उठवून आपल्या भावाचे प्रताप तिला निस्तरावयास लावावें असा त्यानें विचार केला. तो आपल्या पत्नीच्या खोलीजवळ गेला त्यावेळीं शांता जागीच होती. इतकेंच नव्हे तर प्रथम देसाईनें तिच्या दरवाजावर टिचक्या मारल्या, तिला हळूंच हांका मारिल्या हा सर्व प्रकारहि तिला माहीत होता. देसाईनें दरवाजावर टिचक्या मारल्या त्यावेळीं बाहेर कोण आहे हें तिला कळलें नाहीं. ती चटकन् उठून दरवाजा उघडणार होती. परंतु देसाई जेव्हां तिला हळूच 'शांताबाई' म्हणून हांका मारूं लागला तेव्हां मात्र ती भीतीनें गांगरून गेली. इतक्यांत बाजूचा दरवाजा उघडल्याचा तिनें आवाज ऐकला आणि वसंतानें उच्चारलेले रागाचे शब्द तिच्या कानीं पडले. ती जास्तच भ्याली. तोंच बाहेर कोणी मोठमोठ्यानें ओकत आहे असें तिनें ऐकलें.

मनाच्या गोंधळलेल्या स्थितींत ती दरवाजाजवळ येऊन उभी राहिली. बाहेर काय गडबड आहे याची तिला कांहींच कल्पना करतां येईना. थोड्या वेळानें तिला पुनः पतीचा आवाज ऐकूं येऊं लागला. आणि क्षणभर स्तब्धता होऊन ' दरवाजा उघडून जरा बाहेर ये पाहूं ' असा तिला स्पष्ट आवाज ऐकूं आला.

शांतानें हळूंच पण भीत भीत दरवाजा उघडला. वसंत दरवाजांतच उभा होता. आजपर्यंत तिला केव्हांच आपल्या पतीची भीति वाटली नव्हती उलट वसंतच तिला भीत होता असें म्हटलें तरी चालेल. परंतु आतांचा प्रसंग निराळा होता. ती बाहेर येऊन वसंताच्या मुखाकडे तिची दृष्टि जातांच तिला भीति वाटली. तिनें चटकन् आपली दृष्टि फिरविली.

" या—अशा पुढें या आणि आपल्या दादाचे हे प्रताप पहा ! "

---

## १२........ हा नवरा नको.

सर्व खोलीभर पसरलेली ती घाण, सर्वत्र सुटलेली ती दुर्गंधी, आणि यशवंताची ती शोचनीय स्थिति पाहून शांतीचा चेहरा काळाठिक्कर पडला. ती एखाद्या दगडी पुतळ्याप्रमाणें जागच्या जागींच उभी राहिली.

" आतां पहात काय राहिलीस ? ती सर्व घाण साफ कर. "

" इश्श ! "

" इश्श काय ? तुझा तो लाडका दादा ना ? "

" मी नाहीं त्या घाणींत हात घालणार ! "

" ठीक आहे. मग खालीं जाऊन कोणाला तरी हांक मार म्हणजे तुझ्या लाडक्या दादाचे चांगले धिंडवडे निघतील. "

ही मात्रा सोळा आणे लागूं पडली. आपण खालून कोणालाहि हांक मारिली तर आपल्या दादाची ही घाणेरडी स्थिति सर्वांना कळेल आणि त्यामुळें आपली फजिती होईल, ही भीति तिच्यापुढें उभी राहिली. काय करावें हेंच तिला सुचेना. शेवटीं ती कातर स्वरांत म्हणाली, " मी आतां हें कसं साफ करूं ? "

" मी यशवंताला पलीकडे करतों. तूं खोलींतून पाणी घेऊन ये. "

ती सर्व घाण साफ करीपर्यंत शांता अगदीं रडकुंडीस आली. वसंतानें तिच्या मनःस्थितिकडे बिलकूल लक्ष दिलें नाहीं. ती सर्व घाण साफ झाल्यावर वसंत बाजूच्या खोलींत गेला. देसाई मुकाट्यानें एखाद्या चोरासारखा मुंडी मारून

ईझिचेअरवर बसला होता. वसंत आंत आलेला पहातांच तो उठला, तेव्हां वसंत म्हणाला, " आतां मी तुझ्याबरोबर जास्त बोलूं इच्छित नाहीं. परंतु तुला आतां बजावून इतकंच सांगतों कीं, सकाळीं मंडळी उठण्यापूर्वी तूं ह्या घरांतून चालता हो. नाहीं तर मी सर्व गोष्टी बाबांच्या कानांवर घालीन, हें लक्षांत ठेव. "

" पण—"

" तुझ्या तोंडचा एक शब्दहि ऐकण्याची माझी इच्छा नाहीं. तूं पहिल्या प्रतीचा हलकट मनुष्य आहेस. " असें म्हणून वसंत खोलींतून बाहेर पडला आणि आपल्या खोलींत जाऊन बिछान्यावर पडला. शांता मात्र बराच वेळ दारूनें देहभान नसलेल्या आपल्या दादाकडे पहात तेथेंच उभी होती. यशवंताचें हें वर्तन पाहून तिला लाज वाटूं लागली. हें दारूचें व्यसन त्याला केव्हां लागलें, याबद्दल तिनें बराच विचार केला. असें हें घाणेरडें दारूचें व्यसन आपल्या दादाला लागलें आहे, असें जर तिला कोणी सांगितलें असतें तर ती एखाद्या वाघिणीप्रमाणें सांगणारावर तुटून पडली असती, इतका तिला आपल्या दादाच्या निर्व्यसनी-पणाचा अभिमान होता. परंतु आज तिच्या अभिमानाची राखरांगोळी झाली. दादाचें हें व्यसन अद्यापि आपणांस माहीत नव्हतें, त्याचप्रमाणें आपल्या बाबांना देखील माहीत नसेल आणि ह्यापुढें जर बाबांना कळलें तर त्यांना किती वाईट वाटेल, हा विचार तिच्या मनांत येऊन तिचें मन जास्तच दुःखी झालें. पुष्कळ वेळ झाल्यावर तिनें यशवंताला हालविलें. परंतु तो शुद्धीवर येईना. उलट बराच वेळ त्याच्याजवळ उभें राहण्यामुळें त्याच्या तोंडाला येणाऱ्या दुर्गंधीचा दर्प सहन न होऊन तिला मळमळूं लागलें. क्षणभरानें तिला डोकें फिरल्यासारखें वाटूं लागलें. आतां आपण पडणार असें वाटतांच ती खालीं बसूं लागली तोंच तिचा तोल जाऊन ती जमिनीवर पडली. त्याचा मोठा आवाज झाला. परंतु त्यावेळीं वसंत आपल्या खोलींत विचारांत चूर होऊन गादीवर पडला होता, त्याला तो आवाज ऐकूं आला नाहीं. त्याचें डोकें पाहिलेल्या प्रकारामुळें अतिशय भणाणून गेलें होतें. फक्त तो आवाज पलीकडील खोलींत बसलेल्या देसाईनें ऐकला व त्या आवाजाबरोबर बांगड्या फुटल्याचाहि आवाज ऐकून हा काय प्रकार आहे हें सम-जावून घेण्यासाठीं त्याचें मन उतावीळ झालें. तो हळूंच उठला आणि दरवाजा-जवळ आला. त्याला आतां वसंताची भीति वाटूं लागली होती. परंतु दरवाजांतून डोकावून पाहतांच वसंताचा दरवाजा बंद आहे असें त्याच्या दृष्टीस पडतांच तो हळूंच बाहेर आला आणि शेजारच्या खोलींत डोकावूं लागला. तेथें त्याला काय

देखावा दिसला ? शांती आपल्या दादाजवळ अस्ताव्यस्त पडली होती. तिचा पदर एका बाजूला पडला होता. आणि दिव्याचा प्रकाश तिच्या उघड्या शरीरावर पडल्यामुळें त्या नीच वृत्तीच्या मनुष्याच्या अंगावर एकप्रकारचे शहारे आले. त्यानें हळूंच पुढें होऊन तिच्या अंगाला स्पर्श केला. आणि तशा स्थितींतच तिला उचलून त्यानें तिला आपल्या अंगावर घेतलें. परदेहाचा स्पर्श होतांच ती खाडकन शुद्धीवर आली. तिनें डोळे उघडतांच स्वतःचें वस्त्र विस्कलित झालेलें पाहून तिची भयंकर गाळण उडाली. तिनें आपला पदर सांवरून घेतला. परंतु पदर सांवरीत असतांना तिनें अशा कांहीं कठोर व भेदक दृष्टीनें बाळा देसाईकडे पाहिलें कीं, तोही भेदरून गेला.

"शांताबाई, तुम्ही एकाएकी बेशुद्ध झालां काय ?" संपादणी करीत देसाई म्हणाला "धाडकन् आवाज झालेला ऐकून मी आंत धांवून आलों. तुम्हाला कुठं लागलं का ?"

शांतीनें पुनः एकवेळ त्याच्याकडे तशाच क्रूर दृष्टीनें पाहिलें. परंतु आपल्या मनांत बिलकूल पाप नाहीं असें दाखवीत देसाई पुढें म्हणाला, "शांताबाई, आजच्यासारखा वाईट दिवस मी माझ्या आयुष्यांत केव्हांहि अनुभविला नाहीं."

ही संपादणी देसाईला पूर्ण साधली. आपल्या अंगाला जो त्यानें हात लाविला तो केवळ वाईट हेतूनें नाहीं असेंच तिला वाटलें. बऱ्याच वेळानें ती म्हणाली, "पण दादानें हा आज काय प्रकार केला ? तुम्ही तरी त्याला कसं असं करूं दिलं ?"

"मी काय करणार शांताबाई ? येथं येतांना वाटेंतच त्याच्या पोटांत दुखूं लागलें. तेव्हां नाइलाजास्तव स्टेशनवर मी एक ब्रान्डीची बाटली घेतली. पुनः काल संध्याकाळीं त्याच्या पोटांत दुखूं लागलें. परंतु मी तिकडे कांहीं लक्ष दिलें नाहीं. रात्रीं झोपतांना तो पुनः कुरकूर करूं लागला. मला तर झोपेनें अगदीं घेरलें होतें. तेव्हां मी त्याला सांगितलें कीं, ट्रंकमध्यें ती बाटली आहे, तींतील थोडी ब्रांडी घे.' इतकें सांगून मी झोंपलों. पुढें ह्या राजश्रीनें किती ब्रांडी घेतली हें कांहीं मला माहित नाही. परंतु जेव्हां तो ओकूं लागला तेव्हां मी खडबडून जागा झालों व पहातों तों हे राजेश्री असे बेफाम झालेले ! मी लगेच उठलों. काय करावें हें मला सुचेना. तेव्हां बाहेर जाऊन प्रथम वसंतरावांना हाका मारल्या परंतु त्यांना झोंप लागली होती. नंतर तुमच्या दरवाजाजवळ येऊन तुम्हाला हांका मारूं लागलों; त्यावेळीं वसंतराव एकदम दरवाजा उघडून बाहेर आले आणि

त्यांनीं मजवर भलताच आरोप केला. परंतु मी कांहींच बोललों नाहीं. आतां मात्र निश्चय केला आहे कीं दिवस उजाडतांच येथें रहावयाचें म्हणून नाहीं."

एका सपाट्यांत देसाईनें शांतीचा ग्रह बदलून टाकला. त्यानें जें जें सांगितलें तें इतकें व्यवस्थित जुळवून सांगितलें कीं, तो बोलला तो प्रत्येक शब्द शांतीला खरा वाटला. तो पुढें म्हणाला, " मला तुम्ही वहिणीसारख्या अहांत. मी तुम्हाला केवळ मदतीकरितां म्हणून मघां हांका मारिल्या. माझ्या मनांत पापाचं वारं देखील नव्हतं. पण तुमचे पतिराज माझ्यावर केवढे रागावले. त्यांनीं मला भलभलते शब्द लावले. ते मघां रागांत होते, म्हणून मी कांहीं बोललों नाहीं. मी तुमच्याविषयीं पापबुद्धि मनांत धरीन असें कधीं स्वप्नांत तरी होईल काय ? असो. आतां येथें जास्त दिवस राहूं नये हाच शहाणपणा ! "

अशा रीतीनें त्याच्या तोंडाची वटवट चालू असतां वसंतराव एकदम आंत येऊन उभा राहिला. आपणांस पाहतांच आपली बायको आणि देसाई देखील खजील होतील असें त्याला वाटलें होतें परंतु शांता तर खजील झाली नाहींच. परंतु उलट आपल्या दादाबरोबर आलेल्या त्याच्या मित्रावर—तो केवळ मित्रभावानें वागत असतां—आपल्या पतीनें त्याला वाईट शब्द बोलावे आणि आपणांविषयीं भलताच संशय घ्यावा याबद्दल राग येऊन ती कपाळाला आंठ्या घालून वसंतरावाकडे पाहूं लागली. त्याचप्रमाणें देसाईला देखील जोर आला होता. तिच्या ह्या वर्तनावरून व पतीकडे तिनें लाविलेल्या ह्या दृष्टीवरून ती आपल्या बाजूला पूर्ण झुकली आहे हें त्यानें ताडलें आणि त्या जोरावर तोहि वसंतरावाकडे धिटाईनें पाहूं लागला. परंतु वसंतरावाला मात्र स्तब्ध रहावेना. त्याचा राग जास्तच चेतला. तो म्हणाला. " बाळ्या, तुझ्यासारख्या कवडीमोल मनुष्याच्या + +वर लाथ मारून पहिल्या तडाख्याला घरांतून हांकून द्यावयाचें—"

" कां—इतकं रागावयाला झालं काय ? " शांता रागांत म्हणाली. " तुम्ही माझ्याविषयीं असे भलते सलते संशय घेतां तुम्हांला कांहीं वाटत नाहीं ! दादाबरोबर आज बाळासाहेब येथें होते म्हणून गोष्ट निभावली. नाहींतर आज कोणता प्रसंग दादावर येता याची कांहीं कल्पना तरी ? उगाच माणसानं डोक्यांत राख घालावी हें चांगलं का ? बाळासाहेबांना तुम्ही काय म्हणून दुरुत्तरं करतां ? ते दादाबरोबर आलेले आपले पाहुणे आहेत."

" असला नीच मनुष्य पाहुणा झाला तरी त्याला जोड्याखालींच मारला पाहिजे. म्हणे पाहुणे आहेत ! पहा—त्या हलकटाच्या नादानें तुझ्या दादाची काय स्थिति झाली आहे ती ! तुला डोळे आहेत काय ? "

" मला डोळे आहेत आणि मला चांगलं दिसतं. पण तुमचे डोळे मात्र आतां बंद झाले आहेत."

" बस्स—जास्त बोलूं नकोस." असें म्हणून तो पुन पुनः देसाईकडे वळला आणि म्हणाला, " देसाई, तूं येथें–ह्या खोलींत पुनः कशाला आलास ?"

" आपल्या शांताबाईलाच विचारा."

" तूं येथून चालती हो." वसंताचा राग अनावर झाला. " तुला ह्या हलकट मनुष्याबरोबर बोलण्याची काय जरूर ? जा आपल्या खोलींत जा."

" कां–इतका कांहीं शिरजोरपणा नको दाखवायला! कर नाहीं त्याला डर कशाला !"

" तूं येथून जातेस कीं नाहीं ?"

" मी येथून जाणार नाहीं" शांतीनें तितक्याच रागांत स्पष्ट उत्तर दिलें.

" जा, शांताबाई, तुम्हीं आतां जा. वसंतराव सांगतात त्याप्रमाणें तुम्ही आतां जा आणि स्वस्थ झोंपा. मी आहें आतां तुमच्या दादाजवळ."

त्याचवेळीं यशवंतराव थोडी हालचाल करूं लागला. दोन तीन ओकाऱ्या झाल्यावर थोडा वेळ निचेष्टित पडल्यानंतर त्याची निशा उतरूं लागली. तो आतां थोडा थोडा शुद्धीवर येऊं लागला होता. तें पाहून शांतीचाहि राग थोडा कमी झाला आणि ती आपल्या पतीकडे रागानेंच पहात खोलींतून बाहेर पडली आणि आपल्या खोलींत गेली. तिनें स्वतःच्या खोलीचा दरवाजा बंद केलेला पाहून वसंतरावहि मुकाट्यानें आपल्या खोलींत जाऊन दरवाजा बंद करून बसला.

त्यावेळीं रात्रीं दोन वाजण्याचा सुमार होता. थोड्या वेळानें बाळ्या देसाई उठला आणि सर्व खोलींत टेहळणी करूं लागला. त्यानें आधल्या दिवशीं कांहीं कांहीं गोष्टी पाहून ठेविल्या होत्या. त्याप्रमाणें त्यानें प्रथम हळूंच दरवाजा बंद करून घेतला व यशवंत साफ शुद्धीवर आला आहे काय हें पाहिलें. तो अद्यापि अर्धवट निशेंतच होता. नंतर उठून त्यानें हळूंच कोपऱ्यांत असलेलें वसंतरावाचें कपाट उघडलें. आणि प्रत्येक खण तो तपासून पाहूं लागला. त्यांत पुढेंच असलेलीं सोन्याचीं बटणें त्याच्या हातीं लागलीं. तीं त्यानें प्रथम हस्तगत केलीं. कोपऱ्यांत दोन अत्तराच्या बाटल्या होत्यां. त्या त्यानें खिशांत उतरविल्या. नंतर दुसरी बाजू तो शोधूं लागला. त्या बाजूला कपडे रचून ठेविले होते. त्या कपड्यांतून त्यानें चायना सिल्कच्या कोटाची व जरीच्या रुमालाची अशा दोन घड्या काढल्या. आणि आपल्या ट्रंकमध्यें सर्व कपड्यांच्या खालीं ठेविल्या. नंतर

बाजूच्या कोपऱ्यांत त्याचें लक्ष गेलें. तेथें शांतीची दोन अडिचशें रुपयांची सासरहून मिळालेली लाल शालजोडी होती. त्या शालजोडीकडे पहात तो कांहींवेळ विचार करीत राहिला. थोड्या वेळानें काय ठरवावयाचें तें ठरवून तो उठला. कपाट बंद केलें. आणि आपल्या बेडिंगची वळकटी त्यानें सोडली व त्या वळकटींत ती शाल व्यवस्थेशीर गुंडाळली. इतक्यांत त्याचें लक्ष शेल्फवर रचून ठेविलेल्या पुस्तकांकडे गेलें. त्यानें त्यांपैकीं तीन चार पुस्तकें निवडलीं आणि पुनः वळकटी सोडून त्यांत तीं बांधलीं. इतका प्रकार झाल्यावर तो यशवंताला शुद्धीवर आणण्याच्या उद्योगाला लागला. अर्ध्या तासाच्या प्रयत्नांत 'कोण ?' 'काय ? असें यशवंत प्रश्न उच्चारूं लागला. आतां पुढें काय करायचें तें त्यानें ठरवून ठेविलेंच होतें. तीन साडेतीन वाजण्याच्या सुमारास यशवंत साधारण चांगलाच शुद्धीवर आला. तेव्हां देसाई म्हणाला, "अरे ए मूर्खा, उठ. तूं हा काय गोंधळ करून ठेविला आहेस ! उठ."

यशवंत धडपडत उठला. परंतु अद्यापि त्याचें डोकें फिरतच होतें. देसाई त्याला हालवीत म्हणाला, "उठ–प्रथम तोंड धुवूं ! ही पहा–ओकून काय घाण केली होतीस ती. तो तुझा वश्या आला होता त्याची माझी पुष्कळ बोलाचाली झाली. हें प्रकरण पुष्कळ वाढलं आहे. शिवाय तूं असा बेशुद्ध झाल्यावर तुझ्या घरची रावबहादुरांना तार आली आहे. आतां येथें एक क्षणभरहि रहातां उपयोगी नाहीं. तूं शुद्धींत नव्हतास म्हणून त्या तारेविषयीं जास्त वाच्यता झाली नाहीं. आतां सकाळीं सर्व मंडळी उठल्यावर आपलं कारस्थान फुटेल. चल, उठ. असा बावळटासारखा बघत काय राहिला आहेस ? आतां आपण येथून निघालों म्हणजे पांचाची मेल आपणास मिळेल. आपण येथून गेल्यावर मग बसूंदे ह्या मंडळीना शंख करीत उठ—"

घरून तार आली असें कळतांच यशवंतरावांची स्वारी गडबडली. तो आपल्या मित्राच्या तोंडाकडेच पहात राहिला. परंतु देसाई पक्का बनलेला ! तो म्हणाला, "असा भितोस काय ? चल–तुला मी सांगतों तसं मुकाट्यानें कर. आपणांस सकाळीं जावयाचं आहे हें येथं सर्वांना माहीत आहे. आतां तूं मुकाट्यानें तोंड धुवून कपडे कर. मी हळूंच खालीं जाऊन एखाद्या नोकरास उठवितों आणि गाडी जोडण्यास सांगतों. चल-एकदां आपण हें घर सोडलें कीं मिळवलें !" असें म्हणून त्यानें हळूंच कपडे केले. थोड्या वेळानें यशवंतहि तयार झाला.

रात्रींच्या गडबडीमुळें वसंतरावाला उठण्यास थोडा वेळ झाला. वास्तविक

तो सहा वाजतां उठत असे. परंतु त्या दिवशीं सात वाजून गेल्यावर तो उठला. उठतांच 'आतां पुढें काय करावें ?' हा प्रश्न त्याच्या मनांत पहिल्या प्रथम उद्भवला. रात्रीं झालेली सर्व गोष्ट वडिलांच्या कानावर घालावी किंवा नाहीं, याचा तो विचार करूं लागला. त्याला एकदां वाटे कीं, आतां आपला मेहुणा चांगला शुद्धीवर आला असेल. त्याला सामोपचारानें सांगून देसाईला घरांतून घालवून द्यावें. पुनः हा विचार त्याला नापसंत होऊन आपल्या वडिलांच्या कानावर जशी घडली तशी खरी खरी हकीकत सांगावी आणि ते काय करतात तें स्वस्थ चित्तानें पहावें. अशा रीतीनें हा विचार ठरतो न ठरतो तों शांतीबद्दल त्याच्या मनांत विचार आला. त्याबरोबर त्याचें डोकें एकदम तापलें. इतके दिवस त्यानें सहन केलें, परंतु तिच्या रात्रींच्या वर्तनानें सर्व गोष्टींचा कळस झाला. आतां इतःपर तिचें नांव घ्यावयाचें नाहीं, असें त्यानें ठरविलें. इतक्यांत दरवाजाबाहेर एक नोकर येऊन 'रावसाहेब'—' म्हणून त्याला हांका मारूं लागला. तेव्हां उठून त्यानें दरवाजा उघडला. नोकरानें वडील बोलावीत आहेत असा त्याला निरोप कळविला. वसंतानें पुनः खोलींत जाऊन चूळ भरिली. आपणास वडिलांनीं बोलाविलें आहे तेव्हां त्यांना रात्रींची भानगड कळली असावी असें त्याला वाटलें. तो बाहेर दिवाणखान्यांत आला त्यावेळीं रावबहादुर चहापान करीत बसले होते.

"कायरे, यशवंतराव आणि त्याचे मित्र ते देसाई सकाळीं गेले तेव्हां मला उठवायचें होतेंस कीं नाहीं ?" रावबहादुर म्हणाले.

"काय ?—गेले ?"

"म्हणजे ते गेले तें तुला माहिती नाहीं कीं काय ?"

"नाहीं !—केव्हां गेले ?"

"पहांटेच्या गाडीनें ते मुंबईस गेले असें रामसिंग सांगतो."

वसंतराव खालीं जाऊन चौकशी करूं लागला. तेव्हां त्याला खरी हकीकत कळली. ते दोघे मित्र सकाळींच उठून त्यांनीं रामसिंगाकडून गाडी जोडविली. ते जात आहेत असें पाहून 'रावसाहेबांना उठवितों, बाबासाहेबांना उठवितों.' असें रामसिंग म्हणूं लागला. परंतु 'ते आतां निजले आहेत उगाच त्यांची झोंपमोड करूं नकोस. आम्हीं रात्रीं दोन वाजेपर्यंत तर बोलत होतों. त्यामुळें जागरण होऊन ते आतां निजले आहेत. उगाच नको त्यांना त्रास देऊं. ती मंडळी उठल्यावर आम्ही मुंबईस ठरल्याप्रमाणें गेलों असें सांग. व तेथून

पोंचल्याबद्दल आम्हीं खुशालीचें पत्र लिहूंच.' अशी देसाईनें त्याची समजूत केली. आणि ती त्याला खरी वाटून तो कांहींच बोलला नाहीं. त्या दोघांना पोंचवून गाडी पुनः परत घरीं आली त्यावेळीं रावबहादुर ब्रशनें दांत घांशीत खिडकींत उभे होते. गाडी येत असलेली पाहून पाहुणे मंडळी सकाळीं कदाचित् फिरावयास गेली असावी असें त्यांना वाटलें. परंतु गाडी जवळ येतांच गाडींत कोणी नाहीं हें पाहून त्यांना आश्चर्य वाटलें. त्यांनीं रामसिंगाला वर बोलाविलें तेव्हां त्यानें खरा प्रकार आपल्या मालकाला सांगितला. रावबहादुरांनीं मुकाट्यानें त्याची हकीकत ऐकून घेतल्यावर वसंतरावाला बोलाविण्याकरितां त्यांनीं सांगितलें परंतु त्याला तरी हा प्रकार कुठें माहित होता! त्यानें खालीं जाऊन चौकशी केल्यावर ते दोघे मित्र—आपले मेहुणे आणि त्यांचे सन्माननीय मित्र मुंबईस गेले हें ऐकून त्याला अत्यंत समाधान झालें. एक प्रकारचें त्याला हलकें वाटूं लागलें. आतां आपण रात्रीं घडलेल्या गोष्टी वडिलांच्या कानावर घालून त्यांच्या मनाला व्यर्थ खेद उत्पन्न करूं नये असें त्याला वाटलें. आणि त्या विचारांत तो वर आला. इतक्यांत तारेचा शिपाई आला. तार रावबहादुरांच्या नांवाची होती. वसंत दिवाणखान्यांत येऊन म्हणाला, "ते सकाळीं जायचं म्हणून म्हणत होते. परंतु ते अशा रीतीनें कोणालाहि कळविल्याशिवाय—निदान मला उठविल्याशिवाय—जातील असें मला वाटलें नव्हतें."

"चमत्कारिकच मुलं आहेत म्हणायचीं!" इतके उद्गार रावबहादुरांनीं काढले.

"तार आहे रावसाहेब." तारेचा लखोटा पुढें करून आंत येत शिपाई म्हणाला.

वसंतरावानें तार आपल्या हातीं घेतली. आणि त्याला पावती दिली. रावबहादुरांनीं तार फोडली. ती तार बरीच मोठी होती. तार वाचून रावबाहादुरांनीं आश्चर्यानें पुनः उद्गार काढले. "हा काय प्रकार आहे?"

वसंतरावानें तारेचा कागद आपल्या हातांत घेतला आणि पुढीलप्रमाणें वाचला.

Thousand Rupees missing. Yeshawant and his friend Desai absconded. Please detain them and make inquiry if they come to you.

(हजार रुपये नाहीसे. झाले. यशवंत आणि त्याचा मित्र देसाई नाहींसे झाले. तुमच्या घरीं आले तर त्यांना अडकवून चौकशी करा.)

"ही फुलाबोलाला गांठ पडली म्हणायची!" रावबहादुर म्हणाले, "इकडे

मुलं आलीं तिकडे हजार रुपये गेले!—शंकररावांना मुलांचा संशय आला कीं काय ?"

वसंतरावानें उत्तर दिलें नाहीं. वडिलांना ज्या गोष्टीची शंका आली ती गोष्ट खात्रीनें खरीच आहे असें त्याला निश्चयात्मक वाटलें. यशवंतरावांकडून ही गोष्ट व्हावयाची नाहीं हें तो जाणून होता परंतु त्याच्याबरोबर आलेला त्याचा मित्र बाळासाहेब हा कोणत्या प्रतीचा मनुष्य आहे हें त्याला चांगलें ठाऊक होतें. आपल्या सासऱ्याचे हजार रुपये गेले ते खात्रीनें देसाईनें चोरले असले पाहिजेत अशी त्याची ठाम समजूत झाली. तो माडीवर येत असतां रात्रीचा प्रकार आपल्या वडिलांच्या कानावर घालावा अशा विचारानेंच आला होता. परंतु आतां ही तार वाचून त्यानें आपला विचार रहित केला. उगाच आपल्या वडिलांचें मनही आपल्या मेहुण्याविषयीं कलुषित करूं नये असें वाटून तो गप्प राहिला. थोड्या वेळानें रावबहादुर म्हणाले, " वसंत ह्या तारेचें उत्तर जाऊं दे शंकररावांना आणि कळीव कीं, यशवंतराव आणि त्याचा मित्र येथें आले होते, एक दिवस राहून आज सकाळीं मुंबईस निघून गेले. "

" वसंतराव आपला प्रातर्विधि आटोपण्याकरितां आंत गेला तेव्हां रमाबाईनें विचारलें, " कायरे वसंत, पाहुणे उठले का ? त्यांचा चहा झाला आहे. "

" आई, ते दोघेहि सकाळींच उठून मुंबईला गेले. "

" काय पाहुणे गेले ? हें काय बाई तरी! फराळाचं तरी कांहीं करून दिलं असतं ! "

वसंतरावानें कांहीं उत्तर दिलं नाहीं. तो तोंड धूत असतां त्याच्या मनांत निराळीच एक शंका आली. आणि त्यानें लवकर लवकर तोंड धुतलें व चहा घेऊन तो वर आला. ज्या खोलींत त्यांचे पाहुणे झोंपले होते, त्या खोलींत प्रवेश करतांच त्याला प्रथम घाण आली. रात्रीं शांतीनें ती खोली साफ केली होती तरी घाणीचा अवशेष राहिला होताच! त्यानें इकडे तिकडे पाहिल्यावर त्याची दृष्टि शेल्फकडे गेली. तेव्हां शेल्फवरील पुस्तकें विस्कटलेलीं त्यास दिसलीं. त्यानें सर्व पुस्तकांवर नजर फिरविली. ती शेल्फ त्याच्या नेहेमीं दृष्टीसमोर असल्यामुळें त्यांतील कांहीं पुस्तकें कमी झालीं आहेत असें त्याला वाटलें. त्यानें पुनः सर्व पुस्तकें सारखीं रचलीं. तेव्हां चार पुस्तकांची जागा रिकामी पडली. त्यानें पुनः एकदां नीट लक्षपूर्वक त्या पुस्तकांकडे पाहिलें आणि चार पुस्तकें व तीं अमुक अमुकच पुस्तकें कमी झालीं असें त्याच्या लक्षांत येतांच तीं पुस्तकें काल रात्रीं-

पर्यंत होतीं आणि आतां नाहींत त्याअर्थीं तीं देसाईनेंच नेलीं असें त्याला वाटलें. तोंच त्याचें लक्ष कपाटाकडे गेलें. कपाटहि उघडें पाहून त्याची शंका दुणावली. त्यानें कपाट उघडलें. तोंच दर्शनीं रात्रीं ठेविलेलीं सोन्याचीं बटणें नाहींत असें त्याला दिसलें. नंतर कपडे पाहूं लागला. त्यांतहि कोट आणि रुमाल स्थानभ्रष्ट झालेले त्याच्या लक्षांत आले.

" किती हा बाळ्या नीच मनुष्य आहे. " इतकें वाक्य वसंतरावांच्या तोंडून बाहेर पडायला आणि शांता आंत यायला एकच गांठ पडली. ती नुकतीच उठली होती. उठल्याबरोबर ती आपल्या लाडक्या दादाला पहाण्याकरितां त्या खोलींत आली. तिला पहातांच रागानें वसंत पुढें म्हणाला, " पहा तुझ्या दादाचा हा प्रताप ! तो बनला आहे दारूबाज आणि बरोबर आणला होता दरोडेखोर ! "

" हो—माझा दादा दारूबाज आणि त्याचा मित्र दरोडेखोर ! कांहीं वाटतं का बोलायला ? "

" वाटायचं काय ? धडधडीत रात्रीं दारू पिऊन ही सर्व येथें घाण केली ! आतां शंका का राहिली आहे तो दारूड्या बनायला ? "

" बरं बरं माझा दादा दारुड्या—दारूबाज—" असें बोलत असतां तिला हुंदका आला. आपल्या पत्नीच्या हुंदक्याकडे दुर्लक्ष करून वसंतराव म्हणाला, " आणि तो त्यानें बरोबर आणला होता तो हलकट पाजी बाळ्या देसाई पक्का हरामखोर दरोडेखोर आहे. "

" बोला—वाटेल तितकं बोला. " डोळे पुशीत शांता म्हणाली, " माझ्या दादाला तुम्हीं नाहीं बोलणार तर कोण बोलेल ? "

" तुझा दादा आहे म्हणूनच गप्प रहातों. नाहीं तर केव्हांच एव्हांना पोलिसांत वर्दी देऊन त्या दोघांच्या हातांत ठोकल्या असत्या लोखंडी कड्या ! "

क्षणांत शांतीची स्थिति बदलली. ती अगदीं रडकुंडीस आली होती. परंतु एकाएकीं ती उलटली. जणूं काय आपण नवऱ्यापुढें अश्रू गाळले याची लाज वाटूनच कीं काय ती एकदम चवताळून म्हणाली, " तुमच्या मनांत काय आहे तें एकदां स्पष्ट कळूं द्या. माझ्या दादाला दारुड्या दरोडेखोर म्हणून नांव ठेवून मला खिजवण्यांत कांहीं पुरुषार्थ नाहीं. तुम्हांला माझ्याशीं भांडण उकरून काढायचं असेल तर तसें सांगा. मी आतां साफ सांगतें, माझं आणि तुमचं कांहीं धडपणीं पटायचं नाहीं. लग्न झाल्यापासून पहातें. तुम्हीं कांहीं तरी कारण शोधीत असतां. असा आतां आड पडदा कशाला ठेवितां ? काय असेल तें

स्पष्टच होऊं द्या. मी आपली पुण्यास जातें."

"जा—चालती हो."

"हो—हो जातें. तुम्हीं काय समजलां ! इतकं ओरडायला नको कांहीं !' एखाद्या पुरुषाप्रमाणें आविर्भाव करून छाती पुढें करीत शांती म्हणाली. "याल झकत माझ्या पायां पडत !" असें म्हणून खोलीबाहेर पडली. आणि खरोखरीच ती आपल्या सामानाची आवराआवर करूं लागली. तिनें आपल्या दोन्ही ट्रंक भरल्या. इतक्यांत "वहिनीसाहेब उठल्या काय ?" हें पाहून येण्यास रमाबाईनं पाठविलेला नोकर वर आला.

तो नोकर देखील गोंधळला ! परंतु वहिनीसाहेबांनीं खरोखरीच ट्रंका भरून जाण्याची तयारी केलेली पाहून तो मुकाट्यानें खालीं गेला व आपल्या मालकिणीस वहिनीसाहेबांचा निरोप सांगूं लागला. बिचारी रमाबाई तर आश्चर्यचकित झाली. सुनबाई इतक्या लवकर माहेरीं जाण्यास निघाली. याचें तिला कां आश्चर्य वाटूं नये ? सुनेनें चातुर्मास येथेंच संपवावा अशी तिची इच्छा होती. पण इच्छा असून उपयोग काय ? सासुपणाचे हक्क गाजविण्या इतकें तिला धैर्य कुठें होतें ? उलट ती सून आणि शांता ही सासू असाच प्रकार होता असें म्हटलें तरी चालेल ! कारण सकाळीं उठल्यापासून तो रात्रीं झोपेपर्यंत तिला सुनबाईची सारखी चवकशी करावी लागत होती. ती उठली का ? तिचें तोंड धुणें झालें का ? तिनें केंस विंचरले का ? इत्यादि सर्व लहान मोठ्या गोष्टी तिला पहाव्या लागत. आतां घरची श्रीमंती होती; घरांत दोन चार चाकर नोकर होते म्हणून ठीक होतें. नाहीं तर सुनबाईचें अंगधुणें झाल्यावर लुगडें घेऊन तिला जातीनें उभें रहावें लागलें असतें. असो. सुनबाई पुण्यास जाते असें म्हणते हा निरोप ऐकून ती गप्प राहिली. आईसाहेब कांहीं बोलत नाहीं असें पाहून नोकर मुकाट्यानें पुनः वर गेला आणि वहिनीसाहेबांनीं सांगितल्याप्रमाणें तिच्या ट्रंका घेऊन तो खालीं जाऊं लागला. त्यावेळीं रावबहादूर दिवाणखान्यांत टाईम्स वाचीत बसले होते. त्यांनीं नोकराला ट्रंक घेऊन जातांना पाहून विचारलें, "कायरे पाहुण्यांच्या का ह्या ट्रंका ?"

"नाहीं धनीसाहेब. पाहुण्यांनीं त्यांच्या ट्रंका सकाळींच बरोबर नेल्या."

"मग ह्या ट्रंका कोणाच्या ?"

"वहिनीसाहेबांच्या ?"

"मग तूं चाललास कुठें घेऊन ?"

" वहिनीसाहेब पुण्यास जातात आतां."

" काय ? " हा आश्चर्यात्मक प्रश्न विचारून रावबहादुर थांबले. त्यांनाहि प्रथम थोडें आश्चर्य वाटलें. परंतु लगेच त्यांना व्याह्यांकडून आलेल्या तारेची आठवण झाली. एक हजार रुपये गेले. याबद्दल विचारपूस करण्याकरितां शांता पुण्यास जात असेल, असें त्यांना वाटलें. इतक्यांत वसंताच्या स्टडीरूममध्यें तो ओरडून बोलत आहे असें त्यांच्या कानीं आलें. थोड्या वेळानें शांतीनें देखील मोठ्यानें बोलण्यास केलेली सुरवात त्यांना ऐकूं आली. त्यांनीं रामसिंगाला हांक मारून वसंताला बोलविण्यास सांगितलें. रामसिंग तेथें जाण्यापूर्वी काय प्रकार घडला तो आपण पाहूं. शांतीनें ट्रंका भरून तसेंच तोंड धुतलें आणि लवकर लवकर केंस विंचरून ती नवें लुगडें नेसली. आतां येथें क्षणभरहि रहावयाचें नाहीं असा तिनें निश्चय केल्यासारखा दिसत होता. आपण जातों हें पाहून आपणास सासुसासरा काय बोलेल याची तिला पर्वाहि वाटली नाहीं ! ती पहिल्या प्रतीची हट्टी आणि हेकेखोर होती. लुगडें नेसून तयारी होतांच ती अंगावर पांघरण्याची शालजोडी पाहूं लागली. आपली शालजोडी काल सायंकाळीं फिरून आल्यावर आपण शेजारच्या खोलींत टेविली आहे याची तिला मागाहून आठवण झाली ती तशीच त्या खोलींत गेली. परंतु तेथें शालजोडी तिच्या दृष्टीस पडेना. तेव्हां कदाचित् आपल्या पतीनें ती उचलून ठेविली असेल असें वाटून ती वसंताच्या खोलींत गेली. तो त्यावेळीं ईझिचेअरवर बसून स्वस्थ विचार करीत होता. शांता दरवाजांत उभी राहून म्हणाली, " माझी शाल द्या. मी जातें."

" मला तुझी शाल माहीत नाहीं.." तिच्याकडे न पाहतां वसंतानें उत्तर दिलें.

" माहित नाहीं म्हणजे ? मी काल तुमच्या स्टडीरूममध्यें खुंटीवर ठेविली होती. मला चांगलें स्मरतें."

"मग ती शाल खात्रीनें त्या तुझ्या भावाबरोबर आलेल्या दरोडेखोरानें नेली."

" हें पहा मी पुनः सांगतें—दरोडेखोर, दारुबाज असें पुनः पुनः बोलून मला तुम्ही चिडवूं नका."

त्याच संधीला रमाबाई वर आली. तिला पाहून वसंतराव म्हणाला, आई, हिला तुझी शालजोडी दे आणि एकदांची जाऊं दे."

" जाऊं दे कुठें ? " असें बोलून रमाबाई सुनेकडे वळून म्हणाली, " काय

लक्ष्मी, तूं खरंच चाललीस का ? हा एवढा चातुर्मास तूं इथंच काढावास—"

" कशाला आई ? जाऊं दे तिला. "

" मग जायचंच होतं तर मग सकाळीं तिचा दादा गेला त्याच्या बरोबरी सोबतीनें गेली असती. "

" तिचा दादा गेला मुंबईला. आणि गेला तरी सांगून गेला का ? एखाद्या चोरासारखे सकाळीं उठून ते पळून गेले.

पतीचें भाषण ऐकून शांता त्यांच्याकडे कपाळाला आठ्या घालून पाहूं लागली. रमाबाई म्हणाली, असं काय भलतंच बोलतोस वसंत ?

" भलतंच नाहीं आई ! खरं आहे तेंच बोलतों. "

" बोला—वाटेल तें बोला. मी आतां तुमचीं हीं नासकीं बोलणीं ऐकायला येथें रहातच नाहीं. " शांती तोऱ्यांत पण रागांत म्हणाली.

" बरं आतां फार झालं ! फार शहाणी होऊं नकोस ! "

" आपण शहाणपणाच शिकवूं लागल्यावर मी कशी नाहीं होणार शहाणी ?" हें आपल्या सुनेचें उत्तर ऐकून रमाबाई एकदम स्तंभितच झाली. इतक्यांत रामसिंग व त्याच्या मागून स्वतः रावबहादुर तेथें आले. त्यांना पाहतांच वसंतराव रागानें व तिरस्कारानें म्हणाला, I Don't want her. Let her go to Poona ( बाबा, मला हिची जरूरी नाहीं. हिला पुण्याला जाऊं द्या. ) "

" I too don't want you ! " " मलाहि तुमची जरूरी नाहीं ! " शांतीनें निर्भीडपणें खाडकन् उत्तर दिलें.

---

## १३........ काजवे चकाकले

आपण मुंबईस जातों असें सांगून यशवंत आणि त्याचा मित्र बाळा देसाई निघाले ते मुंबईस न जातां हरिपुरास आले. सांगलीच्या स्टेशनवर उतरतांच त्यांनीं एक टांगा केला. वास्तविक यशवंताला येथें येण्याचें कांहींच कारण नव्हतें. कांहीं दिवसांपूर्वी मुंबईहून कमलिनीच्या वडिलांचें-जयरामपंतांचें शंकररावांस नेहमीप्रमाणें पत्र आलें होतें. त्यांत त्यांनीं जांवयाबद्दल थोडी हकिगत लिहिली होती. तें पत्र यशवंताच्या वाचण्यांत आलें. त्याचवेळीं त्याचा आणि बाळा देसाई

याचा कुठेंतरी बाहेर गांवीं चार दिवस फिरावयास जाण्याचा विचार चालला होता. तेव्हां त्यांनीं प्रथम भोरला जाण्याचें ठरविलें. तेथें येऊन त्यांनीं काय काय प्रकार केले हें गेल्या पत्रांत सविस्तर येऊन गेलेंच आहे. तेथून ते आतां हरिपुरास येऊन कमलिनीच्या 'इडिएट' नवऱ्याला दोन बोधाच्या गोष्टी सांगण्याकरितां मुद्दाम आले. सांगलीहून टांगा करून ते दहा वाजण्याच्या सुमारास हरिपुरास आले. आतां रघुनाथच सर्वस्वी मालक होता. हे दोघे मित्र आले त्यावेळीं रघुनाथ आपल्या कुळाबरोबर बोलत बाहेरच बसला होता. दरवाजांत टांगा येऊन उभा राहतांच रघुनाथानें यशवंताला तात्काळ ओळखलें. लग्नाकरितां आपण पुण्यास गेलों असतां त्यानें आपली कशी पाठ पुरविली होती, हें तो अद्याप विसरला नव्हता. त्याच्या मनांत राग होताच परंतु आपल्या घरीं तो स्वतः होऊन आला आहे तेव्हां नाइलाजास्तव शिष्टाचाराप्रमाणें त्याला पुढें व्हावें लागलें.

"या यशवंतराव, आज कुणीकडे वाट चुकलां?" नमस्कार करीत रघुनाथ म्हणाला.

"मुद्दाम आपल्याच भेटीकरितां."

"इतकं मुद्दाम येणं केलं? बोलून चालून हें आमचं खेडें त्यांतून आम्ही खेडवळ माणसं! आमच्यासारख्या मूर्ख मंडळीकडे तुमच्यासारख्या शहरवासी मंडळीचें इतकें मुद्दाम येण्यासारखें काय काम?"

"रघुनाथराव, तुम्ही तर अगदीं खोंचून बोलूं लागलां!" हांसत हांसत पण मनांत खजील होऊन यशवंत म्हणाला. "हे आमचे जयरामपंतांचे जांवई आणि हे आमचे एक कॉलेजांतील मित्र मिस्टर बाळासाहेब देसाई." असें म्हणून त्यानें रघुनाथ आणि बाळा देसाई यांची परस्परांबरोबर ओळख करून दिली.

आपल्या घरीं कोणते पाहुणे आले आहेत हें कळतांच मनुताईला आनंद झाला. आतां आपणांस आपल्या आईची, दादाची त्याचप्रमाणें भावजयीची व सुनेची इतक्या दिवसांची मुंबईची हकीकत कळेल म्हणून तिला आनंद होणें स्वाभाविक होतें. ती मोठ्या उत्साहानें स्वयंपाकाला लागली. इकडे रघुनाथ आपल्या पाहुण्यांच्या स्नानाची तयारी करून बाहेर आला आणि नोकराला हांक मारून पत्र लिहूं लागला. तें पत्र लिहीत असतां त्याच्या चर्येवर आनंदाची छटा दिसूं लागली. लिहून झाल्यावर त्यानें पुनः एक वेळ वाचून पाहिलें. तें पत्र खालीं लिहिल्याप्रमाणें होतें.

**मित्रवर्य गणपत आणि श्रीधर यांस—**

**न. वि. वि. माझ्या लग्नाकरितां आपण पुण्यास गेलों असतां आपल्या खास परिचयाचे झालेले यशवंतरावसाहेब एका मित्राबरोबर येथें सकाळीं आले आहेत ही एक अपूर्व संधि आली आहे. असें लिहिण्याचें कारण आपणांस निराळें लिहावयास नकोच! आपला पुण्यास त्यांनीं जो मानसन्मान केला तो आपण सव्याज वसूल करून त्यांचें कसे काय 'काजवे चमकावितां' तें आतां पहाणें आहे. ही चिठ्ठी पावतांच आपण उभयतांनीं भोजनाकरितां येऊन पाहुण्याबरोबर आपल्याहि पंक्तीचा लाभ घ्यावा अशी आशा आहे. कळावें.**

आपला,

**रघुनाथ.**

हें पत्र जाऊन पोंचण्यापूर्वी श्रीधर आणि गणपति यांना रघुनाथाकडे कोण साहेबी पोशाख केलेले पाहुणे आले आहेत याची वर्दी लागली होती. त्यांच्या पोषाखावरून ते बहुतेक रघुनाथाच्या [illegible] आले असावेत असा त्यांनीं तर्क केला. परंतु ते कोण हें मात्र आतां त्यांना रघुनाथाच्या पत्रावरून कळलें. तें पत्र वाचून आतां पुढें काय करायचें तें प्रसंग पाहून आपण ठरवूं. असा बेत करून ते दोघे मित्र रघुनाथाकडे आले. यशवंतरावानें त्या दोघांना ओळखलें; परंतु त्यांच्याकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. तो देसाईबरोबर इंग्रजींत बोलण्यांत अगदीं गर्क झाला होता. जणूं काय आपल्याजवळ बसलेले कोणी मूर्ख खेडवळ आहेत, त्यांच्याजवळ बोलण्यांत कांहीं अर्थच नाहीं, असें तो समजत होता. हें त्याचें वर्तन रघुनाथ आणि त्याचे मित्र यांच्या लक्षांत आलें. परंतु तेहि कांहींच बोलले नाहींत. थोड्या वेळानें जेवण तयार होतांच मनुताईनें बाहेर वर्दी पाठविली. सर्व मंडळी भोजनाकरितां उठली. रघुनाथानें पाहुण्याकरितां दोन सोंवळीं वस्त्रें आणिलीं. परंतु तीं न नेसतां ते दोघेहि अंगांतील शर्टसह पाटावर जाऊन बसले. अर्थात् श्रीधर आणि गणपति यांनीं, त्यांच्या ओळीला मांडलेलीं आपलीं पानें उचलून बाजूला घेतलीं. परंतु रघुनाथाला मात्र तसें करतां येईना कारण आपणहि आपलें पान बाजूला घेतलें तर पाहुण्यांचा आपण उघडपणें अपमान करतों असें त्यांना वाटेल, अशी त्याला भीति वाटली. ही रघुनाथाच्या मनाची

झालेली चलबिचल पाहून यशवंत हांसत हांसत म्हणाला, " रघुनाथराव, तुम्ही आमच्या पंक्तीला बसतां, पण सांभाळा हो. आम्हीं पुण्याचे सुधारक आहोंत. उगाच तुमचें ब्राह्मण्य भ्रष्ट होईल. ते पहा कसे तुमचे दोघे मित्र ! मुकाट्यानें पानें बाजूला सारून दूर झाले ! हेंच तर तुमच्यांत आणि आमच्यांत-खेड्यांत आणि शहरांत अंतर आहे. काय ही तुमची वेडगळ समजूत रघुनाथराव ? अहो, पोशाखांत का कुठें धर्म आहे ? "

" पोशाखांत धर्म असो अगर नसो- ' रघुनाथ म्हणाला, परंतु आपले वाडवडील जें करीत आले तेंच आपणहि केलें पाहिजे. "

" वाडवडील शेण खात होते—" मध्येंच देसाई म्हणाला.

" आणि तेंहि तुम्हीं खावं काय ? " यशवंतानें आपल्या मित्राचें वाक्य पुरें केलें आणि ते दोघेहि खो खो हंसूं लागले.

हीं त्यांच्या तोंडांतून बाहेर पडलेलीं मुक्ताफळं ऐकून रघुनाथ रागावला. परंतु त्यानें विवेक करून आपला राग गिळला. तीच स्थिति बाजूला बसलेल्या गणपति आणि श्रीधर यांची झाली. थोड्या वेळानें जेवतां जेवतां यशवंत म्हणाला, " रघुनाथराव, आतां तुम्ही आपल्या ' वाईफ ' ला केव्हां आणणार ? "

" कोणाला आणणार ? " तो काय बोलतो हें न समजून रघुनाथानें विचारलें.

" वाईफ म्हणजे बायको. काय समजलांत ? ती आतां ह्या वर्षीं म्याट्रिकला बसणार. खरोखर रघुनाथराव, तुम्ही तिच्या बाबतींत अगदीं अन्याय करतां. अहो अशी शिकलेली बायको मिळणं म्हणजे खरोखरीच भाग्य लागत असतें. अशी बायको जर मला मिळाली असती तर मीं तिला ह्या माझ्या ' हार्ट '. जवळ बाळगली असती. तुम्हां खेडवळ लोकांना सुशिक्षित पत्नीची किंमत काय कळणार ? "

" कोंबडयाला रत्नाची पारख काय ? " मध्येंच देसाईनें तोंड घातलें.

मनुताई मुकाट्यानें त्यांचा संवाद ऐकत त्यांना काय पाहिजे काय नको हें पहात होती. थोडया वेळानें पुनः यशवंतानें विचारलें काय हो, तुम्ही देखील कांदे खात नाहीं काय ? काल आम्ही त्या रावबहादुरांच्या घरीं जेवायला होतों. ते इतके सुधारक पण घरांत पक्के बामण ! काय तो म्हातारा एवढा रावबहादुर होऊन अद्यापि पोरासारखं सोवळं नेसतो ! मला प्रथम वाटलं कीं, आमचं जेवण टेबलावरच होईल. पण पहातों तों काय ?—सगळीच बामणशाही ! नाहीं कांदा-नाहीं लसूण—"

" तुमची शांताबाई बरी आहे ना ?—" त्यांचा विषय बदलावा म्हणून मनुताईनें मध्येंच प्रश्न केला.

" होय. ती मात्र सुखी झाली. तिला मनाप्रमाणेंच सुशिक्षित नवरा मिळाला. रावबहादुरांचा तो वसंत. आमच्या कॉलेजांत होता. आतां रावबहादुर आहेत तोंपर्यंत त्याला जरा वेसण आहे पण एकदां रावबहादुरांची गच्छन्ति झाली कीं घरांत सर्वच सुधारकी राज्य! अहो, असा सुशिक्षित नवरा असला म्हणजेच त्याला बायकोची खरी किंमत कळते. नाहीं तर तुमचे रघुनाथराव पहा. त्यांना आहे का कांहीं बायकोची किंमत? कमलिनी म्हणजे एक नक्षत्र आहे. पण काय उपयोग! खरोखर मी तुम्हाला सांगूं का?—हें मुलीचं लग्न करून तुमचे जयरामपंत अगदीं फसले. त्यांनीं तुमचं भाऊबहिणीचं नातं टिकविलं पण मुलीचं सुख मात्र गमाविलं. मी म्हणतों, कमलिनीला तिच्या योग्यतेप्रमाणें चांगला बी. ए. झालेलाच नवरा पाहिजे होता."

आपण विषयांतर करण्याकरितां प्रश्न विचारला परंतु पुनः यशवंतराव मूळपदावर आले असें पाहून मनुताई पुढें म्हणाली, " किती दिवस होतां रावबहादुराकडे?"

" एकच दिवस होतों. पण कायहो बाळासाहेब, आज तर तेथें अगदीं गडबड उडाली असेल नाहीं?"

" गडबड काय पण सारखा शंख करीत असतील मंडळी! मी तर तेथें असा गोंधळ करून ठेवला आहे कीं, त्या वश्याला आणि त्या बुड्ढया रावबहादुराला माझी जन्माचीच आठवण राहिली पाहिजे." असा आपल्या पराक्रमाचा अभिमान वाटून देसाई दांत काढून हांसूं लागला. त्या दोघांचें चाललेलें संभाषण नव्हे त्यांच्या वाक्यांतील प्रत्येक शब्द श्रीधर आणि गणपति जणूं काय पाठच करीत होते. इतकें ते लक्षपूर्वक त्यांचा संवाद ऐकत होते. आणि त्यांचा प्रत्येक शब्द त्यांच्याच घशांत कसा घालतां येईल याबद्दल रघुनाथाचा विचार चालला होता. अशा रीतीनें त्यांचें भोजन आटोपलें.

रात्रीं त्रास झाल्यामुळें पाहुणेमंडळी दोनप्रहरीं स्वस्थ झोंपली. जेवण झाल्यावर गणपति आणि श्रीधर जाऊं लागले. परंतु पाहुण्यांचा मुक्काम असेपर्यंत रघुनाथानें त्यांना रहाण्याचा आग्रह केला. त्याप्रमाणें ते राहिले. ते दोघेहि घरचे सुखवस्तु होते. त्यांच्याहि घरीं साधारण रघुनाथाप्रमाणें कुळांबरोबर देवघेवीचा लहान धंदा चालू होता. त्यामुळें ते चार दिवस रघुनाथाकडे राहिले तरी कांहीं बिघडण्या-

सारखें नव्हतें. त्यांतून त्यांच्या रहाण्याचें कारण कांहीं निराळेंच होतें. पाहुण्यांनीं भोरच्या रावबहादुरांना—त्या बुढ्याला जन्माची आठवण राहील असे कांहीं प्रताप गाजविले होते, हें त्यांच्याच तोंडून त्यांनीं ऐकिलें होतें. त्याचप्रमाणें आपणहि त्यांना आपली जन्माची आठवण राहील असेंच कांहीं तरी केलें पाहिजे, असा विचार करून ते दोघे [illegible] रघुनाथाचा पाहुणचार घेत राहिले. दोनप्रहरीं रघुनाथाचीं कुळें येऊं जाऊं लागलीं. रघुनाथाजवळ त्याचे दोघे मित्र बैठकीवर बसले होते. पलीकडे यशवंत आणि त्याचा मित्र देसाई हे दोघे झोंपले होते. तास दीडतास झोंप घेतल्यावर ते दोघे उठले. त्यावेळीं रघुनाथ आपल्या एका कुळाबरोबर पैशांबद्दल कांहीं बोलत होता. त्याचें भाषण ऐकून देसाईला स्वस्थ बसवेना. तो मोठ्या आढ्यतेनें म्हणाला, " काय हो रघुनाथ-राव ! जवळ पांच पंचवीस रुपये असले म्हणजे तुम्हांला तुमचीं हीं भिकार कुळें सहज पटवितां येत असतील, नाहीं का ? आणि असा हा पांच दहा रुपयांचा तुम्ही घरबसल्या व्यापार करतां म्हणून हीं तुमचीं कुळं तुम्हांला मोठे सावकार समजत असतील खरं ना ? "

" अहो, आमचं काय ? खेडेगांवच्या लोकांचं, सर्वच खेडवळ !

" पण तुम्ही येथील सावकार तर खरेना ? "

" कसले सावकार ! आमचे खेडवळ लोक आम्हांला म्हणतात म्हणून आम्ही झालों सावकार ! "

" मग असं समजा कीं आमच्यासारखा एखादा आला आणि एखादी मोठी रक्कम मागूं लागला ! मग कसं काय ?—फजितीच व्हायची तुमची ! "

" फजिती कां होईल ?—तुमचं तारण आम्हाला पटलें नाहीं तर आम्ही नाहीं देणार पैसे. यांत फजिती कशी होणार ? "

" पण आहेत का जवळ कांहीं शेंपाचशें ? का उगाच सावकारी डौल दाखवितां ? "

" आहेत कीं नाहींत हें काय सांगूं ? "

" मग दाखवा पाहूं किती आहेत ते ? "

" कां—उगाच कारणाशिवाय दाखवा ? "

" कारणाशिवाय कशाला ?—काढा पाहूं. मला नोटीचे रुपये पाहिजेत."

" काढा—देतों सुटे रुपये."

" किती द्याल सुटे रुपये ? "

" तुम्ही मागाल तितके. " हट्टाला पेटूनच रघुनाथ म्हणाला.

" पक्का बरं, नाहीं तर फजिती होईल. "

" बरं पाहूं आतां कोणाची फजिती होते ती ! "

देसाई मोठ्या आढ्यतेनें उठला आणि आपल्या ट्रंकमधून त्यानें कपड्याच्या घडींत ठेवलेलें नोटांचें पुडकें बाहेर काढलें आणि म्हणाला, " दहा, वीस, पन्नास, शंभर, पांचशें कांढा रुपये ? "

रघुनाथ आणि त्याचे मित्र देसाईच्या हातांतील एवढ्या मोठ्या रकमेच्या नोटा पाहून आश्चर्यचकित झाले. हा लेकाचा उगाच फुशारकी मारतो असें त्यांना प्रथम वाटलें होतें. परंतु जेव्हां तो उठून ट्रंक उघडूं लागला तेव्हां त्यांना वाटलें कीं, हा फार झालें तर पन्नासाची नोट काढील. परंतु हें मोठें पुडकें पाहून ते तिघेहि त्याच्या तोंडाकडे पहात राहिले. तें पाहून देसाई म्हणाला, " कां हरिपूरकर सावकार, शेंपुट घातलींत कां आतां मागें ? "

" थांबा–उगाज इतकी लवकर वाफ दवडण्याची घाई करूं नका. " रघुनाथ म्हणाला, " किती रुपयांचें नाणें पाहिजे तें सांगा. "

" काढा प्रथम ह्या बारीक बारीक नोटांचे रुपये. " असें म्हणून त्यानें दहा, वीस आणि पन्नास इतक्या रुपयांच्या नोटा पुढें केल्या. त्या हातांत घेऊन रघुनाथ म्हणाला, " रुपयाला एक पैसा वटाव पडेल.–हो. आतां हा व्यवहाराचा प्रश्न आला. "

" एक पैसा देतों पण देईन तितक्या नोटा वटाविल्या पाहिजेत. नाहीं तर तितके पैसे दंड द्यावा लागेल. "

कांहीं एक न बोलतां रघुनाथ उठून आंत गेला व दहा मिनिटानें दोन थैल्या घेऊन बाहेर आला व म्हणाला, " ही एक एक पांचशेंची थैली अशा ह्या दोन मिळून हा हजाराचा तोडा आहे. बोला तुमच्या नोटा किती आहेत ? सांगा असे हजाराचे आणखी किती तोडे घेऊन येऊं ? "

हे तोडे पाहून आतां ते दोघे आश्चर्यचकित झाले. रघुनाथ म्हणजे समजत होतों त्याप्रमाणें अगदींच फाटका मनुष्य नसून खरोखरीच सावकार आहे अशी त्यांची खात्री झाली. ते दोघे अशा रीतींनं पहात असतां रघुनाथानें तें पुडकें उचललें आणि नोटा मोजल्या. त्या एकंदर नऊशें ऐंशी रुपयाच्या होत्या त्या हातांतच ठेऊन त्यानें एका थैलीचें तोंड मोकळें केलें. आणि तींतून पस्तीस रुपये बाहेर काढले. नंतर त्या दोन्ही थैल्या पुढें करून रघुनाथ म्हणाला,

" आपल्या नोटा आहेत नऊशें ऐंशीच्या. त्यांचा वटाव झाला रुपये पंधरा. आणि हा तोडा आहे हजाराचा. त्यांतून मी हे पस्तीस रुपये काढून घेतले. आतां उचला हे रुपये. " असें म्हणून त्यानें त्या नोटा आणि सुटे पस्तिस रुपये उचलले आणि उठून ते ठेवण्याकरितां तो आंत गेला. थैल्या तेथेंच राहिल्या. आतां मात्र देसाईला प्रश्न पडला. आतां हें ओझें जवळ बाळगावें कसें ? वास्तविक त्या दोन थैल्या म्हणजे त्या दोघांना पुरेसें ओझें होतें. थोड्या वेळानें रघुनाथ बाहेर आला. तेव्हां देसाई पुनः घुटमळत म्हणाला. " बरं रघुनाथराव. आतां ह्या थैल्या नेऊन ठेवा आणि त्या नोटा आणा. "

" ठीक आहे. पण पुनः तितकाच वटाट पडेल हें लक्षांत ठेवा. "

" बरं–बरं देऊं वटाव. पण नोटा तर आणा. "

" आणतों. " असें म्हणून रघुनाथ पुनः उठून गेला. व नोटा घेऊन आला. परंतु त्या नोटा देसाईच्या हातांत देतांना दहा दहा रुपयांच्या तीन नोटा त्यानें काढून घेतल्या आणि थैल्या उचलून त्या आंत नेल्या. आतां मात्र देसाईचे डोळे उघडले. थट्टेचा परिणाम तीस रुपये गमावण्यांत झाला. यशवंत अगदीं गप्प होता. रघुनाथ ते रुपये घेऊन जाणार नाहीं असेंच त्याला प्रथम वाटलें आणि रघुनाथाच्याहि मनांत रुपये नेऊन ठेवण्याचा विचार नव्हता. परंतु पुनः त्यानें विचार केला कीं, या अति शहाण्या लोकांना असेंच शिकविलें पाहिजे. तो रुपये ठेवून बाहेर आला आणि मंडळींत बसतांना म्हणाला, " बाळासाहेब, आपल्यासारखीं दोन चार गिऱ्हाइकें रोज येतील तर फार बरें होईल. "

" हो–खरंच ! अशी हजारांची उलाढाल करण्यांत जर तीस रुपये मिळाले तर मग शेंकडा काय पडला ? " यशवंतानें विचारलें आणि स्वतः हिशेब करण्याकरितां त्यानें बाजूला असलेलें शाईकलम जवळ ओढलें.

" तुम्हीं एवढें इंग्रजी शिकलेले आणि हा क्षुल्लक हिशोब तुम्हांला तोंडी होत नाहीं, तेव्हां आश्चर्यच म्हणायचं ! अहो, महिना शेंकडा तीस टक्के झालें ! रघुनाथानें उत्तर दिलें. यशवंत किंचित् ओशाळला आणि म्हणाला, " बरं पण आतां एकदां चहाची व्यवस्था करा. आणि कांहो, गणपतराव, श्रीधरपंत, तुमच्या गांवांत विशेष पहाण्यासारखें काय आहे ? कांहीं तरी दाखवाल कीं नाहीं ? "

" आमच्या खेडेगांवांत काय ? चिंचेचीं झाडं आहेत, आंब्याचीं झाडं आहेत, केळी आहेत, हीं मोडकींतुटकीं घरं आहेत. तुमच्या पुण्यासारखं हें थोडंच शहर आहे !

" अहो जें कांहीं आहे तें तरी दाखवाल कीं नाही ? पण रघुनाथराव, तुमचा सांगलींत एक मोठा वाडा आहे ना ?—तो तरी दाखवा. "

" चला—" असें म्हणून रघुनाथ उठला आणि त्यानें मडळींना चहा आणला. तो घेत असतां देसाई म्हणाला, " रघुनाथराव, तुम्ही एवढी मोठी रक्कम घरांत ठेवतां, तुम्हांला कांहीं भीति नाहीं ! हें तुमचं घर तर आहे चंद्रमौळी !"

" हें घर तुम्हांला दिसतं चंद्रमौळी, पण त्याच्या मजबुतीबद्दल तुम्हांला काय कल्पना ? आणि जो एवढी मोठी रक्कम जवळ ठेवतो, तिच्या रक्षणाची तो व्यवस्थाहि करतो. "

सर्व मंडळी बाहेर पडली. रस्त्यांतील प्रत्येक मनुष्य आमच्या गांवठी साहेबांकडे वळून वळून पहात होता. रघुनाथाचें लग्न झाल्यावर त्यानें " आपली बायको शिकलेली व इंग्रजी फाडफाड बोलणारी असल्यामुळें टाकली आहे." ही गोष्ट सर्व हरिपुरांत माहीत होती. इतकेंच नव्हे तर तिचें नांव ' पंडिताबाई ' हें ' मोठा बाजीरावच किं नाहीं ! ' म्हणीप्रमाणें प्रसंगानुसार प्रत्येक घरांत वापरलें जात होतें. त्याच पंडिताबाईचे हे साहेबी पोषाख केलेले भाऊ रघुनाथाकडे आले आहेत, असेंच गांवांतील मंडळींना वाटलें.

" यशवंतराव, फार पोटांत दुखूं लागलं बुवा ! " देसाई मध्येंच म्हणाला, हा कांहीं पाण्याचा दोष असेल काय ?

" छे ! आमच्या नदीचें पाणी फारच पाचक आहे. " रघुनाथानें उत्तर दिलें,

" येथें केमिस्टचें दुकान आहे काय ? "

" केमिस्टचें दुकान म्हणजे ? चहा किंवा फराळाचें कांहीं घ्यावयाचं आहे का ? "

" केमिस्टचें दुकान म्हणजे जेथें इंग्रजी औषधें विकतात तें ! "

" नाहीं पण पारशाचें आहे दुकान. तेथें औषधें मिळतात किंवा नाहीं हें नाहीं मला माहीत. पण इंग्रजी दारू मिळते. "

" चालेल. औषधाच्या ऐवजीं ब्रांडी घेतली तरी चालेल. "

" म्हणजे ? तुम्ही ब्रांडी घेणार कीं काय ? "

" त्याला काय हरकत आहे ? औषध म्हणून घ्यायची ! यशवंतराव, फार लागलं आतां पोटांत दुखायला ! " जणूं काय पोटांतच दुखतें असें भासविणारा आवाज काढून पोट दाबीत देसाई म्हणाला.

थोडा वेळ चालून गेल्यावर रघुनाथानें सांगितलेलें पारशाचें दुकान आलें. तेव्हां यशवंत आणि देसाई यांचें कांहीं वेळ इंग्रजींत भाषण होऊन देसाई दुकानांत

शिरला. त्याला जें पाहिजे होतें तें मिळालें. रघुनाथ आणि त्याचे मित्र यांना संशय येण्यास चिलकुल कारण उरलें नाहीं. इतकी त्यानें पोटदुखीची बेमालुम रीतीनें बतावणी केली होती. कांहीं पुढें गेल्यावर त्यांना एक ब्राह्मणाचें गांवठी उपहारगृह लागलें. त्या उपहारगृहाला गांवठी हें विशेषण देण्याचें कारण मुंबई पुण्याच्या उपहारगृहांशीं त्या गृहाची तुलना करून त्याचें वर्णन करावयाचें म्हणजे त्याला 'गांवठी' हेंच विशेषण देण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. त्या दुकानाजवळ येतांच भजीं तळण्याचा खमंग वास येऊं लागला. तेव्हां बाळा देसाई म्हणाला, "कां यशवंतराव घ्यायचा! का थोडा?" यशवंतानें 'घ्या' म्हटल्यावर ते दोघे दुकानांत शिरूं लागले. परंतु रघुनाथराव, व त्यांचे मित्र बाहेरच उभे राहिले. तें पाहून देसाई म्हणाला, "कांहो रघुनाथराव, बाहेर कां उभे, चला थोडा थोडा चहा घेऊं?"

"छे! आम्हांला नाहीं तो दुकानचा चहा चालत! आणि आम्हीं कधीं घेतलाहि नाहीं."

"म्हणूनच आतां घ्या."

"नको; दुकानचा चहा घेणं अप्रशस्त आहे."

"जाऊं द्या हो. नाहीं घेत तर उगाच कशाला आग्रह करतां?" यशवंतराव म्हणाला आणि ते दोघे दुकानांत शिरले. सकाळीं ते रघुनाथाकडे आल्यावर त्यानें आपल्या मित्रांना—गणपति आणि श्रीधर यांना बोलाविल्यावर त्याच्याबरोबर पाहुणेमंडळी फार बोललीच नाहीं. ते दोघेहि अगदीं गप्प गप्पच होते. केवळ ते दोघे पाहुण्यांच्या सर्व कृत्याला साक्षीदार म्हणूनच रघुनाथाबरोबर होते. थोड्या वेळानें यशवंत आणि देसाई दुकानांतून बाहेर आले. त्यावेळीं देसाईच्या हातात एक पुडा होता. तो पाहून रघुनाथानें विचारलें, "ही कसली खरेदी केली?"

"अहो, हीं भजीं आहेत भजीं! कांद्याचीं ताजीं भजीं आहेत. 'ड्रिंक'वर त्याची अशी 'टेस्ट' लागते कीं यव!"

"तें काय म्हणतां तें कांहीं आम्हांला कळत नाहीं." आणि खरोखरीच 'ड्रिंक' आणि 'टेस्ट' या शब्दांचा अर्थ रघुनाथाला कळला नाहीं. तो पुढें म्हणाला, "पण तुम्हांला—शहरांतल्या मंडळीना धर्म अधर्म कांहीं राहिलाच नाहीं. तुम्ही शिकलेल्या मंडळींनीच हा सर्व भ्रष्टाकार मांडला आहे."

"आणि तुम्ही देव देव करणाऱ्या मंडळींनीं काय कमी केलं आहे? होती कुठें पेशवाई तिचाहि शेवटीं देव देव करून सत्यानाश केला. उगीच कशाला

आतां धर्म-धर्माच्या गोष्टी सांगतां ?–बस्स ! खाना, पीना और मजा उडाना !"

थोड्या वेळानें सर्व मंडळी रघुनाथाच्या वाड्यांत आली. ह्या वाड्याचें वर्णन मागें एका प्रसंगीं येऊन गेलेंच आहे. हा वाडा रिकामाच असून मागें असलेल्या मळ्याची व्यवस्था पहाण्याकरितां एक नोकर ठेविला होता. वाड्याच्या फाटकांतून मंडळी आंत शिरतांच तो नोकर पुढें झाला. रघुनाथावर वडिलांच्या मागें सर्व जबाबदारी पडल्यानंतर इतर कामांमुळें तो क्वचितच ह्या वाड्याकडे येत असे. आज तो ह्या मंडळीसह जवळ जवळ दोन महिन्यांनीं आपल्या वाड्यांत आला होता. नोकर पुढें आलेला पाहून रघुनाथानें त्याला स्वच्छ पाणी आणण्यास सांगितलें आणि यशवंताकडे पहात तो म्हणाला, "यशवंतराव, थोडीं कणसं-काकड्या आणायला सांगूं का ? ह्या दिवसांत आमच्या मळ्यांत हेंच होतं !"

"सांगूं का म्हणून काय विचारतां ? आणवून पुढें ठेवायचं" देसाई म्हणाला.

"श्रीधर, तुम्ही थोडीं कणसं हरीकडून भाजून आणण्याची व्यवस्था करा." असें रघुनाथानें सांगतांच श्रीधर आणि गणपति मळ्यांत जाण्याकरितां निघाले. इकडे ही मंडळी वाड्यांत आली. रघुनाथानें दरवाजा उघडल्यावर पाहुणे आंत गेले. तेथें एक जाजम अंथरलें होतें. मध्यभागीं बैठक होती. दिवाणखान्याच्या भिंतींना देवादिकांच्या जुन्या तसबिरा लाविलेल्या होत्या. हरीनें लोटा आणि एक पंचपात्र आणलें. मंडळीनें चूळ वगैरे भरून टाकिल्यावर सर्वजण बैठकीवर बसले देसाईनें भज्यांचा पुडा पुढें ठेविला. आणि 'दुसरीं दोन पंचपात्रें आहेत काय ?' असें रघुनाथाला विचारलें. तेव्हां रघुनाथ उठून आंत गेल्यावर देसाईनें आपल्या आंतल्या खिशांत इतका वेळ कोणाला दिसूं नये अशा व्यवस्थेनें लपवून ठेविलेली लहान ब्रॅन्डीची बाटली बाहेर काढिली. आणि तो म्हणाला, "आतां हा बूच कसा काढायचा ? येथें थोडाच 'कॉर्क' मिळणार आहे ?"

"मग उडव कीं तोंड !"

"पण तोंड उडविल्यावर तिला मागून खिशांत कशी ठेवितां येईल ? एका बैठकीला ही सगळी थोडीच संपणार आहे ?"

'न संपायला काय झालं ? आपण पांच जण आहोंत."

"हो पण ते तिघे घेतील तेव्हां ना ?"

"त्यांचा बाप घेईल ! सकाळपासून त्यांनीं सोंवळ्या ओंवळ्याचं, धर्मअधर्माचं मोठं बंड माजविलं आहे. त्यांची घमेंड उतरविलीच पाहिजे. आपण दोघे आहोंत. वाटेल तें करून त्यांना आतां थोडाथोडा प्रसाद द्यायचाच !"

" ठीक आहे. माझीहि तयारीच आहे." असें म्हणून देसाईनें बाटलीचें तोंड फोडलें आणि पहिल्या सपाट्यांत अर्धें पंचपात्र भरून तें पोटदुखीवरील औषध त्यानें घशांत ओतलें. यशवंतानेंहि त्याचेंच अनुकरण केलें. ते दोघे भज्यांवर ताव मारीत असतां रघुनाथ दुसरें एक पंचपात्र घेऊन आंत आला. तेव्हां त्या दोघांत चाललेला तो हिडीस प्रकार पाहून त्याला चमत्कारिक वाटलें. परंतु कांहीं एक न बोलतां पुढें होऊन त्यानें पंचपात्र त्यांच्यापुढें ठेविलें. तेव्हां त्याचा हात धरून देसाई म्हणाला, "–हं रघुनाथराव असे जवळ–अगदीं आमच्या जवळ बसा. आणि ही थोडी लज्जत तर पहा !" असें म्हणून त्यानें थोडी ब्रॉंडी त्या आणलेल्या पंचपात्रांत ओतली. आणि तें पंचपात्र त्याच्या पुढें केलें. " हं घ्या. आतां मुहूर्त पहात बसूं नका. उचला आणि लावा एकदम तोंडाला. थोडी चाखा तर खरी ! हं–होऊन जाऊं द्या. एकदां ही तुमच्या नरड्याखालीं उतरली म्हणजे कळेल हिच्यांत काय और मजा आहे ती ! हं–चालूं द्या—आम्हीहि घेतों तुमच्याबरोबर थोडी थोडी !" असें म्हणून डुलत डुलत त्यानें आपल्याहि पंचपात्रांत थोडी ओतून घेतली. तो ह्या कामांत चांगला कसलेला होता. परंतु यशवंत नवशिक्या असल्यामुळें त्यानें प्रथम घेतलेल्या 'ड्रिंक' नें त्याचें डोकें गरगर फिरूं लागलें. त्याचा शब्दहि थोडा थोडा अडखळूं लागला; परंतु त्यांतच त्याला मोठी मौज वाटून तो शरिराचा झोंक सांभाळून पुढें झाला आणि म्हणाला, "रघुनाथराव, तुम्हीं एक वेळ हिची 'टेस्ट' तर पहा. मग ही तुम्ही 'द्या–द्या म्हणून म्हणूं लागाल.–असं काय ? ही घ्या आतां–उडवा एकदां बार !"

रघुनाथानें त्या दोघांकडे एक वेळ तीक्ष्ण दृष्टीनें पाहिलें. परंतु त्याच्या दृष्टींतील भेदकपणा त्या दोघांच्याहि लक्षांत आला नाहीं. ते दोघेहि आतां मदिरेच्या आधीन होत चालले होते. इकडे गणपति आणि श्रीधर मळ्यांतून दहा कोवळीं कणसें तोडून तीं भाजण्याच्या उद्योगांत होते. नोकरानें आग पेटवून दिल्यावर तो कांकड्या तोडण्याकरितां निघून गेला. तेव्हां गणपति म्हणाला, " श्रीधर, मला ह्या पाहुण्यांबद्दल मोठा संशय येतो. मघां बोलतां बोलतां बाळासाहेबानें एवढ्या मोठ्या रकमेच्या नोटा काढल्या त्या पाहून मी आश्चर्यचकित होऊन गेलों. ही एवढी मोठी रक्कम त्याच्याजवळ आली असेल कोठून ?

" मलाहि त्यावेळीं थोडं चमत्कारिक वाटलं ! प्रवासांत एवढी मोठी रक्कम कोणी जवळ बाळगील हें संभवत नाहीं. येथें कांहीं तरी घोंटाळा असावा असें

मलाहि वाटतं! पण रघूला वटाव मात्र चांगला मिळाला. अरे ह्या चोरांचें घ्या काय !

" ह्या नोटा चोरलेल्या तर नसतील ! मला वाटतं यांत कांहींतरी पाणी मुरतं !"

कणसें भाजून होत आहेत तोंच मळेवाल्यानें कांहीं कांकड्या आणिल्या, त्या घेऊन ते दोघे वाड्यांत आले. त्यावेळीं त्यांना एक हिडिस देखावा दिसला, रघुनाथानें आपल्या हातांनीं स्वतःचें तोंड झांकलें आहे आणि बाळासाहेब त्याचे तोंडावरील हात काढण्याचा प्रयत्न करीत असून बाजूला यशवंतराव हातांत मदिरापात्र घेऊन त्याच्या तोंडांत ओतण्याकरितां अगदीं तयार आहे. दोघेही निशेनें अगदीं तर्र झाले होते. रघुनाथ त्यांना ' नको—नको ' म्हणून सामोपचारानें सांगत होता. वास्तविक त्याला ते दोघे भारी होते, असें नाहीं. परंतु पाहुण्यांचा मान ठेवायचा म्हणूनच तो इतक्या मिनतवारीनें त्यांचीं आर्जवें करीत त्यांच्या हातांतील दारूचा निषेध करीत होता,

" यशवंतराव, तुम्हीं हा मला भलताच काय आग्रह करीत अहांत ! "

" तु—तुम्हाला—ही—घेतलीच पाहिजे—या—या—तुम्ही श्रीरीधर पंट—ग्यानपॅट राव—" असें अडखळत म्हणत यशवंतानें हातांतील पात्र कांहीं जमिनीवर आणि कांहीं श्रीधराच्या आंगावर सांडलें. तें पाहून श्रीधर म्हणाला, " शीः—शीः काय ही घाण ! माझे सर्व कपडे खराब झाले ! "

" ही घाण—ही घाण—कोण म्हणतो ही ही घाण ? " देसाई पुढें होऊन म्हणाला, " ओत—ओत त्याच्या घशांत—" देसायानें बाटली तोंडाला लावीत यशवंताला बाजूला ओढलें आणि ती बाटली गणपतीच्या तोंडाजवळ नेली. परंतु आपणास बाजूला केलें हा अपमान यशवंताला सहन न होऊन तो झोकांड्या खात पुढें घुसला. त्याचा धक्का देसाईच्या हाताला लागला. त्याबरोबर बाटलीचें फुटकें तोंड गणपतीच्या तोंडाला लागलें आणि त्याच्या गालांत बाटलीची कांच रुपली ! तत्काळ तेथें जखम होऊन त्या जखमेंतून रक्त वाहूं लागलें. तें पाहून गणपति चिडला. तो रागानें म्हणाला, " बाळासाहेब, ही छाकटेगिरी आतां बस्स झाली. ह्याचा परिणाम चांगला होणार नाहीं. विचार करा. मागून पस्तवाल ! "

" कोण—कोण म्हणतो छाकटा ? " यशवंत आपल्या निशेच्या अवसानांत येऊन म्हणाला, "—तूं—तुझा बाप छाकटा ! "

अतिरेक झाला ! यशवंतानें बाप काढतांच गणपतीनें फाड्कन त्याच्या

श्रीमुखांत भडकाविली ! त्याबरोबर खरोखरीच यशवंताच्या डोळयापुढें काजवे चकाकले ! त्या झणझणीत फटक्याबरोबर यशवंतानें जमिनीवर लोटांगण घातलें. आपल्या मित्राची ती स्थिती पाहून देसाई मोठ्या आवेशांत आला. तो गणपतीच्या अंगावर येत आहे असें पाहून श्रीधर त्याला अडवून म्हणाला, " ए दारुड्या, मागें हो ! त्याच्या गालाला कापून आणखी जोर दाखवितोस काय ? " त्याला अडविण्याचा जसा प्रयत्न होऊं लागला, तसा त्याला जास्तच जोर येऊं लागला. त्याची धिंगामस्ती पाहून गणपति म्हणाला, " रघुनाथ. पहातोस काय ? तो दोर घेऊन बांध त्या चोराला ! "

" कोण–कोण चोर ! तुझा बाप चोर ! "

पुनः फाडकन् आवाज झाला ! आतां गणपति आणि श्रीधर हे दोघेहि चिडले. त्यांनीं देसाईची बरीच कणीक मऊ केली. इतका प्रकार होत आहे तों यशवंतराव इंग्रजींत शिव्या देत झोकांड्या खात उठले. तेव्हां श्रीधरानें खरोखरीच दोर आणून त्या दोघांना बांधण्यास सुरवात केली. रघुनाथ मुकाट्यानें ती मौज पहात होता. त्यानें त्या दोघांच्या आरडाओरडीकडे बिलकुल लक्ष दिलें नाहीं. इतका प्रकार झाल्यावर श्रीधर म्हणाला, " गणपति, आतां विचार त्या छाकट्याला, त्या नोटा कोठून आणल्यास म्हणून ? "

" तूं–तूं–तूं–कोण विचारणार ? "

" मी तुझा बाप–! " एक झणझणीत ठोसा मारून गणपति म्हणाला, " सांग, त्या नोटा कोठून आणल्यास चोरून ? "

गुडूप अंधारांत घडलेल्या गोष्टी उजेडांत आणण्यास अगदीं सोपा उपाय म्हणजे चौदावें रत्न ! ह्या रत्नाचा प्रयोग सुरू होतांच बाळासाहेब पोपटासारखें बोलूं लागले. आपण यशवंताच्या सांगण्यावरून त्याच्या वडिलांच्या–शंकररावांच्या खिशांतून हजार रुपयांच्या नोटा चोरल्या, ही एकच गोष्ट देसाईनें कबूल केली नसून रावबहादुरांच्या घरीं केलेली हातचलाखीहि त्यानें कबूल केली.

---

## १४....... राजमान्य जुगार

सूर्यास्त होऊन काळोख पडूं लागला असें पाहून रघुनाथ आणि त्याचे मित्र परत घरीं येण्यास निघाले. यशवंत आणि देसाई यांना उठण्याचीहि शक्ति नव्हती. म्हणून त्या दोघांना तेथेंच ठेवून ' ते शुद्धीवर आल्यानंतर त्यांना घेऊन ये असें

रघुनाथानें आपल्या नोकराला सांगून ठेविलें. वाड्यांतून बाहेर पडतांच श्रीधर म्हणाला, " कां रघुनाथ पाहुण्यांचे काजवे चकाकले कीं नाहींत ! "

" अरे, तुम्ही त्या दोघांना फार मारलंरे ! अशा मारण्यानं एखाद्याचा पटकन् प्राण देखील जायचा ! शहरचीं नाजुक माणसं ! "

अशा रीतीनें बोलत चालत ते तिघे दिवे लागण्याच्या सुमारास घरी आले. मनुताई बाहेरच होती. आपल्या मुलाबरोबर पाहुणे आले नाहींत हें पाहून तिनें पाहुण्यांची चौकशी केली. तेव्हां रघुनाथानें सर्व खरा प्रकार आपल्या आईला सांगितला आणि म्हणाला, " आई, माझ्या लग्नांत त्यांनीं आपणाला कसं भंडावून सोडलं होतं तें आहे ना तुझ्या लक्षांत ? त्या सर्वांचीं आज अगदीं सव्याज बाकी फेड करून घेतली. "

" पण रघुनाथ आतां पुढें काय करायचं ? " श्रीधरानें विचारलें, " राव-बहादुरांच्या वसंतरावांना त्याचप्रमाणें पुण्यास शंकररावांना पत्रें लिहून हा सर्व प्रकार कळवावा असें मला वाटतें. "

" अरे पण त्यांच्याजवळच्या त्या नोटी काढून घेतल्या का ? " गणपतीनें मध्येंच विचारलें.

" नाहीं त्या तुमच्या मारण्याच्या गडबडींत नोटींचें मला विस्मरण झालें ! "

रघुनाथ म्हणाला, " पण त्या आतां जातात कुठें ? येतील ते इथें ! त्यांच्या ट्रंका आहेत ना इथें !

परंतु रघुनाथाचा समज अगदीं चुकीचा ठरला. कारण यशवंतराव आणि त्याचा मित्र परत आलेच नाहींत. त्या दोघांची कणिक चांगलीच मऊ झाल्यामुळें ते दोघे सर्व रात्र अगदीं पडूनच होते. पहाटेच्या सुमारास ते, रघुनाथ आणि त्याचे मित्र यांना शिव्या देत उठले. त्यांच्या शरिराला सारख्या ठणका लागल्या होत्या. उठल्यानंतर पुढें काय करायचें हा प्रश्न त्यांच्यापुढें उभा राहिला. परंतु रघुनाथाच्या घरीं जाण्यास आतां त्यांना भीति वाटूं लागली. शेवटीं आपलें सामान तसेंच टाकून ते दोघे तोंड वगैरे धुऊन बाहेर पडले. आणि एका उपहार-गृहांत जाऊन तेथें त्यांनीं चहापान केलें. त्यांच्याजवळ पैसे मुबलक होते. त्यामुळें त्यांना काळजी करण्याचें कारण नव्हतें. चहा घेऊन झाल्यावर यशवंतानें त्या दुकानांत बसूनच रघुनाथाला एक खरमरीत पत्र लिहिलें. आणि आपल्या ट्रंका व बेडिंग पुण्यास पाठवून देण्याविषयीं लिहून तें पत्र नोकराजवळ दिलें. तेथून ते दोघे स्टेशनवर आले. पुण्यास येणारी सकाळीं एक गाडी होती. त्या गाडीनं ते

दोघे सेकन्ड क्लासमधून पुण्यास आले. यशवंताला घरीं जाण्यास तोंड नव्हतें. परंतु बरोबर देसाई असल्यामुळें उतरावें कुठें याची त्याला काळजी नव्हती. पुण्यांत बुधवार चौकांत एक गायनवादन क्लब होता. त्या क्लबमध्यें देसाईचे दोन मित्र होते. तेथें जाण्याचा त्यांनीं बेत ठरविला. परंतु पुण्याच्या स्टेशनवर येतांच तेथें विशेष गडबड असलेली दिसून आली. त्यांना कळलें कीं, आज पुण्याची पहिली रेस असल्यामुळें मुंबईहून एक्सप्रेसनें आलेल्या उतारूंची ती गडबड होती.

" यशवंत, आज योगायोग तर अगदीं सोळा आणे जुळून आला आहे." देसाई म्हणाला, " आज बुधवार-आजची ही पहिलीच रेस आहे. पूना रेसिस् सिझन सुरू झाला हें माझ्या लक्षांतहि नव्हतं. आज आपणांजवळ पैसे आहेत, आज आपण रेसिसमध्यें ' फॉरच्यून ' ( दैव ) काढूं ! "

" तें सर्व खरं ! पण मला अतिशय भूक लागली आहे. त्याचा काय विचार !

" ओ, डोन्ट केअर; कम ऑन ! "—( त्याची काळजी नको; चल ) असें म्हणून देसाईनें एका टांगेवाल्याला हांक मारिली आणि ते दोघेजण राजमहाल हॉटेलमध्यें गेले. तेथें बरीच गर्दी झालेली होती. त्यांपैकीं कांहीं मुद्दाम रेसिस-करितां आलेले ह्या रेसिसच्या रूपानें जुगार खेळणारे जुगारी होते. यशवंत आणि देसाई ज्या टेबलावर साहेबी थाटान जेवीत होते, तेथून जवळच दुसऱ्या टेबला-जवळ एक त्यांच्याचसारखा साहेबी पोषाख केलेला मनुष्य बसला होता. यशवंत आणि देसाई यांचें आपसांत चाललेलें भाषण त्याला स्पष्ट ऐकूं येत होतें. आणि त्या भाषणावरून त्या धूर्त माणसानें पुढील बेत ठरवून ठेवला.

" ह्या नोटस् पाहिल्या का ? " यशवंत आणि देसाई यांचें जेवण संपण्याच्या बेतांत तो मनुष्य त्यांच्याजवळ जाऊन म्हणाला. त्याच्या हातांत एक खिशांत सहज जाईल इतक्या बेताची छापील इंग्रजी चोपडी होती. त्या चोपडींत त्या दिवशीं होणाऱ्या सर्व शर्यती आणि प्रत्येक शर्यतींत धांवणाऱ्या घोड्यांचीं टोपण नांवें लिहिलेलीं होतीं. ती चोपडी दाखवीत तो मनुष्य देसाईला पुढें म्हणाला, " हा पाहिला का पहिल्या रेसमधील ' डायमंड ' घोडा आणि दुसऱ्या शर्य-तींतील ' हिरो ' आज खात्रीनें ' उइन ' ( जिंकणें ) करतील. मला माझ्या एका ' ज्याकी फ्रेन्ड ' नें ( शर्यतींत घोड्यांवर बसणारा ) ह्या मला अगदीं ' प्रायव्हेटली ' ( खासगी रीतीनें ) नोटस् दिल्या आहेत. "

" खरं कीं काय ? " आनंदानें देसाई म्हणाला, " मग आपण तुम्हीं सांगतां ह्याच घोड्यांवर पैसे लावणार. पण हे पैसे कसे काय लावायचे तें आपण सांगाल

बर होईल. हा आमचा पहिलाच प्रसंग आहे."

"त्याची नको तुम्हांला काळजी. चला आटपा. आतां वेळ फार थोडा राहिला आहे." असें म्हणून उठतां उठतां त्या मनुष्यानें विचारलें, "पण तुमच्याजवळ पैसे किती आहेत तें एकदां कळलें असतें म्हणजे ठीक."

"पैसे आहेत हो पुष्कळ हे पहा" आपल्या खिशांतील नोटींचें बंडल काढीत देसाई म्हणाला, "पण आम्हांला जिंकून दिलं पाहिजे!"

तें नोटींचं बंडल पाहून त्या मनुष्याच्या मनांत काय विचार आले असतील? या सर्वच जरी नाहीं तरी त्यांपैकीं कांहीं नोटी आज आपल्या खिशांत खात्रीनें जातील, हा विचार मनांत येऊन त्या मनुष्याचा चेहरा प्रफुल्ल दिसूं लागला. देसाईनें हॉटेलचें बील दिल्यावर ते तिघे शर्यतीच्या मैदानाकडे जावयास निघाले. यशवंत आणि देसाई यांच्या मनांत काय विचार येत होते? आपण जवळ असलेल्या रुपयांच्या दसपट रुपये घेऊन परत येऊं ह्या मनोराज्यांत ते चालत होते. इतक्यांत बाजूनें दोन घोड्यांची फैटण जाऊं लागली. गाडींत एकच मनुष्य बसलेला होता. त्याचाहि पोषाख इंग्रजी फ्याशनचा असून त्यानें गळ्यांत दुर्बीण अडकविलेली होती यशवंत आणि देसाई यांच्या बरोबर असलेल्या मनुष्यानें याला पाहतांच 'भय्यासाहेब-भय्यासाहेब' म्हणून हांका मारिल्या. त्याबरोबर भय्यासाहेबानें गाडी उभी करण्यास सांगितलें. नंतर तो मनुष्य भय्यासाहेबांजवळ जाऊन थोडावेळ हलक्या आवाजांत भाषण करून परत आला आणि यशवंताला म्हणाला, "चल-आपण भय्यासाहेबांच्या गाडींतून जाऊं. अनायासें तुमची ही नवीन ओळख होईल आणि आपण लवकरच रेसकोर्सवर जाऊं."

हे नवीन गृहस्थ कोण यांची येथें ओळख करून देण्यापेक्षां कथानकाच्या ओघानेंच त्यांची वाचकांबरोबर ओळख झालेली चांगली. सर्व मंडळी गाडींत बसून रेसकोर्सवर आली. हॉटेलांत परिचय झालेल्या मनुष्यानें प्रत्येकी पांच रुपयांच्या चार तिकीटा काढल्या. त्याचे सर्व पैसे देसाईनेंच दिले. भय्यासाहेबानें दहा दहा रुपयांच्या दोन नोटा काढल्या होत्या परंतु मोठेपणा घेण्याकरितां देसाईनेंच तिकीटांचे रुपये दिले. झालें! पंधरा मिनिटांनीं पहिली शर्यत सुरू झाली. 'डायमंड' घोडा पहिला येणार म्हणून यशवंत, देसाई आणि त्यांचा नवीन मित्र यांनीं शंभर शंभर रुपये लावले. परंतु भय्यासाहेबानें त्यांत फांदा मारिला. 'स्टार' या नांवाचा त्या शर्यतींत धांवणारा एक घोडा होता. या घोड्यावर बक्षीस मिळण्याचा दर एका रुपयाला दहा रुपये होता. त्या घोड्यावर शंभर रुपये लावले

तर हजार येतील आणि आपण ह्याच घोडयावर रुपये लावणार असें भय्यासाहेब म्हणूं लागला. बक्षिसाची रक्कम दसपट येणार हें ऐकून यशवंताचें मन चलबिचल झालें. त्यानें ' डायमंड ' घोडयावर लावलेले शंभर रुपये काढून ते ' स्टार ' घोडयावर लाविले. देसाईनेंहि त्यांचेंच अनुकरण केलें. अर्थात् त्यांच्या नव्या मित्रानेंहि आपली टिकीट बदलली. हे सर्व तीनशें रुपये वास्तविक देसाईनेंच आपल्या जवळचे दिले होते. थोडया वेळानें शर्यत सुरू झाली. भय्यासाहेबानें दुर्बीण काढून ती डोळयापुढें धरिली. सर्वजण उत्सुकतेनें आपण पैसे लाविलेल्या नंबराच्या घोडयाकडे पाहूं लागले. हां हां म्हणतां शर्यत आटोपली ! ' स्टार ' घोडा पांचवा आला. आणि ' डायमंड ' घोडा तिसरा आला. देसाईनें लाविलेले तीनशें रुपये गेले. तेव्हां त्यांचा मित्र म्हणाला, " पहा, मी सांगत होतों त्याप्रमाणें ' डायमंड ' वर आपण पैसे लाविले असते तर आतां दुप्पट तरी आले असते. पण नाहीं ! तुम्ही भय्यासाहेबांचं ऐकलं ! " असें म्हणून त्यानें भय्यासाहेबांकडे रागानें पाहिलें. हें त्याचें पहाणें यशवंताला खरें वाटलें. आणि दुसऱ्या शर्यतीच्या वेळीं त्यानें सांगितलेल्या ' हीरो ' ह्या घोडयावर त्या तिघांनीं पुनः तिनशें रुपये लाविले. भय्यासाहेबानें मात्र निराळ्या घोडयावर फक्त पंचवीस रुपये लाविले. यावेळीं देखील उलट झालें! तिघांचे रुपये बुडाले आणि भय्यासाहेबाला पंचवीस रुपयावर पाऊणशें रुपये आले. तें पाहून देसाई पुनः भय्यासाहेबाकडे वळला ह्या. तिसऱ्या शर्यतीला भय्यासाहेबानें सांगितलेल्या घोडयावर त्यांनीं पुनः तिनशें रुपये लाविले. यावेळीं त्यांनीं रुपये लाविलेला घोडा पहिलाच यावयाचा ! आणि तो घोडा जवळ जवळ शेवटपर्यंत पहिलाच आला होता परंतु काय झालें असेल तें असो. एकाएकीं तो घोडा मागें राहिला आणि एका मागून एक असे चार घोडे त्याच्यापुढें गेले. एकंदरीनें ह्या तिसऱ्या खेपेसहि त्यांचे रुपये गेले. परन्तु भय्यासाहेबाला त्यांचें समाधान करावयाला जागा होती. अशा रीतीनें हां हां म्हणतां देसाई जवळचे नऊशें रुपये संपले. आतां त्याच्या जवळ पन्नास-पंचावनच रुपये राहिले. चौथ्या शर्यतीची तयारी सुरू होतांच एका विशिष्ट घोडयावर पैसे लावा असा भय्यासाहेबांचा आग्रह सुरू झाला. परंतु यशवंताच्या मनांत निराळ्याच घोडयावर रुपये लावावे असें आलें. त्याप्रमाणें त्यानें देसाईला सांगितलें. आणि शेवटीं त्याच घोडयावर त्या दोघांनीं पन्नास रुपये लावले. इकडे भय्यासाहेबानें दुसऱ्या एका घोडयावर शंभर रुपये लावले. ही चौथी शर्यत आटोपली. परंतु या शर्यतींत भय्यासाहेब जिंकला. त्याच्या शंभर रुपयावर एकदम हजार

रुपये आले आणि यशवंत मात्र साफ बुडाला !

" पहा, मी सांगत होतों पण तुम्ही ऐकलं नाहीं ! " भय्यासाहेब म्हणाला, " आतां तुम्ही तेच पन्नास येथें लावले असते तर आतां पांचशें आले असते. बरं जाऊं द्या. आतां मी सांगतों त्या घोड्यावर लावा. आतांपर्यंत तुमचे किती रुपये गेले ?—साडे नऊशें ना ? ठीक आहे. आतां ह्या-मी लावतों ह्या घोड्या-वर लावा शंभर ! "

" पण आतां पैसे आहेत कुठें ? ऑल फिनिश !— ( सर्व संपले ! )" मध्येंच देसाई म्हणाला.

" ' नेव्हर माईंड '—मी देतों—किती देऊं ?—पांचशें ?—"

सावकार मिळाला. मग काय ? यशवंत आणि देसाई मध्येंच ईर्ष्येला पेटले. आपले गेलेले रुपये पुनः मिळविण्याकरितां त्यांची धडपड सुरू झाली. परंतु सर्व शर्यती संपेपर्यंत एक पैही न येतां उलट भय्यासाहेबांकडून घेतलेले पांचशें रुपये कर्ज झाले ! आतां मात्र त्या दोघांना अत्यंत वाईट वाटूं लागलें. परंतु उपयोग काय ?

---

## १५........ दुर्दैव ओढवलें

या जगांत विषमता ही एक अद्भुत जादू परमेश्वरानें उत्पन्न केली आहे. जगाच्या रचनेंत जर कांहीं रमणीयता असेल तर ती या विषमतेमुळेंच ! परमे-श्वरानें जर ही विषमता उत्पन्न केली नसती तर जगाला लोक अगदीं कंटाळून गेले असते. सर्व सृष्टींत सर्वत्र सारखेपणा, कुठेंहि वैचित्र्य नाहीं अशी जर स्थिति असती तर या पृथ्वीवरील सगळे व्यवहार नीरस आणि कंटाळवाणे भासूं लागले असते. विषमता हा सृष्टीचा आत्मा आहे आणि तो आहे तोंपर्यंतच तिच्या ठायीं स्वारस्य आहे.

ही विषमता प्रयेक कुटुंबांत—प्रत्येक व्यक्तींतही दिसून येते. प्रत्येक मनुष्यांत चांगले आणि वाईट गुण असणें हीच ती विषमता. आणि ह्याच विषमतेमुळें इतिहासाचा जन्म झाला आहे. प्रस्तुत कादंबरींत वसंतराव आणि शांता या जोड-प्यांत वरील गोष्टीची पूर्ण सत्यता पटते. शांता आपल्या माहेरीं निघून गेल्यावर वसंतरावाची काय स्थिति झाली असेल याचा आपण थोडा विचार करूं. रागाच्या भरांत वसंतरावानें आपल्या पत्नीला ' चालती हो ' म्हणून सांगितलें आणि

त्याप्रमाणें ती हट्टी आणि हूड स्वभावाची शांता मागचा पुढचा विचार न करतां आपल्या माहेरीं पुण्यास एकटीच निघून गेली, त्याबद्दल वसंतरावाला वाईट वाटलें नाहीं. फक्त त्या प्रसंगानें ' जगांतील सर्व सुखांना आतां आपण पारखे झालों ' याची जाणीव मात्र त्याला झाली. त्या दिवशीं तो धडपणें जेवला देखील नाहीं. रात्रीं त्याला बिलकूल चैन पडलें नाहीं किंवा सर्व रात्र त्याला झोंप आली नाहीं. ह्या मानसिक त्रासामुळें दुसऱ्या दिवशीं त्याला अस्वस्थ वाटूं लागून सायंकाळपर्यंत ताप भरला. अशा रीतीनें दोन दिवस जातांच तिसऱ्या दिवशीं त्याचा मानसिक आणि शारीरिक ताप भडकविणारें रघुनाथाचें पत्र आलें. त्या पत्रांत यशवंतराव आणि त्याचा मित्र देसाई यांची एकंदर हकीकत लिहिलेली होती. त्या गुणी बाळांनीं आपले गुण कसे उधळले, हरिपुरास त्यांनीं काय काय प्रकार केले, त्यांच्याजवळ किती रुपये होते, ट्रंकमध्यें काय काय वस्तु होत्या आणि त्या त्यांनीं कोठून चोरल्या ती सर्व हकीकत वाचून वसंतरावानें तें पत्र आपल्या वडिलांच्या हातांत दिलें. तें पत्र वाचून रावबहादुरांना सर्व गोष्टींचा उलगडा झाला. "आपण मुलाच्या सुखाकरितां जें करावयास गेलों तें सर्वस्वी मुलाच्या दुःखाला कारण झालें ! " अशी त्यांचीहि खात्री झाली.

तो दिवस विचार करण्यांत गेल्यावर वसंतरावानें तें पत्र तसेंच पुण्यास आपल्या स्वशूराकडे–शंकररावांकडे पाठविलें. तें पत्र जाण्यापूर्वीं शंकररावांच्या घरांत काय स्थिति होती, ती आतां आपण पाहूं. ते हजार रुपये शंकररावांनीं आपल्या कचेरीच्या तिजोरींतून आणले होते. अलीकडे त्यांना बरेंच कर्ज झालें होतें. सावकाराला अनेक वायदे करून ते सर्व चुकले. पैशाची कुठेंच सोय होईना. आणि सावकार तर अगदीं हातघाईवर आला. तेव्हां नाइलाजास्तव त्यांनीं कचेरीच्या तिजोरींतून आपल्या जबाबदारीवर ती रक्कम उचलली. ती रक्कम आणतांना त्यांचा विचार असा होता कीं, प्रथम सावकाराचें तोंड बंद करावें आणि एक दोन दिवस जारीनें प्रयत्न करून इतर ठिकाणाहून रक्कम मिळवावी आणि ती पुनः तिजोरींत ठेवावी. परंतु त्यांनीं मनांत योजल्याप्रमाणें सर्व गोष्टी एका बाजूला राहून त्यांच्या खिशावर त्यांच्या सुशिक्षित चिरंजीवाचा दरवडा पडला. चांगला बी. ए. झालेला मुलगा परंतु देसाईच्या संगतीनें पार बिघडला पहा ! परीक्षा पास झाल्यावर देसाईची संगत लागतांच त्यानें अलीकडे चार सहा महिन्यांत आपले बरेच गुण उधळले. आपल्या चैनीकरितां पैसे कसे मिळवावे याचें कसब देसाईच्या अंगीं पूर्ण होतें. त्याबद्दल थोडीशी माहिती येथें दिल्यास ती अनाठायीं होणार नाहीं

अशी आमची खात्री आहे. कॉलेजच्या क्वार्टर्समध्यें त्याचें नांव तर अगदीं मशहूर होतें. एखाद्या विद्यार्थ्याची ट्रंक उघडून त्यांतून एखादा जिन्नस लांबविण्यांत त्याचा हातखंडा होता. अमुक विद्यार्थ्याजवळ अमुक एखादी मौल्यवान् वस्तु आहे असें कळतांच तो विद्यार्थी बाहेर गेला आहे असें पाहून ही स्वारी त्याच्या खोलींत जाऊन त्या विद्यार्थ्याचें नांव सांगून व्यवहार करीत असे. बाहेर एखादी बायसिकल दिसली तर बेधडक तीवर स्वार होऊन देसाईनें तिला पळविली म्हणून समजावी ! दुसऱ्याचें नांव सांगून तिसऱ्याकडून एकादा जिन्नस कसा आणावा या कसबांत तर ती स्वारी फारच पटाईत होती. असा गुरु भेटल्यावर मग शिष्य तयार व्हावयास कितीसा वेळ लागणार ? त्यांतून यशवंताला अलीकडे चटोर फ्याशनची चटक लागलेली ! पण मनाप्रमाणें छानछोकपणा करण्यास द्रव्याची प्राप्ति कोठून होणार ! त्याचे वडील शंकरराव हे देखील ह्या फॅशनेबल राहणीमुळें कसे टेकीस आले होते याचें वर थोडक्यांत वर्णन केलेंच आहे. अशा वेळीं त्याच्या फॅशनच्या वाढत्या गरजा पुरविण्यास देसाईनें त्याला मदत केली. आणि त्याची सुरवात त्यानें घरांतूनच केली.

आपल्या मुलानें हजार रुपये नेले, हें शंकररावांस कळतांच त्यांना बाहेर तोंड काढण्यास जागा राहिली नाहीं. कारण त्यांना आपल्या दोन्ही मुलांबद्दल—यशवंत आणि शांता—फार अभिमान होता. आपण सुधारक म्हणवून घेण्यांत त्यांना किती भूषण वाटत होतें त्याबद्दल पहिल्या दोन प्रकरणांत थोडेसें दिग्दर्शन केलेंच आहे. आपण आपल्या मुलाला उच्च शिक्षण दिलें आहे, मुलीला मॅट्रिकपर्यंत शिकविलें आहे, तिचा प्रौढ विवाह केला आहे, वगैरे गोष्टींचा ते मोठ्या अभिमानानें सांगत असत. पण ह्या आठ दिवसांत सर्वच पारडें फिरलें. स्वतःच्या मागें कर्जाची टोंचणी लागली. त्या संकटांतून पार पडण्याकरितां केलेली पैशाची उचापत गळ्याशीं आली. आणि त्या सर्व गोष्टींचा कडलोट म्हणजे वसंतरावानें त्यांच्याकडे पाठविलेलें रघुनाथाचे पत्र. तें पत्र येण्यापूर्वींच एकच दिवस शांता पुण्यास आली होती. ती एकटीच आलेली पाहून शंकररावना थोडेंसें चमत्कारिक वाटलें. 'तूं एकटीच कां आलीस ? असें स्वस्थ चित्तानें तिला विचारण्यास त्यांच्या मनाला स्वस्थताच नव्हती. पार्वती बाईनें मात्र तिला विचारलें. परंतु शांती आपल्या आईला धडपणें उत्तर देईल तेव्हां ना !

शंकरराव मोठ्या विवंचनेंत होते. दोन दिवस ते कचेरींत देखील गेले नाहींत. कचेरींतील पैशाची व्यवस्था लावण्याकरितां दोन दिवस त्यांनीं आपल्या तंगड्या

तोडल्या परंतु कुठेंच पैशाची व्यवस्था होईना. इकडे कचेरींत दुसऱ्याच दिवशीं पैशाबद्दल बोंबाबोंब झाली. साहेबानें एक दिवस चौकशींत घालविला आणि दुसऱ्या दिवशीं तें सर्व प्रकरण पोलीसकडे पाठविलें. आपणावर कोणतें संकट येणार आहे याची शंकररावांस कल्पना नव्हती. ते वसंतरावांकडून आलेल्या पत्रावर संतापून विचार करीत होते. सर्व दिवसांत त्यांना विचारांनीं सोडलें नाहीं. त्यांची वृत्ती एखाद्या पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणें झाली होती. तोंच संध्याकाळच्या प्रहरीं पोलीस अधिकारी त्यांच्या घरीं येऊन थडकले. त्यांनीं रीतसर चौकशी सुरू केली. परंतु शंकररावांनीं कोणत्याच गोष्टी अंगीं लागूं दिल्या नाहींत. " प्रकृति अस्वस्थ आहे म्हणून आपण कचेरींत जात नाहीं. " असें त्यांनीं सांगितलें. भीतीनें गाळण उडाल्यामुळें ते कांहींतरी छपवाछपव करूं लागले. परंतु सर्वच गोष्टी त्यांच्या गळ्याशीं आल्या. आपल्या हातांतील पत्र आपणाविरुद्ध पुरावा करण्याची वाट पहात आहे, हें त्यांच्या लक्षांत आलें नाहीं. परंतु पोलीस अंमलदाराचें लक्ष त्या पत्रावर होतें. कारण तो शंकररावांस प्रश्न विचारीत असतां भीतीनें गडबडून गेलेले शंकरराव हातांतील पत्र चाळवाचाळव करीत होते. त्यावेळीं त्या पत्राच्या दुसऱ्या पानावरील 'एक हजार रुपये खिशांतून चोरले' हें वाक्य त्या अंमलदारानें स्पष्ट वाचलें.

" तुम्हीं चोरी केली असें मी म्हणत नाहीं. " पोलीस अधिकारी म्हणाला, आणि तसा आरोप तुम्हां सुशिक्षित मंडळीवर करण्याचें मला धाडस देखील होणार नाहीं. पण अलीकडे तुम्हांला सावकारांनीं बरेंच सतावून सोडलें आहे, ही गोष्ट खरी का ! "

" माझ्या खासगी व्यवहाराची चौकशी करण्याचा तुम्हांला अधिकार नाहीं. " जरा रागांतच शंकररावांनीं उत्तर दिलें.

" तुमचे खासगी व्यवहार पाहण्याची माझी इच्छा नाहीं. परंतु संशयाची निवृत्ति करण्याकरितां जेव्हां आम्हांला एखाद्या सुशिक्षित म्हणविणाऱ्या सद्गृहस्थाच्या वर्तनाची बारकाईनें चौकशी करावी लागते, तेव्हां त्यानें केलेलीं बरींच लफडीं आमच्या दृष्टीस पडतात. त्यांनीं बाहेर शेण खाण्याकरितां एखादं पात्र ठेवलेलं असतं, एखाद्या जमशेटजी वाईन मरचंटचं त्यांच्यावर फुगलेलं बील असतं—"

" तुम्हीं हें काय बोलतां याचा विचार केला काय ? " रागानें शंकरराव म्हणाले.

" होय. विचार करूनच बोलतों. सुशिक्षित सद्गृहस्थाचें खासगी वर्तन कसें

असतें तें मी तुम्हांला सांगितलें पण जाऊं द्या. आतां तेवढं तें तुमच्या हातांतील पत्र मला दाखवा पाहूं ?

" तें पत्र खासगी आहे. "

" खासगी असलं तरी तें पहाण्याचा मला पूर्ण अधिकार आहे. त्या पत्रांत हजार रुपयांचा उल्लेख केला आहे हें मला माहित आहे.

" पण—"

" पण आणि परंतु नको. तुम्ही तें पत्र देतां कीं नाहीं. " अधिकारी दरडावून म्हणाला.

अधिकाऱ्यानें तें पत्र हस्तगत करून घेतलें. अर्थात् शंकररावास आपला गुन्हा आतां खालच्या मानेनें कबूल करावा लागला. परंतु वेळ निघून गेली. शंकररावांनीं गुन्हा कबूल केला. त्या एका गुन्ह्यांत ते दोन गुन्ह्यांच्या कचाटयांत सांपडले. आतां मात्र प्रसंग मोठा बिकट येऊन ठेपला. शंकररावांनीं कबुलीजबाब देतांच पोलिस अंमलदार त्यांच्यावर चोरीचा चार्ज ठेवून उठला. तात्काळ शंकररावांच्या डोळयांपुढें एक भयंकर चित्र उभें राहिलें, त्यांना सुचेनासें झालें. आपल्याला आतां फरासखान्यांत जावें लागेल ही कल्पना मनांत येतांच त्यांचे हातपाय मोडले ! तोंच " तुम्हांला आतां आमच्या बरोबर फरासखान्यांत आलें पाहिजे. " हें त्या पोलीस अधिकाऱ्याचें हृदयभेदक आणि त्यांच्या अब्रूचे धिंडवडे करणारे शब्द एखाद्या तापलेल्या सळयाप्रमाण त्यांच्या कानांत शिरले. त्यांतून शंकररावांच्या दुर्दैवानें तो पोलीस अधिकारी सुधारकांचा कट्टा द्वेषी होता. तेव्हां अर्थात् शंकररावांसारख्या सुधारकांचे आपणांला किती हाल करितां येतील याचा जणुं काय विचार करितच तो म्हणाला,—" चला उठा आतां आपणांस माझ्याबरोबर आलेंच पाहिजे. चोरीच्या पैशावर ह्या सुधारकी थाटावर शृंगारलेल्या [illegible] हवा खाऊन आपण कंटाळला असाल करितां दोन दिवस फरासखान्यांची हवा आपणांस थारेपालट करील चला उठा. "

आतां ' होय ' ' नाहीं ' म्हणून कांहीं चालण्यासारखें नव्हतें. शंकररावांनीं पुष्कळ आर्जवें करून पाहिलीं. परंतु त्याचा कांहींच उपयोग होईना, उलट पोलीस अधिकारी आपलें उग्र स्वरूप दाखवूं लागला.

" आतां मुकाटयानें येतां कीं हातकड्याचा प्रयोग करूं !"

अरेरे ! हें वाक्य शंकररावांनीं धडपणें ऐकलें देखील नाहीं. ते जवळ जवळ शुद्धीरहितच झाले होते. परंतु त्यांच्यापेक्षां घरांत पार्वतीबाईची स्थिति

अगदीं शोचनीय झाली होती. आपल्या पतीला आतां फरासखान्यांत नेणार हें पोलीस अधिकाऱ्यांचें वाक्य दरवाजाच्या फटींतून कानीं पडतांच एखाद्या मोडलेल्या केळीप्रमाणें ती धाडकन् जमिनीवर आदळली!

शंकररावांना पोलीस अधिकारी घेऊन गेले. त्यावेळचा देखावा हृदयद्रावक होता. सर्व वाड्यांत ह्या गोष्टीची चर्चा सुरू झाली. तास अर्धा तासानें शांतीनें थोडीशी खटपट केल्यावर पार्वतीबाई शुद्धीवर आली. तो प्रसंग मोठा आणिबाणीचा होता. आतां पुढें काय करावें हें दोघींना सुचेना. वाड्यांतून शेजार पाजाऱ्यांकडून साह्य मिळविण्याचा प्रयत्न केला असतां कदाचित् कुणी पुढें आलें असतें परंतु साह्याची याचना करावी कोणी? बिचारी पार्वतीबाई खोलींत बसून आपल्या अश्रूंनीं जमिनीला न्हावूं घालीत होती. आणि शांती जणुं काय आपल्या घरीं कांहींच झालें नाहीं अशा बेफिकिरपणानें दिवाणखान्यांत एक पुस्तक चाळीत बसली होती. ती रात्र कशीबशी निघून गेली. दुसऱ्या दिवशीं जयरामपंतांच्या सुमती वहिनींना मुंबईस पत्र लिहावें म्हणजे त्या खात्रीनें या संकटसमयीं धांवून येतील असें पार्वतीबाईला वाटलें. परंतु नुसतें वाटून उपयोग काय? शांती पत्र लिहिल तेव्हांना? शेवटीं बिचाऱ्या पार्वतीबाईनें शेजारच्या एका मुलाकडून जयरामपंतांना एक सविस्तर हकिकतीचें पत्र लिहविलें. अद्यापि शंकरराव फरासखान्यांतच होते. कचेरींत त्यांच्या वाईटावर असलेली कांहीं मंडळी झाल्या गोष्टीबद्दल आनंद मानीत होती. कोणीहि त्यांच्या सुटकेबद्दल किंचित् देखील प्रयत्न केला नाहीं. इकडे पार्वतीबाईनें लिहविलेलें पत्र जयरामपंतांना दुसऱ्या दिवशीं सकाळीं पोहोंचलें. त्यावेळीं तें कचेरींत जाण्याच्या गडबडींत होते. परंतु पत्र वाचून शंकररावावर असा भयंकर प्रसंग आलेला पाहून त्यांनीं कचेरींत चिठ्ठी पाठवून तात्काल पुण्यास निघण्याची तयारी केली. शंकररावांनीं हजार रुपये चोरल्याबद्दल त्यांना फरासखान्यांत नेलें आहे, या गोष्टीबद्दल जयरामपंतांना राहून राहून आचंबा वाटत होता. शंकरराव चोरी करतील हें शक्यच नाहीं, असें त्यांचें मन त्यांना राहून राहून सांगत होतें. परंतु प्रत्यक्ष त्यांच्या पत्नीनेंच त्यांना पत्र लिहिलें असल्यामुळें ते मोठ्या गोंधळांत पडले, तें पत्र कोणी तरी दुसऱ्यानेंच लिहिलें असावें असाहि त्यांना प्रथम संशय आला. त्या पत्रावर त्यांनीं आणि सुमतीबाईनें अनेक तर्क वितर्क लढविले. शेवटीं पुण्यास गेल्याशिवाय खरीखोटी गोष्ट कळणें शक्य नाहीं, असाच निर्णय करून ते दुपारच्या गाडीनें पुण्यास निघाले.

" पंत, तुमचे उपकार मी कसे फेडूं ? तिला बुद्धि झाली आणि तिनें तुम्हांला पत्र लिहिलें. तुम्ही जर आला नसतां तर–तर काय हें माझ्या अब्रूचे धिंडवडे ! ह्या कारस्थ्याच्या पायीं ही काळोखी माझ्या तोंडाला लागली." इतकें बोलून शंकरराव थांबले.

पुण्यांत येतांच पंतांनीं सर्व गोष्टींचा शोध करून शंकररावांची फरासखान्यांत भेट घेतली. आणि तात्काळ जामीन देण्याची व्यवस्था करून त्यांची सुटका केली. नंतर कचेरींतील साहेबास भेटून आपल्या वशिल्यावर कचेरीच्या तिजो-रींतील रक्कम भरून शंकररावांची केस काढून घेण्याची व्यवस्था केली. अशा रीतीनें त्यांच्यावरचें संकट तात्पुरतें निभावलें; तरी त्या संकटाची अद्यापि परिसमाप्ति व्हावयाचीच होती. जयरामपंत आणि शंकरराव वर लिहिल्याप्रमाणें गोष्टी बोलत बसले असतां त्या संकटाच्या परिसमाप्तीला सुरवात झाली. त्यावेळीं पार्वतीबाई दरवाजाजवळ उभी होती आणि शांता खिडकीजवळ उभी होती. इतक्यांत पोष्टाच्या शिपायानें शंकररावांच्या नांवाचें एक पत्र आणून दिलें. तें पत्र त्यांनीं फोडलें आणि वाचण्यास सुरवात केली. पत्र लांबलचक लिहिलें होतें. थोडें वाचून पाहतांच शंकररावांनीं एकवेळ क्रूर मुद्रेनें बाजूला उभी असलेल्या शांतीकडे पाहिलें. तें पत्र रावबहादुरांनीं लिहिलें असून त्यांत शांतीबद्दल इत्थंभूत हकीकत होती. सर्व पत्र वाचून होतांच शंकररावांनीं एक दीर्घ श्वास सोडला आणि पंतांपुढें तें पत्र केलें.

" पंत, हीं माझीं कर्म मला भोवताहेत बरं ! " पंतांनीं पत्र वाचून होतांच शंकरराव म्हणाले. " तो कार्टा तसा पाजी दरोडेखोर निघाला आणि ही कार्टी अशी निघाली ! सगळीच दिवाळी ! ह्या कार्टीला मी शिक्षण दिलं म्हणून मला अभिमान होता–पहा–पहा–कशी निर्लज्यासारखी पहाते आहे !—शांते, तूं सासर-हून कां आलीस ? तुला नवरा नको काय ? कार्टे तुला ही कसली अवदसा आठवली ! " रागानें भडकून शंकरराव बोलूं लागले, इतक्यांत त्यांच्या नांवाचा शोध करीत दोन इसम आंत आले. तेव्हां शंकररावांना गप्प रहाणें भाग पडलें. पंतांनीं त्यांना बसावयास सांगितलें. आणि शंकररावांनीं त्यांना 'काय काम आहे ?' असा प्रश्न केला. ते दोघेहि इसम त्यांना अगदीं अनोळखी होते. परंतु वाचकांच्या मात्र ते पूर्ण ओळखीचे आहेत. शंकररावांनीं काय काम आहे ? असें

विचारतांच त्यांपैकीं एकानें खिशांत हात घालून एक कागद बाहेर काढला आणि तो शंकररावांच्या पुढें केला. तो कागद म्हणजे यशवंतरावानें शर्यतीकरितां भय्यासाहेबाकडून कर्जाऊ घेतलेल्या पांचशें रुपयांची ' प्रॉमिसरी नोट ' होती.

" हे रुपये कसले ? " आश्चर्यानें शंकररावांनीं विचारलें.

" आपले चिरंजीव यशवंतराव यांनीं ' रेसीस ' खेळण्याकरितां परवां हात उसने घेतले ते. "

बराच वेळ शंकरराव एखाद्या दगडी पुतळयाप्रमाणें स्तब्ध होते. आपण काय ऐकत आहोंत, याचें त्यांना भान देखील नव्हतें. ते हातांतील कागदाकडे पहात होते. इतक्यांत त्यांच्या कचेरींतून शिपाई तेथें आला. त्यानेंहि शंकररावांच्या नावाचें एक पाकीट आणलें होतें. शिपाई रामराम करून बाजूला उभा राहिला. शंकररावांनीं तें पाकीट फोडलें आणि वाचलें. त्यांची चर्या अगदीं काळी ठिक्कर पडली. त्यांनीं खाडकन् कपाळावर हात मारून घेतला. आणि तात्काळ ते धाडकन् मागें पडले ! ! !

' तुमच्या गैर वर्तनामुळें तुम्हाला नोकरीवरून बडतर्फ केलें आहे ' असें त्या पत्रांत होतें. आणि हीच त्यांच्या संकटाची परिसमाप्ति होती. शंकरराव बेशुद्ध होऊन पडले, ते पुनः उठलेच नाहींत. त्यांच्या छातीला मोठा जबरदस्त धक्का बसला. त्या थोड्या अवधींत एका मागून एक अशा गोष्टी घडल्या कीं शेवटीं त्या सर्वांचा अगदीं कडेलोट झाला. पंतांनीं त्यांना सावध करण्याचा प्रयत्न केला. परंतु पाणी वगैरे शिंपडून ते शुद्धीवर येईनात असें पाहून त्यांनीं डॉक्टर बोलावून आणण्यास त्या शिपायाला पाठविलें. बिचारी पार्वतीबाई अगदीं भयभीत होऊन गेली. आपल्या पतीवर आलेलं संकट टळलें म्हणून थोड्या वेळापूर्वी तिला बराच धीर आला होता; परंतु सर्व गाडें उलटलें ! डॉक्टर येईपर्यंत शंकररावांच्या तोंडांतून फेंस येऊं लागला. तें पाहून पंत देखील घाबरले. मग बिचाऱ्या पार्वतीबाईची काय स्थिति झाली असेल याची वाचकांनींच कल्पना करावी. आपल्या वडिलांची ही शोचनीय अवस्था पाहून शांती देखील गडबडली. तिचा ताठाहि कमी झाला. ती देखील आतां धांवपळ करूं लागली. थोड्या वेळानें डॉक्टर आला. परंतु त्याचा काय उपयोग ? त्यानें शंकररावाची नाडी हातांत धरली आणि तात्काळ सोडून दिली. तें पाहून पंतांनीं एकदम विचारलें, " काय डॉक्टर ? "

" हार्ट फेल ! ( हृदयक्रिया बंद झाली ! ) " हें एकच उत्तर त्यानें दिलें.

एकाएकीं असा विपरीत प्रसंग आलेला पाहून आपली प्रॉमिसरी नोट खिशांत घालत भय्यासाहेबानें तेथून आपला पाय काढला. थोड्या वेळानें डॉक्टर निघून जातांच एकटे पंत आणि त्या मायलेकी घरांत राहिल्या. आतां प्राप्त झालेल्या प्रसंगाला तोंड देण्याखेरीज पंतांना दुसरा मार्गच नव्हता. ते आज दोन दिवस पुण्यांतच होते. आज त्यांनीं परत मुंबईस जाण्याचा विचार केला होता. परंतु अशा स्थितींत त्या मायलेकींना टाकून जाणें अगदीं अशक्य होतें, ते इतके धिराचे होते. तरी त्यांची देखील गडबड उडून गेली. मग पार्वतीबाई आणि शांता यांची काय बरें स्थिति झाली असेल ! हळुहळू पंतांनीं आजुबाजूच्या व आपल्या स्नेही मंडळींना जमविलें. सर्व स्मशानयात्रेची तयारी झाली. परंतु यशवंताशिवाय सर्व गोष्टी अडल्या. तो कुठें आहे, हें कोणालाच माहिती नव्हतें. शेवटीं नाइलाजास्तव त्यांना सर्व गोष्टी आटोपून घ्याव्या लागल्या.

इकडे प्रॉमिसरी नोट खिशांत घालून भय्यासाहेब बाहेर पडल्यावर पुढें काय करावें या विचारांत होता. त्याला यशवंत आणि त्याचा मित्र कुठें उतरले आहेत हें माहिती होतें. बुधवार पेठेंत गायन-वादन क्लबांत जाऊन त्यानें त्या दोघां मित्रांची चौकशी केली. परंतु ते त्यावेळीं तेथें नव्हते. पुनः एकवेळ त्यानें चक्कर घेतली. त्यावेळीं मात्र त्यांची भेट झाली. आपल्या घरीं असा भयंकर प्रकार झाला ही गोष्ट भय्यासाहेबाकडून ऐकतांच यशवंतरावाचें धाबें दणाणलें ! परंतु त्याला ही गोष्ट प्रथम खरी वाटेना. " तुम्हीं आमचें घर चुकलां असाल-भलत्याच घरीं जाऊन ती प्रॉमिसरी नोट दाखविली असेल—" अशा त्यानें ब-याच शंका काढल्या. कारण ती प्रॉमिसरी नोट घेऊन घरीं जाण्यास त्यानेंच भय्यासाहेबाला पत्ता दिला होता. शेवटीं देसाई चौकशी करण्याकरितां निघाला. तेव्हां भय्यासाहेब आपल्या पैशाविषयीं विचारूं लागला. परंतु यशवंताचें चित्त ठिकाणावर कुठें होतें ?

" ही प्रॉमिसरी नोट मी आतां वाटेल त्याला विकीन " भय्यासाहेब म्हणाला, " मला पुढल्या रेसीस करितां पैशाची जरूरी आहे. मला आज उद्यांपर्यंत रुपये उभे केलेच पाहिजेत. कोणीही ही प्रॉमिसरी नोट पांच पन्नास रुपये कमी देऊन आतां विकत घेईल. मग मात्र तुम्हांला हें प्रकरण जड जाईल हें प्रथम सांगून ठेवतों. " अशा रीतीनें त्याची बडबड चालू असतांना देसाई परत आला. आपले वडील एकाएकीं निवर्तले ही गोष्ट खरीच आहे असें कळतांच त्याला

आतां भीती वाटूं लागली. पुढें काय करावें हें सुचेना. देसाई देखील आतां आपला काढता पाय घेऊं लागला. शेवटीं ' आठ चार दिवसांनीं कांहीं तरी पैशांची सोय करतों. ' असें सांगून त्यानें भय्यासाहेबाची पिडा टाळली. आतां ते दोघेहि अगदीं निष्कांचन होते. आतां पुढें काय करावें याचा बराच वेळ विचार करून शेवटीं घरीं जावें असें यशवंतानें ठरविलें.

संध्याकाळच्या सुमारास एखाद्या चोरासारखा यशवंत घरीं आला. परंतु घरांत सर्वत्र अगदीं सामसूम होती. बिचारी पार्वतीबाई खोलींत एका चटईवर पडली होती. अद्यापि तिनें तोंडांत पळीभर पाणीहि घेतलें नव्हतें. शंकररावांना पोलिसांनीं फरासखान्यांत नेल्यादिवसापासून पंत येऊन त्याची सुटका होईपर्यंत त्या साध्वीनें अन्नाला स्पर्शदेखील केला नव्हता. आज आनंदानें चूल पेटवून आपण जेवण करायचें तिनें ठरविलें होतें. त्यांतून आज पंतहि मुंबईस जाणार होते. त्यांच्याकरितां कांहींतरी पदार्थ करावा असा तिचा मानस होता. पुण्यांत असतांना पंत जरी अगदीं त्यांच्याजवळ एकाच वाडयांत रहात होते, तरी शंकररावांकडे मुद्दाम जेवण्याचा त्यांना कधींच प्रसंग आला नव्हता. ह्या सर्व गोष्टी विचारांत घेऊन पार्वतीबाईनें पंक्तीला आज काय करायचें हें ठरवून ठेवलें होते परंतु विधीनें लिहून ठेविलेल्या गोष्टी अगदींच निराळ्या होत्या. तिचे सर्व बेत जागच्या जागीं राहून आज हा भलताच प्रसंग येऊन ठेपला. आजच्या प्रसंगा-मुळें रडून रडून आणि चार दिवसांच्या उपासामुळें तिला इतकी ग्लानी आली होती, कीं बिचारीला आतां उठून बसवत देखील नव्हतें. शेजारपाजारच्या बायांनीं मोठ्या मिनवतवारीनें तिला आणि शांतीला न्हावूं घातलें. नाहीं म्हणा-यला शांतीनें थोडा चहा केला. परंतु पार्वतीबाईनें तो घेतला नाहीं. ती तशीच पडून होती. यशवंत आला तो मुकाट्यानें खोलींत डोकावून दिवाणखान्यांत गेला. शांती वळकटीला टेकून सचिंत बसली होती. दादाला पाहतांच तिला एकदम रडें कोसळलें. तिचें आपल्या दादावर आणि दादाचें तिच्यावर प्रेम होतें. आणि परस्परांना एकमेकांबद्दल अभिमानहि होता. तिच्या दादाला कोणी बोललेलें तिला खपत नसे आणि आपल्या बहिणीला कोणी नांवें ठेवलेलीं त्यालाहि सहन होत नसत. प्रत्यक्ष पतीनें—वसंतरावानें त्याला ' दारुडया ' आणि ' दरवडेखोर ' म्हणतांच शांती त्याच्यावर कशी चवताळून उसळली होती त्याबद्दल बाराव्या प्रकरणांत थोडासा उल्लेख केलेला आहे. असो.

हळू हळू शांतीची समजूत करून ' हा असा प्रकार एकाएकीं झाला कसा ? '

असें यशवंतानें तिला विचारलें. तिनेंहि घडलेल्या सर्व गोष्टी त्याला सांगितल्या आणि चार दिवसांपूर्वी रघुनाथाकडून आलेलें पत्र त्याच्या हातीं दिलें. तें सर्व वाचून यशवंत म्हणाला, " यांत माझा काडी इतका देखील दोष नाहीं. त्या बाळ्या देसाईनेंच त्या नोटा बाबांच्या खिशांतून चोरल्या. मला बिलकुल कळलं देखील नाहीं. आम्ही तुझ्या सासरीं आलों होतों. त्यावेळीं मला त्याचा थोडा संशय आला. पण माझी प्रकृति कशी बिघडली होती ती तुला माहीत आहेच. तेथून आम्ही त्या रघ्याच्या गांवीं गेलों. तेथेंहि त्यानें फाजीलपणा केला. आणि तेथेंच मला ह्या हजार रुपयांचें आणि तुझ्या सासरींहि त्यानें कांहीं चोरी केल्याचें वर्तमान कळलें. अशा स्थितींत मी घरीं कोणत्या तोंडानें येऊं ? बाबांना मी किती सांगितलं असतं तरी त्यांनीं माझाच संशय घेतला असता. पण शांते, तूं कां एकटीच पुण्यास आलीस ? तुझाही नवऱ्या-बरोबर कांहीं खटका उडाला कीं काय ? "

शांतीनेंहि आतां आपली हकीकत सांगण्यास सुरवात केली. ती ऐकून यशवंत म्हणाला, " वसंताचा इतका स्वभाव कसा बदलला याचें मला राहून राहून आश्चर्य वाटतं ! मला वाटलं होतं कीं, त्याच्या अंगांत चांगली तडफ आहे पण माझा सर्व अंदाज चुकला म्हणायचा ! एकंदरीनें त्यानें तुला अगदीं ' शेमफुल ट्रीटमेंट ' ( लज्जायुक्त वर्तणूक ) दिली तर कांहीं हरकत नाहीं. त्याला मीच चांगला शुद्धीवर आणीन.

दिवे लागण्याच्या सुमारास पंत स्मशानयात्रेहून परत आले. यशवंताला पाहून ते कांहींएक न बोलतां फक्त इतकेंच म्हणाले, कीं, " तूं सकाळीं आला असतास तर तुझे हात लागले असते आणि अग्नि देखील तुझ्याच हातानें लागला असता. असो. नव्हतें त्यांच्या नशिबीं ! बरं आतां मला स्नानाला पाणी द्या. "

शांतीनें उठून पंतांना पाणी दिलें. स्नान झाल्यावर त्यांनीं पार्वतीबाईची चौकशी केली. पण ती तापानें अगदीं बेभान पडली होती. सर्व दिवसांत शांतीनें तिची एकदां देखील चौकशी केली नाहीं. किंवा यशवंतानेंहि आपल्या आईच्या खोलींत डोकावून पाहिलें नव्हतें. पंतांना मात्र सडकून भूक लागली होती. शिवाय आज त्यांना विशेष श्रम झाले होते. परंतु उघड शब्दानें त्यांना बोलतां येईना. शेवटीं नाइलाजास्तव त्यांनीं शांतीकडून पिठलें भात करविला. आज ह्या चुली-जवळ बसण्याचा शांतीचा पहिलाच दिवस होता. त्यावरून तिनें ते दोन पदार्थ

कसे केले असतील याची सहज कल्पना होण्यासारखी आहे. त्या पदार्थांचें विशेष वर्णन करण्यापेक्षां पंत—इतकी सडकून भूक लागली होती तरी—पानावर जसे बसले तसेच उठले इतकें सांगितलें म्हणजे पुरें !

पार्वतीबाई अगदीं लोळागोळा होऊन पडली होती. तिला दूध देण्याविषयीं पंतांनीं शांतीला सांगितलें. परंतु आई कांहींच बोलत नाहीं किंवा हालचाल करीत नाहीं असें पाहून ती घाबरली. पंतांनीं खोलींत जाऊन स्वतः पार्वती-बाईला पाहिलें. परंतु तिला काय झालें आहे, हें त्यांच्या लक्षांत येईना. शेवटीं पुनः डॉक्टरला बोलाविणें भाग पडलें. त्यानें येऊन पाहतांच सांगितलें कीं, " हा जबरदस्त वायूचा झटका आहे. "

---

## उपसंहार

प्रस्तुत कथानकाच्या पहिल्या भागाचा समारोप करावयाचा म्हणजे जवळ जवळ आतांपर्यंत येऊन गेलेल्या सर्व पात्रांची थोडक्यांत हकीकत लिहावयाची आहे. गेल्या प्रकरणांत पार्वतीबाईबद्दल जें थोडेंसें दिग्दर्शन केलें आहे, त्याच्यापुढें माहिती द्यावयाची म्हणजे त्या साध्वीचा मृत्यु होय. बिचारी साधी, सरळ, बाल-बोध वळणाची बायको शंकररावासारख्या सुधाकराच्या पदरीं पडून दुःखी झाली किंवा ती सुखी होती याचा आम्हीं विचार करण्यापेक्षां आतांपर्यंत तिच्या संबंधानें जी थोडीबहुत माहिती वाचकांनीं वाचिली आहे. व त्यावरून त्यांना सहजच अनुमान करतां येईल. शंकररावांच्या सुधारकी आचारविचारांचा परिणाम त्यांचीं मुलें यशवंत आणि शांती यांच्या कोंवळया मनांवर होऊन तीं प्रमाणा-बाहेर कशीं उच्छृंखल बनलीं आणि वडिलांच्या फाजील लाडामुळें किंवा सुधारकी प्रेमामुळें म्हणा कशीं बेफान झालीं, याचा विचार करण्यासारखा आहे. वास्तविक मुलांना लहानपणीं कोणतीही शिस्त लावण्याचें जबाबदारीचें काम पूर्ण हिश्शानें आईकडे असतें. परंतु ज्या घरांत आपल्या लहान मुलांचें सुधारकी लाड करितांना त्यांच्या समक्ष त्यांचा बाप त्यांच्या आईची–ती अजागळ, अशि-क्षीत आणि वेडगळ म्हणून जी टर उडवित असतो, त्यामुळें मुलें शेफारून आपल्या आईला कशीं गणेनाशीं होतात याचें स्पष्ट चित्र वाचकांना या ठिकाणीं चांगलें पहावयास मिळालें आहे. आपलीं मुलें वाईट निघावींत अशी इच्छा

कोणत्याही आईला केव्हां तरी होणें शक्य आहे काय ? मुलांपेक्षां मुलींच्या वर्तनाकडे आईचें लक्ष विशेष असतें. आणि त्याप्रमाणें शांतीकडे पार्वतीबाईचें लक्षही होतें पण ती बापाच्या लाडानें लाडावलेली पोर आपल्या आईला कशी जुमानेनाशी झाली होती, याबद्दल पार्वतीबाईनें दुसऱ्या प्रकरणांत स्वतःच सुमतीबाईजवळ विवेचन केलें आहे.

प्रस्तुत कादंबरींत चित्रीत केलेल्या पात्रांत आम्हांला जें मुख्यतः वाचकापुढें मांडावयाचें आहे, तें गृहशिक्षण होय. ह्या शिक्षणानें मुलें कशीं शीलसंपन्न होतात आणि ह्या शिक्षणाच्या अभावीं तीं कशीं उच्छृंखल बनतात हीं दोन चित्रें यांत रंगविलेलीं आहेत. असो.

एकाएकीं शिरावरील मातापित्यांचें छत्र नाहींसें होऊन शांती आणि यशवंत पोरकीं झालीं. पंतांना नाइलाजास्तव पंधरा दिवस पुण्यांत रहावें लागलें होतें. तितक्या अवधींत शंकररावांच्या आपल्या पतीच्या क्रियाकर्मांत पार्वतीबाईनेंहि आपला वांटा काढून घेतला. रावबहादुर एक दिवस येऊन गेले. त्यांनीं पंतांना शांतीच्या वर्तनाबद्दल कांहीं गोष्टी सांगितल्या. त्या सर्व गोष्टीवरून विचार करून मुंबईस जाण्यापूर्वी पंतांनीं त्या दोघां बहिणभावंडांना जवळ बोलाविलें. आणि दोन हितोपदेशाच्या गोष्टी सांगितल्या आणि त्याप्रमाणें वागण्याचें त्यांनीं कबूलहि केलें. परंतु हातून मात्र कांहींएक घडलें नाहीं. शांतीनें सासरीं जावें आणि यशवंतानें एकादी शाळाखात्यांत नोकरी पहावी असें त्यांनीं सांगितलें होतें. पण नवऱ्यानें स्वतः येऊन आपलीं आर्जवें करून आपणास न्यावें तर आपण जावयाचें; नाहीं तर सासरीं जावयाचें नाहीं असा शांतीनें निश्चय केला होता. तेव्हां पंताच्या सांगण्याप्रमाणें ती थोडीच वागणार होती ! आणि यशवंतहि ' नोकरी पहा ! ' म्हणून सांगून तो थोडाच पहाणार होता ?

पहिला एक महिना त्या दोघांनीं कसा बसा काढला. आतां चूल शांतीच्या गळयांत पडली. ती कसें तरी जेवण करी. एखाद्या दिवशीं चहाच करून दुकानांतील चिवडा भजीं आणून त्यावर रहावें असा प्रकार चालूं लागला. परंतु नेहमींच असें कसें निभावणार ? शिवाय दुकानांतील जिन्नस रोज आणायाचे कुठून ? एक महिना लोटतांच यशवंताला अनेक विंचू टोचूं लागले. मूळांत शंकररावांना कर्ज झालें होतें, तें फेडण्याकरितां त्यांनीं जी गोष्ट केली तिच्यामुळें शेवट काय भयंकर परिणाम झाला तो वाचकांना टाऊक आहेच ! ते हजार रुपये यशवंतानें चोरून शिवाय पांचशें रुपयांचें स्वतः कर्ज केलें. शिवाय शंकररावांचे

मुळांतले सावकार तसेच कायम होते. इतकेंहि करून पंतांनीं शंकररावांचे कचेरींतील हजार रुपये भरले होते ते निराळेंच! अशा रीतीनें अडीच हजार रुपये आणि इतर किरकोळ पांचशें रुपये मिळून तीन हजारांचें कर्ज आतां यशवंताच्या शिरावर आलें होतें. हे सर्व सावकार आतां चैन पडूं देईनात. परंतु त्या सर्वांत भय्यासाहेबानें आपल्या पांचशें रुपयांकरितां त्याचा अगदीं पिच्छा पुरविला.

'प्रसंगीं कोण कोणाचें नाहीं.' याची आतां यशवंताला पूर्ण प्रचीति आली. एका महिन्यांतच त्याची सळो कीं पळो स्थिति झाली. रोज एखादा सावकार त्याला दमदाटी देऊन जाऊं लागला. भय्यासाहेबानें तर दरवाजावर धरणेंच धरलें! ह्या एकंदर परिस्थितीमुळें काय करावें हेंच त्याला सुचेना. कोणा एखाद्या श्रीमंताच्या घरावर दरोडा घालावा नाहींतर कोणाला तरी लुटावें, असे विचार त्याच्या मनांत खेळूं लागले. आणि त्या विचारांना बाळा देसाई पुष्टि देऊं लागला. 'श्रीमंतांनीं गाड्या घोड्यांतून फिरावें आणि आपणच कां असे हालांत दिवस काढावे,' असें म्हणून देसाई त्याच्या विचारांना विषाचें पुट देऊं लागला. ह्या विषाचा परिणाम यशवंताच्या मनावर जरी तात्काळ झाला नाहीं, तरी हळुहळू तें विष त्याच्या मनांत भिनूं लागलें; त्याबद्दल पुढील भागांत उल्लेख येणारच आहे.

शेवटीं जवळ कांहीं असेल तें विकावें आणि कर्ज वारावें, असा विचार करून यशवंत आपल्या आईचे दागिने शोधूं लागला. परंतु जवळ होतें काय? पार्वतीबाई खरी पार्वती होती! तिचे दागिने शंकररावांनीं केव्हांच फयाशनला बळी दिले. होतें नाहीं म्हणायला शें सवाशें रुपयाचें किडूकमिडूक त्याच्या हातीं लागलें परंतु त्यानें काय होणार! हजाराच्या मापानें भरणारा कर्जाचा खड्डा शें सव्वाश्यानें थोडाच भरणार आहे! शेवटीं शांतीचीं त्याला आर्जवें करणें भाग पडलें. प्रथम तिनें बरेच आढेवेढे घेतले. परंतु नाहीं म्हणून तरी कसें सांगणार? पैशाच्या अभावीं घरांतून चूल पेटेनाशी होऊन तिलाहि रोज एकादशी घडूं लागली होती. शेवटीं तिनें लग्नांत मिळालेल्या सोळा तोळ्यांच्या चार बांगड्या मोठ्या कष्टानें आपल्या भावाच्या स्वाधीन केल्या. त्यामुळें यशवंताचा एक सावकार घरीं यावयाचा बंद झाला. परंतु बाकीच्या सावकारांची काय वाट? जेमतेम आणखी एक महिना गेला! पुण्यांत राहून आतां भागावयाचें नाहीं, असें देसाईनें यशवंतास सुचविलें. आपण मुंबईस गेलों तर वाटेल ती उलाढाल करितां येईल आणि पावड्यानें पैसा हातीं लागेल, असें देसाईनें त्याला मधाचें बोट लाविलें. शांतीलाहि हा विचार पसंत पडला. तिनें अद्यापि मुंबई पाहिली नव्हती. तथापि मुंबईचें

कल्पनाचित्र तिनें कैकवेळां पाहिलें होतें. मुंबईस जाण्यास तिचाहि दुजोरा मिळतांच त्यांनीं कोणत्याहि सावकाराला न कळवितां मुंबईस जाण्याचा बेत नक्की करून तो त्याच दिवशीं अमलांत आणला. बाळा देसाईहि त्यांचे बरोबर होताच! तो कोणत्या उद्देशानें यांच्या बरोबर होता, हें येथें स्पष्ट लिहिण्यापेक्षां पुण्यापासून मुंबईच्या प्रवासांत एकाच डब्यांत शांतीचा आणि त्याचा जो निकट सहवास झाला, त्यावेळच्या त्याच्या वर्तनावरून तिला त्याचा तिटकारा आला आणि त्वेष वाटून त्याची भीतिहि वाटूं लागली. मागील एका प्रसंगीं त्यानें तिच्याबरोबर जें एक छिचोरपणाचें वर्तन केलें होतें, यावरून त्याचा नीच उद्देश वाचकांच्या लक्षांत आलाच असेल! परंतु शांतीला मात्र त्याची जाणीव त्यावेळीं झाली नव्हती ती या सहवासानें पूर्ण झाली!

आमची मंडळी मुंबईस आल्यावर त्यांनीं माधवाश्रमांत आपलें बिऱ्हाड केलें. शांतीच्या अंगावर अद्यापि चार ठळक दागिने होते. त्या दागिन्यावर देसाईची पूर्ण दृष्टि होती. मुंबईत आपली कुठेंहि सोय लागली नाहीं, तरी देखील त्या दागिन्यांकडे पाहून देसाईला त्याबद्दल फिकीर वाटत नव्हती. आश्रमाच्या मालकाची आणि यशवंताची त्यानें पहिल्या दिवशीं ओळख करून दिली. आश्रमाच्या बिलाबद्दल यशवंत जबाबदार होता. आणि तो मोकळा होता. मुंबईत येतांच फ्याशनचे पूर्ण शोकी यशवंतराव आणि शांताबाई फ्याशनेबल पद्धतीनें वागूं लागले. शांतीच्या बांगड्या विकून आलेल्या पैशांतून भय्यासाहेबास प्रॉमिसरी नोटीचे रुपये दिल्यावर वीस पंचवीस रुपये राहिले होते. त्यांतून रेल्वे भाडें वगैरे सर्व जाऊन पंधराच रुपये बाकी होते. हे पंधरा रुपये किती दिवस पुरणार? एक दोन नाटकें आणि सिनेमा पाहण्यांतच चार दिवसांत ते संपले!

आतां ह्या पहिल्या भागाचा समारोप करण्यापूर्वीं एकाच गोष्टीचा उल्लेख करून आपण पुढें जाऊं.

यशवंताजवळ एक पै देखील शिल्लक नव्हती, आतां पुढें काय करावें याची त्याला विवंचना पडली होती. नोकरीच्या मागें लागावें असा विचार त्याच्या मनांत येत होता. परंतु प्रयत्नाला मात्र अद्यापि सुरवात झाली नव्हती. इकडे देसाईच्या मनांतहि नाना विचारांचें काहूर उसळलें होतें. आतां आपण ह्या बहिणभावंडांबरोबर आश्रमांत राहणें श्रेयस्कर नाहीं असें त्याला वाटूं लागलें. यशवंताला नोकरी लागली असें जरी गृहीत धरलें तरी देखील आश्रमाचें महिन्याचें बील येतांच तें देण्याकरितां यशवंताजवळ पैसे नसणार आणि त्या वेळीं आपली आणि

आश्रमाच्या मालकाची पूर्वीची ओळख असल्यामुळें कदाचित् बिलाची मागणी आपणाकडे होईल अशी त्याला भीति वाटूं लागली. शेवटीं त्या दोघांना आश्रमांत सोडून आपण काढता पाय घ्यावा, असें त्यानें ठरविलें परंतु शांतीच्या अंगावर असलेले चार दागिने त्याच्या नजरेपुढें असल्यामुळें त्यांचा मोह सुटेना! येथून जाण्यापूर्वी ते दागिने आपल्या हातीं कसे लागतील याचा विचार करीत असतां त्याला निरनिराळ्या युक्त्या सुचूं लागल्या. त्यांपैकीं एक युक्ति त्यानें अंमलांत आणली आणि ती यशस्वी झाली. आज तो एकटाच फिरावयास जाण्याकरितां बाहेरें पडला. त्याला जो पदार्थ आणावयाचा होता तो त्यानें आणला आणि रात्रीं जेवणाची ताटें आलीं असतां मोठ्या शिताफीनें त्यानें शांतीच्या अन्नावर त्याचा प्रयोग केला. जेवण होऊन थोडा वेळ होतांच शांतीचें डोकें फिरूं लागलें आणि पोटांतहि मळमळूं लागलें. त्यामुळें तिनें लवकरच आंथरूण गांठलें. थोड्याच वेळांत ती जवळ जवळ शुद्धिरहित अशी झोंपी गेली.

देसाईचें पूर्ण लक्ष होतें! शांतीच्या प्रत्येक हालचालीवर त्यानें चांगली दृष्टि ठेविली होती. डोकें फिरूं लागतांच शांता गडबड करूं लागली. परंतु यशवंतानें तिच्याकडे लक्षच दिलें नाहीं. तो स्वतःच्याच विवंचनेंत गर्क असल्यामुळें 'जा झोंप जा; म्हणजे बरें वाटेल!' इतकेंच सांगून त्यानें तिच्याकडे दुर्लक्ष केलें. आणि देसाईलाहि तेंच पाहिजे होतें. दहाच्या सुमारास यशवंतहि निजला देसाईनें मात्र झोपचें मिष केलें होतें. थोडा वेळ जाऊं दिल्यावर तो उठला आणि हळूच शांतीच्या अंथरुणाजवळ गेला. ती अगदीं अस्वस्थ पडली होती. प्रथम तिच्या अंगाला हात लावून ती जागी होते किंवा काय, हें त्यानें पाहिलें. परंतु ती जागी होण्याच्या स्थितींतच नव्हती. देसाईनें हळूहळू तिच्या अंगावरील दागिने काढले. नंतर आपली ब्याग भरली. हा सर्व व्यवहार त्यानें चोरासारखा केला. त्यावेळीं साडे अकरांचा सुमार झाला होता. आतां त्याच्याजवळ दीड हजारापर्यंत ऐवज होता. तो घेऊन तो आश्रमाबाहेर पडला आणि व्हिक्टोरिया करून तडक बोरीबंदरचें स्टेशन त्यानें गांठलें!

दुसऱ्या दिवशीं शांता फार उशीरां उठली! अद्यापि तिचें डोकें जडच होतें. यशवंत मात्र फार लवकर उठला होता. सर्व रात्रींत त्याला फार थोडी झोंप लागली होती. उठल्यावर त्यानें देसाईच्या बिछान्याकडे पाहिलें. परंतु देसाई त्याला दिसला नाहीं. कदाचित् तो आपल्या पूर्वी उठून बाहेर गेला असेल असें समजून यशवंत बाहेर तोंड धुण्याकरितां गेला. आठ वाजले, तरी देसाई येईना, तेव्हां

त्यानें आश्रमांत थोडी चौकशी केली. परंतु त्याला देसाईबद्दल कांहीं कळलें नाहीं. तो पुनः आंत आला, त्यावेळीं शांती उठून आपल्या बिछान्यावर डोळे चोळीत बसली होती. तो आंत येतांच तिनें विचारलें, " दादा, माझ्या हातांतल्या पाटल्या आणि गळ्यांतला चंद्रहार काढून घेतलास का ? "

" नाहीं. "

" मग दादा, माझ्या अंगावरील दागिने काय झाले ? " गडबडीनें एकदम उठून शांतीनें विचारलें. " तुझा मित्र देसाई कुठें आहे ? "

" तोहि कुठं दिसत नाहीं. "

" मग दादा, त्याचंच काम ! माझे सर्व दागिने किरे नेले ! "

शांतीच्या एका वाक्यानें यशवंताच्या छातींत धक्का बसला, तीं बहिणभावंडें आतां अगदीं निसहाय आणि निष्कांचन झाली !

भाग पहिला समाप्त.

## उपोद्घात

गेली का कमू इलायतेला ?–काय बाई तुमचं हें धाडस ! काल ती जाईपर्यंत आम्हांला खरंच वाटत नव्हतं !"

"पण त्यांत खोटं वाटण्यासारखं तरी काय होतं ?"

"आतां कमू गेलीच, आतां त्यांत खोटं कोठून असणार ! पण बाई, इतक्या लांब एकट्या पोरीला पाठवायला तुम्हाला धीर तरी कसा झाला ? मेली पोरीची जात ! चांगले मी मी म्हणणारे पुरुष तिकडे गेल्यावर धर्म, जात, गणगोत सारं कांहीं विसरून दिवे लावून येतात. मग ही तर बोलून चालून पोर ? त्यांतून सुखाला पारखी झालेली ! फट् म्हणतां भलतंच कांहीं व्हायचं !"

"सुलोचनाबाई, आणखी आहेत का कांहीं तुमच्या शंका कुशंका ?"

इतक्यांत दरवाजा वाजला. आणि एक व्यक्ति आंत येत असतां आंत चाललेलें भाषण ऐकून दरवाजांतच थबकली. सुमतीबाईनें मागें वळून पाहिलें. परंतु आंत कोणी आलें नाहीं तेव्हां वाऱ्यानेंच दरवाजा वाजला असेल असें समजून ती पुढे म्हणाली, "सुलोचनाबाई, तुम्हीं आतां जितक्या शंका कुशंका घेतल्या, तसंच माझ्याहि मनांत दुसऱ्या ज्या अनेक शंका उद्भवल्या त्या सर्वांचा पूर्ण विचार होऊनच आम्हीं कमूला इतक्या लांब परदेशांत एकटं पाठविलं बरं !"

"असा कोणता विचार करून तुम्ही मुलीला पाठविलं तें तरी कळूं द्या."

"हें पहा सुलोचनाबाई, आमच्या कमूबद्दल आम्हांला पूर्ण खात्री आहे."

"यांत काय सांगितलंत सुमतीबाई ! प्रत्येक आईबापास आपल्या मुलांविषयीं खात्री नसते वाटतं ! आजपर्यंत थोडी का मंडळी इलायतेला गेली ? त्यांच्या आईबापांना नव्हती वाटतं खात्री ? मग कां त्यांनीं शेणाचे दिवे लावले ?"

"तुम्ही म्हणतां ती गोष्ट खरी आहे. पण ह्या सर्व गोष्टींचा दोष मी त्या आईबापांना देतें. मुलांना गृहशिक्षा चांगली असल्यावर त्या मुलांविषयीं भीति

बाळगण्याचं मुळींच कारण नाहीं. अशा मुलांना विलायतेलाच काय पण वाटेल तिकडे पाठवा, तीं मुलं आपल्या शिलापासून कधींहि ढळायचीं नाहींत."

"असं कसं म्हणतां सुमतीबाई ? चांगल्या शिकलेसवरलेल्या आईबापांचीं मुलं घरच्या चांगल्या शिक्षेंत असतांनासुद्धां बिघडलेलीं थोडी का आपण पहातों ? तुम्हींच ना परवां त्या पुण्याच्या शंकररावांची गोष्ट सांगितली ? इतके ते शिकलेले सुधारक ! पण त्यांचीं तीं मुलं—शांता आणि यशवंत घरदाराशिवाय फिरतात ना आतां सर्व गांवभर ?

"त्याचं कारण फाजील सुधारणा ! सुधारणेच्या पांघरुणाखालीं त्या दोघां मुलांना मिळालेलं घातुक स्वातंत्र्य ! आणि वडिलांचे लाड ! आईचं असं त्यांना काय गृहशिक्षण होतं ? बिचारी पार्वतीबाई ह्या मुलांच्या त्रासानं सदा दुःखी-कष्टी असे. खरं जर म्हणाल तर सुलोचनाबाई, हीं दोघं मुलंच आपल्या आईबापांच्या मृत्यूला कारण झालीं."

"तें कांहीं जरी असलं तरी सुमतीबाई, तुमच्या कमूची स्थिति फार नाजुक आहे."

"होय. तुम्हीं म्हणतां ती गोष्ट खरी आहे. पण आम्हीं आमच्या कमूचं शील बनविण्यांत फार श्रम घेतले आहेत."

"तें सर्व मला माहित आहे. आम्हीं पहात का नव्हतों ? पण सुमतीबाई, इलायतेंत म्हणे सर्व गोष्टी विपरीत आहेत."

"कांहीं जरी असलं तरी आमच्या कमूची आम्हांला पूर्ण खात्री आहे. तिला दगडावर जरी आपटली तरी तिच्या शिलाला धक्का लागणार नाहीं, अशी आमची मनोदेवता आम्हांला सांगते."

इतक्यांत पुनः दरवाजा वाजला. सुमतीबाईनें पुनः दरवाजाकडे पाहिलें. परंतु दरवाजा उघडून आंत कोणी आलें नाहीं. उलट इतका वेळ दरवाजाआड लपलेली व्यक्ति हळूच बाहेर पडली. असें आडून भाषण ऐकून आंत न येतां परत जाणारी ती व्यक्ति कोण बरें असावी ?—वाचकहो ! ती व्यक्ति यशवंत-रावाची बहीण शांता होती.

---

पहिल्या भागांत घडलेल्या गोष्टी आतां चार वर्षांच्या जुन्या झाल्या. आमच्या कथानायिकेनें आपल्या इच्छेप्रमाणें प्रवेशपरीक्षा होतांच 'ग्रँट मेडिकल कॉलेजांत' आपलें नांव घातलें. आणि नुकतीच 'एल्. एम्. अॅन्ड एस्.' ची सनद घेतली होती. परंतु इतकेंहि करून तिची शिकण्याची इच्छा पूर्ण झाली नाहीं. आपण विलायतेंत जाऊन अधिक शिक्षण घ्यावें असें वाटून तिनें आपला विचार आईला कळविला. प्रथम सुमतीबाईला तिचा विचार पसंत पडला नाहीं. मुलीनें इतक्या लांब जाऊं नये अशी तिची इच्छा होती. परंतु जयरामपंतांना ही गोष्ट कळतांच त्यांनीं मोठ्या आनंदानें आपल्या मुलीला विलायतेस जाण्याची सल्ला दिली. ते आपल्या मुलीकडे फार बारकाईनें लक्ष पोंचवीत असत. मूर्ख आणि अशिक्षित नवऱ्यानें तिचा त्याग केल्यापासून तिच्या मनाला किंचित्हि न दुखविण्याची ते फार खबरदारी घेत. तिचें मन रमावें म्हणून त्यांनीं तिच्या इच्छेप्रमाणें तिला 'ग्रँट मेडिकल कॉलेज' मध्यें घातलें. आणि त्यांनीं अटकळ केल्याप्रमाणें त्या ठिकाणीं तिचें मन रमलें इतकेंच नव्हे तर आपण ह्याच शास्त्रांत अधिक लौकिक मिळवावा असें वाटून विलायतेला जाण्याचा विचार तिच्या मनांत घोळूं लागला. तिचा विलायतेला जाण्याचा विचार आहे, असें जेव्हां जयरामपंतांना समजलें, तेव्हां त्यांनीं देखील त्या गोष्टीचा चांगला विचार केला. त्यांना आपल्या गृहशिक्षेबद्दल एक प्रकारची खात्री वाटत होती. इतर जन आपल्या मुलांना ब्यारिस्टर, किंवा डॉक्टर अथवा 'सिव्हिल सर्व्हंट' अगर इतर धंदेशिक्षणाकरितां स्वदेश सोडून दूर दूर पाठवितात, मग आपण मुलीलाच कां पाठवूं नये ? तिची स्त्रीजात म्हणून आक्षेप घेण्यांत येतात. परंतु लोकांच्या शुष्क टीकेला मान वांकविणारे जयरामपंत नव्हते. जांवई तिला वागवीत नाहीं अशी त्यांची खात्री होऊन मुलगी जेव्हां परत आली, त्या दिवसापासून ते तिला मुलाप्रमाणेंच बाळगूं लागले. प्रत्येक हालचालीवर, तिच्या आचार-विचारांवर त्यांची प्रथमपासूनच फार बारीक नजर होती. घरांतून म्हाताऱ्या आजीचें व आईचेंहि तिच्यावर लक्ष होतें. थोडक्यांत सांगायचें म्हणजे कमलिनीचा आचार, विचार किंवा कृति यांत तिळभरहि शंका घेण्याला जागा नव्हती.

उपोद्घातांत वर्णन केल्याप्रमाणें कमलिनी विलायतेला गेली, परंतु बरेच दिवस आजुबाजूची मंडळी त्याबद्दल टीका करीत होती. 'जितक्या व्यक्ति तितक्या

प्रकृति.' प्रत्येकाचीं निरनिराळीं मतें परंतु त्यांच्या मतांचा जयरामपंत किंवा सुमतीबाई यांच्या मनावर बिलकुल परिणाम झाला नाहीं; त्यांच्या टीकेला त्यांनीं बिलकुल भीक घातली नाहीं. सुमतीबाईला आपल्या शेजारपाजारच्या बायकांची कशी समजूत करावी लागत होती, त्याचा मासला वर उपोद्‌घातांत दिला आहे. वर वर्णन केल्याप्रमाणें सुमतीबाई आणि शेजारच्या सुलोचनाबाई यांचे भाषण चालू असतां शांता आली होती. ती तेथें कां आली होती, ती आणि तिचा भाऊ–यशवंत आतां काय करीत असतात, पुण्याहून आल्यावर माधवाश्रमांत देसाईनें त्यांना लुबाडल्यावर पुढें त्यांची काय हकिगत झाली ईत्यादि बऱ्याच गोष्टी वाचकांना अद्यापि कळावयाच्या आहेत. करितां गेल्या चार वर्षांचा इतिहास येथें संक्षिप्त रीतीनें देऊन प्रस्तुत कथानक पुढ चालविण्याचा आमचा विचार आहे.

पहिल्या भागांत शेवटच्या प्रकरणांत घडलेल्या हकिकतीकरून शांता आणि यशवंत असहाय्य आणि निष्कांचन स्थितींत होतीं, हें वाचकांच्या स्मरणांत असेलच ! आपणास आपल्या मित्रानें–बाळया देसाईनें फसविलें, इतकेंच नव्हे तर आपणास अशा भयंकर आपत्तींत आणून टाकण्यास तोच सर्वस्वी कारण आहे, इतकें यशवंताला कळलें. परंतु आतां कळून काय उपयोग ! आतां त्या बहिणी-भावंडांची स्थिति इतकी नाजूक झाली होती कीं त्यांना कांहींच सुचेना. क्षणभरानें यशवंत तर इतका हताश झाला कीं, तो एखाद्या लहान मुलाप्रमाणें रडूं लागला.

"दादा हें रे काय ?" शांता पुढें होऊन म्हणाली, "आतां रडून काय होणार ? त्या देसाईचा अलीकडे मला संशयच येत होता. पण हें काय दादा ?–"

शांता आपल्या भावाची समजूत करीत होती. परंतु त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. उलट यशवंताला जास्त जास्त हुंदके येत होते. बऱ्याच वेळानें त्याच्या दुःखाचा पहिला वेग कमी झाला. परंतु तो कांहींच बोलला नाहीं. आतां आपलें काय होणार ? माधवाश्रमाचें बील आपणांस कसें देतां येईल ? आपण कुणाजवळ सहाय्याची याचना करावी ? मुंबईसारख्या ह्या अफाट शहरांत आपला कसा निभाव लागेल, इत्यादि अनेक विचार त्याच्या पुढें दत्त म्हणून उभे राहिले इतक्यांत त्याला जयरामपंतांची आठवण झाली. त्यांच्याकडे जाऊन त्यांचे पाय धरावे असा विचार त्याच्या मनांत आला. आणि तो आपला विचार आतां शांतीला सांगणार तोंच दरवाजा उघडला

"ही एकच खोली आहे—" माधवाश्रमाचा म्यानेजर आंत येत म्हणाला.

त्याच्या मागून दुसरा एक गृहस्थहि आंत आला. " ही एक दोन दिवसांनीं रिकामी होणार आहे. कायहो यशवंतराव तुम्ही एक दोन दिवसांनीं जाणार अहांत ना ?"

" होय. जाणार आहे. पण अद्यापि नक्की नाहीं. " यशवंतरावानें उत्तर दिलें.

" ठीक आहे. मलाहि दोन दिवस अवकाश आहे. माझी मंडळी यावयास आणखी चार दिवस आहेत, तोंपर्यंत ही खोली होईलच रिकामी. " नवीन आलेला गृहस्थ म्हणाला.

" पण ही खोली तुमच्या पसंत आहेना ? म्यानेजरनें पुनः विचारलें.

" होय अगदीं पसंत आहे. " हें उत्तर देत असतां त्या गृहस्थाचें सर्व लक्ष यशवंताच्या शेजारीं उभी असलेल्या शांतीकडे होतें. परंतु शांतीचें लक्ष मात्र त्याच्याकडे नव्हतें. ती आपल्याच संकटांत चूर होती. ' मग ठरली तर ही खोली ? " असें म्हणून मॅनेजर खोलीबाहेर पडला. त्याच्या मागून तो दुसरा गृहस्थहि बाहेर गेला. तेव्हां शांता म्हणाली, " दादा असा विचार करीत काय बसला आहेस ? तो देसाई कुठें गेला त्याचा कांहीं शोध तरी कर ! माझे सगळे दागिने नेले नारे त्यानें !"

" जाऊन करूं काय ? तो आतां माझ्या हातीं सांपडेल असं का तुला वाटतं ? तो पक्का बेरड आहे.

" मग आतां करायचं तरी कसं ?

" काय करूं तेंच सुचत नाही. आणि त्यांतून दोन दिवसांत ही जागाहि सोडली पाहिजे. बील द्यायला तरी आहेत कुठें पैसे ? " असें म्हणून यशवंतानें आपलें कपाळ दोन्हीं हातांनीं धरलें.

पुनः दरवाजा उघडला आणि म्यानेजरबरोबर आलेला गृहस्थ पुनः दरवाजांत येऊन उभा राहिला. शांतीनें मागें वळून पाहिलें तेव्हां तो गृहस्थ म्हणाला, आंत येऊं का मी ?"

यशवंतनें फक्त मान हलविली. तेव्हां तो गृहस्थ आंत येऊन म्हणाला, " मी एवढ्याच करितां आलों कीं मघां आपण म्हणाला, एक दोन दिवसांत ही खोली रिकामी होईल परंतु निश्चयात्मक नाहीं. आणि खरोखरीच जर आपण ही खोली एक दोन दिवसांत सोडिली नाहीं तर मात्र माझी मोठी फजिती होईल. कारण परगांवाहून माझे कांहीं व्यापारी मित्र यावयाचे आहेत. "

" आम्हीं येथून जाणार असं म्हणतों प–ण " इतकेंच बोलून यशवंतराव

घोंटाळला. शांती जवळच होती, ती पुढें होऊन म्हणाली, " आम्हीं आज देखील येथून जाणार होतों, पण दादाच्या बरोबर त्याचा मित्र म्हणून एक दरोडे-खोर आमच्या बरोबर होता. त्यानें रात्रीं आमची दीड दोन हजारांची चोरी केली, आतां पुढें काय करायचं याचाच आम्हीं आतां विचार करीत होतों. "

" मग तुम्हीं प्रसंगांत अहांत म्हणायचें ! पण यशवंतराव, तुम्ही मग पोली-सांत कां वर्दी देत नाहीं ! "

" काय करावं हेंच मला सुचत नाहीं. मला इथली कांहीं विशेष माहिती नाहीं. "

" मग चला मजबरोबर मी करतों ती सर्व व्यवस्था ! पण प्रथम तुमच्या काय काय वस्तु गेल्या त्याची यादी करा. माझ्या आहे एक ओळखीचा पोलीस इन्स्पेक्टर ! "

मी देतें करून यादी. पण मिळतील कांहो माझे दागिने परत ? " शांतीनें वरील प्रश्न इतक्या लडिवाळपणानें केला कीं, त्या गृहस्थाला तिचें मोठें कौतुक वाटलें त्यानेंहि तितक्या मोकळ्या आवाजांत तिला उत्तर दिलें. " अहो तसाच प्रयत्न केल्यावर तो चोर जातो कुठें ? वाटेल तेथून हुडकून काढून तुमचे दागिने परत घेऊन येतों. "

शांतीनें आपल्या दागिन्यांची यादी करून दिली. यशवंतानें आपल्या नूतन परिचित पाहुण्याकरितां चहा मागविला, आणि थोड्या वेळानें ते दोघेजण चोराचा मार्ग काढण्याकरितां माधवाश्रमांतून बाहेर पडले. ते निघून गेल्यावर शांती आपल्या उद्योगाला लागली. आतां आपले दागिने खात्रीनें परत येतील असेंच तिला वाटलें. जवळ जवळ दोन तास झाल्यावर यशवंत परत आला. त्याला पाहतांच शांतीनें विचारलें, " कायरे दादा, आणलेस का दागिने ? "

" असें 'दागिने' म्हणतांच दागिने मिळतात वाटतं ? आतां कुठें पोलिसांत वर्दी दिली आहे. आतां ह्यापुढें त्यांचा शोध सुरू होईल. पण शांते त्या गोपाळ-रावांची ओळख झाली ही गोष्ट फार उत्तम झाली. "

" कोणते गोपाळराव ?

" ते आतां माझ्याबरोबर आले होते ते ! ते मोत्याचे व्यापारी आहेत. वाटेंत मी त्यांना आपली सर्व हकीकत सांगितली. त्यांनीं मला मदत करण्याचं कबूल केलं आहे. ते पुन्हां दुपारीं येणार आहेत. "

" पण माझे दागिने परत मिळतील ना ? "

" मिळतील असं गोपाळराव म्हणतात. ते मोठे व्यापारी आहेत, सांगली मिरज, कुरंदवाड, फलटण ह्या ठिकाणीं त्यांचा मोठा व्यापार आहे. "

ठरल्याप्रमाणें गोपाळराव मोतीवाले दोन प्रहरीं माधवाश्रमांत आले. बराच वेळ त्यांच्या गोष्टी झाल्या. शेवटी माधवाश्रमाचें बील देण्याकरीतां आपण पैसे देतों असें ते म्हणाले. आणि बोलतां बोलतां त्यांनीं असेंही सुचविलें कीं, अशा स्थितींत माधवाश्रमांत राहून खर्च वाढविण्यापेक्षां पुढली व्यवस्था होईपर्यंत त्या बहिणभा-वंडांनीं आपल्या घरीं येऊन रहावें. ही गोष्ट यशवंताला इतकी रुचली कीं त्यानें एखाद्या अतिपरिचित मित्राप्रमाणें गोपाळरावांच्या खांद्यावर हात ठेवला.

" मग माझी योजना आपणास मान्य आहे तर ? मी देखील तेंच म्हणतों, कारण तुम्हीं आतां येथें राहून दिवसाचे दोन रुपये वाढविण्यापेक्षां माझ्या घरीं आलांत तर बरें होईल. मग उठा तर यशवंतराव आणि तुमचं एकंदर काय बील झालं आहे तें विचारून या. म्हणजे देऊन टाकूं रुपये. "

" पण आतांच बील द्यायचें कीं काय ? "

" हो. आतांच देऊन टाकूं. "

यशवंताला हातीं स्वर्ग यावा इतका आनंद झाला. तो एकदम उठला आणि बाहेर गेला. आतां खोलींत शांता आणि गोपाळराव राहिले. क्षणभरानें गोपाळराव म्हणाले, " तुमची ट्रंक भरायची असल्यास भरा. तुम्हीं येणार ना आमच्या घरीं ? तुम्हीं मनांत बिलकुल संकोच बाळगूं नका. "

" संकोच कसला बाळगायचा ? पण म्हटलं, तुमची आमची ओळख होते काय आणि—"

" हाच—हाच तो संकोच ! अहो, तुमच्यासारख्यांचे पाय तरी कधीं लागणार होते आमच्या घराला ? हे देखील योगायोगच असतात. "

" आपल्या घरीं कोण कोण मंडळी आहेत ? "

" इकडे माझी मंडळी कोणी नाहीं. फक्त घरांत स्वयंपाकाला एक बाई आहे. हो कोणी तरी घर राखायला आणि चूल पेटवायला पाहिजे ना ? "

शांतीनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. गोपाळरावांच्या घरांत त्यांची कोणी मंडळी नाहींत, तेव्हां आपण तेथें जावें किंवा नाहीं याबद्दल तिचा विचार चालला होता. इतक्यांत यशवंतराव आंत आला. आणि म्यानेजरानें दिलेलें बील त्यानें गोपाळ-रावांच्या पुढें केलें. तें बील किती आहे इतकें पाहून गोपाळरावांनीं आपल्या खिशांतून पैशाचें पाकिट काढलें. आणि तीन नोटी काढून त्या यशवंतरावाच्या स्वाधीन केल्या. मात्र त्या नोटी देत असतां त्यानें एक वेळ जवळच उभी असलेल्या शांतीकडे पाहिलें. यशवंताच्या मात्र तें कांहींच; लक्षांत आलें नाहीं. त्यानें पैसे

घेऊन गोपाळरावांचा हात दाबला आणि विनयपूर्वक तो म्हणाला, "गोपाळराव, तुमचे हे उपकार माझ्या हातून कसे फिटतील ते फिटोत. पण ह्या वेळीं तर तुम्ही मला देव भेटला यांत शंकाच नाहीं."

"जाऊं द्या त्या देवदानवांच्या गोष्टी! तुम्हीं प्रथम बील भरून या. म्हणजे आपण गाडी करून आतांच घरीं जाऊं. आज रात्रीचं जेवण आमच्या घरीं झालं पाहिजे चला—"

---

## २....... महालक्ष्मीची सफर

पिंजऱ्यांतून सुटतांच पक्षी प्रथम फार उंच भरारी मारतो. क्षणार्धांत तो आपलें पिंजऱ्यांत कोंडल्याचें दुःख विसरून जातो, स्वतंत्र हवेंत उडतांना त्याला कोणत्याहि गोष्टीचें भान रहात नाहीं. तशीच स्थिति यशवंताची झाली. मध्यंतरी माधवाश्रमांत असतांना कांहीं काळ पैशामुळें आणि देसाईच्या चोरीमुळें यशवंतरावाचें मन अत्यंत अस्वस्थ झालें होतें. प्रथम त्यानें बाळा देसाईच्या नादानें आपलें गुण उधळून जी एक उसळी मारली होती. तशीच दुसरी उसळी मारण्याची त्याला आतां संधि सांपडली. गोपाळरावांनीं त्याला आणि शांतीला आपल्या घरीं नेलें, यांत त्यांचा कांहीं हेतु होता. आणि तो हेतु साध्य होण्यासाठीं त्यांनीं यशवंतरावाला अगदीं मोकळेपणानें वागूं देण्याची मुभा दिली; पुनः नाटकें, सिनेमा इत्यादि चैनीचे प्रकार सुरू झाले. ह्या सर्व गोष्टींना लागणारा पैसा गोपाळराव अगदीं सढळ हातानें खर्चूं लागले. वास्तविक गोपाळराव म्हणजे कोणी धनिक होते असें नाहीं. किंवा त्यांनी यशवंतरावाला सांगितल्याप्रमाणें त्यांचा मोत्याचा व्यापार होता असेंहि नाहीं. फक्त ते मोतीबाजारांत जाऊन मोत्याची दलाली किंवा क्वचित् प्रसंगीं सट्टेबाजी करीत आणि त्या हातावरील मिळकतीवर आपला गुजारा करीत इतकेंच! परंतु ही त्याची अंतस्थ स्थिति यशवंतरावासारख्या कच्च्या पोराच्या कशी लक्षांत येणार! इतकेंच नव्हे तर मुंबईंत जन्म घालविलेल्या एखाद्या अनुभवी डोळ्यांनासुद्धां गोपाळरावांची कपडालत्त्याची ऐट, त्याची राहणी आणि बोलण्यासवरण्याची धाटणी चकवील अशीच होती. त्यांच्या शर्टला बटणें होतीं, तीं मोत्यांचीं होतीं. कानांत मोत्याची भिकबाळी होती आणि बोटांत सात मोतीं सभोंवतीं व मध्यें लहान

तांबडा खडा बसविलेली आंगठी होती. शिवाय डोक्याला जांभळ्या रंगाचा जरीचा रुमाल आणि नेहमी इस्त्री केलेले अंगांत कपडे ह्या त्यांच्या पेहरावा-वरून त्यांना मोतीवाले हें नांव पडलें होतें.

मुंबईंत राहणाऱ्या कोणत्याहि व्यक्तीच्या पोषाखावरून आणि छानछोकपणा-वरून त्याच्या प्राप्तीचा अंदाज करण्याचें ठरविलें तर मुंबईच्या कोनाकोपऱ्यांत सुद्धां औषधाला ' गरिबी ' सांपडावयाची नाहीं. जिकडे तिकडे झक्पक् दृष्टीस पडते्. परंतु जें दिसतें तें सारेंच सोनें नसतें हेंच खरें ! सिनेमा, नाटकगृहें, हॉटेलें सर्कसी इत्यादि ठिकाणीं जाऊन क्षणभर निरीक्षण केलें तर कोणती गोष्ट आपल्या लक्षांत येईल ? मुंबई म्हणजे एक इंद्रपुरीच आहे, असेंच कोणीहि म्हणेल. परंतु वस्तुस्थिति तशी आहे काय ? घरांत उंदीर जरी पाहुणा आला तरी त्याला उपा-शींच मरावें लागणार, अशीं शेंकडा पन्नास घरें तेथें सांपडतील ! अशी जर खरी वस्तुस्थिति आहे, मग हा पोषाखी नटवेपणा कशाला ? असा कोणीहि प्रश्न करील त्याला उत्तर म्हणून इतकेंच कीं, मुंबई हें शहरच मुळीं पोषाखी आहे. कोणी घाटावरून येवोत, कोणी कोंकणांतून येवोत, मुंबईचा वारा लागतांच ती व्यक्ति तात्काळ पोषाखी बनते. अशाच प्रकारची स्थिति आमच्या गोपाळराव मोती-वाल्यांची होती.

गोपाळरावांच्या घरीं आल्यावर पहिले आठ दिवस त्या बहिणभावंडांचे मोठ्या आनंदांत गेले. प्रत्येक दिवशी कांहीं तरी चैन त्यांनीं अनुभविली. आज नाटक, तर उद्यां सिनेमा, परवां सर्कस, तर पुनः नाटक ! ह्या आनंदांत शांती आपले दागिने विसरून गेली. घरांत कामा करितां बाई ठेवलेली होती पण ती अर्धवटच होती. शांताबाई म्हणजे आपली मालकीण असेंच ती समजत होती. कदाचित् गोपाळरावांनीं तिचा तसा समज केला असल्यास नकळे ! शिवाय शांता देखील त्या घरांत मालकिणीप्रमाणेंच वावरूं लागली होती.

एके दिवशीं ठरल्याप्रमाणें रात्रीं ' मानापमान ' नाटकाला जावयाचें होतें. परंतु सतत जागरणामुळें यशवंतरावाची प्रकृति बिघडली. त्याचें मनस्वी डोकें दुखूं लागलें. शेवटीं डॉक्टरकडे गेल्याशिवाय गत्यंतर नाहीं असें पाहून गोपाळरावांनीं त्याला डॉक्टरकडे जाण्यास सांगितलें. त्यांच्या चाळींत तळमजल्यावर शेवटच्या खोलींत डॉ. गाडगीळ यांचा दवाखाना होता. यशवंतराव औषधाकरितां त्या दवाखान्यांत गेला. त्यावेळीं दवाखान्यांत ' पेशन्ट ' नसल्यामुळें टेबलावर पाय टाकून डॉक्टर साहेब ' न्यूज पेपर ' वाचीत बसले होते. आपणाकडे कोणी रोगी

येत आहे, आतां संध्याकाळची आपली ‘ बोहोणी ’ होणार असें वाटून डॉक्टर साहेबांनीं चटकन् आपले पाय खालीं घेतले.

“ या मिस्टर अमृते ! ” डॉक्टरसाहेब यशवंतरावाकडे पाहून हांसत म्हणाले. परंतु यशवंतरावानें मात्र इतक्या सहजासहजीं डॉक्टरांस ओळखलें नाहीं. तें पाहून डॉक्टर पुढें म्हणाले, “ कां वाय्. एस्. मला ओळखलं नाहीं वाटतं ? न्यू इंग्लिश स्कूलची ओळख इतक्यांतच विसरलास काय ? ”

डॉक्टरानें इतकी ओळख दिल्यावर यशवंतरावानें डॉक्टरास ओळखलें.

“ मी तर तुला त्या दिवशीं तुम्हीं संध्याकाळीं व्हिक्टोरियांत बसून आला त्याच वेळीं ओळखलें. बरं पण तूं इकडे कोणीकडे ? आणि ती तुझ्या शेजारीं बसली होती ती कोण ? ”

“ ती माझी ‘ सिस्टर ’ शांता. ”

“मला वाटलंच तसं ! आणि त्या गोपाळरावांची आणि तुझी ओळख कुठली ?”

“ ते माझे ‘ फ्रंड ’ आहेत. आम्हीं त्यांच्याच घरीं उतरलों आहोंत. ”

“ म्हणजे ? तुझी आणि त्यांची इतकी जुनी ओळख आहे कीं काय ? पण तुझी ‘ सिस्टर ’ इकडे कशी ? तिचं लग्न झालं आहे ना ? ”

“ होय. ती ‘ हीस्टरी ’ ( इतिहास ) फार मोठी आहे. पण तूं प्रथम मला औषध दे. माझं डोकं अतिशय दुखत आहे. मला कांहींच सुचत नाहीं. ”

डॉक्टरनें ‘ प्रिस्क्रिपशन ’—औषधाचा खर्डा लिहिला आणि आपल्या कंपौंडरास हांक मारिली. औषध तयार होत असतां पुनः डॉक्टरनें विचारलें, “ पण यशवंत, तुझी आणि ह्या गोपाळरावांची ओळख केंव्हांची हें नाहीं सांगितलंस !

“ ही ओळखहि नुकतीच झाली. पण कां बरं ? इतकं पुनः पुनः अगदीं खोंचून कां विचारतोस ? कांहीं विशेष आहे कीं काय ? ”

“ विशेष आहे म्हणून विचारतों. ”

“ असं असेल तर मग ऐकलंच पाहिजे. पण आतां नको. आतां ह्या डोक्यामुळें मला कांहींच सुचत नाहीं. मी उद्यां येईन आणि आपण स्वस्थ चित्तानं बोलत बसूं. ”

“ ठीक आहे. तर मग असं कर यशवंत, उद्यां तुझ्या सिस्टरला घेऊन घरींच ये सकाळीं जेवण होईल माझ्या घरीं. ”

“ म्हणजे तूं इकडे बिन्हाड केलं आहेस वाटतं ! ”

“ त्याशिवाय कसं भागणार. मी नवीन थाटलेला संसार तर पहा ! बरं मग

ठरलं ना ? मी उद्यां डिस्पेन्सरी बंद केल्यावर अकरा वाजतां तुझ्याकडे कंपौंडरला पाठवीन. मग आपण संगतीनेंच जाऊं. माझं घर कांहीं फार लांब नाहीं. हें येथें पुलाजवळ आहे."

यशवंतराव औषध घेऊन घरीं आला. आठ दिवसांच्या सतत जाग्रणामुळेंच त्याचें डोकें दुखत होतें. आज स्वस्थ झोंप घ्यावयाची असें त्यानें ठरविलें होतें. परंतु रात्रीं जेवतांना शांतिनें विचारलें, "मग काय दादा, तूं खरंच का आज नाटकाला येणार नाहींस ? गोपाळरावांनीं खुर्चीच्या तीन तिकिटा 'रिझर्व' केल्या आहेत. खरं ना गोपाळराव ?"

गोपाळरावांनीं फक्त मान हालविली आणि यशवंतराव काय उत्तर देतो, तें ऐकण्याकरितां ते त्याच्याकडे पाहूं लागले. तेव्हां यशवंतराव म्हणाला, "छे बुवा, आपण तर कांहीं आज येणार नाहीं. आणि शांते, तूं देखील असं रोज रोज जाग्रण करणं कांहीं चांगलं नाहीं. ह्या जाग्रणामुळेंच तर माझं डोकं दुखूं लागलं."

"हें रे काय दादा ? तुझं डोकं दुखतं म्हणून मीसुद्धां जाऊं नको वाटतं ? आजचं नाटक किती चांगलं आहे. त्यांतून बालगंधर्वाचं काम तर म्हणे पाहण्यासारखंच असतं."

यशवंतरावानें जास्त भाषण वाढविलं नाहीं. त्याचें डोकें फारच दुखूं लागलें होतें, केव्हां एकदां जाऊन बिछान्यावर डोकें टेंकतों असें झालें होतें. तरी देखील आपल्या बहिणीनें एकटेंच गोपाळरावाबरोबर नाटकाला जाऊं नये असें त्याला वाटत होतें. परंतु शांतीला 'जाऊं नको' असें सांगून ती थोडीच ऐकणार होती ? जेवण झाल्यावर मंडळी दिवाणखान्यांत आली. आज आपणाबरोबर यशवंतराव येत नाहीं असें पाहून गोपाळरावांस आनंद झाला. ती स्वारी कुठल्यातरी विचारांत होती असें दिसत होतें. परंतु शांतीच्या किंवा यशवंतरावाच्या तें लक्षांत आलें नाहीं. फक्त डॉक्टरानें बोलतां बोलतां 'गोपाळरावाविषयीं कांहीं विशेष आहे' असें सांगितलें होतें. त्यावरून त्याचें मत थोडें अस्वस्थ झालें होतें इतकेंच !

आठ वाजतां शांती कपडे घालून तयार झाली. यशवंतराव आपल्या बिछान्यावर पडला होता. अद्यापि त्याला झोंप लागली नव्हती. थोड्या वेळानें गोपाळरावहि तयार झाले. त्यांनीं पुनः एकदां औपचारिक रीतीनें यशवंतरावाला येण्याबद्दल विचारलें. वास्तविक त्यानें आज नाटकाला येऊं नये असेंच त्यांच्या मनांत होतें. आणि तो येणार नव्हता हेंहि ठरलेलेंच होतें. थोड्या वेळानें शांता आणि गोपाळराव रिबाहेर पडले. रस्त्यावर येतांच गोपाळरावांनीं एक व्हिक्टोरिया बोलाविली. ह्यापूर्वी ते

नाटकाला किंवा सिनेमाला जातांना केंव्हांच गाडींतून गेले नव्हते. पण आज मात्र त्यांनीं भाड्याची गाडी केली. शांती कांहींच बोलली नाहीं. तिला गाडींतून फिरण्याची हौसच होती. ती किती हट्टी, लहरी आणि निर्भिड होती याबद्दल ती सासरीं गेली असतां तेथील वर्णन पहिल्या भागांत सविस्तर रीतीनें केलेंच आहे. गाडींत ती आणि गोपाळराव शेजारी शेजारींच बसलीं होतीं. गाडी चालू होऊन थोडा वेळ झाल्यावर गोपाळरावांनीं आपल्या खिशांतून एक लहानशी बाटली काढली आणि ती शांतीच्या पुढें करून म्हटलें, " हें ओटो मोहिनी अत्तर पाहिलं का ? किती मनपसंत सुवास येत आहे तो ! काढा तुंमचा रुमाल मी त्यावर थोडं शिंपडतों. "

शांतीनें आपल्या पोलक्याच्या खिशांतून रुमाल काढला. तो तिच्या हातांतून घेत असतां गोपाळरावाचा हात थरथरत होता. त्यांनीं थोडा ' सेंट ' तिच्या रुमालावर शिंपडला आणि स्वतः वास घेऊन तो आपल्या हातानें तिच्या नाकाजवळ धरला.

" खरंच, फार सुंदर वास आहे. गोपाळराव, मला द्या ती बाटली. "

गोपाळरावांनीं बाटली पुढें केली आणि देतांना तिच्या हातालाही किंचित् धक्का दिला. त्यावेळीं त्यांच्या सर्वांगाला कंप सुटलेला होता. थोड्या वेळानें थिएटरजवळ गाडी येऊन उभी राहिली. गोपाळरावानीं शांतीला खालीं उतरवून गाडीवाल्याचे पैसे चुकते केले. त्या दिवशीं मनस्वी गर्दी झाली होती. त्यांतून तो खेळ शेवटचा होता. त्यामुळें मंडळींनीं अगदीं तोबा उडविला होता. गोपाळरावांनीं दोन दिवस अगाऊ टिकिटा काढल्या होत्या म्हणून त्यांना कांहीं त्रास पडला नाहीं. परंतु कित्येक जोडपीं, कुलीन स्त्रिया टिकिटा न मिळाल्यामुळें एका बाजूला तोंडात मारल्याप्रमाणें तोंड आंबट करून उभ्या होत्या. गोपाळरावांनीं शांतीला आंत नेऊन बसविल्यावर ते पुनः बाहेर आले. त्यांच्याजवळ यशवंतरावांकरितां काढलेली एक तिकिट शिल्लक होती. ती त्यांनीं बाहेर नेऊन दामदुप्पट भावानें विकली. अद्यापि नाटक सुरू व्हावयास दहा मिनिटें अवकाश होता. तोंपर्यंत त्यांचें निरनिराळ्या ठिकाणीं निरीक्षण चालूं होतें. थिएटरांत बायकांची ग्यालरी तर गच्च भरली होती, परंतु खुर्च्यांवरसुद्धां रंगी बेरंगी पोलकीं घातलेल्या, निरनिराळीं फ्याशनेबल पातळें, जरींचे शालु परिधान केलेल्या, केस विंचरण्यांत आपलें कौशल्य प्रगट करणाऱ्या आणि धंदेवाईक स्त्रियांना त्यांच्या ' परपुरुषमोहिनीशास्त्रांत ' त्यांना धडा देणाऱ्या युवती आपल्या बोटांतील आंगठ्या चमकविण्याकरितां रुमालानें वरचेवर तोंड पुशीत बसल्या होत्या. त्याच खुर्च्यांपैकीं कांहीं खुर्च्यांवर कांहीं

धनिकांनीं आपल्या बरोबर आणलेल्या विश्वयोषिता होत्या. त्यांच्याकडे नजर फिरविली असतां त्या सभ्य आणि नीटनेटक्या दिसत होत्या. तो देखावा खरोखरीच प्रशंसनीय दिसत होता. आमच्या कुलीन स्त्रियांत असा छचोरपणा यावा आणि खरोखरीच ज्यांच्या बारशाला छचोरपणा पुजला आहे त्या स्त्रियांत असा सभ्यपणा यावा हा कालमहिमा असेल काय ? परपुरुष आणि कांहीं चटोर लोक आपल्या तोंडाकडे निर्लज्जपणानें पहात आहेत, याबद्दल त्यांच्या मनाला कांहींच वाटत नसावें काय ? आणि ह्या गोष्टी त्या स्त्रियांना नाटकाला घेऊन येणारे मर्द पुरुष तरी कशा सहन करतात, याचेंच मोठें आश्चर्य वाटतें !

नाटक सुरू झालें ! मधुन मधून गोपाळराव कांहीं तरी विषय काढून शांतीबरोबर बोलत होते. त्यांतून एखादा भामिनीचा प्रेमविषयक प्रवेश आला म्हणजे आपल्या मनांतील वर्म तिला कळावें अशा बेतानें त्या प्रवेशाचें मर्महि ते तिला समजून देत होते. पहिला अंक संपतांच गोपाळरावांनीं शांतीकरितां मुद्दाम बाहेर जाऊन ग्लासांत राजबेरी आणिली; शिवाय एक मसालेदार पानाची पट्टीहि दिली ! अशा रीतीनें नाटक आटोपलें ! थिएटरांतून बाहेर पडत असतां 'कीर्ति हा मम चांद, वाहिला तव पदी ' ही ओळ ते आपल्याशींच गुणगुणत होते. दोघेहि बाहेर पडल्यावर गोपाळराव पुढें होऊन त्यांनीं एक व्हिक्टोरिया गाडी ठरविली. आणि आतां ते गाडींत बसणार तेव्हां गोपाळराव म्हणाले, "शांताबाई, आतां जातांना आपण थोडी कॉफी घेऊं. हें नाक्यावर 'गोखल्यांचें हॉटेल' आहे. कॉफी फार नामी तयार करतात." शांती कांहीं बोलली नाहीं. कॉफी घेण्यास तिची संमति होतीच. गाडी हॉटेल जवळ उभी राहिली. गोपाळरावांनीं त्या गर्दींतून शांतीचा हात धरून तिला आंत नेलें. तेथें स्वतंत्र खोलीच्या फर्स्ट क्लासांत तीं दोघं जाऊन बसलीं. थोड्या वेळानें त्यांच्या पुढें एक एक पदार्थ येऊं लागला. प्रथम आईसक्रिम आला. नंतर ताजीं भजीं आलीं, नंतर बटाट्यांच्या तळलेल्या कचोऱ्या आल्या. तें पाहून शांती म्हणाली, "हें काय गोपाळराव, तुम्हीं तर येथें जेवण करण्याचा विचार केला आहे."

"ह्या पदार्थांची रुचि तर पहा ! तुमच्याबरोबर यशवंतराव असतात म्हणून नाहीं तर मी तुम्हांला मुंबईतील किती मौजा दाखविल्या असत्या.

कॉफी घेऊन झाल्यावर तीं दोघें गाडींत येऊन बसलीं. गाडी चालू झाली. थोडया वेळानें गोपाळरावांनीं विचारलें, "शांताबाई, मी तुम्हाला कांहीं विचारूं का ? पण प्रथम मी देईन तें घ्याल ना !"

" काय देतां ! " असें शांतीनें विचारलें असेल नसेल तोंच तिच्या अंगावर कलून गोपाळरावानें तिच्या तोंडांत विडा घालण्याचा प्रयत्न केला. अर्थात् ते आपल्या तोंडांत काय घालतात, हें न कळल्यामुळें तिनें तोंड फिरविलें.

" हें काय गोपाळराव, असं काय करतां ? " तोंड फिरवीत शांतीनें म्हटलें परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तिच्या मानेवर हात टाकून गोपाळरावांनीं विडा तिच्या तोंडांत दिलाच !

" हें नाहीं मला खपायचं गोपाळराव ! दूर बसा ! " असें म्हणून तिनें तो विडा थुंकून टाकला. बराच वेळ गेल्यावर तिच्या मांडीवर हात ठेवून गोपाळराव म्हणाले, " कां–राग आला वाटतं ? "–असं काय बरं ? इकडे पहा–अशी कोपऱ्या कोपऱ्यांत काय घुसतेस " असें म्हणून त्यांनीं तिच्या दंडाला धरलें त्याबरोबर तिनें फणकाऱ्यानें गोपाळरावांच्या हाताला धक्का दिला. ती काळोखी रात्र होती. नाहीं तर शांतीची ती रागानें लाल झालेली मुद्रा पाहून गोपाळराव अगदीं भेदरूनच गेले असते. थोड्या वेळानें गाडी महालक्ष्मीच्या समुद्र-किनाऱ्यावर आली. समुद्राच्या लाटांचा खळखळ आवाज ऐकतांच शांता भानावर आली. ती आजूबाजूला पाहूं लागली. आपण कोणत्या ठिकाणीं आलों हें तिच्या लक्षांत येईना. घरीं जाण्याच्या ऐवजीं गोपाळरावांनीं आपणास इकडे आणलें, त्या अर्थीं त्यांच्या मनांत कपट आहे, हें ती आतां पूर्णपणें समजून चुकली, आतां तिला गोपाळरावाच्या प्रत्येक वर्तनांतील नीचपणा स्पष्ट दिसूं लागला. ती रागानें म्हणाली, " गोपाळराव हें तुमचं वर्तन चांगलं नाहीं. याचा परिणाम फार वाईट होईल. तुम्ही मला मुकाट्यानें घरीं घेऊन चला. "

" थोडा वेळ येथली हवा खाऊं आणि मग जाऊं. मी तर मुद्दाम गाडी इकडे आणिली. "

" तुम्ही गाडी परत फिरवितां कीं नाहीं ? " चिडून शांती म्हणाली, " पहा–पुनः सांगतें, गाडी मुकाट्यानें घराकडे न्या. नाहीं तर मी खालीं उतरून चालूं लागेन. "

" पण तुला आपलें घर कसं सांपडेल ? वेडी कुठली ? हें पहा शांता, तूं अशी रागावून काय होणार ? मी तुला कांहीं सांगतों तेवढें ऐक—इकडे पहा—"

" हं–गोपाळराव मागें सरा. असला फाजीलपणा मला नाहीं सहन व्हायचा ! एकूण तुम्ही जसे दिसतां तसे नाहीं तर ! "

" आतां मी तुला कांहींहि केलं तर तूं काय करशील ?—वेडी आहेस तूं शांते ! पहा—माझ्याकडे पहा तर खरी ! "

गोपाळराव जास्त भिडूं लागतांच शांती चटकन् उठून गाडीखालीं उतरूं लागली. इतक्यांत समोरून पोलिसचा शिपाई येत असलेला गोपाळरावांच्या दृष्टीस पडला. तेव्हां त्यांचें धाबें दणाणलें ! आतां जास्त फाजीलपणा केल्यास तो अंगावर येईल असें वाटून त्यांनीं अगदीं पडती बाजू घेतली. " बरें शांता, बैस आतां आंत. चल तुझी इच्छा नाहीं. मग काय ? चला आतां घरीं जाऊं." शांता पुनः आंत बसली. त्याच संधीला वाटेनें येणारा पोलिस जवळ आला. आणि एकदां गाडींत दृष्टि फेंकून खाकरला. त्या त्याच्या खांकरण्यांत गाडींत कोणतें जोडपें बसलें आहे हें आपण जाणलें असें त्यानें दर्शविलें.

आतां मात्र गोपाळरावांनीं जास्त फाजीलपणा न करतां गाडी परत फिरविण्यास सांगितलें. घरीं येईपर्यंत त्यांनीं बिलकुल हालचाल केली नाहीं. गाडी उभी राहतांच शांता झटकन् खालीं उतरून जिना चढूं लागली. बहुतकरून दादा आपली वाट पहात बसला असेल असें तिला वाटलें. परंतु यशवंतरावाला त्या वेळीं गाढ झोंप लागली होती. शांति आणि गोपाळराव नाटकाला गेल्यापासून तो सारखा विचार करीत तळमळत होता. दरवाजा तसाच उघडा होता. शेवटीं कंटाळून त्याला झोंप लागली होती. शांती वर आल्यावर तिच्या मागून थोड्या वेळानें गोपाळरावहि वर आले. परंतु त्यांनीं कांहीं एक न बोलतां माडीचा रस्ता धरला. ते वर जातांच शांतीनें दरवाजा बंद केला. आतां मात्र तिला धीर निघेना. ती यशवंतरावांच्या बिछान्याजवळ गेली आणि त्याच्या शेजारीं बसली. इतक्यांत तिला मोठ्यानें हुंदका आला. त्या आवाजाबरोबर यशवंत धडपडून जागा झाला.

" काय–काय–शांते, काय झालं ?—"

शांतीला जास्त जास्त हुंदके येऊं लागले.

---

## ३...... व्यवस्था लागली.

" शांते, तुला झालं तरी काय ? अशी तूं रडतेस कां ?–" पुष्कळ प्रकारें समजूत करून यशवंतराव आपल्या बहिणीला विचारीत होता. शांतीला पहिल्या आवेशाचे हुंदक्यावर हुंदके येत होते. बऱ्याच वेळानें ती अडखळत म्हणाली, " दादा, आतां येथें राहूं नको–चल–आतांच आपण येथून जाऊं–त्या गोपाळ-रावांची मला आतां भीति वाटते–दादा—"

" पण त्यांनीं केलं काय ? तरी तूं एकटीनें त्यांच्या बरोबर नाटकाला जाऊं नये असेंच मला वाटत होतं. मी तुला जाऊं नको म्हणून सांगितलं पण तूं कांहीं माझं ऐकलं नाहींस. सांग—त्यांनीं काय केलं ? "

" आतां नाटकाहून येतांना त्यांनीं गाडी कुठें भलतीकडेच नेली आणि माझ्या अगदीं अंगलटीला ते आले. दादा, आतां येथें मी पाणी पिण्यासहि राहणार नाहीं—"

" पण शांते, आपण आतां जायचं कुठं ?—काय एका मागून एक प्रसंग येणार आहेत ते हरि जाणे ! मघां मी त्या डॉक्टर गाडगिळाकडे औषधाला गेलों होतों; तेव्हां तो देखील ह्या गोपाळरावाबद्दल असंच कांहीं म्हणाला. पण हो, बरी आठवण झाली, उद्यां त्यानें मला आणि तुला त्याच्या घरीं जेवणाकरितां बोलाविलें आहे. त्याच्याकडे गेल्यावर आपण पुढें काय करायचं त्याचा विचार करूं ? आतां जा आणि स्वस्थ झोंप. आतां चाराचा सुमार झाला आहे. जा, तूं आतां कांहीं काळजी करूं नको. "

शांतीनें आपला पोषाख उतरविला आणि ती बिछान्यावर पडली परंतु तिला झोंप येईना. तीच स्थिति यशवंतरावाची झाली होती. दोघांचीं डोकीं विचारांत चूर झालीं होतीं. शेवटीं पहाटेच्या सुमारास त्या दोघांनाहि निद्रा लागली. सकाळीं सात वाजले. दिवाणखान्यांत एका बाजूला जवळ जवळ अंथरलेल्या बिछान्यावर ती बहीणभावंडें निजलीं होतीं. इतक्यांत आंतल्या बाजूच्या कोंपऱ्यांत असलेला दरवाजा हळूच उघडला आणि गोपाळरावांचें डोकें आंत डोकावून पाहूं लागलें. अद्यापि कोणी उठलें नाहीं असें पाहून स्वारी हळूच बाहेर आली; आणि पाय न वाजवितां पुढच्या दरवाजानें बाहेर पडली. गोपाळरावांच्या ह्या चोरट्या कृतीवरून रात्रीच्या वर्तनाबद्दल त्यांचें मन खात होतें हें सिद्ध होत होतें. इतकेंच नव्हे तर सकाळीं शांता किंवा यशवंतराव यांना तोंड दाखविण्यासहि त्यांना लज्जा उत्पन्न झाली होती. आठाच्या सुमारास यशवंतराव उठला. त्याच्या मागून थोड्या वेळानें शांतीहि उठली. तिनें उठतांच प्रथम सभोंवार पाहिलें. तिला त्या घरांतील सर्व हवा आतां दूषित झालेली आहे असेंच वाटूं लागलें.

" दादा, येतोस ना ? मी नाहीं आतां ह्या घरांत एक क्षणभरहि राहणार !"

" थांब—प्रथम तोंडबिंड धुवूं—"

" नकोरे दादा—मला किनई इथं अगदीं गळेचेपी केल्यासारखं वाटत आहे चल ना दादा—"

आंतला दरवाजा उघडला आणि घरांत काम करणारी बाई दरवाजांत उभी

राहून म्हणाली, " चहा झाला आहे."

" पण गोपाळराव कुठें आहेत ? ते उठले का ?" यशवंतरावानें विचारलें.

" ते सकाळींच कांहीं कामासाठीं बाहेर गेले आहेत. परत यायला मला वेळ होईल, असं त्यांनीं सांगून ठेवलं आहे."

" असं का ? मग आम्हांलाहि आज जेवायचं नाहीं. एका मित्राकडून आम्हांला आज जेवणाचं आमंत्रण मिळालं आहे. आतां आम्ही तिकडेच जाणार आहोंत."

गोपाळराव घरांत नाहींत हें ऐकून शांतीचा जीव बराच थंड झाला. तिनें तोंड धुतलें आणि चहा घेतला. इकडे यशवंतराव चहा घेऊन डॉक्टर गाडगीळकडे गेला. शांता त्याची वाट पहात दरवाजांतच उभी होती. जिन्यांत कोणाचेही पाय वाजूं लागतांच तिच्या छातींत प्रथम धस्स् होई व गोपाळरावच आले असा तिला भास होई. त्यांची तिला एक प्रकारची दहशतच बसली. जवळ जवळ तासानें यशवंतराव परत आला. त्याच्या मागून दुसरा एक मनुष्य होता. हा मनुष्य म्हणजे डॉक्टर गाडगीळ यांचा कंपौंडर होता. यशवंतरावानें दवाखान्यांत जाऊन डॉक्टरची भेट झाल्यावर रात्रीं घडलेला सर्व प्रकार त्यांस कळविला. तेव्हां डॉक्टर गाडगीळ म्हणाले, " तरी मी काल तुला त्या मनुष्याविषयीं 'हींट' (सूचना) दिली होती. मग तूं होऊन तुझ्या सिस्टरला एकटीच त्याच्याबरोबर कशी पाठविलीस ? कां पण त्यानं असं केलं काय ?"

" तें अद्यापि मी तिला विचारलं नाहीं. जवळ जवळ चार वाजतां ती परत आली. त्यावेळीं मला झोंप लागली होती. ती आली आणि माझ्याजवळ बसून रडूं लागली. मी तिची पुष्कळ समजूत केली. पुष्कळ प्रकारें विचारलें, तेव्हां ती म्हणाली, ' आतां ह्या घरांत पाणी पिण्यासही राहणार नाहीं, ' इतकेंच ! आतां तिला मी जास्त काय विचारूं ? बाकी आमची शांती फार खंबीर मनाची आहे. तिला किंचित् सुद्धां बाल्यपणा सहन होत नाहीं."

" आतां गोपाळराव घरांत नाहीं ना ? मग आतां असं कर, मी माझा कंपौंडर देतों तुझ्याबरोबर. त्याला घेऊन घरीं जा आणि तुमचं सामान घेऊन आमच्या घरीं जा. मीहि आतां लवकरच डिस्पेन्सरी बंद करून येतों घरीं."

" असें ठरवून यशवंतराव आपल्याबरोबर कंपौंडरला घेऊन आला होता. त्यांनीं लागलीच एक हमाल बोलविला आणि आपलें बिऱ्हाड तेथून हालविलें. डॉक्टरचें बिऱ्हाड फार लांब नव्हतें. पुलाजवळ एका लहानशा टुमदार बंगलींत ते

रहात होते. डॉक्टर गाडगीळ आणि यशवंतराव हे पूर्वीचे सहाध्यायी होते. पुन्हां न्यू इंग्लिश स्कूलमध्यें ते एकत्र होते. पुढें गाडगीळानें मेडिकल कॉलेजमध्यें नांव दाखल केलें आणि यशवंतरावानें फर्ग्युसन कॉलेजमध्यें नांव घातलें. त्यामुळें मध्यंतरीं चार वर्षे ते दोघे परस्परांच्या संगतीला अंतरले होते. गाडगीळ पास झाल्यावर त्यानें नुकतीच मुंबईत आपली 'प्रॅक्टिस' सुरू केली होती. अद्यापि त्याचा कांहींच जम बसला नव्हता. आणि जम तरी बसावा कसा? आरोग्य देण्याबद्दल सरकारी शिक्का घेतलेले हे प्राणाचार्य प्रत्येक गल्लीकुचींत दोन दोन चार चार येऊन आपलें बिऱ्हाड करून राहूं लागतांच सर्व शहरांतील रोग दूर पळाला होता. अर्थात् ह्या डॉक्टरांना रोग्याची मार्गप्रतीक्षा करीत एखाद्या वेश्ये-प्रमाणें नटून थटून आपल्या दुकानाचा दरवाजा सताड उघडा टाकून बसावें लागत होतें. आमच्या डॉक्टरसाहेबांचीहि हीच स्थिति होती. मात्र दुःखांत सुख इतकेंच कीं, त्यांची घरची स्थिति साधारण बऱ्यापैकीं होती. शिवाय डॉक्टरीची सनद घेतांच त्यांच्या धनिक श्वशुरानें त्यांस त्यांच्या इच्छेप्रमाणें मुंबईत वर वर्णन केलेला दवाखाना थाटून दिला होता. वास्तविक डॉक्टरसाहेबानें आपला दवाखाना पुण्यास उघडावयाचा! परंतु कॉलेजच्या निमित्तानें चार वर्षे मुंबईत गेल्यामुळें मुंबईच्या 'फॅशन' नें त्यांना मोह पाडला होता. त्यामुळें पुण्यासारख्या बिन-फॅशनच्या शहरांत त्यांना गमावें कसें? शिवाय पुण्यासारख्या ठिकाणीं काय प्राप्ति होणार, अशा आर्थिक दृष्टीनें विचार करून त्यांनीं आपला दवाखाना मुंबईतच थाटण्याचा निश्चय केला. मुंबईत एकदां आपण दवाखाना उघडला म्हणजे चार पांचशें रुपये आपणास सहज मिळूं लागतील असेंहि त्यांस वाटत होतें. आणि त्या मनोराज्यावर विश्वासून त्यांनीं आपले विचार आपल्या सहचारिणीच्या मार्फत श्वशुरास कळविले. परंतु श्वशुरमहाराजांची इच्छा मात्र तशी नव्हती. आपल्या जांवयानें पुण्यांतच दवाखाना घालावा म्हणजे आपली मुलगी गांवांतल्या गांवांतच राहील असें त्यांचें मत होतें. परंतु जांवईबुवांना तो विचार पसंत नव्हता. त्यांनीं आपल्या पत्नीच्या वशिल्यानें श्वशुराकडून पांच साडे पांच हजार रुपये खर्चून मोठ्या थाटांत 'अपटु डेट' फॅशनचा गेल्या प्रकरणांत उल्लेख केलेल्या ठिकाणीं दवाखाना उघडला. डॉक्टरसाहेबांनीं महिना चार पांचशें रुपये प्राप्ति होईल असा अंदाज केला होता. परंतु हळुहळु अनुभव अगदींच निराळा येऊं लागला. कल्पना सृष्टि आणि सत्य सृष्टि यांत जमीन अस्मानाचें अंतर आहे, हें त्यांच्या लक्षांत पहिल्या महिन्यांतच आलें. कारण पहिला महिना अगदीं कोरडा

गेला. दुसरा महिनाहि सदरहु प्रमाणें. तिसऱ्या महिन्याला अखेर अखेर बादशाही नाणें डॉक्टरसाहेबांच्या दृष्टीस पडलें. अशा रीतीनें दवाखाना उघडून आठ महिने झाले. ह्या एकंदर आठ महिन्यांची प्राप्ति सारी दोनशें रुपयेच झाली. आपल्या जांवईबुवांची ही आठ महिन्यांची अचाट प्राप्ति पाहून श्वशुरमहाराजांनीं त्यांस पुण्यास येण्याबद्दल पत्रावर पत्रें लिहिण्याचा सपाटा चालविला. शेवटी पंधरा दिवसांपूर्वी ते स्वतः येऊनसुद्धां गेले. त्यावेळीं असें ठरलें कीं, दवाखाना उघडल्यासारखें एक वर्ष मुंबईंत काढावयाचें. मग कांहीं प्राप्ति होवो वा न होवो! वर्षाअखेर मुंबईंतील दवाखाना मोडून पुण्यास जावयाचें! हें असें ठरल्यामुळें डॉक्टरसाहेबांची चिंता दूर झाली. इतके दिवस आपल्या दवाखान्यांत रोगी यावे, म्हणून मनांतल्या मनांत त्यांचे देवाला नवस होत असत; आज कांहींच प्राप्ति नाहीं म्हणून त्यांचें मन रोज सचिंत असे, परंतु आतां पुण्यास जाण्याचें ठरतांच त्यांची चिंता दूर झाली. पुण्यांत गेल्यावर आपण आपली 'प्रॅक्टिस' जमवूं असे विचार आतां त्यांच्या मनांत घोळूं लागले. इंदिरेलासुद्धां—डॉक्टरसाहेबांचें कुटुंब—आतां एका प्रकारचा उत्साह वाटूं लागला. डॉक्टरसाहेबांनीं मुंबईत दवाखाना थाटल्यावर इंदिरा मुंबईस आली होती. आतां आपण डॉक्टरीणबाई म्हणून तिला मोठा अभिमान वाटत होता. परंतु तो अभिमान लवकरच मावळला. प्राप्ति नसल्यामुळें पतीची ती बापुडवाणी मुद्रा पाहून तिला चैन पडेनासें झालें. प्रत्येक महिन्याला मुंबईचा आवाढव्य खर्च चालविण्याकरितां तिला पतीच्या आग्रहावरून पुण्यास आपल्या बापाला पत्र लिहावें लागे. पहिले दोन महिने सरळ कारण लिहून पैसे मागविले. परंतु तिसऱ्या महिन्याला पत्र लिहावयास तिला जिवावर आलें. पतीच्या शिक्षणाचा खर्च, त्यानंतर दवाखाना उघडण्याकरितां खर्च, त्याचप्रमाणें स्वतःचे व पतीच्या फॅशनकरितां होत असलेला खर्च आपल्या बापाच्या तिजोरींतूनच झालेला होता हें तिला माहित होतें. ती आपल्या श्रीमंत आईबापांची एकुलती एक लाडकी असल्यामुळें इतका दांडगा खर्च करण्यांत त्यांनाहि कांहीं वाटलें नाहीं. तरी आतां प्रत्येक महिन्यास पैशाच्या याचनेचें पत्र लिहिण्यास इंदिरेला अतिशय शरम वाटूं लागली. पतीची परीक्षा पास होऊन त्यांची डॉक्टरी सुरू होतांच पैशाचा पाऊस पडूं लागेल असें जें तिला वाटत होतें, तें तिचें वाटणें पतीच्या मनोराज्याप्रमाणेंच मनोराज्य ठरलें. दोन महिने मुलीचें पत्र आलें, आणि तिसऱ्या महिन्याला आलें नाहीं असें पाहून इंदिरेच्या वडिलांनीं स्वतः होऊन जांवयाच्या नांवें रक्कम पाठवून दिली. अशा

रीतीनें आम्ही वाचकांबरोबर, परिचय करून दिलेले हे डॉक्टरसाहेब आपल्या सासऱ्याकडून येणाऱ्या पैशांवर मुंबईत थाटांत थाटलेल्या दवाखान्यांत माशा मारीत कालक्रमणा करीत होते. असो.

डॉक्टरच्या घरीं आल्यावर शांतीला आपण मोठ्या संकटांतून सुटल्यासारखें वाटूं लागलें. डॉक्टर आणि यशवंतराव हे जसे मित्र होते, त्याचप्रमाणें इंदिरा आणि शांता ह्या दोघी बाळपणींच्या मैत्रिणी होत्या. त्यामुळें तर तिला अतिशयच मोकळें वाटूं लागलें. डॉक्टरसाहेबांच्या घरांत स्वयंपाकाला आचारी असल्यामुळें इंदिरा मोकळीच होती. तिला घरांत कांहींच काम करावें लागत नसे. डॉक्टरसाहेबांचें घर म्हणजे मियाबिबीचेंच राज्य होतें, शांतीचा वेळ आतां सुखांत जाऊं लागला. सर्व दिवस इंदिरा आणि ती गप्पागोष्टी बोलण्यांत वेळ घालवीत. त्याचप्रमाणें यशवंतराव आपला सर्व दिवस दवाखान्यांत बसून रिकामा वेळ घालविणाऱ्या आपल्या मित्राची करमणूक करूं लागला. अशा रीतीनें आठ दिवस गेले. आतां यशवंतरावाला कंटाळा येऊं लागला. बाहेर फिरावयास जावयाचें परंतु एकटें जावयाचें कुठें ? त्यांतून बाहेर जावयाचें परंतु खिशांत एक पैसा देखील नसल्यामुळें बाहेर फिरावयास जाण्यासाठीं त्याचें मन घेईना. शिवाय बरेच दिवस नाटक, सिनेमा वगैरे पाहिलें नसल्यामुळें त्याचें मन तिकडे धांव घेऊं लागलें परंतु पैसा यावा कोठून ? सकाळ संध्याकाळचें जेवण आणि चहा डॉक्टरबरोबर होत असे; परंतु बाळा देसाईच्या संगतीनें त्याला लागलेलें व्यसन आणि चैनीची झालेली सवय ह्या दोन गोष्टी पैशाच्या अभावीं व्हाव्या कशा ?

"आतां कांहीं तरी उद्योग केला पाहिजे," अशी यशवंतरावाची इच्छा पाहून डॉक्टरसाहेब खटपट करूं लागले. यशवंतराव तरतरीत डोक्याचा होता. त्याची इंग्रजी भाषा फार सुंदर होती. शिवाय तो मराठी आणि इंग्रजी सुद्धां कविता करीत असे. त्याच सुमारास ऑनरेबल मेथा एक इंग्रजी दैनिक वृत्तपत्र काढण्याच्या विचारांत होते. तेथें यशवंतरावाची कांहीं सोय झाल्यास पहावी म्हणून डॉक्टर गाडगिळानें प्रयत्न सुरू केले. आणि त्या प्रयत्नाला यश येऊन यशवंतरावाला 'बॉंबे क्रॉनिकल' ऑफिसमध्यें साठ रुपयांची नोकरी लागली. आणि त्याच संधीला डॉक्टरसाहेबांच्याच वशिल्यानें चार नंबरच्या मुलींच्या शाळेंत शांतीला वीस रुपयांवर 'मास्तरिणी' ची जागा मिळाली.

---

"माझं घड्याळ काढून ठेवलं आहेस का?" दवाखान्यांत जाण्याकरितां कपडे करीत असतां डॉक्टर गाडगीळानें जवळच उभी असलेल्या आपल्या पत्नीला विचारलें. " आणि खिशांत माझें पैशांचें पाकिट सुद्धां नाहीं !"

"म्हणजे?" आश्चर्यचकित मुद्रेनें इंदिरा म्हणाली.

"घड्याळ नाहीं आणि पाकिटहि नाहीं ! मी नेहमींप्रमाणं काल येथें खुंटीवर कपडे ठेवले मग रात्रींत कोणी दरोडा घातला कीं काय?"

"रात्रीं दुसरं कोणी आलं नाहीं. यशवंतराव गेल्यावर 'व्हिजिट' (रोग्याला पाहण्याकरितां) बोलाविण्यासाठीं कोणी आलं होतं का?"

"कुठली आली आहे व्हिजिट? ह्या उभ्या महिन्यांत मला एक तरी व्हिजिट मिळाली आहे का?"

"मग बाई मोठाच चमत्कार म्हणावयाचा! तुम्हाला आवडतं म्हणून बाबांनीं तें दीडशें रुपयाचं वॉच घेतलं; चार महिने देखील अद्यापि झाले नाहींत. आणि त्या पाकिटांत काय होतें?"

"दहाची एक नोट आणि सुटे चार रुपये !"

बरीच शोधाशोध केली, बराच विचार केला, रात्रीं कोणीं आलें होतें किं काय याची आठवण केली परंतु छे! शेवटीं तसेच कपडे करून डॉक्टर दवाखान्यांत निघून गेले. परंतु घड्याळाबद्दल त्यांच्या मनाला लागलेली हुर हुर जाईना रात्रीं यशवंतरावाच्या अत्याग्रहास्तव ते, यशवंतराव आणि शांति असे तिघे मिळून सिनेमा पाहण्याकरितां गेले होते. तेथून परत येत असतां वाटेंत माधवाश्रमांत त्यांनीं शांतीला सोडलें. नंतर यशवंतरावासह घरीं आल्यावर त्यांनीं चहा घेतल्यावर थोडा वेळ त्यांच्या गोष्टी झाल्या. आणि यशवंतराव आपल्या बिऱ्हाडीं निघून गेले. त्यानं तर त्यांच्याकडे कोणीही आलें नाहीं; इत्यादि गोष्टी त्यांनीं पुनः पुनः आठवण करून पाहिल्या. परंतु रात्रीं कोणी आल्याचें त्यांना स्मरेना. यशवंतरावांबद्दल त्यांच्या मनांत मधून मधून विचार येत परंतु त्या विचारांवर त्यांचा विश्वास बसेना. एकंदरीनें आपलें दीडशें रुपयांचें घड्याळ आणि पाकिट गेलें तें आतां पुनः आपल्या दृष्टीस पडणार नाहीं असेंच शेवटीं त्यांची मनोदेवता त्यांना सांगूं लागली. इतक्यांत त्यांच्या मनांत एक विचार आला. आपल्या मनांत वरचेवर येणाऱ्या विचाराची एकदां शहानिशा करून घ्यावी, असें ठरवून ते उठले आणि 'मी यशवंतरावांच्या

बिऱ्हाडीं जाऊन येतों ' असें आपल्या कपौंडरास सांगून बाहेर पडले. त्या वेळी दहा वाजण्याचा सुमार झाला होता. बहुतकरून आतां यशवंतराव कचेरींत जाण्याच्या गडबडींत आपणास भेटतील असें त्यांना वाटलें होतें. शांताबाई मात्र भेटेल अशी त्यांची खात्री होती. कारण तिची शाळा जवळच असून ती अकरा वाजतां भरत असे हें त्यांना माहित होतें. डॉक्टरसाहेब यशवंतरावांच्या बिऱ्हाडीं येण्यापूर्वी दहाच मिनिटें तो बाहेरून आला होता. त्यानें आपणाबरोबर बरेंच सामान आणलें होतें. एक लहानसें कपाट, दोन खुर्च्या, एक आरामखुर्ची, एक टेबल, टांगायचा मोठा दिवा इत्यादि सामान आपल्या भावानें आणलेलें पाहून शांताबाई त्याला ' दादा, हें सामान कुणाकडून आणलेंस ?—विकत घेतलेंस कीं काय ?' असा प्रश्न विचारीत होती आणि यशवंतराव हेलकऱ्यांच्या डोकीवरून सामान उतरविण्याच्या गडबडींत होता, तोंच डॉक्टर गाडगीळ आंत आले. त्यांना पहातांच यशवंतरावाचा चेहरा एकदम बदलला. परंतु सामान उतरविण्याच्या गडबडींत त्यानें तो कुणाच्या दृष्टीस पडूं दिला नाहीं.

गेल्या प्रकरणांत लिहिल्याप्रमाणें त्याला आणि शांतीला नोकरी लागतांच त्यानें वर उल्लेख केलेलें गिरगांवांत स्वतंत्र बिऱ्हाड केलें. आतां दोघांची मिळून ऐंशी रुपयांची आवक झाली, आतां त्यांना मोठा धीर आला. बिऱ्हाडाची व्यवस्था लागतांच आपण अगदीं स्वतंत्र झालों असें त्या दोघांना वाटलें. जेवणाकरितां माधवाश्रमांतून सकाळ संध्याकाळ डबे येऊं लागले, त्यामुळें घरांत स्वयंपाकाची दगदग नव्हती, तरी नवीन बिऱ्हाड केल्यावर पहिले दोन चार दिवस गडबडींत गेले. पुढं मात्र त्या दोघांना नोकरी खेरीज राहणारा वेळ कंटाळवाणा वाटूं लागला. परंतु खिशांत पैसा नसल्यामुळें संध्याकाळीं घरांतून बाहेर पडण्यास त्याला उमेदच येत नव्हती. पगाराची रक्कम हातीं येण्यास अद्यापि महिना पूर्ण भरावयाचा होता. तेव्हां चैनीकरितां हातीं पैसा येण्यास काय करावें ह्या विचारांत यशवंतरावाची स्वारी सारखा विचार करीत होती. शिवाय त्यांनीं नवीन थाटलेल्या बिऱ्हाडांत दोन ट्रंका, दोन गाद्या ह्या शिवाय इतर सामान नसल्यामुळें जागा उदास भासत होती. पगार होतांच प्रथम कांहीं लाकडी सामान घ्यावें, असें शांताबाईनें प्रथम सुचविलें होतें. ती तिची सूचना आज यशवंतरावानें अंमलांत आणिली.

"कां—अद्यापि ऑफिसमध्यें गेला नाहींस ?" डॉक्टर गाडगीळ आंत येतांच म्हणाला. "आणि हें फर्निचर नवीन घेतलंस कीं काय ?"

"होय—नाहीं—हें फर्निचर असंच घेतलं !" अडखळत यशवंतरावानें उत्तर दिलें.

" जेवण झालं का ! ऑफिसला वेळ नाहीं का होणार ! "

" आज मी येणार नाहीं असं सांगितलं आहे."

" पण दादा, हें फर्निचर तूं विकतं घेतलंस कीं काय ? " मध्येंच शांताबाईनें प्रश्न केला. " पैसे कुठून आणलेस दादा ? "

बहिणीचा प्रश्न ऐकून यशवंतरावाला राग आला. त्यानें रागानें कपाळाला आंठ्या घालून आपल्या बहिणीकडे पाहिलें आणि उत्तर दिलें. " आमच्या ऑफिसला फर्निचर तयार करून देणारा एक पार्शी कंट्राक्टर आहे, त्याच्याजवळ मी गोष्ट काढिली होती. त्यानें थोडक्यांत हें फर्निचर दिलं. पैसे पगारावर देण्यांचं ठरविलं आहे. " असें म्हणून त्यानें एक खुर्ची पुढें ओढली आणि " बसा डॉक्टरसाहेब बसा " असें म्हणून विषय बदलला. " कां–डॉक्टर आज इथं कुठें ? आज दवाखान्यांत पेशन्टची गर्दी नाहीं वाटतं ? "

" आणि होती केव्हां ? " डॉक्टरनें हांसत हांसत उत्तर दिलें.

" दादा, तूं स्नान केव्हां करणार ? माझा शाळेचा वेळ होत आला. " शांताबाई म्हणाली.

" तूं जेव आणि जा. मला आज जायचं नाहीं. डॉक्टर, तुझंही अद्यापि स्नान वगैरे व्हावयाचंच असेल–नाहीं ? मग आतां इथंच होऊं दे. मी आश्रमांतून दुसरा डबा मागवितों. आतां तूं माझा ' गेस्ट ' ( पाहुणा ) "

" छे–घरीं वाट पहात राहील. आज नको. पुढें केव्हांतरी पाहूं ! "

" मग असं कर, वहिनीला सुद्धां घेऊन ये.

" बरें तर करूं त्याचा पुढें केव्हांतरी विचार ! पण मी आतां कां आलों होतों तें सांगतों. काल रात्रीं आमच्या घरीं दरोडा पडला—"

" दरोडा पडला !–' नॉन्सेन्स ' " अत्यंत आश्चर्याचा आविर्भाव दाखवून यशवंतराव एकदम खुर्चीवरून उठून म्हणाला.

" नॉन्सेन्स नाहीं–खरं ! माझं गोल्डनवॉच आणि मनीपर्स काल चोरीला गेली."

" काल गेली ? पण रात्रीं आपण सिनेमाहून परत येत असतां ' फार वेळ झाला ' असें म्हणून तूं खिशांतून घड्याळ बाहेर काढलेलें मी पाहिलें. शिवाय व्हिक्टोरियाचें भाडेंहि तूंच दिलेंस. त्यावेळीं तुझं पाकिट होतं—"

" होय. मी घरीं गेल्यावर जाकिट खुंटीला काढून ठेवलं तोंपर्यंत होतं."

" मग मोठं आश्चर्य आहे बुवा ! "

थोड्या वेळानें डॉक्टर निघून गेले. ते गेल्यावर यशवंतराव एक श्वास सोडून

मोठ्यानें हांसला. इतक्यांत शांताबाई आंतल्या खोलींतून बाहेर आली. तिनें आपल्या भावाला एकटेंच हंसतांना पाहून हांसत विचारलें, " कारें दादा, कां एकटाच हांसतोस ? कशाचा एवढा आनंद झाला ? "

" आनंद !–अग आतां कुठं आपली ठाकठिक व्यवस्था लागूं लागली,–कां आनंद होणार नाहीं सांग ? "

" पण अद्यापि बरंच फर्निचर पाहिजे तेव्हां कुठं ही रूम ( खोली ) शोभूं लागेल. पण दादा मी आतां जातें. माझा शाळेचा टाईम भरत आला. "

" या-मास्तरीणबाई—"

" येतों बरं एडिटर साहेब ! "

भावाच्या विनोदपर प्रश्नाला विनोदपर उत्तर देऊन शांताबाई बाहेर पडली. ती गेल्यानंतर यशवंतरावानें आपल्या खिशांतील पैसे काढून टेबलावर पसरले आणि मोजले. ते एकंदर बावीस रुपये होते. ते रुपये मोजीत असतां त्याच्या मुखावर हास्य चमकत होतें.

सायंकाळीं शांताबाई शाळेंतून आल्यावर " शांते, आज कोणत्या सिनेमाला यायचा विचार आहे ? " अस यशवंतरावानें तिला विचारलें. तेव्हां तिनें विचारलें, " दादा, आज तुझ्याजवळ बरेच पैसे दिसतात ! कुणाजवळून उसने घेतलेस कीं काय ?—वाः असें तूं उसने पैसे काढूं लागलास मग कसं होणार ? ह्या उसनवारींतच तुझा आणि माझा पगार संपणार असं दिसतं ! "

" असं कुठं झालंय् ! "

रात्रीं तीं दोघें सिनेमाला गेलीं. आज यशवंतरावाची स्वारी फार आनंदांत होती. सिनेमाहून परत आल्यावर ' मी डॉक्टरकडे जाऊन येतों ' असें सांगून तो बाहेर पडला. शांताबाई घरांत एकटीच राहिली. थोड्या वेळानें माधवाश्रमांतून जेवणाचा डबा आला. दादा आल्यावर आपण जेऊं, असा विचार ठरवून ती सकाळीं आणलेल्या आराम खुर्चीवर स्वस्थ बसली. त्यावेळीं तिच्या मनांत कोणते विचार चालले होते ? पतिसंबंधानें कांहीं विचार तिच्या मनांत आले असतील काय ? पतिबरोबर केलेल्या वर्तनाचें चित्र तिला दिसत होतें काय ?—छे ! भोर सोडल्यापासून आतांपर्यंत घडलेल्या अनेक गोष्टींपैकीं एकाही गोष्टीबद्दल तिच्या मनांत चूकून देखील विचार आला नाहीं. मग त्याबद्दल तिला पश्चाताप तरी कोठून होणार ? मग ती आतां कोणत्या गोष्टीचा विचार करीत बसली होती ? आपण मुलींना उत्तम शिकवितों ,' असा आपला लौकिक व्हावा, आपणास बढती मिळत

जाऊन 'हेडमिस्ट्रेस' ची जागा मिळावी, ह्या भावी गोष्टीवरच तिचे विचार भ्रमण करीत होते. अशा रीतीनें विचार करतां करतां किती वेळ गेला याचें तिला भान-देखील राहिलें नाहीं. इतक्यांत दरवाजा वाजला. आपला दादा आला असें समजून " किती वेळ हा दादा ! असें ती वळून म्हणाली, तोंच एक व्यक्ति दरवाजांतून आंत आली. शांताबाईनें त्या व्यक्तिकडे पहातांच तिच्या छातींत धस्स झालें. ती चटकन् उठून उभी राहिली.

" यशवंतराव आहेत का ? " त्या व्यक्तीनें प्रश्न केला .

" नाहीं. दादा बाहेर गेला आहे तो अद्यापि आला नाहीं. " शांताबाईचें हें उत्तर ऐकून ती व्यक्ति पुढें झाली आणि मुकाट्यानें जवळच्या खुर्चीवर बसूं लागली. तें पाहून मनाचा हिय्या करून शांताबाई म्हणाली, " गोपाळराव तुम्हांला येथं बसण्याचं कांहीं कारण नाहीं. दादाला जर तुम्हाला भेटायचं असेल तर उद्यां सकाळीं या म्हणजे तो भेटेल. पण दादाजवळ तुमचं काय काम असणार ? वास्तविक आम्हाला तोंड दाखवायला तुम्हाला शरम वाटायला पाहिजे होती."

किती तोंड करून बोलतां ? मी तुमच्याकरितां इतके पैसे खर्च केले ते फुकटच वाटतं ! "

" तुम्ही येथून जातां कीं मोठ्यानें ओरडूं ? " रागानें शांताबाई म्हणाली.

तिचा तो रागाचा आवेश पाहून गोपाळराव मोतीवाले मनांत बरेच वरमले. आतां येथून जावें हेंच चांगलें असा पोक्त विचार करून ते दरवाजाकडे वळतांना म्हणाले, " ओरडा नाहींतर रडा पण लक्षांत ठेवा मी तुमच्यासाठीं खर्च केलेला पैसा तुमच्याकडूनच वसूल करीन. उद्यां मी येईन असें यशवंतरावाला सांगा. आणि तुमचं माधवाश्रमाचें जें बिल मी चुकतें केलें आहे, ते रुपये मला उद्यां मिळाले पाहिजेत असं त्याला नीट बजावून ठेवा, नाहींतर कठीण प्रसंग येईल हेंहि सांगा—"

गोपाळराव गेल्यावर शांताबाईनें दरवाजा आंतून बंद करून घेतला. आतां तिला बरें वाटूं लागलें. थोडया वेळानें पुनः दरवाजा वाजला. आतां आपला दादाच आला असेल असें समजून तिनें दरवाजा उघडला परंतु तिचा दादा आंत येण्याच्या ऐवजीं दुसरी एक व्यक्ति दरवाजांत उभी होती.

" कोण ? मास्तर !—"

" मी मघां आलों होतों पण आपण बाहेर फिरावयास गेल्याचें कळलें. आतां येथून जात होतों तेव्हां म्हटलं येथेंहि डोकावून जावं, " आंत येऊन मास्तर म्हणाले, तुमचे बंधू कुठें बाहेर गेले आहेत वाटतं ? "

" होय. दादा बाहेर—डाक्टर गाडगीळांकडे गेला आहे. "

" ते कोपऱ्यावर आहेत ते डॉक्टर गाडगीळ ना ?—"

" होय. "

" मग तेथें कांहीं तुमचे बंधू नाहींत ! मी इतका वेळ त्यांच्याच दवाखान्यांत बसलों होतों. "

" मग दादा गेला तरी कुठं ? अद्यापि आमचं जेवण व्हायचं आहे. किती वाजले असतील मास्तर ? "

" आतां साडे नवाचा सुमार झाला. अजून तुमचं जेवण व्हायचं आहे ? कोण ? तुम्हींच करतां वाटतं स्वयंपाक ? "

" नाहीं, मला स्वयंपाकाचा अगदीं कंटाळा आहे. आमचा माधवाश्रमांतून डबा येतो. पण मास्तर बसा–उभे का ? "

" बसतों–" असें म्हणून मास्तरसाहेब एका खुर्चीवर बसले. शांताबाईला ज्या शाळेंत नोकरी मिळाली होती, त्याच शाळत चौथ्या यत्तेवर हे मास्तर होते. त्यांचें नांव धोंडोपंत नेने असें होतें. परंतु सर्वजण त्यांना नेने मास्तर म्हणत असत. नांवानें ते जरी धोंडोपंत होते तरी बुद्धीनें फार थोर होते. त्यांनीं केलेल्या बऱ्याच कविता निरनिराळ्या मासिकांतून प्रसिद्ध झाल्या होत्या. ते कवि होते, लेखक होते आणि नाटककारहि होते. इतकें सर्व जरी होतें तरी मतीनें मात्र ते 'धोंड्या' पेक्षांहि अत्यंत हीन होते. [illegible] नोकरी लागतांच ह्या मास्तरसाहेबांनीं प्रथम तिची ओळख करुन घेतली होती. आणि हे मास्तर मोकळ्या मनाचे आहेत, असें वाटून शांताबाईहि त्यांच्या बरोबर मोकळ्या मनानेंच वागूं लागली होती. लहान मुलींना शिकविण्याचें काम ह्यापूर्वीं तिनें केव्हांहि केलेलं नसल्यामुळें त्या कामाची माहिती करून घेण्यांत तिला नेने मास्तरांचा फार उपयोग झाला.

" तुम्हीं इथें जागा घेतली हें बरं झालं—" मास्तर म्हणाले, " मी देखील येथून अगदीं जवळच राहतों. पण शांताबाई तुम्हीं हा पेषा उचलला याचं मला राहून राहून फार आश्चर्य वाटतं. तुमच्या बंधूंना नोकरी आहे ना ? मग तुम्हाला ही मास्तरकिची भिकार नोकरी धरण्याचं काय कारण ? त्यांतून तुमचं लग्नहि झालेलं आहे. मग कां असं ? "

मास्तरानें विचारलेले प्रश्न अगदीं सरळ भावनेनें विचारलेले आहेत असें वाटून शांताबाई म्हणाली, " मी नोकरी कां धरली ह्याचं उत्तर ह्या मुंबईच्या राहणीला लागणारा दांडगा खर्च हेंच होय. "

" पण तुमचे श्वशुर फार मोठे गृहस्थ आहेत. त्यांच्याकडून तुम्हांला—"

" मास्तर, ती हकीकत फार मोठी आहे. माझं सासर चांगलं श्रीमंत आहे, सासरे फार मोठे-रावबहादुर आहेत वगैरे सर्व गोष्टी खऱ्या पण—"

" अशा अडखळलांत कां ? पण सांगण्यासारखं नसेल तर कांहीं माझा आग्रह नाहीं. अहो, हें पहा-हें जें आपणास बाहेरून मोठं मोठं म्हणून दिसतं, तें सर्व बहुत करून आंतून खोटं असतं ! तसाच कांहीं प्रकार आहे कीं काय तुमचा ? "

" हो—जवळ जवळ तसाच कां म्हणाना ! "

" एकूण तुमचं आणि तुमच्या पतीचं सरळ सूत नाहीं असंच ना ? "

" कसंहि म्हणा. पण मास्तर त्या गोष्टी कशाला ? माझी अशी इच्छा आहे कीं आतां ट्रेनिंगच्या परिक्षेचा अभ्यास करायचा म्हणजे पुढें मागें मला ह्या शाळा-खात्यांत कांहीं तरी चांगला ' चान्स ' मिळेल. "

" मिळेल असं संशयात्मक कां ? खात्रीनें मिळालाच पाहिजे. त्यांतून तुमच्या इंग्रजी पांच सहा यत्ता झाल्या आहेत. तुम्हाला ट्रेनिंगचा अभ्यास कांहीं जड नाहीं. दोन महिन्यांत तुम्ही तयार व्हाल, अशी माझी खात्री आहे. "

" इतका अभ्यास मला दोन महिन्यांत करतां येईल ! "

" त्यांत काय अवघड आहे ! मी तर तुम्हांला दोन महिन्यांत तयार करीन. "

" खरंच का मास्तर ?—पण तुम्हाला इतका वेळ कोठून मिळणार ? तुम्हांला कांहीं खासगी शिकवण्या आहेत ना ? "

" त्या सांभाळूनसुद्धां मी तुम्हांला शिकवूं शकेन ! मग काय ? केव्हांपासून सुरू करतां बोला ? "

" पण पुस्तकं ? "

" तीं सर्व आहेत मजजवळ ! तुम्ही केव्हांपासून बसतां तें सांगा ?—येऊं मी उद्यांपासून ? "

ह्या नवीन शिकवणीची वेळा ठरली ! मास्तरसाहेबांनीं मोबदल्याशिवाय ही शिकवणी कां पत्करली ? यांत काय रहस्य असेल तें असो. परंतु ' मास्तर ' तुम्ही उद्यांपासून येत जा. मी दोन महिन्यांत ट्रेनिंगचा सर्व अभ्यास करतें. रात्रीं आठ ते नऊ आपण बसत जाऊं. ' असें आपण होऊन शांताबाईनें वेळ ठरवून उत्तर दिलेलें ऐकून मास्तरसाहेबांस एक प्रकारचा मुग्ध आनंद झाला. हा पक्षी आपण खात्रीनें जाळयांत पकडूं असें त्यांना वाटलें. त्यांतून शांताबाईचें वर्तन अगदीं मोकळया प्रकारचें असल्यामुळें ती सरळ बोलूं लागली तरी त्यांतें आपला हेतु

प्रगट होत आहे असें त्या नीच वृत्तीच्या माणसास वाटलें.

मास्तर निघून गेल्यावर शांताबाई पुनः आराम खुर्चीवर बसून आपल्या दादाची वाट पाहूं लागली. अद्यापि तिचा दादा येण्याचें कांहींच चिन्ह दिसत नव्हतें. त्यावेळीं दहाचा सुमार झाला होता. आपण आतां जास्त वेळ वाट न पाहतां आपलें थंड होऊन गेलेलें जेवण जेवावें म्हणून ती उठली. परंतु पुनः तिचा विचार बदलला. आतां जेवणें काय आणि दादा आल्यावर जेवणें काय सारखेंच! कारण आतां जेवलें तरी अन्न थंड झालेलें खावें लागणार, त्यापेक्षां इतका वेळ वाट न पाहतां डबा येतांच आपण जेऊन घ्यावयास पाहिजे होतें, अशा प्रकारचा विचार करीत ती पुनः आराम खुर्चीवर बसली. आपण ट्रेनिंगची परिक्षा दिल्यावर आपणास सहज बढती मिळेल, आणि थोड्याच दिवसांत आपण कोणत्यातरी एखाद्या शाळेंत हेड मिस्ट्रेस होऊं मग आपणास आपल्या शाळेच्या हेड मिस्ट्रेस अशा अधिकारानें वागतां येईल; इत्यादि विचार तिच्या मनांत येऊं लागले. तिच्या स्वभावांत एक मोठी गोम होती. वास्तविक मास्तर येण्यापूर्वी थोडावेळ गोपाळराव मोतीवाले तेथें आले होते. त्या मनुष्याचें वर्तन किती नीच प्रकारचें होतें. आणि त्यानें शांताबाईला पेंचांत पकडण्याचा किती भयंकर घाट घातला होता, त्याबद्दल गेल्या एक दोन प्रकरणांत साद्यंत हकीकत आलीच आहे. अशा प्रकारचा नीच वृत्तीचा मनुष्य तेथें आला असतां आणि त्यानें एक प्रकारची दहशत घातली असतांही त्याबद्दलचे सर्व विचार मास्तर येतांच ती विसरून गेली. शांतीच्या ऐवजीं जर दुसरी एखादी स्त्री असती तर गोपाळरावाच्या भाषणाची तिला इतकी जबरदस्त दहशत बसली असती कीं केव्हां एकदां आपला दादा येतो आणि आपण त्याला सर्व हकीकत सांगून ' दादा, मला बाई त्याची भीति वाटते. तो मेला चांडाळ केव्हां येईल आणि काय करील याचा नेम नाहीं. येथून आपण दुसऱ्या ठिकाणीं बिऱ्हाड पाहूं. " असा भीतिनें गांगरून जावून हट्ट धरून बसली असती. परंतु तसा प्रकार शांताबाईचा नव्हता. झाली गोष्ट ती तेवढ्यापुरतीच तिच्या ध्यानांत रहात असे. त्या वेळा पुरताच त्या गोष्टीचा तिच्या मनावर परिणाम होत असे. दुसरी गोष्ट पुढें येतांच ती पहिली गोष्ट साफ विसरून जाई. मग पहिली गोष्ट कितीही वाईट असो अगर चांगली असो. तिच्या स्वभावाची वाचकांबरोबर नीट ओळख पटवून द्यावयाची म्हणून लहान मुलांचेंच उदाहरण घेतलें पाहिजे. मुल एखाद्या गोष्टींत तात्काळ रमतें. परंतु दुसरी गोष्ट पुढें येतांच

पहिल्या गोष्टीचें त्याला स्मरणसुद्धां रहात नाहीं, तसाच प्रकार शांताबाईच्या स्वभावाचा होता. नाहींतर पतीबरोबर तिनें केलेलें वर्तन अशा बिकट स्थितींत पश्चात्तापाला कारण होऊन तिचें मन पिचत राहिलें असतें.

बराच वेळ हेडमिस्ट्रेसचा विचार करकरून तिला कंटाळा आला. रात्रही बरीच झाली. अद्यापि तिच्या दादाचा पत्ता नव्हता. त्यांतून वेळ जाण्याकरितां एकादें पुस्तक किंवा करमणुकीचें एखादें साधनदेखील नव्हतें. फार झालें तर आंतल्या खोलींतून बाहेर आणि बाहेरच्या खोलींतून आंत! किंवा खिडकी-जवळ बसून बाजूच्या घराच्या भिंतीची शोभा पाहणें ह्या पलीकडे मनाची करमणूक करून घेण्यास दुसरें साधन नव्हतें. असो.

शेवटीं कंटाळून ती उठली. आतांपर्यंत तिचा दादा तिला एकटीला सोडून इतकी रात्र केव्हांच बाहेर राहिला नव्हता. नाटकाला किंवा सिनेमाला अगर फिरावयास जावयाचें झालें तरी यशवंतराव तिला बरोबर घेऊन जात असे. मग आजच तो एकटा कुठें गेला ? डॉक्टर गाडगीळाकडे जातों असें सांगून तो गेला होता परंतु नेनेमास्तरांनीं 'तुमचे बंधू डॉक्टरसाहेबांकडे नाहींत.' असें सांगितलेलें तिच्या लक्षांत होतें. मग तिचा दादा गेला असेल तरी कुठें ? आपण भलत्याच शंकाकुशंका काढण्यापेक्षां यशवंतराव परत घरीं येईपर्यंत दम धरावा हेंच चांगलें. म्हणजे साहजिकच आपणांस सर्व गोष्टी कळतील.

बारा वाजण्याचा सुमार झाला. शांताबाई त्याच आरामखुर्चीवर पेंगत होती. इतक्यांत दरवाजावर मोठ्यानें धक्का बसला. त्याबरोबर शांताबाई खडबडून जागी झाली. तोंच दरवाजावर दुसरा जोराचा धक्का बसला. तेव्हां धडपडत उठून शांता-बाईनें दरवाजा उघडला. तेव्हां पहिल्या झटक्याला तिला बसकन घाण आली आणि त्या घाणीचा आपल्या पोटांत पूर्ण सांठा केलेला आहे अशी यशवंतरावाची मूर्ति झोंके खात खात आंत आली. त्याला अशा स्थितींत पाहतांच शांताबाई एखाद्या पुतळीप्रमाणें स्तंभितच झाली. यशवंतराव आंत येऊन तसाच आराम-खुर्चीवर येऊन पडला. त्यानें डोक्याची टोपी काढून दूर कोंपऱ्यांत फेंकून दिली.

" शांते–ए शांते, तू–तुला आतां एक गम्मत–गम्मत सांगतों–ये–अशी ह्या खुर्चीवर बस. बस म्हणतों ना ? बस–खुर्चीवर बस—."

" दादा, अरे हें काय ? आज हा तूं काय प्रकार केला आहेस ? "

" काय प्रकार केला ?–काय प्रकार म्हणजे ?–आज ' गोल्डन डे ' आहे आज ' गोल्डन नाईट ' आहे. काय स–स–समजलीस ? "

" दादा, हें चांगलं का ? त्या मेल्या देसाईनें ही संवय लावून काय काय

प्रकार केले तें तूं विसरलास काय ? दादा, तूं हा काय प्रकार आरंभला आहेस ?"

"काय आरंभला ?–हा–हा–हा पहा—" असें म्हणून यशवंतरावानें आपल्या खिशांत हात घातला आणि एक चपटी बाटली बाहेर काढली." घे–शांते,–घे–घे म्हणतो ना ? तूं घे. आज–आज गोल्डन नाईट आहे–घे—"

"दादा, तूं शुद्धीवर तरी आहेस का ? तुझ्यासाठीं मी इतका वेळ जेवणाची खोळंबून राहिलें. चल, उठ–तूं जेवतोस ना ? ऊठ—"

"उठ ?–कां उठ ?–बस तूंच बस. हें घे. शांते, ए शांते, घे, एक पेग घे–एकच घे—"

"दादा, असं काय हें ? हें तुला शोभतं का ? कोठून तुला ही आज अवकाबया आठवली ?"

"अकाबया आली ?—कुठें आली ? कधीं आली ? सांग अकाबया कशी आली ?"

"आली माझ्या कपाळासारखी ! दादा. ऊठ–तुझ्या मी पायां पडतें, ऊठ. दोन घास खा. ऊठ—"

मोठ्या प्रयासानें शांताबाईनें आपल्या दादाला उठविलें. त्याच्या अंगावरील कपडे काढले आणि त्याला आंतल्या खोलींत नेलें. ती डब्यांतील थंड गार झालेलें अन्न ताटांत काढीत असतां यशवंतरावाची सारखी बडबड सुरू होती. शेवटीं मोठ्या संकटानें तिनें त्याला दोन घांस खावूं घातले. परंतु त्या दोन घांसांना यशवंतरावाच्या पोटांत जागा मिळेल तेव्हां ना ? कारण आंतली जागा पूर्वीच तांबड्या पाण्यानें भरून काढली होती ! आपली जागा आतां अन्नाचे घांस पटकविणार असें पाहून त्या तांबड्या पाण्यानें त्या दोन घांसांना गचांडी मारली. त्याबरोबर ते आंत गेलेल्या मार्गानें गडबडत परत फिरून पुनः पुढें असलेल्या ताटांत पडले ! थोड्या वेळांत त्या सर्व खोलीभर यशवंतरावानें ओकून ओकून घाण करून टाकिली. तो प्रकार पाहून [illegible] पोटांत भडभडून आलें. तिला ती घाण सहन होईना. पण करणार काय ! तिला तें सर्व निस्तरणें भाग होतें. यशवंतराव तर इतका गाफिल बनला कीं, आतां त्याला स्वतःची शुद्धि देखील नव्हती. पोटांत गेलेल्या पाण्यानें आतां त्याच्या डोक्याचाहि ताबा घेतला. तो तेथेंच कोलमडून पडला. भोरला त्याची जशी स्थिति झाली होती, त्याचीच ही दुसरी आवृत्ति आज झाली. त्यावेळीं त्याच्याजवळ त्याचा जिवलग मित्र बाळा देसाई होता आणि आज त्याची बहीण जवळ होती.

दुसऱ्या दिवशीं आठ वाजेपर्यंत यशवंतराव झोंपला होता. बिचारी शांताबाई लवकर उठून आंतली खोली साफ करण्याच्या उद्योगास लागली. तिला त्या घाणीमुळें सर्व रात्र बिल्कुल झोंप आली नाहीं. आठ वाजण्याच्या सुमारास यशवंतराव उठला. आपली बहिण आंतल्या खोलींत काय करित आहे हें त्यानें डोकावून पाहिलें. त्यावेळीं त्यालासुद्धां आंतली घाण आली, आणि शरम वाटली. आपण रात्रीं फारच वाईट प्रकार केला हें तो जाणून होता. परंतु !

थोड्या वेळानें गोपाळराव मोतीवाले आले. त्यांना पाहतांच यशवंतरावाच्या कपाळाला आंठ्या पडल्या. अद्यापि त्याच्या डोक्यांत रात्रीच्या दारूचा शिल्लक शेष होताच. गोपाळराव आंत येतांच म्हणाले, " का यशवंतराव, माझा निरोप तुम्हाला पोंचला ना ? मग काय देतांना पैसे ? "

"कुठले पैसे ?"

" ते तुमचें माधवाश्रमाचें बील मी चुकतें केलें तें ! "

" बरं मग त्याचं काय आतां ? बिल चुकतं केलं आतां काय त्याचं राहिलं आहे बाकी ? "

" त्याचं कांहीं नाहीं राहिलं बाकी, पण माझी बाकी राहिली आहे ना आतां तुमच्याकडे ? "

बाहेर कोण बोलत आहे हें पाहण्याकरितां शांताबाई दरवाजांत येऊन उभी राहिली. गोपाळराव दृष्टीस पडतांच ती एकदम उसळून म्हणाली, " दादा ह्या गोपाळरावांना इकडे येण्याचं बंद कर. आतां आपल्या घरीं येण्याचं यांचं काय काम आहे ? "

" काम पुष्कळ आहे बरं शांताबाई ! " गोपाळराव तिला हिणवीत म्हणाले. " माझे पैसे यावयाचे आहेत. माझे पैसे मला आज मिळालेच पाहिजेत. रुपये घेतल्याशिवाय मी आज जाणार नाहीं. "

तो निर्भीड बनलेला गृहस्थ त्या दोन पोरांना थोडीच भीक घालणार होता ? त्याचे रुपये द्यावयाचे हें यशवंतरावाला सुद्धां कबूल होतें, परंतु रुपये द्यावयाचे कोठून ? आधल्या दिवशीं त्याच्याजवळ वीस बत्तीस रुपये होते, परंतु आतां त्यांपैकीं सारे चारचं रुपये शिल्लक राहिले होते. पुढें बराच वेळ घासाघीस करून शेवटीं यशवंतरावाला पन्नास रुपयांची ' प्रॉमिसरी नोट ' लिहून देणें भाग पडलें.

त्या रात्रीं पुनः यशवंतराव आधल्या रात्रीप्रमाणें तयार होऊन घरीं आला !

---

मृगया, द्यूत, स्त्रिया आणि मद्यप्राशन याची आसक्ति अतृप्त आहे, असें वचन आहे. ह्या निंद्य मानलेल्या गोष्टी मनुष्याला पशुकोटींत नेऊन बसवितात. ह्या चार व्यसनांपैकीं कोणत्याहि एकाच व्यसनाची एकदां मनुष्याला चटक लागली म्हणजे त्याच्या अधोगतीला सुरवात होते. ह्या व्यसनांच्या पायीं आजपर्यंत शेंकडों अब्रुवंत कुटुंबें नामशेष झालीं आहेत, सध्यां होत आहेत आणि पुढेंहि होणार आहेत; त्याचप्रमाणें किती तरी लक्षाधीश अन्नान्न दशेला मिळाले आहेत, मिळत आहेत आणि पुढेंहि मिळणार आहेत. हीं व्यसनें अधोगतीला नेऊन भिडवितात, हें अनुभवाला येत असतांहि मनुष्य एकदां कां त्यांच्या सपाट्यांत सांपडला म्हणजे त्यांतून परावृत्त होणें सहसा अशक्यच असतें. आमच्या यशवंतरावाची स्थिति तशीच होती. त्याचें व्यसन आतां दिवसेंदिवस वाढूं लागलें होतें. सकाळीं कचेरींत जातांना 'अप टु डेट' स्टाईलमध्यें जाणारा आपला दादा संध्याकाळीं परत घरीं येतांना कोणत्या 'डन अप्' स्टाईलमध्यें येईल, हा एक संकटमय विचार प्रत्येक दिवशीं शांताबाईच्या हृदयाचें पाणी करीत असे.

यशवंतरावाला दारूचें व्यसन आहे, ही गोष्ट आतां त्यांच्या कचेरींत प्रत्येकाला माहित झाली होती. ह्या व्यसनामुळें प्रत्येक आठवड्यांत त्याची कचेरींत एक दोन दिवस तरी गैरहजिरी असायचीच ! तरी सुद्धां त्याचे वरिष्ठ म्हणजे वृत्तपत्राचे संपादक त्याकडे दुर्लक्षच करीत; कारण ते यशवंतरावाची योग्यता जाणून होते. त्याच्याकडे 'पत्रकर्त्याचे स्फुट विचार' हें सदर असे. आणि तें सदर तो इतक्या सुंदर भाषेंत लिहीत असे कीं, खरोखरीच त्याच्याविषयीं त्याच्या वरिष्ठास त्याचा अभिमानच वाटे. परंतु अशी गोष्ट किती दिवस चालणार ? कोणतीहि गोष्ट मर्यादेच्या बाहेर गेल्यानंतर ती कितीहि उत्तम असली तरी ती लोकांच्या तिरस्कारासच पात्र होते. गुण असतात त्यांची अवगुणांत गणना होऊं लागते. त्याचप्रमाणें यशवंतरावांच्या गुणाची गोष्ट झाली. त्याच्या गुणामुळें त्याला नोकरीवर ठेवावा असें संपादकास वाटे. परंतु दिवसेंदिवस त्याचें व्यसन वाढत जाऊन गैरहजिर दिवसांची संख्याहि फुगूं लागली. शिवाय तितक्या अवधींत कचेरींत कांहीं निराळ्याच गोष्टी घडून आल्या होत्या. एके दिवशीं खासगी खोलींत संपादकांनीं आपले कपडे नेहमींप्रमाणें काढून ठेवले असतां त्यांच्या कोटाच्या खिशांतील कांहीं पैसे चोरीस गेले. पुढें एक दोन दिवसांत घडयाळ नाहींसें झालें. एकदां तिजोरी-

कडे असणाऱ्या कारकुनाच्या हिशेबांत दोन नोटी कमी आल्या. अशा रीतीनें कचेरींत चोऱ्या होऊं लागल्या होत्या. प्रथम हा संशय नोकरचाकरांवर होता. आणि अशा प्रकारें नोकरचाकरांवर चोरीचा संशय येणें कांहीं विशेष आश्चर्य मानण्यासारखें नाहीं. कारण कुठेंहि झालें तरी प्रथमतः अशी गरीब पोटार्थी मंडळीच कोणत्याहि संशयाला बळी पडत असतात.

पुढें पुढें कचेरींतील कांहीं मंडळी यशवंतरावाविषयीं संशय घेऊं लागली. त्याच्या वर्तनांत दिवसेंदिवस पडत चाललेला फरक कचेरींतील प्रत्येक इसमाच्या संशयाला कारण होऊन हळुहळू मंडळींत कुजबूजहि सुरू झाली; परंतु यशवंतरावाच्या अगदीं 'अप टु डेट' वागण्यानें त्याचें उघड रीतीनें नांव घेण्याची कोणाचीहि छाती होईना. परंतु असें किती दिवस चालणार ? शेवटीं 'पाप हें अड्यावर बोंबलत येतें' असें जें म्हणतात, तें अगदीं खरें आहे. कारण एके दिवशीं असाच एक योग जुळून आला कीं, त्या दिवशीं यशवंतराव कचेरींत गेला नव्हता; आणि एक मारवाडी त्याचा शोध करीत कचेरींत आला. तेव्हां साहजिकच "यशवंतरावाबरोबर तुमचें काय काम आहे ?" असें मंडळीनीं त्याला विचारलें. प्रथम तो मारवाडी कांहीं सांगेना. 'हायकोर्टांत माझें काम होतें, तें आटोपून यशवंतरावांची भेट झाली तर पहावी म्हणून मी आलों,' असेंच त्यानें सांगितलें. परंतु मंडळी कसली पडली खप्री ! मारवाडी म्हटला म्हणजे सर्वांच्याच थट्टेचा विषय ! ते त्याच्या पोटांत शिरल्याशिवाय थोडेच राहणार ? हळुहळू मारवाड्याचें तोंड उघडूं लागलें. 'यशवंतरावानें आपणाकडे दोन घड्याळें—एक सोन्याचें आणि एक चांदीचें—गहाण ठेविलीं असून तीं सोडवून नेण्याची मुदत संपली आहे. शिवाय हातउसने नेलेले कांहीं किरकोळ रुपयेसुद्धां अद्यापि परत आणून दिले नाहींत. आणि ह्या आठ दिवसांत त्यानें तोंड चुकविलें आहे म्हणून त्याचा शोध घेण्याकरितां आपण आलों.' इतकी बातमी त्य मारवाड्यानें सांगितली. मग काय विचारतां ? मंडळी जास्तच खोदखोदून विचारूं लागली. अशा प्रकारें मंडळीची त्या मारवाड्याबरोबर चाललेली गडबड वरिष्ठाच्या लक्षांत येतांच त्यानें चौकशी केली. मारवाड्याकडे यशवंतरावानें घड्याळें गहाण ठेविलीं आहेत, असें कळतांच स्वतःची खात्री करून घेण्याकरितां संपादकान एका कारकुनाला मुद्दाम मारवाड्याच्या बरोबर त्याच्या दुकानीं पाठविलें. आतां मात्र प्रत्येक इसमाचें मत यशवंतरावाविशयीं कलुषित झालें. त्यांत त्या पाठविलेल्या कारकुनानें 'आपण एक घड्याळ ओळखलें' असें येऊन सांगतांच संपादकाचें पित्त एकदम खवळलें.

त्यानें तात्काळ यशवंतरावला बोलाविण्याकरितां मनुष्य रवाना केला. यशवंत-रावाला आतां नोकरीला मुकावें लागणार असें आतां प्रत्येकाला वाटूं लागलें आणि तें खरेंहि होतें.

कचेरींतील नोकर यशवंतरावाला बोलाविण्याकरितां आला त्यावेळीं तो डॉक्टर गाडगीळांच्या दवाखान्यांत गप्पागोष्टी करीत बसला होता. त्यांच्या बोलण्याचा विषय दुसरा तिसरा नसून ' तूं अलीकडे फार गैरहजीर राहतोस, तुझें व्यसनहि आतां वाढत्या प्रमाणावर आहे, हाच होता. आपल्या मित्राची बुद्धिमत्ता उत्तम असून केवळ व्यसनापायीं तो कवडीमोल ठरत आहे याबद्दल डॉक्टरास अंतःकरणा-पासून वाईट वाटत होतें. ते अलीकडे त्याला वरचेवर हितोपदेशाच्या गोष्टी सांगत असत. परंतु यशवंतरावाच्या मनावर त्याचा कांहींच परिणाम होत नव्हता. तो प्रत्येक गोष्ट हांसण्यावर घालवी.

आज तूं ऑफिसमध्यें कां गेला नाहींस ? " खरें कारण यशवंतरावच्या तोंडून निघावें म्हणून डॉक्टर त्याला हाच प्रश्न वरचेवर करीत होते.

" खरं जर म्हणशील तर ह्या ताबेदारीचा अगदीं मनापासून कंटाळा आहे. पण करणार काय ? नाइलाज म्हणून मी ही नोकरी धरली, हें तुला माहितच आहे. माझ्या मनांतून एकदां ' एल एल बी.' होऊन तुझ्यासारखं अगदीं स्वतंत्र व्हावं असें आहे. "

होय ! ' एल एल. बी.' न होतां आतां त्याला स्वतंत्र होण्याची वेळ आली होती आणि तेवढ्याच करितां त्याच्या कचेरींतील मनुष्य त्याला बोलाविण्याकरितां दवाखान्यांत आला. त्याला पाहतांच यशवंतानें विचारलें, " कायरे महादू कां आलास ? माझ्याशिवाय ' आर्टिकल ' अगदीं अडलेंच असेल ना ? " इतकें बोलून यशवंतराव आपल्या मित्राकडे वळून मोठ्या फुशारकीनें पुढें म्हणाला, " हें पाहि-लेंस, मी ऑफिसमध्यें गेलों नाहीं, म्हणजे असा पचडा उडतो ! दोन एडिटर-दोन सब एडिटर आहेत, पण एखादं स्वतंत्र आर्टिकल लिहिण्याची धमक एकाच्याहि अंगीं नाहीं. पण कायरे महादू, सांग कीं, कां आला होतास ? "

" तुम्हांला आतांच्या आतां बोलाविलें आहे."

" कां ? इतकं गडबडीनं कां बोलाविलं आहे ? "

" तें कांहीं मला माहित नाहीं, पण एक मारवाडी आला होता—"

" को–ण–मारवाडी !" मारवाड्याचें नांव ऐकतांच यशवंतरावाची फुशारकी मारणारी जिव्हा अडली !

होय–एक मारवाडी आला होता. त्याच्याकडे तुम्ही एक सोन्याचें आणि एक रुप्याचें अशीं दोन घड्याळें गहाण ठेविलीं आहेत—"

"बरं–बरं–तूं–तूं जा. मी आलोंच!" "डॉक्टर गाडगीळापुढें हा भलत्याच गोष्टीचा स्फोट झालेला पाहून यशवंतरावाची चर्या खरंदिशीं उतरली. आतां ती सबंध इमारत कोसळून त्यांत आपण, डॉक्टर आणि तो मनुष्य असे तिघेहि गडप होऊं तर बरें, असेंच त्याला वाटलें. परंतु अशी भलतीच असंभवनीय गोष्ट वाटून उपयोग काय ? त्याच्या वाटण्यानें ती इमारत थोडीच कोसळणार होती. ? आतां आपल्या मित्राला जास्त संशय येऊं नये म्हणून यशवंतराव गडबडीनें उठला. परंतु डॉक्टरांना संशय यावयाचा तो आलाच ! त्यांनीं विचारलें, "कायरे यशवंत ही काय भानगड आहे ? हीं घड्याळं कुठलीं तूं गहाण ठेविलींस ?"

"कुठलीं घड्याळं ? हा कांहीं तरी सांगतो—चलरे महादू–चल–" असें म्हणून यशवंतराव उठलाच ! त्यानें [illegible] उडवाउडवी करण्याचा प्रयत्न केला तरी त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. आपलें सोन्याचें घड्याळ गेलें तें यशवं-तरावानेंच–ज्याला आपण मित्र म्हणून समजत होतों, ज्याला अडचणीच्या वेळीं आपण आश्रय दिला आणि नोकरी मिळवून दिली, त्यानेंच नेलें अशी आतां त्यांची खात्री झाली. आणि एका क्षणांत त्यांच्या मनांत यशवंतरावाविषयीं असलेला आदर पार मावळला ! आतां डॉक्टर साहेबांस चैन पडेना. यशवंतराव गेला, त्याच्या मागें जाऊन त्यानें कोणत्या मारवाड्याकडे आपलें घड्याळ ठेविलें आहे तें पहावें, अशी अनावर उत्कंठा होऊन ते उठले. आपल्या मागून डॉक्टर येतील अशी यशवंतरावाची कल्पना देखील नव्हती. तो सरळ दवाखान्यांतून निघाला तो महादूला घेऊन कचेरींत आला. थोड्या वेळानें डॉक्टर गाडगीळहि आले, त्यांना पाहतांच यशवंतरावाचा चेहरा अगदीं काळा ठिक्कर पडला. एकदां बाजू उलटली म्हणजे मनुष्य बेफिकीर बनतो, तसा आतां यशवंतराव आलेल्या संकटास तोंड देण्यास तयार झाला.

"यशवंतराव, तुमच्याकडून एक अत्यंत नीच गोष्ट घडली आहे. तुमच्या हातून अशी गोष्ट घडावी ही अत्यंत लाजीरवाणी गोष्ट आहे. मी कोणत्या बाबी संबंधानें बोलत आहें, हें तुमच्या लक्षांत आलेंच असेल." यशवंतराव आंत आल्यावर संपादक म्हणाले, "आतां ह्या गोष्टीबद्दल मी ज्यास्त वाच्यता करूं इच्छित नाहीं. आतांपर्यंत आफिसमधून आणि किरकोळ मिळून तीस रुपये चोरीस गेले. त्याचप्रमाणें माझ्या खिशांतील घड्याळ गेलें तें आपण आज संध्या-

काळपर्यंत आणून द्यावें. आणि आपल्या नोकरीचा राजीनामा लिहून पाठवावा. ह्या उपर आम्हाला तुमची जरूरी नाहीं."

"आपण काय बोलतां हेंच मुळीं अद्यापि माझ्या लक्षांत आलें नाहीं." यशवंतरावानें गंभीर चेहरा करून विचारलें.

"हें पहा यशवंतराव, आतां विषाची परीक्षा पाहण्यांत कांहीं अर्थ नाहीं. मी केवळ आमचे मित्र डॉक्टर गाडगीळ यांच्या करितां म्हणून तुम्हाला हा 'चान्स' देत आहें. कारण त्यांच्या शिफारशीवरून तुम्हीं इकडे आलां आहांत. तेव्हां ह्या चान्सचा फायदा घेऊन मी सांगितल्याप्रमाणें आज सायंकाळपर्यंत सर्व व्यवस्था करा नाहीं तर गोष्ट विकोपाला जाईल हें लक्षांत ठेवा." असें म्हणून संपादक डॉक्टरकडे वळून म्हणाले, "डॉक्टर केवळ आपणाकरितां म्हणून मी ह्या बाबतींत खोल जाऊं इच्छित नाहीं, नाहींतर केव्हांच मी ही गोष्ट पोलीस-मध्यें कळविली असती."

"यशवंत, झाल्या गोष्टी होऊन गेल्या, आतां त्या मिटवून टाकण्यांत शहाणपणा आहे,"

"डॉक्टर, तुला काय वेड लागलं आहे ? मी अशा गोष्टी करीन अशी तुला शंका तरी कशी आली याचेंच मला आश्चर्य वाटत आहे. आतां मी नोक-रीचा राजीनामा द्यावा अशींच जर यांची इच्छा असेल तर त्याला माझी तयारी आहे. कारण ह्या नोकरीचा मलाहि कंटाळा आला आहे."

"ठीक आहे. द्या आतांच राजीनामा लिहून; आणि त्याबरोबरच ह्या पंधरा दिवसांच्या पगाराची म्हणजे रुपये तीस पोंचल्याबद्दल पावती !" संपा-दकानें सांगितलें.

"म्हणजे ?–रुपये पोंचल्याशिवाय कशी पावती द्यावयाची ?

"रुपये आपणास अगाऊच पोंचले आहेत. आतां आणखी रुपये कोठले द्यावयाचे ?"

"छे ! मला पसंत नाहीं. रुपये पोंचल्याशिवाय ते पोंचल्याबद्दच मी पावती कशी लिहून देणार ?"

"कशी लिहून देणार म्हणजे ? दिलीच पाहिजे. शिवाय घड्याळहि आणून दिलें पाहिजे."

"घड्याळ ! कोणतें घड्याळ ?–म्हणजे तुम्ही हा माझ्यावर चार्ज करीत आहांत."

" आतां ह्या गोष्टी सामोपचारानें मिटतील असें नाहीं मला वाटत." संपादक म्हणाले, " चला, डॉक्टर आपण सर्वजण त्या मारवाड्याकडे जाऊं. तेथें माझेंच घड्याळ या स्वारीनें गहाण ठेवलें आहे असें नाहीं, तर दुसरें एक सोन्याचें घड्याळहि आहे."

" आणि तें माझें आहे," डॉक्टर एकदम म्हणाले.

" म्हणजे? तुमच्यावर देखील ह्या स्वारीनें प्रयोग केला आहे तर! वाः मित्राची निवड तर फार उत्तम केलीत म्हणायची!"

संपादकांचें हें वाक्य ऐकून डॉक्टर गाडगीळांनीं यशवंतरावाकडे अशा तिरस्करणीय मुद्रेनें पाहिलें कीं, तत्काळ त्याची मान खालींच वांकली! परंतु तो पश्चात्ताप क्षणिक होता. कारण जेव्हां ती सर्व मंडळी शहानिशा करून घेण्याकरितां मारवाड्याकडे निघाली त्यावेळीं तो देखील सरळ निघाला. त्याच्या मनावर कोणत्याच गोष्टीचा परिणाम झालेला दिसत नव्हता. रस्त्यानें जात असतां तरी यशवंत आपणाजवळ सर्व गोष्टी कबूल करील, असें डॉक्टरांस वाटलें होत. परंतु तो कांहींच बोलेना तेव्हां कदाचित् तो निर्दोष असेल, असाहि विचार त्यांच्या मनांत आला. परंतु सर्व मंडळी जेव्हां मारवाड्याच्या दुकानीं आली, तेव्हां मात्र आमच्या यशवंतरावाचा चेहरा पाहण्यासारखा होता. आतां कोणतीच गोष्ट त्याला नाकबूल करतां येणें शक्य नव्हतें. प्रथम त्यानें सोन्याचें घड्याळ गहाण ठेवून त्यावर साठ रुपये व्याजीं काढले. नंतर एक दोन पांच मिळून दहा रुपये हातउसने नेले. त्यानंतर पुनः रुप्याचें घड्याळ गहाण ठेवलें, ह्या दोन घड्याळांचे कोण कोण मालक होते. हें आतां वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल?

" यशवंत, तूं आपल्या मित्रत्वाची ओळख फार लवकर पटविलीस, त्याबद्दल मी तुझा आभारी आहें." डॉक्टर गाडगीळ म्हणाले. " आतां इतःपर तुझी आणि माझी ओळख संपली. बरं झालं, फार लवकर तुझं खरं स्वरूप मला दिसलं. नाहींतर आणखी किती गोत्यांत आलों असतों, तं एक परमेश्वरालाच माहित! तूं ह्या कृतीनें आपल्या उच्च शिक्षणाला काळोखी मात्र फासलीस!" इतकें बोलून त्याच्याकडून उत्तराची अपेक्षा न करतां डॉक्टर खालीं उतरून आपल्या रस्त्याला लागले.

संध्याकाळीं यशवंतराव घरीं आला. आजपासून तो स्वतंत्र झाला, परंतु अडीअडचणीला उपयोगी पडणारा एक मित्र मात्र त्यानें गमावला. आतां ह्यापुढें चरितार्थ आपणास आपल्या बहिणीच्या पगारांत—अवघ्या वीस रुपयांत—चालवावा

लागणार हा विचार मनांत येऊन तो विचार करीत आरामखुर्चीवर पडला होता. अद्यापि शांताबाई शाळेंतून परत आली नव्हती. ती अलीकडे शाळा सुटल्यानंतर ट्रेनिंगचा अभ्यास करण्याकरितां मास्तरच्या घरीं जात असे. प्रथम कांहीं दिवस मास्तर त्यांच्या घरीं येत होता. परंतु यशवंतराव दारूच्या निशेंत घरीं आल्यावर दंगेल उडवूं लागल्यामुळें शांताबाईनें मास्तरला आपल्या घरीं येण्याचें बंद करून आपणच त्याच्या घरीं जाऊं लागली. जवळ जवळ पंधरा दिवस तिचा अभ्यास चांगला सुरळीत चालला होता. तिला ट्रेनिंगचा अभ्यास शिकविण्याच्या उद्देशानें मास्तर साहेबानें ही शिकवणी पत्करली होती काय ? नाहीं, त्याचा मूळ उद्देश निराळाच होता. शांताबाईला आपल्या पकडींत पकडावी, हाच त्याचा मूळ उद्देश होता. आणि त्या उद्देशाला धरून अलीकडे त्यानें शिकविण्याची पद्धत ठेविली होती. प्रत्येक दिवशीं शिकवितांना एखाद्या विषयावर बोलतांना मूळ विषय बदलून त्याचें प्रेमाच्या विषयांत रूपांतर करावयाचें आणि आपला हेतु तिच्यापुढें मांडायचा असा त्यानें क्रम सुरू केला होता. पहिल्यानें ही गोष्ट शांताबाईच्या लक्षांत आली नाहीं. परंतु अलीकडे मास्तर कांहीं कांहीं गोष्टी निर्भीडपणें उघड बोलूं लागल्यामुळें तिचें मन साशंक होऊं लागलें होतें. आज देखील तसाच प्रकार झाला. ती मास्तरकडे गेली, त्यावेळीं मास्तरसाहेब अंगावर पांघरूण घेऊन बिछान्यावर पडले होते. शांताबाई आंत आली. आणि मास्तर अंथरुण धरून पडले आहेत हें पाहून म्हणाली, " कां मास्तर, आज असं कां ? शाळेंत तर तुमची प्रकृति ठीक होती. मग इतक्यांतच काय झालं ?

" काय झालं तें माझं मलाच कळत नाही. तुम्ही आलांत हें ठीक झालं. पण शांताबाई प्रथम ती खिडकी बंद करा पाहूं आणि तो दरवाजाहि जरा लोटून घ्या. मला वारा अगदीं सहन होत नाहीं. " नुकतीच थंडी भरूं लागली आहे, अशा आवाजांत नेने मास्तर म्हणाला.

खरोखरीच मास्तर आजारी आहेत असें वाटून शांताबाईनें खिडकी बंद केली आणि विचारलें, " मास्तर, आक्का घरांत नाहीं वाटतं ! "

" गेली असेल देवदर्शनाला. पण तो दरवाजा जरा लोटा. नाहींतर तो बाहेरचा दरवाजाच बंद करून घ्या. म्हणजे वारा तरी आंत येणार नाहीं. "

" पण आक्का येईल ना इतक्यांत ! "

" येईल तेव्हां उघडतां येईल. "

शांताबाईनें दरवाजा बंद करून घेतला. आणि ती पुनः आंत आली. दरवाजा

बंद करून घेतल्यामुळें खोलींत बराच काळोख झाला होता. शिवाय त्या दोघां-शिवाय तिसरें कोणीहि घरांत नव्हतें. आक्का म्हणून ज्या बाईविषयीं शांताबाईनें विचारलें ती बाई एक म्हातारी विधवा असून नेने मास्तराची दूरची नातेवाईक होती. प्रथम ह्या बाईनें मुंबईंत मुगभाटांत एक खाणावळ घातली होती. पुढें मुलाचें आणि तिचें पटेना. त्याच खाणावळींत नेने मास्तर जेवणाकरितां जात असत. आक्काचें आणि मुलाचें पटेना. असें पाहून नेने मास्तरानें तिला आपल्या बिऱ्हाडीं आणलें होतें. मास्तराचा स्वयंपाक, घराची झाडलोट आणि घर सांभाळण्याच्या कामांत तिचा नेने मास्तरास चांगला उपयोग होत होता. शिवाय कांहीं नाजुक गोष्टींतहि तिची मास्तरास बरीच मदत असे. आज ती इतका वेळ देवदर्शनाच्या निमित्तानें घराबाहेर राहिली, त्यालाहि नेने मास्तराची तिला संमति होती. अरेरे ! किती शोचनीय प्रकार हा! पोटाच्या टिचभर खळगीच्या अन्नाकरितां अशा कित्येक विधवा स्त्रिया नेने मास्तरासारख्या नीच माणसाच्या राक्षसी कृत्यांना मदतनीस झाल्या आहेत.

"शांताबाई. आक्का येईपर्यंत तुम्ही माझ्या सोबतीला बसा. आज मला तुमचा अभ्यास घेतां येत नाहीं—बसा—बस शांता, माझ्या जवळ बैस—हा पहा मला आतां ताप भरूं लागला—" स्वाभाविकपणें शांताबाई बिछान्याजवळ बसली, तेव्हां आपला हात पुढें करून, आपलें कपाळ गरम झालें आहे, हें दाखविण्याकरितां मास्तरानें तिचा उजवा हात धरला आणि आपल्या कपाळावर ठेवला. त्यावेळीं खरोखरीच त्याचें कपाळ तापलें होतें. पण तें तापामुळें मात्र तापलें नसून मनांत चाललेल्या विषयीं विचाराच्या काहूरामुळें भडकून तापलें होतें.

"शांता परवां मी तुला सांगितलें ती हीच वेळ बरं !" तिचा हात तसाच आपल्या हातांत धरून ठेऊन नेने पुढें म्हणाला, "मनुष्य जेव्हां आपल्या पायांवर उभा असतो, त्यावेळीं तो जगाविषयीं अगदीं बेफिकीर असतो. परंतु असा एकाद्या वेळीं बिछान्यावर पडला म्हणजे त्याला प्रेमाच्या सहानुभूतीचं कोणी तरी जवळ लागत असतं. खरंच, आतां तूं माझ्याजवळ बसली आहेस, ह्यावेळीं मला जसं वाटतं, तसं तुला कधीं तरी वाटतं का ? शांता, तूं देखील माझ्याच सारखी एकटी आहेस खरं ना ?"

"एकटी कशी ? माझा दादा आहेना ?"

"दादा असला तरी त्याचा प्रश्न निराळा आणि आपल्यावर प्रेम करणाऱ्या एखाद्या जिवाभावाच्या माणसांचा प्रश्न निराळा ! ईश्वरानें ह्या जगांत स्त्रीपुरुष ही

जोडी कशाकरितां बरं निर्माण केली आहे ? तुलाहि आपल्या प्रेमाचें एखादं स्थान असावं असं नाहीं कां वाटत ? "

" मास्तर, तुम्ही हें कांहीं तरी बोलत आहांत ! मी अशा भलत्याच गोष्टींचा कधीं विचारच करीत नाहीं. "

" तसे विचार तुझ्या मनांत येत नाहींत, याचें कारण तसे विचार तुझ्या मनांत आणून देणारी एखादी व्यक्ति तुझ्या आढळण्यांत आली नाहीं हें होय. मी आज कित्येक दिवस तुला विचारीन विचारीन म्हणतों पण तसा योगच जुळून आला नव्हता. "

" तसा म्हणजे कसा ? "

" तसा म्हणजे कसा हें मी तुला आतां उघड कसं सांगूं ? पण आतां सांगतोंच, हें पहा शांता तू आणि मी—असें म्हणून मास्तरानें तिचा हात जवळ ओढून आपल्या छातीवर ठेवला. " तूं आणि मी शांता, एकाच व्यवसायांतील आहोंत. तुझं आणि माझं जर प्रेम-मीलन झालं-शांता, मी तुला हें मन आणखी स्पष्ट रीतीनें कसं उघड करून सांगूं ! "

" मास्तर, तुम्ही हें शुद्धीवर असून बोलतां ना ?" आपला हात काढून घेऊन व बिछान्यावरून जरा दूर सरकून बसून शांताबाई म्हणाली.

" शांता, मी तुला एक पत्र लिहून ठेवलं आहे. देऊं कां तें तुला ? वाचतेस का तूं तें पत्र ? "

" पत्र वाचून काय करायचं आहे मला ? मी तुमच्या म्हणण्याचा भावार्थ समजलें बरं मास्तर ! " असें म्हणून ती उठूं लागली. तिची हालचाल पाहून ती पुनः आपणाजवळ येऊन बसत आहे असेंच समजून नेने मास्तरानें आपला हात पुढें केला. तो हात तिच्या गालाला लागला. त्याबरोबर शांताबाईनें ताड्दिशीं मास्तराच्या श्रीमुखांत लगाविली !

परंतु तेवढ्यानें मास्तराच्या मनाचें समाधान झालें नाहीं. त्यानें आपल्या अंगावरील पासोडी दूर करून शांताबाईला धरण्याचा प्रयत्न केला. परंतु तोहि फसला. शांताबाई खोलींतून बाहेर पडली. मास्तर तिच्या मागेंच होता.

" मास्तर, मला मुकाट्यानें जाऊं द्या. मला आतां अडविण्याचा प्रयत्न कराल तर फसाल ! असें म्हणून ती बाहेरचा दरवाजा उघडूं लागली. आतां ती जाणार असें पाहून " शांता, असं काय ?–माझं ऐक तरी ! " असें म्हणून त्यानें पुनः तिचा पदर धरला. तिनें हिसडा देतांच पदर हातांतून सुटलेला पाहतांच पुढें

होऊन मास्तरानें तिच्या मानेसभोंवतीं हात टाकला. आतां अतिप्रसंगाची वेळ आली असें पाहून शांताबाईनें आपलें शेवटचें हत्यार उपसलें. मानेसभोंवती विळखा घालून तोंडाजवळ आलेल्या मास्तराच्या हाताला ती इतक्या जोरानें कडकडून चावली कीं, ' अर्रर्र ! ' असा शब्द तोंडाबाहेर पडतो न पडतो तों मास्तर कोलमडून खालीं पडला. शांताबाईनें त्याच्या आंगठ्याचें हाड चावून चुरा केलें.

शांताबाई घरीं आली, त्यावेळीं दिवे लागण्याची वेळ झाली होती. परंतु यशवंतरावानें मात्र अद्यापि दिवा लाविला नव्हता. तो आरामखुर्चीवर बसून आपल्या विचारांत मग्न झालेला होता. आपण नोकरी सोडली त्याला कारण काय झालें, असें आपल्या बहिणीनें विचारल्यावर तिला कोणतें उत्तर द्यावें, याचा तो विचार करीत होता. इतक्यांत दरवाजा उघडून शांताबाई आंत आली.

" दादा, हें असंच कारे जग ? "

" असंच म्हणजे कसं ? "

" पापानें भरलेलं ! "

" मग तुला आतांच त्याचा अनुभव येतो वाटतं ?—पण शांते, असा प्रश्न करण्याचें कारण काय ? आज कांहीं विशेष झालं कीं काय आणि हें तुझ्या पदराला रक्त कसलं लागलं आहे ? पडलीस वाटतं कुठं रस्त्यांत ? "

" पडलें नाहीं नी कांहीं नाहीं ! पण दादा, उद्यांपासून मी शाळेंत जाणार नाहीं मला ही नोकरी नको."

" मग आपलं होणार कसं ? मीहि आज नोकरी सोडली आणि तूंहि सोडणार ! मग आपला हा खर्च चालणार कसा ? "

" तूं कां नोकरी सोडलीस ? तुला नोकरी सोडायला झालं काय ? "

यशवंतरावानें कांहींतरी एक कारण पुढें करून आपल्या बहिणीची समजूत केली. परंतु तिनें मात्र सर्व खरी गोष्ट सांगितली. नेने मास्तरानें केलेला नीचपणा ऐकून यशवंतरावाला अत्यंत राग आला पण करतो काय ? मुकाट्यानें बसण्यापलीकडे त्याला कांहींच करतां येण्यासारखें नव्हतें. बराच वेळ तो स्तब्ध होता. तितक्या वेळांत शांताबाईनें दिवा लाविला. तेव्हां यशवंतराव म्हणाला, " शांते, इकडे मजजवळ बैस. आतां आपला हा गाडा पुढें चालणार कसा ? मला असं वाटतं कीं, तूं परत आपल्या घरीं जावेंस व्यर्थ डोक्यांत राख घालून तूं वसंतरावावर रागावून आमच्या मागें आलीस. वास्तविक वसंतराव म्हणजे फारच विचारी आणि

शांत डोक्याचा ! तुला असा नवरा लाभला हें खरोखरच तुझं भाग्य ! ”

“ कोण दादा ! तूंच का बोलतोस हें ? तुम्हीच आपले गुण पाघळून मला ‘ इकडे आड आणि तिकडे विहीर ’ असें करून टाकलें ! ”

“ तो तुझा मूर्खपणा ! त्याला आम्ही काय करणार ! पण आतां तूं परत जावेंस हेंच चांगलें ! तूं गेल्यावर मी माझें एकट्याचें कसें तरी भागवून घेईन. ”

“ अस्सं काय ? माझा तुला आतां भार वाटूं लागला काय ? पण मी साफ सांगत्यें मी कांहीं भोराला परत जाणार नाहीं. ”

“ मग आपला येथें अशा स्थितींत निभाव लागणार तरी कसा ? ”

वाचकहो ! आतां आपण ह्या बहीणभावंडांस इकडे सोडून वसंतरावाची काय हकीकत आहे, ती पाहूं.

---

## ८........ व्यवस्था केली

शांताबाईनें आपल्या सासरीं कसा धिंगाणा घातला, त्याचें सविस्तर वर्णन पहिल्या भागांत येऊन गेलेंच आहे, त्या पुढची हकीकत ऐकण्यास वाचकवर्ग अगदीं उत्कंठित झाला असेल. करितां ह्या प्रकरणांत आपण वसंतरावाचा समाचार घेऊं.

शांताबाई निघून गेली त्यावेळीं मनःसंतापामुळें वसंतरावाची प्रकृति नादुरुस्त झाली होती, ही गोष्ट वाचकांच्या स्मरणांत असेलच. शांताबाईच्या उद्धट वर्तनाचा त्याच्या कोंवळया मनावर अतिशय परिणाम झाला. तो आंतल्या आंत करपूं लागला. सर्व दिवस विचार विचार आणि विचार ! विचाराशिवाय त्याच्या मनाला एका क्षणाचीही विश्रांति नव्हती. सर्व रात्र झोंप कशी ती त्याच्या डोळयांना माहीत नव्हती. आपण आपल्या निवडीनें लग्न केलें, आतां ह्या लग्नाचा शेवट कोणत्या प्रकारचा होईल याची त्याला कांहींसुद्धां कल्पना होईना. शांताबाईच्या जाण्याचें त्याला दुःख झालेंच, परंतु आपल्या लग्नाचा अशा रीतीनें शेवट होत आहे हें पाहून आपल्या प्रेमळ मातापितरांस दुःख होत आहे. ह्या गोष्टीचा विचारहि त्याच्या मनाला छळीत होता. आपली पत्नी गेल्यामुळें आपणास बिलकूल दुःख होत नाहीं, असें दाखविण्याचा तो पुष्कळ प्रयत्न करी. परंतु मनःसंतापामुळें त्याच्या शरिरावर होत असलेला परिणाम स्पष्ट दिसत होता. आठच दिवसांत त्याचें अर्धे अधिक जेवण तुटलें. त्याचे डोळे खोल जाऊं लागले, तोंडावर फिकटपणा आला.

चार महिने झाले. रावबहादुर आणि त्याचें कुटुंब रमाबाई आपल्या एकुलत्या एक मुलाच्या दुःखजनक स्थितीचा आणि त्याच्या शरीरक्षीणतेचा विचार करीत होतीं. आपल्या मुलाचें आपण कसें व कोणत्या प्रकारें समाधान करावें हेंच त्यांना कळेना. वास्तविक वसंतराव कांहीं लहान नव्हता, चांगला सुशिक्षित होता, त्याचें समाधान आपण कोणत्या शब्दांनीं करावें हेंच रावबहादुरांना कळेना. परंतु दिवसेंदिवस त्याची शरीरअवस्था कठीण होत चाललेली पाहून रमाबाईला भीति वाटूं लागली. सबंध दिवसांतून तो क्वचित्‌च आपल्या खोलीबाहेर येत असे. गांवांत त्याची कांहीं लहानपणींची समवयस्क मित्रमंडळी पूर्वी होती. परंतु आतां मात्र त्यांपैकीं गांवांत कोणीहि नव्हतें. त्यांच्या मित्रमंडळीपैकीं कांहीं मुंबई पुणें, अशा शहराच्या ठिकाणीं नोकरीप्रीत्यर्थ गेलेले होते, त्यामुळें हल्लीं गांवांत कोणी नसल्यामुळें त्याला अशा स्थितींत एकान्ताचें दुःख जास्त प्रमाणांत वाटत होतें. मन गुंतविण्याकरितां एखादें पुस्तक काढावें, त्याचीं दहापांच पानें वाचावीं, पण काय वाचलें तेंच कळूं नये. असें झालें म्हणजे त्यानें पुस्तक बाजूला ठेवावें. आणि स्वस्थ बसून विचार करावा, असा त्याचा दिनक्रम होता. रमाबाई मधून मधून हळूच वर येई आणि हलकेंच आंत डोकावून जाई. प्रत्येक वेळीं वसंतराव कपाळाला हात लावलेला तिच्या दृष्टीस पडे. शेवटीं वसंतरावाचा मनःसंताप इतका वाढला कीं, एक भयंकर रोग त्याच्या शरिरांत आपलें वसतिस्थान करूं लागला.

रावबहादुरांची झोंप फार सावध होती. एके दिवशीं मध्यरात्रीच्या सुमारास सर्वत्र सामसूम झालें असतां माडीवर कोणीतरी मोठ्यानें बोलत आहे, असा त्यांना भास झाला. त्यांनीं चटकन उशीवरून आपलें डोकें वर उचललें आणि कोठून आवाजाचा भास झाला, तिकडे कान दिले. परंतु तो भास नव्हता. खरोखरीच वर कोणी बोलत आहे असें त्यांना स्पष्ट ऐकूं आलें. इतक्या रात्रीं वसंत कुणाबरोबर बोलत बसला आहे, हें पाहण्याकरितां ते आपल्या पलंगावरून उठले आणि हलकेच जिना चढून वर आले. वसंतरावाच्या खोलीजवळ येतांच पुनः सर्वत्र शांत झालें. इतका वेळ आंत वसंत कोणाबरोबर तरी मोठमोठ्यानें बोलत होता; आणि इतक्यांतच त्याचें भाषण कां थांबलें ? त्या सर्व दिवसांत वसंतरावाकडे त्याचा कोणी मित्र आलेला त्यांनीं पाहिला नव्हता; इत्यादि विचार त्यांच्या मनांत येतात तोंच आंत सुरू झालेलें वसंतरावाचें भाषण त्यांच्या कानीं आलें.

"शांता हें चांगलं नाहीं बरं ! पहा—ह्या वर्तनापासून तूं स्वतःच्या शीलाला आणि आमच्या अब्रूला काळोखी फांसशील ! नको ग नको ! शांता, तूं चांगली

शिकलेली आहेस, मग तुला हेंच कसें कळत नाहीं ?–तुझं माझ्यावर प्रेम नाहीं का ? अगदीं उघड, मन मोकळं करून सांग ! मला आतां काडीइतकंसुद्धां वाईट वाटणार नाहीं. सांग–शांता सांग ! अशी गप्प राहूं नको. तुझ्या मनांत काय आहे तें एकदां मला स्पष्ट कळूं दे. नाहीं ना माझ्यावर तुझं प्रेम ? मग तूं माझ्याशीं लग्न तरी कशाला केलेंस ? तुझी मी निवड केली, त्याचवेळीं तूं स्पष्ट कां बोलली नाहींस ? त्यावेळच्या तुझ्या मुग्धपणामुळें तूं स्वतःबरोबर माझ्या सुखाचा घात केलास ! नाहीं मी तुला अशा स्वैर रीतीनें केव्हांही वागूं देणार नाहीं. तूं माझी पत्नी आहेस. तुझ्या हातून होणारी अगदीं क्षुल्लक अशी लहान मोठी गोष्ट आमच्या नांवावर विकली जाणार आहे. माझ्यावर तुझं प्रेम नाहीं, तर तूं माझ्यापासून दूर रहा, पण वर्तनानें मात्र धड रहा–नको शांता–असा अविचार करूं नकोस !–"

पुनः सर्वत्र शांतता झाली. आंतील भाषणाचा प्रत्येक शब्द रावबहादुरांनीं ऐकला. आपला मुलगा स्वतःच्या बायकोबरोबर बोलत आहे, हें त्याच्या भाषणावरून सिद्ध झालें. परंतु सुनेचा आवाज मात्र त्यांनीं ऐकला नाहीं. ती आपली नजर चुकवून मुकाट्यानें घरांत आली आहे कीं काय असा विचार त्यांच्या मनांत येऊन ते पुनः दरवाजाला कान देऊन ती काय उत्तर देते तें ऐकण्याकरितां उत्सुकतेनें उभे राहिले. पुष्कळ वेळ झाला. परंतु शांतताभंग करणारें आंतील भाषण पुनः सुरू झालें नाहीं. अर्धा तासपर्यंत रावबहादुर दरवाजाजवळ उभे होते. शेवटीं कंटाळून ते खालीं आले. रमाबाई थोड्या वेळापूर्वींच जागी झाली होती. आजुबाजूला पाहिलें तेव्हां यजमान पलंगावर नाहींत, असें पाहून ती उठून बसली. कांहीं वेळानें रावबहादुर खालीं आले, तें पाहून रमाबाईनें विचारलें, "वर कशाकरितां जाणं झालं होतं ?"

आपण वर कशाकरितां गेलों होतों, तेथें आपण काय ऐकलें इत्यादि सविस्तर हकीकत रावबहादुरांनीं आपल्या कुटुंबाला सांगितली आणि आतां पुढें काय करावें, हा प्रश्न सोडवीत त्यांनीं शेष राहिलेली सर्व रात्र जागून घालविली. शेवटीं दुसऱ्या दिवशीं वसंतरावाला जवळ बसवून काय तो विचार करावयाचा असेंच त्यांनीं ठरविलें. सूनबाई घरांतून गेल्यापासून त्यांनीं एका शब्दानेंही आपल्या मुलाजवळ तिच्याबद्दल गोष्ट काढली नव्हती. फक्त नेहमीचे औपचारिक प्रश्न ते वसंतरावाला विचारीत असत; कारण आपण सूनबाईचं नांव त्याच्यापुढें उच्चारणें म्हणजे त्याच्या मनाला दुःख देणें असें ते समजत होते. आणि एवढ्याच करितां चार महिने ह्या बाबतींत अगदीं गप्प राहिले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं चहा घेऊन झाल्यावर रावबहादुरांनीं वसंतरावास हांक मारिली. रमाबाईहि जवळच होती. वसंतराव आल्यानंतर त्याला आपणा-जवळ बसवून रावबहादुर म्हणाले, "वसंता, मी इतके दिवस तुझ्याजवळ बोललों नाहीं. परंतु आतां बोलण्याचा समय प्राप्त झाला आहे. तुझ्या मनाला स्वस्थता वाटूं लागल्यावर आपण बोलूं असं मी प्रथम ठरविलं होतं, परंतु अलीकडे मी पहातों आहें कीं, तुझ्या मनाला स्वस्थता न येतां उलट दिवसें-दिवस तुझ्या मनाची अस्वस्थता फार वाढतच चालली आहे. मी आतां कोणत्या गोष्टीबद्दल बोलणार हें तुझ्या लक्षांत आलेंच असेल. मीहि ह्या गोष्टीचा पूर्ण विचार केला आहे. आणि जें मनाशीं ठरविलें आहे तेंच मी आतां तुला सांगणार आहें. तूं स्वतःच्या सुखाकरितां जी निवड केलीस ती साफ चुकीची ठरली हें मी तुला सांगितलें पाहिजे असें नाहीं आणि त्याबद्दल मी तुला दोषहि देत नाहीं. चांगलं म्हणून आपण एखादं फळ घेतों, परंतु फोडल्यानंतर तें आंत नासलेलें आपल्या दृष्टीस पडतें. तसाच कांहींसा हा प्रकार झाला आहे. आतां आम्ही असं ठरविलं आहे कीं, आपल्या कुलशीलाला साजेल अशी आणि तुला अनुरूप अशी एखादी मुलगी पाहून येत्या वैशाखांत तुझें दुसरें लग्न करायचें." इतकें बोलून रावबहादुर वसंतरावाच्या मुखाकडे पहात राहिले. आपलें भाषण त्याला कितपत रुचलें आणि तो काय उत्तर देतो म्हणून बराच वेळ ते थांबले. परंतु वसंतराव कांहींच बोलेना. तो पुढें असलेल्या टेबलावरील एका कागदाच्या घड्या पाडीत स्तब्ध बसला होता. तो कांहींच बोलत नाहीं, असें पाहून रावबहादुर पुढें म्हणाले, "मग काय वसंत, ह्या बाबतींत तुझं मत ठरलं नसेल तर तूं दोन चार दिवस विचार कर आणि मग मला कळीव; परंतु इतकी गोष्ट मात्र खरी कीं, आतां कांहीं तरी केल्याशिवाय तुझ्या विचारांची दिशा बदलणार नाहीं. काल सर्व रात्र तूं झोपेंत एकसारखा बडबडत होतास. अशानें तुझ्या शरिरावर परिणाम होऊन भलतंच कांहीं तरी होऊन बसेल."

"होऊन बसायचं आणखी बाकी तें काय राहिलं आहे?" रमाबाई मध्येंच म्हणाली, "पहा कशी शरिराची काडी बनली आहे ती! अन्न तुटलं, झोंप नाहीं आणि जेव्हां पहावं तेव्हां कपाळावर हात! अशानं तुझा निभाव तरी कसा लागणार वसंत?"

"आई, आतां निभाव तो काय आणखी निराळा लागायचा आहे? प्रत्येक मनुष्याच्या आयुष्यांत त्याच्या सुखाचा सौदा एकदांच होत असतो. त्याप्रमाणें

मी माझ्या सुखाचा सौदा केला, पण तो फसला. आतां काय त्याचं? आहे त्यांतच सुख मानून गप्प रहावं हेंच उत्तम!"

"वसंत, हें तत्त्वज्ञान आपल्यासारख्या संसारी माणसांना लागू नाहीं. असं काय तूं जगांतील सुख पाहिलं आहेस कीं ज्यामुळें तूं स्वमतानें केलेला सुखाचा सौदा फसला असं तुला ठरवितां आलं? तें कांहीं नाहीं. मी म्हणतों, तुझा सुखाचा सौदा बिलकूल फसला नाहीं. आम्ही ठरविलं आहे त्याप्रमाणें येत्या वैशाखांत तुझं लग्न झालंच पाहिजे. कां असंच कीं नाहीं?" आपल्या पत्नीकडे वळून हा शेवटचा प्रश्न रावबहादुरांनीं केला.

वसंतराव पूर्ण आज्ञाधारक होता. त्याला आपल्या वडिलांच्या प्रश्नांला नकारार्थी उत्तर देण्याचें धाडस होईना, आणि दुसरें लग्न करण्याला संमति देण्यासही त्याचें मन तयार होईना; असा तो विलक्षण पेचांत पडला. शेवटीं आईची समजूत घालावी आणि तिच्याकडून वडिलाचें मन वळवावें, असे त्यानें ठरविलें.

"वसंता, मी म्हणतों त्याप्रमाणें झालं म्हणजे ठीक होईल. तुला एखाद्या मुलाप्रमाणें अंधविश्वासानें कोणतीहि गोष्ट मी करायला सांगत नाहीं. मी स्वतः ह्या गोष्टीचा पूर्ण विचार केला आहे. आतां इतकी गोष्ट मात्र खरी कीं, तुझें दुसरें लग्न केलें तर त्या चढेल पोरीची कांहीं तरी कायमची व्यवस्था करणें जरूर आहे. पण त्याबद्दल तुला काळजी करण्याचं कांहींच कारण नाहीं. तिच्या बाबतींत पुढें काय करायचें तें मी ठरवून ठेवलं आहे. आणि त्याप्रमाणें एक दोन दिवसांत मी व्यवस्थाहि करणार आहें."

"कोणती व्यवस्था करणार तें जर मला कळेल तर बरें होईल." भीत भीत वसंतरावानें हलक्या आवाजांत म्हटलें.

"व्यवस्था म्हणजे अशी—आपल्या दिवाणजीला पाठवून तिचा शोध करायचा कारण परवां मला पुण्याहून आलेल्या पत्रावरून असं कळलं कीं, तुझी बायको आणि तिचा भाऊ पुणें सोडून मुंबईत राहण्याकरितां गेले. तेव्हां मुंबईत तिचा शोध करून तिच्या वर्तनाबद्दल खात्री करून घ्यावयाची आणि पुढं जयरामपंतांच्या मध्यस्थीनें तिची पोटगी ठरवून टाकायची म्हणजे तिच्याकडून आपणास पुढें कोणत्याहि प्रकारचा त्रास होणार नाहीं."

वसंतरावानें बराच वेळ कांहीं उत्तर दिलें नाहीं. आपण आईकडून बाबांची समजूत घालूं अशी जरी त्याला खात्री होती, तरी वडिलांचा हा विचार ऐकून त्याला कांहीं तरी उत्तर देणें भाग होतें. शेवटीं तो म्हणाला, "पण असं करण्यापासून

आपला दुर्लौकिक मात्र होईल. लोक उघड टीका करूं लागतील—"

"आणिआतां दुर्लौकिक व्हायचा काय कमी आहे ? लोक अगदीं उघड टीका करूं तर लागले. आणि लोक टीका करीत नाहींत कुणाची ? चांगल्याची करतात आणि वाईटाची सुद्धां करतात ! आपण स्वस्थ राहिलों तरी लोक थोडेच स्वस्थ राहणार आहेत ? मग आतां असं पहा, तूं दुसरं लग्न केलंस तरी टीका होणार ? मग तूं दुसरं लग्न करून सुखी का होऊं नयेस ? आम्ही ह्या गोष्टीचा चांगलाच विचार केला आहे, आणि शेवटीं हा विचार ठरविला आहे तूं आतां तिचा विचार सोडावा आणि दुसरं लग्न करावं हेंच उत्तम !"

वडिलांचा हा विचार वसंतरावाला पसंत पडला. त्याचें आपल्या पत्नीवर खरोखरीच प्रेम होतें. परंतु एका बाजूनें प्रेम असून सुख थोडेंच लाभतें ! टाळी वाजवायला दोन हातांची आवश्यकता असते. असो. रावबहादुरांनीं योजल्या प्रमाणें दोन दिवसांनीं त्यांनीं आपला खासगी कारकून—दामुअण्णा मुंबईस पाठविला. त्याच्याजवळ त्यांनी जयरामपंतांना एक सविस्तर हकीकतीचें आणि आपण योजलेल्या गोष्टीचा खुलासा केलेलें एक पत्र दिलें होतें. शिवाय वसंत रावानेंहि जयरामपंतांच्या मुलीला म्हणजे आमच्या कथानायिकेला—कमलिनी लाहि एक स्वतंत्र पत्र लिहिलें होतें.

---

## ७...... ॲट होम पार्टी

आज जयरामपंतांच्या घरीं विशेष गडबड दिसत होती. त्यांच्या माडीवरील दिवाणखाना लता-पुष्प-पल्लवांनीं आणि पताकांनीं सुशोभित केला होता. मध्यभागी मोठें टेबल ठेवलें असून त्यावर सुवासिक असे नयन मनोहर पुष्पगुच्छ ठेवले होते. टेबलासभोंवती 'टिकवुड' च्या खुर्च्या ओळीनें मांडल्या असून मध्यभागीं मखमलीनें मढविलेल्या गादीच्या दोन मोठ्या खुर्च्या होत्या. शिवाय भिंतीला राजा रविवर्मानें काढलेलीं कांहीं शेलकीं चित्रें टांगून ठविली होती. तसेंच प्रत्येक खिडकीला सुंदर वेलबुट्टी काढलेला पडदा सोडलेला होता. आंतल्या दालनांत फक्त सफेत चादर अंथरलेलें एक मोठें लांब टेबल, निरनिराळी फळफळावळ, नानाप्रकारचीं बिस्किटें आणि चिवडा, शंकरपाळे इत्यादि फराळानें सज्ज करून ठेवलें होतें. ह्या एकंदर थाटावरून तेथें कांहींतरी समारंभ होता इतकें सिद्ध होत होतें.

पंतांना नुकतीच एक मोठी बढतीची जागा मिळाली होती. त्याप्रीत्यर्थ म्हणा किंवा त्याचे वरिष्ठ अधिकारी मिस्टर कसेल साहेब पेनशन घेऊन लवकरच विलायतेस जाणार म्हणून म्हणा अथवा कमलिनी, आमची कथानायिका उत्तम तऱ्हेनें प्रवेश-परीक्षा उत्तीर्ण झाली म्हणून म्हणा, पंतांनीं आज 'ॲट होम पार्टी' चा बेत केला होता. ह्या पार्टीला मिस्टर कसेल साहेब आपल्या पत्नीसह येणार होते. त्याचप्रमाणें पंतांनीं आपल्या कचेरींतील इतर कांहीं कारकून आणि स्नेही, तसेंच कमलिनीनें आपल्या जिवलग मैत्रिणी यांनाहि आमंत्रण दिलें होतें. ही सर्व मंडळी ठरलेल्या वेळीं हजर झाली. ह्या प्रसंगीं मुद्दाम बोलाविलेल्या संगीत शाळेंतील कांहीं मुलांचीं पदें म्हणून झाल्यावर दुसऱ्या अनेक गोष्टी झाल्या. परंतु प्रस्तुत कथानकाशीं संबंध असलेल्याच गोष्टी पुढें दिल्या आहेत.

आजच्या पार्टीची सर्व तयारी आणि खटपट आमच्या कथानायिकेनें केली होती. अद्यापि कसेल साहेबानें किंवा त्यांच्या पत्नीनें कमलिनीला पाहिलें नव्हतें, तथापि तिच्या लग्नाची आणि पतीसंबंधाची सर्व दुःखकहाणी त्यांना ठाऊक झाली होती. मध्यंतरी गणेशपंत तिला पोंचविण्याकरितां मुंबईस येऊन आजारी होऊन परत गेले आणि गांवीं गेल्यावर त्यांचें देहावसान होतांच पंतांना रजा काढून तेथें जावें लागलें, त्या वेळीं गणेशपंतांचा आणि आपला काय संबंध आहे. इत्यादि गोष्टी कसेल साहेबांस सांगतांना आपण आपल्या भाच्याला मुलगी देऊन जांवयाच्या मूर्खपणामुळें मुलीचें जन्माचें नुकसान आपण कसें केलें ह्याहि गोष्टी पंतांनीं आपल्या साहेबांस कळविल्या होत्या, त्यामुळें आज पंतांच्या घरीं येतांच कसेल साहेबाच्या पत्नीनें आमच्या कथानायिकेला प्रेमळ सहानुभूतीनें प्रथम जवळ घेतलें आणि तिच्या तोंडावरून हात फिरवीत ती आपल्या पतीकडे वळून म्हणाली, "What a pity! her husband ought to have proud for such a lovely, bright and intelligent wife! काय हें दुर्दैव! अशा सुंदर, चलाख आणि हुशार बायकोबद्दल नवऱ्याला अभिमान असावयास पाहिजे होता!" असें म्हणून तिनें कमलिनीचें परीक्षा पास झाल्या-बद्दल अभिनंदन करून नांव विचारलें. आणि तें ऐकतांच 'कमलिनी! कमलिनी!' असें एक दोनदां स्वतःशीं पुटपुटून त्या शब्दाचा अर्थ विचारला. कमलिनीनें आपल्या नांवांत काय काव्य आहे तें तिला थोडक्यांत सांगतांच ती हांसत म्हणाली, "What a novel name!" किती अपूर्व नांव!"

मडमसाहेबानें 'नॉव्हेल' हा शब्द उच्चारतांच कमलिनीला एकदम आपल्या

पत्रिकेची आठवण झाली. ती सासरीं जाऊन पतीनें त्याग केल्यामुळें परत आल्यावर "हें असं कां झालं ? पोरीला पतिसुखच नाहीं काय ? तिच्या दैवांत तरी काय आहे ? एकदां तिची पत्रिका तरी पहा !" असा म्हातारीनें हट्ट धरल्यामुळें पंतांनीं तिची पत्रिका एका ज्योतिषाला दाखविण्याकरितां काढली होती. तेव्हां ती कमलिनीनें पाहिली आणि उघडून वाचली. त्या पत्रिकेंत तिचीं 'कमलिनी' 'कादंबरी' अशीं नांवें होतीं. त्या 'कादंबरी' नांवाची आतां 'नॉव्हेल' हा शब्द उच्चारतांच तिला आठवण झाली. बराच वेळ ती आपल्या नांवांचा विचार करीत होती. पत्रिका तयार करतांना आपलीं नांवें अशी काव्यमय ठेवणारा ज्योतिषी मोठा रसिक असला पाहिजे असेंहि तिला वाटलें.

मंडळी फलहाराकरितां बसली त्यावेळीं बोलतां बोलतां पुनः कमलिनीचा प्रश्न निघाला. आपल्या मुलीनें 'ग्रँट मेडिकल कॉलेजमध्यें जाण्याचें ठरविलें आहे' असें सांगतांच साहेब म्हणाला, "जयरामपंत, तुमच्या मुलीनें वैद्यकीची बाजू धरण्याचा केलेला विचार मलाहि फार पसंत आहे. अशा रीतीनें स्वतःचें दुःख विसरून तिला आपल्या आयुष्याचा परोपकारांत सदुपयोग करतां येईल पण त्याबरोबरच मी एक गोष्ट सुचवितों. मी आतां महिन्याभरानें विलायतेस जाणार आहें. तेव्हां कमलिनीला आमच्या बरोबर विलायतेस पाठवा. इथल्यापेक्षां तेथें तिचा फार उत्तम अभ्यास होईल; कारण माझा भाऊ—डॉक्टर कसेल हा तेथें फार प्रसिद्ध आहे. त्याचें स्वतःचें एक मोठें हॉस्पिटल आहे. त्याच्या स्वाधीन हिला करतांच तो तिला 'लंडन एम. डी.' करून पाठवील. शिवाय राहण्याकरितां माझें घर आहेच !—मग कसं काय ? माझी ही सूचना तुम्हाला कशी काय वाटते ? इथें जीं तीन चार वर्षे घालावयाचीं तींच विलायतेस घालविलीं तर फार फायदा होईल आणि शिवाय दुसऱ्या बाजूनें विचार केला तरी स्थान बदलल्यामुळें मानसिक आणि शारीरिक फायदेही होतील."

साहेबानें स्वतः होऊन केलेली ही योजना पंतांना पसंत पडली. आणि कमलिनीला तर फारच मानवली. आपले वडील काय उत्तर देतात हें ऐकण्याकरितां ती मोठ्या उत्सुकतेनें पंतांकडे पाहूं लागली. आपणास विलायत पाहण्यास मिळेल, आपण 'लंडन एम. डी. होऊं,' ह्या विचारानेंच तिची चर्या प्रफुल्ल दिसूं लागली. आणि पंतांनाहि अशी सोन्यासारखी आलेली सूचना कां मानवूं नये ? शिक्षणाकरितां आपलीं मुलें विलायतेस पाठवायचीं म्हणजे किती विचाराचें काम असतें. एकतर ती मोठी खर्चाची बाब ! त्यांतून तेथें मुलांवर देखरेख करणारा आणि

त्यांच्या प्रकृतीला जपणारा असा एक आस्थेचा मनुष्य सर्वांना मिळतो असें थोडेंच आहे ! कोणावर तरी एखादें शिफारसपत्र घेऊन मुलाला विलायतेस पाठवायचें किंवा एखाद्या हॉटेलमध्यें त्याची राहण्याची व्यवस्था करावयाची, परंतु ह्या व्यवस्थेनें मुलावर प्रत्यक्ष दाब नसल्यामुळें मुलगा विलायतेची हवा खाऊन परत आल्यावर त्यानें तेथें कांहीं तरी गुण उधळलेलेच येथील मंडळीच्या नजरेस येतात. आतां ही गोष्ट विलायतेहून शिकून येणाऱ्या सर्वच मुलांना लागूं आहे असें मात्र आमचें म्हणणें नाहीं. तथापि—!

कसेल साहेबाच्या हाताखालीं पंत एक वर्ष काम करीत होते. मधून मधून कांहीं कामानिमित्त त्यांच्या बंगल्यावरहि त्यांना जाण्याचा प्रसंग येत असे. तेव्हां एकंदर परिचयावरून तें जोडपें थोर घराण्यांतील असून सुशिल, सद्गुणी आणि परोपकारी आहे अशी त्यांची खात्री झाली होती. तेव्हां त्यांच्या स्वाधीन आपण आपल्या मुलीला करण्यास कांहींच हरकत नाहीं असें पंतांना वाटलें आणि ते म्हणाले, " साहेब, आपण सुचविलेली योजना खरोखरीच उत्तम आहे. इथल्या-पेक्षां विलायतेस मुलीला पाठविल्यास तिचें शिक्षण उत्तम होईल यांत शंकाच नाहीं. पण ही कल्पना ह्या पूर्वींच माझ्या मनांत केव्हांहि आली नव्हती. आणि यदा कदाचित् तसा विचार माझ्या मनांत आला असतां तरी मुलीला इतक्या लांब पाठविण्याचें मला धारिष्टहि झालें नसतें. कारण तेथें एखाद्या शिफारसपत्रावरून मी तिची व्यवस्था केली असती तरी मुलीची जात पडल्यामुळें येथें आमचा जीव नेहमीं काळजींतच असता परंतु आतां आपणच मुलीची सर्व जबाबदारी शिरावर घेतां तेव्हां प्रश्नच राहिला नाहीं मुलगी आपली आहे असं समजून तिचं कल्याण करा.

" असं आहे तर मग मुलीची तुम्हाला काळजीच नको. आतां ही मुलगी माझी आहे, " असें म्हणून मडमसाहेबानें कमलिनीला जवळ घेऊन तिच्या कपाळाचें चुंबन घेतलें.

ध्यानीं, मनीं किंवा स्वप्नीं नसतांना कमलिनीला विलायतेस शिक्षणाकरितां जाण्याचा योग अगदीं अकल्पित रीतीनें जुळून आला. मात्र घरांत सुमतीबाईला आणि म्हातारीला ही गोष्ट कळतांच त्यांनीं आकांड तांडव केलें, परंतु त्यांतल्या त्यांत म्हातारीनें विशेष ! सुमतीबाईची समजूत होण्यास फारसा उशीर लागला नाहीं. पण म्हातारीची मात्र लवकर समजूत पडेना ! " छे ! तें कांहीं नाहीं. तिला आणखी शिकून–मोठी डॉक्टरीण होऊन करायचं आहे काय ! एक तर

पोरीचं नसीब असं खडतर! त्यांतून इलायतेस पाठविल्यावर पोरीला वाळींत टाकल्यावर मग सर्वच आनंद! मी कांहीं कमूला जाऊं द्यायची नाहीं. असा भ्रष्टाकार कोणी ब्राह्मणांत केला आहे का!" इत्यादि अनेक शंका कुशंका म्हातारीनें काढून पंतांना अगदीं चैन पडूं दिलें नाहीं. परंतु पंतांनीं निश्चयच केला असल्यामुळें म्हातारीची कशीतरी समजूत केलीच!

कमलिनीला मात्र खरोखरीच अत्यानंद झाला. पार्टी आटोपून जातांना कसेलसाहेब म्हणाले, "जयरामपंत, आमच्या बरोबर मुलीला पाठविण्यांत तुम्ही मनोधैर्य दाखवीत आहांत यांत शंका नाहींच; पण आतां मी इतकेंच सांगतो कीं, ती आतां आमची आहे. तिच्या कल्याणाची जबाबदारी आमच्यावर आहे. आतां तिच्या तयारीची व्यवस्था करा.

सर्व मंडळी निघून गेल्यावर पंत ह्या अकल्पित जुळून आलेल्या योगायोगाचा विचार करीत बसले होते, जवळच सुमतीबाई आणि कमलिनीहि होती. 'कां कमू! आतां तूं विलायतेस जाणार तर!' असें म्हणून पंत आपल्या मुलीच्या आनंदांत भर घालीत असतां 'आपणास विचारण्याकरितां कोणी आलें आहे' असा निरोप घेऊन नोकर आतां आला. त्यावेळीं रात्रीचे दहा वाजले होते. अशा वेळीं आपणाकडे येणारा कोण असावा? म्हणून पंत विचार करीत असतां नोकराबरोबर एक गृहस्थ आंत आला. नमस्कार चमत्कार झाल्यावर तो गृहस्थ म्हणाला, "मी भोराहून रावबहादुर जोशी यांच्याकडून आलों आहें. मी त्यांच्याकडे कारकून आहें. त्यांनीं आपणांस हें एक पत्र दिलं आहे."

"असं काय? बसा—रावबहादुरांची प्रकृति कशी काय आहे?"

"ठीक आहे." असें म्हणून त्यानें पत्र पुढें केलें. तें घेऊन पंतांनीं फोडलें आणि वाचलें. बराच वेळ ते विचारमग्न होते. पत्रांत सर्व मजकूर शांताबाईबद्दल होता, हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल.

"शांताबाई मुंबईत आली आहे, ही गोष्ट मला आतां ह्या पत्रावरून कळते. तिचे वडील वारले त्यावेळीं मी पुण्यास गेलों होतों; तेव्हां त्या दोघां बहिण-भावंडांना मी पुष्कळ सांगून पाहिलें पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. मूर्ख आणि शेफारलेलीं पोरं! रावबहादुरांना मात्र ह्या सुनेच्या वर्तनामुळें फार ताप झाला असेल?"

"तें कांहीं विचारूं नका! रावसाहेबांच्या—वसंतरावांच्या मनावर आणि शरीरावर तर फार परिणाम झाला आहे. त्यांनीं सुद्धां हें एक पत्र दिलं आहे."

असें म्हणून दुसरें पत्र त्यानें पुढें केलें. पंतांनीं त्या पत्रावरील नांव पाहून तें आपणाकरितां नसून मुलीच्या नांवें आहे असें पाहतांच कमलिनीला हांक मारिली.

"बरं मग आतां शांताबाईचा शोध करायचा म्हणतां ? पण इथें तिचा शोध लागावा कसा ? ही मुंबई इतकी अफाट पडली आहे ! इथें तिचा शोध करायचा म्हणजे—पण मला वाटतं, सरदारगृह किंवा माधवाश्रम अशा ठिकाणीं शोध केल्यास कांहीं पत्ता लागण्याचा संभव आहे. बरं—करूं आपण त्याचा उद्यां विचार. आतां तुम्हीं उठा—अद्यापि तुमचं जेवण वगैरे व्हायचंच असेल ना ?."

वडिलांनीं हातांत दिलेलें पत्र घेऊन कमलिनी आपल्या अभ्यासाच्या खोलींत आली. पत्र वसंतरावानें पाठविलें आहे हें कळतांच तिला चमत्कारिक वाटूं लागलें. इतकेंच नव्हे तर पत्र उघडतांना तिची छाती धडधडूं लागून हात सुद्धां कांपूं लागला. कारण रावबहादुराच्या घरीं आपण पडावें अशी आपल्या आईची आणि आजीची इच्छा होती ही गोष्ट तिला माहित होती. आणि त्या इच्छेप्रमाणें आपलें वसंतरावाशीं लग्न झालें असतें तर आपण खरोखरीच सुखी झालों असतों, असा कांहीं दिवस तिच्या विचाराचा विषयही बनला होता. परंतु पुढें कांहीं दिवसांनीं वसंतरावाविषयीं विचार करणें पाप आहे, असं कळतांच तिनें तो विषय आपल्या मनांतून साफ काढून टाकला. आपणास आपल्या पतीनं टाकलं असलें तरी पति-व्यतिरिक्त इतर पुरुषाचा विचार नुसता मनांत आणणें हें महापातक आहे. असें महाभारताच्या वाचण्यावरून तिच्या मनावर ठसलें. तिच्या दुःखी मनाची तयारी करण्याकरितां सुमतीबाईला किती श्रम घ्यावे लागले, त्याबद्दलचा उल्लेख पहिल्या भागांत प्रसंगानुसार केलाच आहे. ती श्वशुरगृहाहून भग्नहृदयी होऊन परत आल्यावर तिच्या मनाला स्थिर करण्याकरितां काय करावें ह्या गोष्टीचा पंत आणि सुमतीबाई पुष्कळ दिवस विचार करीत होते. ह्यावेळीं आपण आपल्या कर्तव्यांत किंचित् कसूर केली, तर त्याचा परिणाम किती भयंकर होईल, ही गोष्ट ते जाणून होते. शेवटीं त्यांनीं आपल्या मनाशीं एका गोष्टीचा निश्चय ठरवून त्याप्रमाणें एके दिवशीं संध्याकाळीं जेवणें वगैरे झाल्यावर सर्वजण दिवाणखान्यांत बसलीं असतां पंतांनीं मुद्दाम लायब्रींतून आणलेलें एक पुस्तक कमलिनीच्या पुढें केलें आणि तें तिला वाचावयास सांगितलें. एक तासपर्यंत सर्वजण ऐकत बसले होते. मधून मधून कमलिनीनें वाचलेल्या कथानकावर त्यांच्या शंका कुशंकाहि निघत होत्या. अशा रीतीनें चार दिवस त्यांचें नित्य नियमानें वाचन आणि श्रवण चाललें होतें. आतां तें पुस्तक एक दोन दिवसांनीं वाचून पूर्ण होईल, असें पाहून

पंत म्हणाले, " छे! कमू, अशा रीतीनें कादंबऱ्या वगैरे वाचून मनाची करमणूक करून घेण्यापेक्षां कांहीं तरी माझ्या आईला आणि तुझ्याहि आईला कळेल असें उपयुक्त वाचन सुरू करूं " असें म्हणून पंतांनीं आपल्या वृद्ध मातेकडे पाहिलें तेव्हां म्हातारी म्हणाली, " चांगली रामायणाची चाळीस अध्यायांची पोथी—"

" आई, पोथी वाचायला अद्यापि कमूला वेळ आहे. ती तुझ्यासारखी म्हातारी होईल तेव्हां—"

" म्हाताऱ्यांनींच पोथी वाचावी आणि तरण्या पोरींनीं वाचूं नये असें कांहीं शास्त्र आहे वाटतं ?"

" तसं नव्हे आई. ती कथा तूं वाचीत असतां कैकवेळां तिनें ऐकली आहे. म्हणून म्हणतों कांहीं तरी नवीन पण उपयुक्त असावं असं मी म्हणतों. मला वाटतं आतां महाभारताचे मराठी भाषांतराचे भाग प्रसिद्ध झाले आहेत, तेंच सुरू करावें. मी उद्यां कचेरींतून येतांना पहिला भाग घेऊन येतों."

महाभारत सुरू करायचें हें पूर्वींच पंत आणि सुमतीबाई यांनीं ठरविलें होतें. परंतु आपण मुलीला तें मुद्दाम वाचण्यास सांगतों असें वाटूं नये म्हणून प्रथम त्यांनीं लायब्ररींतून एक पुस्तक आणून प्रघात पडला. अशा रीतीनें रात्रीं महाभारताचें वाचन सुरू झाल्यावर त्या दिवशीं वाचण्यांत आलेल्या तत्त्वांचा त्यांनीं खल सुरू केला. हळुहळू कमलिनी देखील आपल्या बुद्धिनुसार वडिलांबरोबर त्या तत्त्वांचा खल करूं लागली. तिला महाभारताची गोडी लागली. लवकरच महाभारत हा तिच्या आवडीचा ग्रंथ झाला. इतकेंच नव्हे तर तिच्या मनाची जी तयारी व्हावी अशी पंतांची आणि सुमतीबाईंची इच्छा होती. ती तयारीहि होऊं लागली, अद्यापि कमलिनीचें वाचन चालू होतें.

असो, वसंतरावचें पत्र उघडतांना प्रथम तिची थोडी चमत्कारिक स्थिति झाली. परंतु पत्राच्या शेवटीं ' तुझा एक हतभागी बंधु-वसंत ' अशी त्याची सही पाहून तिचें मन स्थिर झालें तिनें अनेकदां तें पत्र वाचून पाहिलें. त्या पत्रांत पुष्कळच गोष्टी लिहिल्या होत्या. परंतु त्या सर्वांचें सार म्हणजे ' शांता मुंबईत आहे, तिला चार समजुतीच्या गोष्टी सांगाव्या, तिचें मन वळवावें. तिच्याकडून कुळाला कलंक लागेल अशा गोष्टी होऊं न देण्याचा प्रयत्न करावा इ० '

पत्र वाचून झाल्यावर तिनें तें आपल्या वडिलांजवळ नेऊन दिलें. पंतांनीं पत्र वाचून झाल्यावर विचार करीत कमलिनीला विचारलें, " कमू, तूं हें पत्र वाचून

विचार केलाच असशील, खरं ना ? मग सांग पाहूं, वसंतरावाला असं दीनवाण्या-सारखं पत्र लिहिण्याचं काय कारण ? "

" शांतीचं वर्तन ! तिच्या मनाची संस्कृति झाली असती म्हणजे तिच्या हातून असें वर्तनच झालें नसतें. "

" आणि संस्कृति न होण्याचें कारण ? "

" गृहशिक्षणाचा अभाव. "

---

## ८........ बोलायचें नाहीं

त्या रात्रीं कमलिनीला फारच उशीरां झोंप लागली. कारण विचारांनीं तिची पाठ पुरविली होती. विलायतेस जाण्याचा विचार तिच्या मनांत येऊन थोडा वेळ होतो न होतो तोंच वसंतरावाचें पत्र तिच्या डोळ्यापुढें येऊन शांति आणि तिचा भाऊ यशवंतराव ह्या दोन व्यक्त्या तिला दिसूं लागत. पुण्यांत जवळ जवळ रहात असतां परस्परांच्या सहवासामुळें तिला शांतीचा चढेल आणि हट्टी स्वभाव पूर्णपणें अवगत झाला होता. घरचा दाब नसल्यामुळें त्या बहिण-भावंडांची प्रत्येक गोष्ट कसकशी चुकत गेली तिच्या मुळाचें चित्र तिला एखाद्या रेखलेल्या चित्राप्रमाणें स्पष्ट दिसूं लागलें. शांताबाईच्या वर्तनाला आळा घालणारें कोणी नसल्यामुळें वसंतरावानें पत्रांत लिहिल्याप्रमाणें जर कदाचित् तिच्या हातून कांहीं पाप घडलें तर कुलशीलाला आपल्या तळहातावरील फोडाप्रमाणें जपणाऱ्या वसंतरावाला किती दुःख होईल, हे विचार तिच्या मनांत येऊन अत्यंत वाईट वाटलें. आपली आणि शांताबाईची आतां भेट झाल्यास आपण शक्य तो प्रयत्न करून तिला हितोपदे-शाच्या दोन गोष्टी सांगून तिचें मन वळविण्याचा तिनें निश्चय केला. आणि ह्या विचारांतच शेवटीं तिला झोंप लागली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं दामुअण्णा—रावबहादुरांकडून पत्र घेऊन आलेला कारकून शांताबाईचा शोध करण्याकरितां बाहेर पडला. कोणकोणत्या ठिकाणीं चौकशी केली असतां पत्ता लागण्याचा संभव आहे, त्या ठिकाणाचीं नांवें पंतांनीं त्याला लिहून दिलीं होतीं. त्याप्रमाणें दामुअण्णा प्रथम सरदारगृहांत गेला, परंतु तेथें त्याला कांहीं सुगावा लागला नाहीं. तेथून माधवाश्रमांत चौकशी केली. तेथें मात्र त्याची अगदींच निराशा झाली नाहीं. शांताबाई आणि तिचा भाऊ आपल्या देसाई नांवाच्या मित्राबरोबर कांहीं दिवस माधवाश्रमांत येऊन राहिले

होते, इतकीच माहिती त्याला मिळाली. परंतु ह्यापुढें मात्र त्याला प्रश्न पडला. कारण ह्यापूर्वीं तो कधींहि मुंबईस आलेला नव्हता, त्यामुळें बोरीबंदरच्या स्टेशनवर उतरल्यापासून ह्या अवाढव्य शरीराची रचना, गाड्याघोड्यांचा सारखा धडधडाट आणि जिकडे तिकडे झकझकाट पाहून त्याची भ्रमिष्ट होण्याचीच वेळ आली होती. तथापि दामुअण्णा हुषार डोक्याचा असल्यामुळें त्यांतल्या त्यांत आपला मार्ग सुधारून घेत होता. दहा वाजण्याचे सुमारास तो परत घरीं आला. त्यावेळीं पंतांची कचेरींत जाण्याची गडबड होती. तरी त्यानें केलेला शोध ऐकून घेऊन, 'संध्याकाळीं मी आल्यावर पुढें काय करायचें, त्याचा नीट विचार करूं' असें त्यांनीं आश्वासन दिलें.

दोन प्रहरीं कमलिनी स्वस्थ वाचीत असतां आईनें मारलेली हांक तिला ऐकूं आली. हातांतील पुस्तक ठेऊन ती खालीं जाण्याकरितां उठली इतक्यांत दरवाजा उघडला. आंत येणारी व्यक्ति दृष्टीस पडतांच कमलिनी एकदम आनंदानें म्हणाली. "ओहो! या डॉक्टरीणबाई. केव्हां आलांत पुण्याहून?"

"चोराच्या उलट्या बोंबा म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. अग, मी डॉक्टरीणबाई कीं तूं डॉक्टरीणबाई? मी किती झालं तरी नांवाची-परप्रकाशी! पण तूं आतां कृतीची स्वयंप्रकाशी डॉक्टरीणबाई होणार आणि ती देखील कांहीं अशी तशी नव्हे तर 'लंडन एम. डी.'"

"बरं पण तूं आलीस केव्हां? काल तुमच्याकडे मी मुद्दाम मनुष्य पाठविला होता. कालची 'ॲट होम पार्टी' मोठी ग्रॅन्ड (बडेजावांत) झाली. डॉक्टर शेवटपर्यंत होते."

"होय. तिकडूनच तर मला सर्व गोष्टी सांगणं झालं!"

"मग काय आतां ठरल्याप्रमाणें पुण्यांत दवाखाना उघडणार तर!"

वरील संवादावरून कमलिनीला भेटण्याकरितां आलेली तिची मैत्रीण कोण होती हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल! डॉक्टर गाडगीळांची पत्नी इंदिराच ती होती. थोडे दिवस शांता आणि यशवंतराव त्यांच्या घरीं होते, तेथून त्यांना नवीन बिऱ्हाड केल्यावर लगेच इंदिरा पुण्यास माहेरीं गेली. ती इतके दिवस तेथेंच होती. परंतु आतां मुंबईतील दवाखाना मोडून पुण्यास घालावयाचा हें नक्की झाल्यावर डॉक्टरांनीं तिला चार दिवसांकरितां मुद्दाम मुंबईस बोलाविलें. कारण इतकेंच कीं, एकदां पुण्यास दवाखाना सुरू झाल्यावर कारणाशिवाय इंदिरा मुंबईत कशाला येणार!

इंदिरा, कमलिनी आणि शांता ह्या तिघीहि सहाध्यायी होत्या. त्यांतल्या त्यांत इंदिरा आणि कमलिनी ह्या दोघींची विशेष मैत्री होती. आपल्या घरीं शांता कांहीं दिवस पाहुणी होती ही गोष्ट इंदिरेनें अद्यापि कमलिनीला सांगितली नव्हती. परंतु तसें म्हणण्यापेक्षां तसें करण्यास तिला संधिच मिळाली नाहीं. कारण शांता आपल्या भावासह तिच्या घरीं असतांना किंवा यशवंतरावानें नवीन बिऱ्हाड घेऊन तेथें राहाण्यास गेल्यावर इंदिरा पुण्यास जाईपर्यंत तिची आणि कमलिनीची भेटच झाली नव्हती, परंतु आतांच्या भेटींत मात्र शांताबाईचा प्रश्न निघाला.

" इंदू, तुला अलीकडे शांतीची कांहीं बातमी कळली का ? " इतर बऱ्याच गोष्टी झाल्यावर कमलिनीनें विचारलें,

" अलीकडे म्हणजे कधीं ? मी पुण्यास गेल्यापासून कांहीं कळलं नाहीं. पण मी पुण्यास जाण्यापूर्वीं ती आणि तिचा भाऊ आमच्याच घरीं पाहुणे होतीं. "

" तुमच्या घरीं पाहुणे होतीं ? " आश्चर्यानें कमलिनी म्हणाली, " मग मला नाहीं तें कधीं सांगितलस् ? "

" केव्हां सांगणार ? मी इथे आलेंच नाहीं आणि तूंहि कधीं आली नव्हतीस. पण बाई शर्थ केली हो तिच्या भावानें! इकडचा तो कॉलेजांतला मित्र ! पण चांगली मैत्री दाखविली ! दोन दिवसांपूर्वींच त्याच्या सर्व गोष्टी उघडकीला आल्या. "

" म्हणजे ! केलीन् काय त्यानें ? "

इंदिरेनें घड्याळची सर्व हकिकत तिला सांगितली आणि त्याबरोबरच यशवंतरावानें आपल्या कचेरींत केलेल्या चोऱ्या, पुढें तो सर्व उघडकीस आलेला प्रकार सांगून ती पुढें म्हणाली, " आणि ही नोकरी देखील इकडच्याच ओळखीनें त्याला मिळालीं होती. "

" एकूण ही चोरी करण्याची यशवंताला अजून सवय आहे तर ! पण इंदु, त्यानें प्रत्यक्ष बापाच्या खिशांतली हजार रुपयांची चोरी केली तें तुला ठाऊक आहे का ? "

" होय. ती काय कमी आहे ? हें पहा—मला कालच भोरहून वसंतरावाचें पत्र आलं—" मेजाच्या खणांतील पत्र काढून कमलिनीनें तें पुढें केलें. " आतां तिचा शोध करण्याकरितां त्यांचा कारकून आमच्या घरीं आला आहे. "

कमलिनीच्या भाषणाकडे इंदिरेचें लक्ष नव्हतें. ती पत्र वाचण्यांत गुंग होती. सर्व पत्र वाचून झाल्यावर ती म्हणाली, " शांतीच्या वर्तनाबद्दल वसंतरावांना जी

भीति वाटते ती मात्र निरर्थक आहे. कारण त्याबद्दल मला बरीच माहिती आहे आणि ती खरी आहे. शांता आणि तिचा भाऊ आमच्याकडे येण्यापूर्वी माधवाश्रमांत उतरले होते. तेथें कोणी मोत्यांचा व्यापार करणारे गृहस्थ यशवंतरावाला भेटले. त्या हलकट मोतीवाल्यानें अतिप्रसंग करण्याचा घाट घातला होता, पण शांतीनें चांगलीच थप्पड मारिली."

"काय काय केलं तिनं, सांग तरी सर्व मला ?"

शांताबाईनें गोपाळराव मोतीवाल्याचा अनुभविलेला पाजीपणा अगदीं साद्यंत असा क्रमाक्रमानें इंदिरेला सांगितला होता, तोच तिनें आतां कमलिनीला सांगितला; आणि शेवटीं म्हणाली, "ती एकटीच त्याच्याबरोबर नाटकाला गेली याचंच मला राहून राहून आश्चर्य वाटतं."

बरं पण आतां ती कुठं आहे ?"

"शाळेंत मास्तरीण आहे. तिला देखील इकडच्याच ओळखीनं ही नोकरी मिळाली."

"पण ती राहते कुठं ?"

"तें नाहीं मला माहित. पण इथंच गिरगांवांत कुठेंशी राहतात. घरांत माहित आहे त्याचं बिऱ्हाड."

"मग तें मला कळविशील का घरीं गेल्यावर ? तिचा शोध करण्याकरितांच तर वसंतरावाकडून कारकून आला आहे—पण असं नको; तूं संध्याकाळीं डॉक्टरांनाच इथं पाठवून दे म्हणजे बाबा विचारून घेतील सर्व हकीकत."

सायंकाळीं पंत घरीं आल्यावर कमलिनीनें सर्व गोष्टी त्यांच्या कानावर घातल्या. शांताबाईचा पत्ता लागला हें ऐकून त्यांना समाधान झालें. आतां रावबहादुरांनीं पत्रांत लिहिल्याप्रमाणें शांताबाईच्या वर्तनाचा बाहेरून तपास करून ती काय करीत असते, तिची दिनचर्या कोणत्या प्रकारची आहे, कोणच्या संगतीनें व कोणत्या प्रकारानें राहते इत्यादि सर्व गोष्टी कळवून पुढें रावबहादुर कळवितील त्याप्रमाणें व्यवस्था करावयाची असें पंतांनीं ठरविलें होतें. दामुअण्णालाहि आनंद झाला. आपणांस मालकानें पाठविल्याप्रमाणें आपण वहिनीसाहेबांचा शोध केला त्यामुळें त्याला समाधान झालें. आतां डॉक्टर गाडगीळ आल्यावर वहिनीसाहेबांचा पत्ता कळतांच आपण समक्ष जाऊन त्यांची भेट घेऊं आणि हरप्रयत्नानें त्यांस आपणाबरोबर भोराला नेऊं म्हणजे रावसाहेबांस अत्यंत आनंद होईल इत्यादि आनंदाच्या मनोराज्यांत तो दंग होता.

डॉक्टर गाडगीळ आल्यावर त्यांच्या पुष्कळ गोष्टी झाल्या. शांताबाईवरील प्रसंग आणि यशवंतरावाचें वर्तन त्यांना कळलें. पुढें काय करायचें ह्याबद्दल त्यांनीं बराच विचार केला. यशवंतरावानें पूर्वी चोरी केली होती ही गोष्ट पंतांना माहित होती. आणि आतां ऐकलेल्या गोष्टी देखील त्याच होत्या. तेव्हां यशवंत-रावाविषयीं त्यांना सर्वस्वी निराशा वाटूं लागली. ते म्हणाले, "मला वाटतं, हा पोर आतां अगदीं कामांतून गेला. त्याला दारू पिण्याचं व्यसन आहे म्हणतां! त्यांतून हें एक मोठें—चोरी करण्याचं व्यसन जडलं आहे. मग काय.? आधीं उल्हास त्यांत हा फाल्गुन मास! केव्हां तरी डोंगरीच्या तुरुंगांत जाऊन पडेल म्हणजे झालं! चांगलं होतकरू पोर, पण ह्या व्यसनानें अगदीं कवडीमोल झालं आहे! आतां ती पोर जर ह्या दारूड्याच्या संगतींत राहील तर ती देखील भावाचं अनुकरण करायला कमी करायची नाहीं. कांहीं तरी करून ह्या पोरांना बचावलं पाहिजे."

"बचावलं पाहिजे ही गोष्ट खरी. पण कोणत्या मार्गानं?" डॉक्टरानें विचारलें.

"आतां असं करूं—" पंत म्हणाले, "उद्यां सकाळीं आपण सर्वजण त्यांच्या बिऱ्हाडीं जाऊं आणि समजुतीच्या दोन गोष्टी सांगूं. त्यानें नाहीं ऐकलं तरी शांतीला त्याच्याजवळ न ठेवतां मी तिला येथें आणण्याचा विचार केला आहे. पोरीची जात, त्यांतून ही मुंबईची पडली बकाल वस्ती! केव्हां ती पोर फसून जाईल याचा नेम नाहीं."

आपणास कळलेल्या सर्व गोष्टी पंतानीं त्या रात्रीं बसून लिहिल्या आणि रावबहादुराकडे पाठविल्या. त्याचप्रमाणें कमलिनीनें एक स्वतंत्र पत्र लिहून तें वसंतरावाला पाठविलें. शांता आपणाकडे राहण्यास आल्यावर आपण तिला तिची चुकी दाखवून 'पति हेंच आपलं दैवत.' पती शिवाय स्त्रियांना गति नाहीं' हें हरप्रयत्नानें तिच्या मनावर ठसवूं; आणि तिला परत पतीकडे पाठवूं असें कमलिनीला वाटत होतें. परंतु आपण हातीं घेत असलेलें काम किती अवघड आहे, याची तिला कल्पना देखील नव्हती.

दुसऱ्या दिवशीं ती सर्व मंडळी, पंत–डॉक्टर आणि दामुअण्णा यशवंतरावाच्या बिऱ्हाडीं आली. त्यावेळीं यशवंतराव आणि शांता चहा पीत बसलीं होतीं. एका-एकीं डॉक्टर आणि पंत आलेले पाहतांच तीं दोघेंहि चपापलीं. पांचव्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें त्या दोघांनीं नोकऱ्या सोडून आज तीन दिवस झाले होते. आतां

पुढें काय करावें हा प्रश्न आज तीन दिवस तीं सोडवीत होती. परंतु हा कधींही न सुटणारा प्रश्न त्यांच्या तीन दिवसांच्या विचारानें थोडाच सुटणार आहे ? आतां दोन दिवसांनीं महिना भरतांच, माधवाश्रमाचें बील, घरभाड्याचें बील, कर्जदाराच बील, अशी एका मागून एक बिलांची फलटण दरवाजावर उभी राहतांच त्यांना देण्याकरितां पैसे कोठून आणावे, ह्या विचारानें यशवंतराव अगदीं भांबावून गेला होता. कुठें तरी चोरी केल्याशिवाय किंवा कपडे आणि नुकतेंच विकत घेतलेलें 'फर्निचर' विकल्याशिवाय पैसा हातीं येण्यास दुसरा मार्गच नव्हता.

पंत मंडळीसह आंत आल्यावर त्यांनीं औपचारिक असा कुशल प्रश्न यशवंतरावाला विचारला. त्यांना बसण्याकरितां खुर्च्या पुढें करून यशवंतराव बाहेर जाऊं लागला. तेव्हां 'यशवंत तूंहि बैस. मला तुझ्याबरोबर कांहीं बोलायचं आहे' असें पंत म्हणाले.

"होय. मी आलों. चहा घेऊन येतों."

"आम्हांला आतां चहा नको. आम्ही चहा घेऊनच इकडे आलों." असें जरी पंतांनीं म्हटलें, तरी तिकडे दुर्लक्ष करून यशवंतराव बाहेर पडलाच! शांताबाई दरवाजाजवळच उभी होती. तिच्याकडे पहात पंत म्हणाले, "का शांते, तुम्ही मुंबईत येऊन इतके दिवस झाले, पण आम्हांला बिलकुल कळूं सुद्धां दिलं नाहींत! तुला आमचं घर माहित नव्हतं कीं काय ?" शांताबाईनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. त्यांच्याबरोबर आपल्या सासरचा कारकून आलेला पाहून ती देखील अगदीं गोंधळून गेली होती. ती उत्तर देत नाहीं असें पाहून पंत पुढें म्हणाले, "तुम्हीं दोघं इथें आलांत, यशवंतानें नोकरी धरली हें ठीकच आहे, पण तुलाहि नोकरी धरण्याची काय जरूरी होती ?—वास्तविक तुम्ही दोघानीं माझ्याकडे येऊन राह्यचं! बरं तसं नाहीं तरी निदान घरीं तरी येऊन जायचं! मी कोणी परका आहे असं तुम्हाला वाटलं काय ? शंकररावाचीं—माझ्या स्नेह्याचीं तुम्ही मुलं—पुण्यांत इतकीं वर्षें एकत्र राहिलेले, तुम्ही मला मुलांसारखींच आहांत. बरं पण हा यशवंत कसा अद्यापि येत नाहीं ? तरी मी चहा नको म्हणून म्हटलं!"

पांच मिनिटें झालीं, दहा झालीं, पंधरा झालीं, शेवटीं अर्धा तास झाला; परंतु चहा घेऊन येण्याकरितां गेलेल्या यशवंतरावाचा पत्ता नाहीं. तो बाहेर पडला तो पडला! चहाच्या निमित्तानें त्यानें आपला पाय बाहेर काढला होता. कारण आतां ही आलेली मंडळी काय बोलणार, काय सांगणार हें तो समजून चुकला होता. त्याला तोंड चुकवायचें होतें; आणि तेवढ्याकरितांच त्यानें चहाचें निमित्त केलें.

शांताबाईला मात्र तसें तोंड चुकवितां येणें शक्य नव्हतें. परंतु तिनेंहि दुसरी तोड काढली होती. तोंड चुकविणें शक्य नसलें तरी तोंड बंद ठेवणं तिला शक्य होतें. त्याप्रमाणें तिनें आपलें तोंड बंद ठेवलें होतें. पंतांनीं तिला अनेक प्रश्न विचारले. परंतु त्या प्रश्नांपैकीं एकाहि प्रश्नाचें तिनें उत्तर दिलें नाहीं. जमिनीकडे पहात ती आंतल्या दरवाजाजवळ एखाद्या दगडी पुतळीप्रमाणें स्तब्ध उभी राहिली होती. शेवटीं नऊ वाजले. पंतांची वेळ भरत आली. आपण इतकें बोललों परंतु शांताबाई उत्तरच देत नाहीं. असें पाहून ते देखील कंटाळले. आणि म्हणाले, " शांते, तूं मला उत्तर देत नाहींस आणि चहा आणण्याकरितां गेलेला यशवंतहि परत येत नाहीं, यावरून मी काय समजायचं तें समजलों. माझी आतां स्नानाची वेळ होत आली, आतां मी जातों. पण तूं हा वेडेपणा सोडून दे आणि आपल्या घरीं ये. वाटेल तर तुला नेण्याकरितां मी दुपारीं कमूला पाठवितों. "

इतकें सांगितलें तरी उत्तर नाहीं, असें पाहून पंत उठले. त्यांच्या बरोबर डॉक्टरहि उठले. दामुअण्णा मात्र उठला नाहीं. 'मी मागाहून येतों' असें म्हणून दामुअण्णा तेथेंच बसून राहिला.

" वहिनीसाहेब —" पंत आणि डॉक्टर निघून गेल्यावर दामुअण्णा म्हणाला, " मी तुम्हाला नेण्याकरितां आलों आहे. रावसाहेबांची प्रकृति बिघडली आहे, म्हणून तुम्हांला नेण्याकरितां मला मुद्दाम पाठविलें आहे. मग काय ? केव्हां निघण्याचा विचार करतां ? "

उत्तर नाहीं ! बोलायचें नाहीं असा शांताबाईनें निश्चयच केला होता !

---

## ९...... लाथांचा प्रसाद

" वहिनीसाहेब, मी अगदीं मुद्दाम तुम्हांला नेण्याकरितां आलों आहें. प्रथम आम्ही पुण्यांत शोध केला, परंतु तुम्ही आणि यशवंतराव मुंबईस निघून गेलां असें पुण्याहून आलेल्या पत्रावरून कळलें. तात्काळ रावबहादुरांनीं मला इकडे पाठविलं. योगायोगहि असाच जुळून आला कीं येथें येतांक्षणींच मला आपला पत्ता लागला. मी कालच आलों. मग काय वहिनीसाहेब, आपण आतां केव्हां निघायचं तें सांगा ! इथली कांहीं व्यवस्था करायची असेल ती सांगा ?—" दामुअण्णा बोलत होता आणि शांताबाई दरवाजाजवळ उभी राहून स्वस्थ ऐकत

होती. पंत आणि डॉक्टर निघून गेल्यापासून तो सारखा बोलतच होता. परंतु शांताबाईनें त्याला एका शब्दानेंहि उत्तर दिलें नाहीं. अगदीं बोलायचें नाहीं असा तिनें निश्चय केला होता. आपण कांहीं उत्तरच दिलें नाहीं म्हणजे बोलून बोलून कंटाळल्यावर दामुअण्णा मुकाट्यानें चालता होईल, अशी तिची खात्री होती. तो बोलत असतां स्नानाकरितां आपण निघून जावें असा विचार एक वेळ तिच्या मनांत आला. परंतु दरवाजा उघडा टाकून जाणें चांगलें नाहीं म्हणून ती आपल्या दादाची वाट पहात होती. साडेनऊ झाले तरी दादा चहा आणण्याच्या निमित्तानें गेला होता तो परत येण्याचें चिन्ह दिसेना. आतां फार थांबल्यास नळाचें पाणी बंद होईल असें पाहून ती. दामुअण्णाला तेथेंच बोलत ठेवून आंत निघून गेली; परंतु दामुअण्णा मात्र उठला नाहीं. आपण विचारलेल्या प्रश्नांपैकीं एकाचें तरी वहिनीसाहेबांकडून उत्तर आल्याशिवाय तेथून हलावयाचें नाहीं असा त्यानें देखील निश्चय केल्यासारखा दिसत होता. शांताबाई आंत निघून गेल्यावर तो स्वस्थ इकडे तिकडे पहात बसला होता. इतक्यांत यशवंतरावाची स्वारी हळूच आंत आली. पंतांना आणि डॉक्टर गाडगिळास टाळण्याकरितां तो चहा आणण्याच्या मिषानें बाहेर गेला आणि शेजारच्या उपहारगृहांत जाऊन बसला. अर्ध्या तासानें पंत आणि डॉक्टर जातांना त्याच्या दृष्टीस पडले तेव्हां तो उठला. परत आपल्या बिऱ्हाडाजवळ येतांच आंत कोणी बोलत आहे, असें त्यानें ऐकलें, तेव्हां दरवाजाजवळ उभे राहून आंत काय भाषण चाललें आहे तें तो ऐकूं लागला. ‘ वहिनीसाहेब, मी तुम्हाला नेण्याकरितां आलों आहें. कधीं निघायचं ?—इथली काय व्यवस्था करायची असेल ती सांगा ?—’ इत्यादि दामुअण्णानें उच्चारलेलें भाषण त्यानें आडून ऐकलें. त्याबरोबर त्याच्या डोक्यांत कांहीं विचार आले. आपल्या बहिणीला नेण्याकरितां तो आला आहे आणि शिवाय येथील व्यवस्थाहि करण्याची तयारी आहे म्हणतो, तेव्हां ह्या संधीचा फायदा घेऊन येथील बिलें त्याला चुकतीं करण्यास सांगून शांतीला त्याच्याबरोबर पाठवून द्यावें, म्हणजे आपण मोकळे होऊं असा विचार यशवंतरावाच्या मनांत आला.

“ कसं काय ? तुम्ही अद्यापि बसलां आहांत का ? ” आंत आल्यावर यशवंतरावानें विचारलें.

“ होय. अझून वहिनीसाहेब कांहीं माझ्याबरोबर बोलल्या नाहींत. ”

“ मग ती गेली कुठं ?—स्नानाला गेली वाटतं ?—होय—” आंत डोकावून यशवंतराव म्हणाला, “ तुम्ही आपल्या वहिनीसाहेबांस नेण्याकरितां आलां आहांत काय ? ”

" होय. आलों आहे नेण्याकरितां. पण वहिनीसाहेब कांहीं बोलतच नाहींत. त्यांचा येण्याचा विचार आहे किंवा नाहीं हें कांहींच कळत नाहीं. "

" त्याला कांहीं कारणं आहेत. पण तीं तुमच्या नाहीं लक्षांत येणार ! चला—माझ्याबरोबर बाहेर चला म्हणजे मी सर्व कांहीं सांगतों. चला—" असें म्हणून यशवंतरावानें कोट टोपी चढविली; आणि रस्त्यावर आल्यानंतर तो म्हणाला, " हें पहा—आमची शांताबाई सासरीं परत जायला फार उत्सुक झाली आहे. पण एका गोष्टीमुळें—आतां उघडच सांगतों, मी हल्लीं थोडा संकटांत असल्या-मुळें ती इथें मला एकट्याला सोडून जाण्यास तयार नाहीं. "

" आपण कोणत्या संकटांत आहांत ? "

" संकट म्हणजे कांहीं विशेष नाहीं. माझी नोकरी सुटल्यामुळें घरभाडं, तसंच माधवाश्रमाचं बील शिवाय किरकोळ एकदोन देणीं आहेत, तीं देतां यावीं म्हणून तर तिनें नोकरी धरली. "

" वहिनीसाहेबांना न येण्याचं इतकंच जर कारण असेल तर मीं तीं सर्व देणीं देऊन टाकतों. मला रावबहादुरांनीं तसा हुकूमच केला आहे. "

" असं असेल तर उत्तमच आहे. एकंदर रक्कम कांहीं फार नाहीं. होईल पन्नास साठपर्यंत. "

" इतकीच रक्कम असेल तर ती मीं आतांच देतों. मग वहिनीसाहेबांस माझ्या बरोबर उद्यां यावयास कांहीं हरकत नाहीं ना ? " दामु अण्णानें आपल्या खिशां-तून पाकिट काढून दहादहाच्या सहा नोटी यशवंतरावाच्या हातावर ठेवल्या.

" आतां कसली हरकत ? मी आतां हे पैसे चुकते करून घरीं जातों आणि तिला सर्व सांगून तिच्या निघण्याची तयारी करतों. तुम्हीं आतां जा—अझून तुमचं स्नान जेवण वगैरे व्हावयाचं असेलच ! "

दामुअण्णा गेल्यावर त्याच्याकडे पहात यशवंतराव स्वतःशीं हंसूं लागला. इतक्या सहजासहजीं साठ रुपये आपल्या हातांत आलेले पाहून तो म्हणाला, " आहे—ईश्वराला माझी काळजी आहे ! अगदीं बिन श्रमानें हे पैसे माझ्या हातीं आले. बोलून चालून गांवढळच तो ! एक थाप मारतांच चकला ! "

प्रथम माधवाश्रमाचें बील चुकतें करावें ह्या उद्देशानेंच यशवंतराव त्या बाजूला वळला. परंतु रस्त्याच्या वळणावर " इंग्लिशबार " दृष्टीस पडतांच त्याचा पहिला विचार एकदम बदलला. आतां त्याच्या खिशांत पैसे होते आणि आज चार दिव-सांत त्याचें आवडतें पेय त्याला मिळालें नव्हतें, अशा स्थितींत पुढें ' इंग्लिशबार '

दृष्टीस पडतांच त्याला दुसरा विचार सुचणें शक्य तरी होतें काय ? एकवेळ त्यानें आजूबाजूला पाहून चटकन् 'बार' चा दरवाजा ओलांडला !

दोन प्रहरीं दोन वाजून गेल्यावर एक व्हिक्टोरिया गाडी येऊन दरवाजाजवळ उभी राहिली. गाडीचा आवाज ऐकतांच कोण आलें आहे, त्याची शांताबाईला नेहमींच्या अनुभवावरून सहजीं कल्पना झाली. परंतु दादा आज गाडींतून कसा आला हा दुसराहि विचार तिच्या मनांत तात्काल आला. कारण दादाजवळ आज चार दिवस एक पैसाहि नाहीं आणि पैसा येण्याचा मार्गहि नसतांना आपला दादा गाडींतून आला आहे तेव्हां तो नेहमींप्रमाणें दारूच्या पूर्ण निशेंत असून कोणाजवळून तरी त्यानें पैसे उसनेच आणले असतील असें तिला वाटलें. थोड्या वेळानें तिच्या कल्पनेची सत्यता पटविण्याकरितांच यशवंतरावानें खाड्-दिशीं दरवाजा उघडला. सरळ उभें राहण्याचीहि त्याच्या पायांत शक्ति नव्हती; इतका तो दारूच्या निशेंत पूर्ण तर्र झाला होता.

"दादा, हें काय ! अरे तूं चहा आणण्याकरितां ना गेला होतास ! आतां वाजले किती ?–पहा, दोन वाजून गेले—"

"च–हा–विलायती चहा–घेऊन आलों–काय समजलीस ?"

"समजलें विलायती चहा घेऊन आलास–मोठा उपकार केलास तें समजलें. पण तुला पैसे दिले कोणी ?"

"पैसे !–अग काय तोटा आहे पैशाला ?–हें हें पहा—" असें म्हणून मोठ्या ऐटीनें झोकांड्या खात त्यानें खिशांतून पांच नोटी काढून दाखविल्या. "तो गांवढळ आला आहे ना ?–तो–तु–तूं–तुला नेण्याकरितां—"

"म्हणजे दादा ? तूं हे रुपये दामुअण्णांकडून घेतलेस कीं काय ?"

"दामुअण्णा का तो ?–हंःहंःहंः–मग हा दामुअण्णाचाच चहा–दामुअण्णाचा विलायती चहा—वारे दामुअण्णा–!"

तों दामुअण्णा खरोखरीच आंत आला. यशवंतरावाला सोडल्यानंतर तो घरीं गेला आणि आपण काय व्यवस्था केली, ती पंतांना कळवून आज वहिनीसाहेब आल्यास त्यांना आपण बरोबर घेऊन जाऊं असेंहि त्यानें पंतांना कळविलें. शांता बाई जात असेल तर तिला अवश्य न्यावें असें पंतांचेंहि मत पडलें. आपण केलेली गोष्ट पंतांना पसंत पडली, याबद्दल दामुअण्णाला आनंद झाला होता. आतां भोरला गेल्यावर वहिनीसाहेबांचें आपण मुंबईतील कर्ज भागविलें आणि चार दिवसांच्या आंतच त्यांना बरोबर घेऊन आलों, ह्या आपल्या कामगिरीबद्दल राव-

बहादुराकडून आपणास शाबासकी मिळेल ह्या आनंदांत त्यानें आपलें जेवण आटोपलें आणि पुनः वहिनीसाहेबांना भेटण्याकरितां तो आतां परत आला होता.

" यशवंतराव, काय झालं पुढें ? करून टाकलींत ना सर्व बिलं चुकतीं ? " दामुअण्णानें विचारलें.

आतां आपल्या दादाच्या तोंडून कांहीं तरी मुक्ताफळें बाहेर पडतील असं वाटून शांताबाई पुढें होऊन म्हणाली," दादा, उठ–जेवण अगदीं थंड झालं ! केव्हांपासून डबा येऊन पडला आहे, उठ–उठ म्हणतं ना ? " आपल्या दादाची अब्रु सांभाळण्याचा शांताबाईनें प्रयत्न केला; परंतु तो फसला ! यशवंतराव उभे राहाण्याचा हिय्या करून उभा राहूं लागला पण निशेमुळें लटपटणारे त्याचे पाय एकमेकांत गुंतूं लागले.

" दा–दा–मु–अण्णा–चला उठा–चला. जेवायला–तुम्हाला देऊं–दामु–मू–अण्णा –आ–विलायती चहा–" यशवंतरावाच्या तोंडून शेवटीं मुक्ताफळें बाहेर पडूं लागलींच !

" दामुअण्णा, तुम्ही दिलेत का दादाला पैसे ! " शेवटीं न बोलण्याचा आपला निश्चय शांताबाईला मोडावा लागला. बिचारा दामुअण्णा हा प्रकार पाहून अगदीं थिजून गेला. यशवंतराव दारू पितात हें त्याला अद्यापि माहीत नव्हतें. तो गोंधळून म्हणाला, तुमचीं कांहीं देणीं द्यावयाचीं आहेत असं सांगून सकाळीं त्यांनीं मजकडून साठ रुपये घेतले, आणि म्हणाले, आतां तुमच्या वहिनीसाहेब तुमच्याबरोबर येतील. "

" मी साफ यायची नाहीं. पण मधल्या मध्येंच हे रुपये तुम्हाला द्यायला सांगितलं कुणी ?–दादा, कुठें आहेत त्या नोटी ? दे त्या परत ! " त्याच्या खिशांतून नोटी काढण्याकरितां शांताबाईनें हात त्याच्या खिशांत घातला. त्याबरोबर 'अग–चल–' असें म्हणून त्यानें तिला जोराचा धक्का दिला पण त्याचा परिणाम उलट झाला. भिंतीवर चेंडू फेंकून मारला असतां भिंत मागें न जातां उलट चेंडूच मागें येतो, त्याप्रमाणें यशवंतरावाचें झालें. त्या धक्यानें रागावलेली शांताबाई मागें न जातां उलट यशवंतरावच कोलमडून बाजूला पडला परंतु शांताबाईनें त्याच्या पडण्याकडे लक्ष दिलें नाहीं. दामुअण्णाकडून–आपल्या सासरच्या नोकराकडून दादानें पैसे घेतले, हा अपमान तिला सहन झाला नाहीं. तिनें पुनः त्याच्या खिशांतून नोटी काढण्याचा प्रयत्न केला. परंतु तिच्या प्रयत्नाला तो थोडीच दाद देणार होता ? त्यानें पडल्या पडल्या लाथा झाडण्यास सुरवात केली परंतु शांताबा-

ईनें त्याच्या लाथा चुकवून पुनः प्रयत्न केला. दादाच्या खिशांतून नोटी काढून घेऊन त्या दामुअण्णाला परत द्यावयाच्या आणि त्याला जावयाला सांगायचें असा तिनें विचार केला होता. तिच्या हालचाली वरून ती आतां आपणाजवळच्या नोटी काढून घेणार असें पाहून यशवंतरावानेंहि त्या न देण्याचा निश्चय केला, शेवटीं शांताबाई त्याच्या अंगाला झोंबूं लागली. तेव्हां त्यानें हातपाय झाडण्यास सुरवात केली. ती खालीं वांकली असतां त्याची लाथ तिच्या छातींत बसली. तरी देखील शांताबाई मागें होईना असें पाहून त्यानें अंगांत होता नव्हता तेवढा जोर करून तिच्या तोंडावर हाताचा फटका मारला. आतां हें प्रकरण विकोपाला जात आहे असें पाहून दामुअण्णा पुढें झाला. तो देखील आपल्या खिशांतून पैसे काढून घेण्याकरितां आला आहे, असें वाटून यशवंतरावानें त्याच्यावरहि लाथांचा प्रयोग सुरू केला. दामुअण्णानें प्रथम विशेष जोर केला नाहीं तो आपल्या वहिनी-साहेबांचा भाऊ आहे तेव्हां दमादमानेंच घ्यावें, अशा पोक्त विचाराखालीं यशवंत-रावाच्या दोन चार लाथा त्यानें खाल्ल्या. परंतु त्याची पांचवी लाथ कुसाटांत बसतांच दामुअण्णानें त्याला गुढघ्याखालीं दाबलें. त्याबरोबर " मेलों—मेलों—धांवा—! " असा यशवंतरावानें मोठ्यानें शंख करण्यास आरंभ केला. क्षणार्धांत बाजूचे बिऱ्हाडकरू धांवत आले. सर्वच गोंधळ उडाला ! बिचारा दामुअण्णा ओशाळून मुकाट्यानें दूर होऊं लागला. पण आतां आजुबाजूची मंडळी आलेली पाहून यशवंतरावाला नवा जोर आला. त्यानें दामुअण्णाला अभद्र शिव्या देत त्याचा अंगरखा धरून जोरानें ओढला तो त्याच्या हातून सोडविण्याचा प्रयत्न करीत असतां यशवंतरावानें धोतर धरलें. शेवटीं बाजूच्या मंडळींनीं मध्यस्थी होऊन यशवंतरावाच्या हातून दामुअण्णाची सुटका केली. परंतु परिणाम काय झाला ? त्या गरिबाचें धोतर आणि अंगरखा दोन चार ठिकाणीं हातभर फाटलें आणि वर शिव्या मिळाल्या त्या निराळ्याच !

" दामुअण्णा, तुम्ही पैसे दिले नसते तर हा इतका प्रकार झाला नसता. आतां तुम्ही येथून जा. "

" पण वहिनीसाहेब, तुमच्या दातांतून रक्त येत आहे. "

" रक्त येऊं द्या—कीं वाटले तें होऊं द्या पण आतां तुम्ही येथून जा. "

" मग रात्रीं निघायचं करतां कां ? "

" मी साफ यायची नाहीं असं एकदां सांगितलं. तुम्ही येथून जा—"

आतां मुकाट्यानें येथून पाय काढावा असा दूरवर विचार करून दामूअण्णा

बाहेर पडला. शांताबाई म्हणजे त्याच्या ' वहिनीसाहेब ' असल्यामुळें त्याला पड घ्यावी लागली. नाहींतर त्यानें यशवंतरावाची कणीक मऊ करायला बिलकुल कसुर केली नसती. परंतु करतो काय ? वहिनीसाहेबांचा भाऊ म्हणून त्यानें मूग खाल्ले ! बिचारा मुकाट्यानें चालता झाला. तो गेलेला पाहतांच आजुबाजूची जमलेली मंडळी हळुहळू निघून गेली. यशवंतराव दारू पीत असतो ही गोष्ट सर्व बिऱ्हाडकरूंना माहिती होती. मंडळी जातांच शांताबाईनें दरवाजा बंद करून घेतला.

दामुअण्णा घरीं आला त्यावेळीं कमलिनी बाहेरच्या दिवाणखान्यांत वर्तमानपत्र वाचीत बसली होती. त्याला पाहून ती म्हणाली, " काहो दामुअण्णा, काय ठरलं तुमचं जायचं ? येणार का शांता ?—पण हें काय ? तुमचं धोतर आणि अंगरखा कशानें इतका फाटला ? पडलांत वाटतं वाटेंत ? "

दामुअण्णानें घडलेला सर्व वृत्तांत तिला सांगितला. कमलिनीला फार वाईट वाटलें. पुनः हीच हकीकत सायंकाळीं पंत आल्यावर त्यांना दामुअण्णानें सांगितली. आतां पुढें काय करावें हा पंतांना मोठा विचार पडला. शेवटीं जेवणानंतर आपण पुनः एकवेळ तेथें जावें असें ठरवून जेवण झाल्यावर ते दामुअण्णाला बरोबर घेऊन निघाले. यशवंतरावाच्या बिऱ्हाडीं येऊन पाहतात तों खोलीला कुलूप ! शेजारीं चौकशी करतां त्यांना कळलें कीं, थोड्या वेळापूर्वीं तीं दोघंजणं भाड्याची गाडी करून कुठें बाहेर निघून गेलीं. ' आज नाटकाचा दिवस आहे, तेव्हां कदाचित् नाटकाला गेलीं असतील. कारण येथें राहायला आल्यापासून आम्ही पाहतों, शनवार बुधवारचें नाटक कांहीं त्यांचं सुटत नाहीं. ' असें शेजारच्या एका गृहस्थानें सांगितलें, तें ऐकून पंत म्हणाले, " पाहिलंत दामुअण्णा, मीं म्हटलं ना हीं बहकलेलीं पोरं ! कोणाचा दाब नाहीं कीं कोणी बोलतं नाहीं ! मनाला येईल तशीं वागतात ! चला, आतां मुकाट्यानें घरीं जाऊं ! रावबहादुरांनीं पत्र लिहिलं म्हणून मी हे श्रम घेतले. नाहींतर पुण्यास त्या दोघांचें वर्तन जेव्हां मी स्वतः पाहिलं तेव्हांच हें भविष्य करून ठेवलं होतं ! चला—आतां येथें उगाच वेड्यासारखं त्यांची वाट पहात उभं राहाण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तुम्हाला मात्र मधल्या मध्यें लाथांचा प्रसाद मिळाला ! "

---

त्या दिवशीं दुपारीं यशवंतरावानें केलेलें नाटक गेल्या प्रकरणांत सविस्तर दिलें आहे. त्यानंतर संध्याकाळपर्यंत तो निशेंत अगदीं पडून होता. आतां आपण कांहींहि बोललों तरी त्याचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं, हें शांताबाईला चांगलें माहित होतें. ती मुकाट्यानें खिडकीजवळ बसून झाल्या गोष्टीचा विचार करीत होती. इतकें जरी तिनें प्रसंग अनुभविले तरी आपलें कुठें तरी चुकत आहे, यांची तिला कल्पनाहि होत नव्हती किंवा ती त्याबद्दल विचार मुद्धां करीत नव्हती. फक्त, आतां पुढें काय करायचें, ह्या एका विचाराशिवाय दुसरा कोणताच विचार तिच्या मनांत येत नव्हता. संध्याकाळच्या सुमारास तिचा गाल आणि दांत दुखूं लागले. यशवंतरावानें तिच्या तोंडावर मारलेला फटका बराच जोराचा होता. प्रथम थोडा वेळ तिच्या दांतांतून रक्त आलें. परंतु त्यावेळीं तिला विशेष दुःख झाल्यासारखें वाटलें नाहीं. परंतु संध्याकाळ होतांच तिला दुःख जाणवूं लागलें. इतक्या अवधींत यशवंतरावहि आपल्या निशेंतून सावध होऊं लागला. अद्यापि त्याला जेवणाची शुद्धीहि नव्हती. त्याची हालचाल चाललेली शांताबाईच्या लक्षांत आली परंतु तिनें एक चकार शब्दहि उच्चारला नाहीं. आपली बहीण आपणावर रागावली आहे हें यशवंतराव जाणून होता. आणि तिचा राग दूर कसा करावा हेंहि त्याला चांगलें माहीत होतें. चांगले कपडे घालून बाहेर जाण्याचीं, त्याचप्रमाणें नाटक, सिनेमाची तिला हौस फार आहे. हें त्याला ठाऊक होतें; त्यामुळें तिच्या रागाचें त्याला विशेष महत्त्व वाटलें नाहीं. दिवे लागण्याच्या सुमारास त्याची निशा साफ उतरली, तेव्हां तो मुकाट्यानें उठला आणि तोंड वगैरे धुवून बाहेर पडला. शांताबाई कांहींच बोलली नाहीं किंवा आपल्या जागेवरून उठली देखील नाहीं. थोड्या वेळानें यशवंतराव हातांत कांहीं पुडे घेऊन आला आणि टेबलावर ठेऊन म्हणाला, " शांते, चल ये— ही पहा गरम गरम भजीं आणि चिवडा आणला आहे. मागून गरम चहाची आर्डरही देऊन आलों आहें. उठ—" बराच वेळ झाला परंतु शांताबाई उठेना असें पाहून तो पुढें म्हणाला, " तूं आतां वेळ करशील तर सगळं गाडं फसेल. मी आज सिनेमाचे तीन प्रोग्राम पाहण्याचा विचार केला आहे. प्रथम जाऊं 'अमेरिका इंडिया' सिनेमाला; तेथून 'इंपिरिअल' आणि शेवटीं जाऊं 'रॉयल ऑपेरा हाऊस.' चल उठ—"

शस्त्र लागूं पडलें ! शांताबाई हळुहळूं उठून आपल्या भावाजवळ येऊन बसली. आणि फराळ करीत करीत म्हणाली "ही पहा, मला हें भजं सुद्धां चावत नाहीं. पहा माझा गाल कसा सुजला आहे तो ! किती जोरानं माझ्या तोंडांत तूं भडकाविलीस ?"

"ताई, मघां माझ्याकडून अगदीं मूर्खपणाचं केवळ पशुसारखं वर्तन झालं खरं ! आणि त्याबद्दल मला आतां अत्यंत वाईटहि वाटत आहे. पण तूं का बरं मध्येंच आलीस ?"

"मी का मध्यें आलें ? दादा, तुला हें करणं शोभतं का ? त्या दामुअण्णा जवळून रुपये घेण्याची तुला काय जरूरी होती ?"

"वाः—जरूरी नव्हती असं कसं म्हणतेस ! मग आतां हें फराळाचं आलं कोठून ! आणि पैसे घेतले त्यांत मी वाईट तें काय केलं ! ह्या चोराचं घ्या काय ! स्वतः उपभोगायचं नाहीं किंवा दुसऱ्याला उपभोगूं द्यावयाचं नाहीं; अशांचे पैसे ते आमचेच पैसे असं मी समजतों."

फराळ आणि चहा झाल्यावर यशवंतराव कपडे करून तयार झाला. तो जाऊन भाड्याची गाडी घेऊन येईपर्यंत शांताबाईहि तयार झाली. दोघेंहि गाडींत बसलीं आणि ठरल्याप्रमाणें सिनेमा पाहण्याकरितां निघून गेलीं. त्यांची गाडी गेल्यावर थोड्या वेळानें पंत आणि दामुअण्णा आले. परंतु त्यांना निराश होऊन परत जावें लागलें हें गेल्या प्रकरणांत वर्णन केलेंच आहे. त्या रात्रीं आणखी दहा रुपये उडाले परंतु त्याबद्दल यशवंतरावाला मुळींच फिकीर वाटली नाहीं. अद्यापि त्याच्याजवळ चाळीस रुपये शिल्लक होते.

आपलें कर्तव्य म्हणून दुसऱ्या दिवशीं सकाळीं दामुअण्णा आपल्या वहिनीसाहेबांस भेटण्याकरितां त्यांच्या बिऱ्हाडीं आला. आधल्या दिवशीं रात्रीं पंताबरोबर तो आला होता. तेव्हां दरवाजाला बाहेरून कुलूप होतें आणि आतां आंतून कुलूप होतें. वास्तविक त्या वेळीं सकाळचे आठ वाजले होते. परंतु अद्यापि शांताबाई आणि यशवंतराव स्वस्थ झोंप घेत होते. आतां त्या दोघांना कसलीच काळजी नव्हती. यशवंतरावाला कचेरींत जावयाची घाई नव्हती कीं, शांताबाईला शाळेंत हजिरी द्यावयाची नव्हती. त्यांतून आधल्या रात्रीं त्यांना दोन वाजेपर्यंत जाग्रण झालें होतें. मग त्या दोघांनीं इतक्या लवकर कां बरें उठावें ? दामुअण्णानें दोन चार वेळां कडी वाजविली. परंतु आंतून कांहीं उत्तर आलें नाहीं. मात्र एक दोन जोरानें धक्के देतांच 'कोण आहे ?' म्हणून यशवंतरावानें पडल्या पडल्या

विचारलें. शांताबाईनें हळूच उठून खिडकीच्या फटींतून बाहेर पाहिलें. दामुअण्णा दृष्टीस पडतांच तिनें आपल्या दादाला बाहेर कोण आलें आहे, तें सांगितलें. तेव्हां तो म्हणाला, "शांते उघडूं नकोस दरवाजा. राहूं दे त्याला बाहेरच कोकलत"

दोघांचें एकमत झालें. दरवाजा उघडावयाचा नाहीं असें ठरल्यावर त्या दोघांनीं आंतल्या आंत आपले कारभार सुरू केले. शांताबाईनें स्टोवर चहा केला. परंतु दुधाची अडचण पडलीच! अद्यापि दामुअण्णा बाहेरच्या सज्जावर उभा, होता. मधून मधून तो 'अहो यशवंतराव' 'वहिनीसाहेब—अहो वहिनीसाहेब' अशा हांका मारून दरवाजाला धक्के देतच होता. दोन तास बाहेर उभे राहून शेवटीं तो देखील कंटाळला आपणास भेट द्यायची नाहीं. आणि म्हणून दरवाजा उघडीत नाहींत, हें त्याच्या लक्षांत आलें. आतां पुढें काय करावें, हें पंतांना विचारून ठरवावें, असा विचार करून तो तेथून निघाला. घरीं आल्यावर त्यानें हा झालेला सर्व प्रकार पंतांना सांगितला.

"बाबा, मी दुपारीं जाऊं कां?" जवळच उभी असलेली कमलिनी म्हणाली.

"माझ्याहि मनांत तेंच आहे." पंत म्हणाले. "तूं कांहीं प्रयत्न करशील तर ह्या पोरीचा तरणोपाय आहे. नाहीं तर ही पोर फुकट जाईल."

कमलिनीनें आतां चंग बांधला. तिला शांताबाईच्या बाबतींत किती यश येतें हें पहाणें आहे. बाकी आपण यश मिळवूं असें तिचें मन तिला सांगत होतें. दुपारीं आपणाबरोबर दामुअण्णाला घेऊन ती ठरल्याप्रमाणें शांताबाईला भेटण्याकरितां आली. त्यावेळीं यशवंतराव बाहेर गेला होता. एकटी शांताबाई मानापमान नाटकाचें पुस्तक घेऊन स्वतःशीं गुणगुणत बसली होती. कमलिनीला पाहतांच ती प्रथम चपापली! क्षणभर ती तिच्या मुखाकडे पहात राहिली. तिची चर्या तिला अत्यंत सतेज आणि सुंदर दिसली. एक प्रकारचें तेज तिच्या मुखावर झळकत आहे असाच शांताबाईला भास झाला. पुणें सोडल्यापासून त्या दोघींची भेटच झाली नव्हती. तिचा पतीनें त्याग केला ही गोष्ट कळल्यापासून 'कमू म्हणजे एक दुर्दैवी प्राणी आहे असें ती समजत होती. तिला महत्त्व देण्यासारखें आतां कांहीं उरलें नाहीं अशा समजुतीनें शांताबाईनें आमच्या कथानायिकेविषयीं केव्हांहि मनांत विचार आला नाहीं. परंतु आज इतक्या महिन्यांनीं तिला प्रत्यक्ष पाहतांच ती गोंधळून गेली. ती वाचीत बसली होती, त्याच्या पलीकडे भिंतीला टांगलेला मोठा आरसा होता. त्या आरशांत तिला तेथें बसून स्वतःचें प्रतिबिंब स्पष्ट दिसत होतें. त्यावरून तिला स्वतःचा चेहरा आणि पुढें उभी असलेल्या

कमलिनीचा चेहरा ह्या दोन्ही चेहऱ्यांची तुलना करतां आली. ज्या आपल्या स्वतःच्या चेहऱ्यविषयीं पूर्वी तिला अभिमान वाटत होता, तोच तिचा चेहरा कमलिनीच्या चेहऱ्याबरोबर तुलना करतांच फिक्कट आणि काळवंडलेला दिसूं लागला !

" का शांता, काय चाललं आहे ? दादा कुठें गेला ? तूं मुंबईस आली आहेस हें मला माहित देखील नव्हतं. नाहीं तर परवां आमच्या घरीं 'ॲट होम पार्टी' झाली, तेव्हां तुम्हांला मी बोलाविलं असतं ! बरं पण शांता, तूं म्हणे आतां मास्तरीण झाली आहेस ? परवां इंदू आली होती, ती सांगत होती. मग आज नाहीं ती शाळेंत गेलीस ? रजा आहे वाटतं ? "

" रजा नाहीं. मी शाळेंतील नोकरी सोडली. पण कमू, उभी का ? बैस. "

" हें काय मानापमान नाटक वाचतेस वाटतं ? " शांताबाईजवळ बसल्यावर कमलिनी म्हणाली. " शांता, किती तरी दिवसांनीं—नव्हे कित्ती कित्ती महिन्यांनीं आज आपली भेट होत आहे. मला तुझ्याबरोबर किती तरी बोलायचं त्याहे. तूं आतां ह्या दामुअण्णांच्या बरोबर आपल्या घरीं जाणार आणि मीहि एका महिन्यानें विलायतेला जाणार. तेव्हां आतां आपण अगदीं एकमेकीच्या सहवासांत राहून सारखं बोलत बसूं. होय ना शांता ? पण तूं आतां आमच्या घरीं केव्हां येणार ? चल—आतांच चल—मला किनई शांता, तुला किती तरी सांगायचं आहे. खरंच सांगूं का ? अगदीं डोंगराएवढं सांगायचं आहे. " असें म्हणून कमलिनीनें तिच्या गळयांत अत्यंत लडिवाळपणानें हात घातला. लहानपणाच्या मैत्रिणी एकत्र झाल्यावर असा प्रेमाचा पाझर फुटायचाच !

' खऱ्या प्रेमाच्या सहानुभूतीचा शब्द अंतःकरण हलवितो,' ही गोष्ट अगदी सत्य आहे. कमलिनींचा हात गळयांत पडतांच शांताबाईच्या डोळयांत खळकन् पाणि आलें. इतक्या प्रेमानें तिच्या गळयांत कोणी हात घातला होता ? तिच्या आईबापांनीं तिला कधीं जवळ घेतलें असेल. पण त्याची तिला आठवण नव्हती. तिला कळूं लागल्यापासून—ती शाळेंत जाऊन र ट् फ् करूं लागल्यापासून तिचें आपल्या आईबरोबर कसें धिंगाण्याचें वर्तन होतें, तें पहिल्या भागांत वर्णन केलेलें आहे. पतिबरोबर तिचें किती सूत होतें, हेंहि वाचकांना माहित आहे आणि भावाच्या प्रेमाची साक्ष अद्यापि तिच्या **गालावर** आहेच ! अशा स्थितींत कमलिनीच्या प्रेमळ सहानुभूतीनें तिचें मन द्रवलें यांत आश्चर्य नाहीं, सलामीबरोबर आपली छाप पडली, हें कमलिनीच्या लक्षांत आलें. शांताबाईच्या डोळ्यांत आलेले अश्रु

तिनें पाहिलें. आतां पुढें काय केलें पाहिजे हेंहि ती जाणून होती, म्हणून तिनें शांताबाईच्या अश्रुकडे दुर्लक्ष करून आपलें भाषण खंड पडूं न देतां पुढें बोलाविलें. ती म्हणाली, " परवां आमच्या घरीं बाबांच्या साहेबाला पार्टी झाली. त्या वेळीं असा एक चमत्कारिक योग जुळून आला. साहेब आतां पेन्शन घेऊन जाणार आहेत. आणि जातांना ते मला विलायतेला नेणार आहेत. बाबा आणि आई यानीं मला साहेबांच्या बरोबर जाण्यास परवानगी दिली पण आजीनें सुद्धां आपली संमति दिली. शांता, आमच्या आजीनें—जुन्या काळच्या जुन्या विचारांच्या आजीनें देखील मला विलायतेला जाण्याची परवानगी द्यावी याचें तुला आश्चर्य नाहीं का वाटत ? "

" आश्चर्य तर खरंच ! पण कमू. तुला तुझ्या पतिराजाकडून मिळाली का जाण्याला परवानगी ? "

" बाबा तिकडे आज पत्र लिहिणार आहेत. पण त्याचा कांहीं उपयोग होईल असं नाहीं मला वाटत ! कारण आतांपर्यंत बाबांनीं आणि मी कितीतरीं पत्रं लिहिलीं. परंतु तीं सर्व जशींच्या तशीं पोष्टांतून परत आलीं. आज बाबा तें पत्र लिहिणार आहेत तें देखील तसंच परत येईल अशी माझी खात्री आहे. "

" मग कशाला पत्र लिहितां ? "

" आपलं अर्तव्य आहे म्हणून ! "

" मी तर अशांचं नांव देखील घेतलं नसतं ! ज्यांना आपली जरूरी नाहीं, त्यांच्या बाबतींत कर्तव्य कसलं ? "

" आणि जरूरी असती तर ? "

" असती तर प्रश्न निराळा होता, "

" निराळा म्हणजे कसा, तें तरी मला एकदां कळूं दे ? "

" जरूरी असती तर त्यांच्या संमतीनें आपण सर्व गोष्टी करणं हें आपलं कर्त्तव्य आहे. "

" अहाहा ! शांता, किती सोन्याचें बोललीस तूं ! ही तुझी विचारक्रान्ति पाहून खरोखरीच मला अत्यंत आनंद झाला आहे. " असें म्हणून कमलिनीनें तिचे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन ते मोठ्या आनंदानें दाबले. परंतु असें करण्याचा काय अर्थ त्याचा शांताबाईला प्रथम बोध झाला नाहीं. आपण साहजिक बोललों त्यांत कमलिनीला इतका काय अर्थ सांपडला याचा ती स्वतःशीं विचार करूं लागली.

" शांता, ज्यांना आपली जरूरी आहे, त्यांच्या संमतीनें, त्यांच्या मताप्रमाणें गोष्टी करणं हें आपलं कर्तव्य आहे, ही गोष्ट खरीना ? मग तूं आपल्या कर्तव्यांत चुकत आहेस असं नाहीं का तुला वाटत ? वसंतरावांना तुझी जरूरी आहे, त्यांनीं तुला मुद्दाम मनुष्य पाठवून बोलाविलं आहे, मग त्यांच्या मनाप्रमाणं तूं का बरं वागत नाहींस ?"

ह्या प्रश्नानें शांताबाईच्या मनाचा साफ गोंधळ उडाला. तिला काय उत्तर द्यावें हेंच सुचेना ! आपले दांत आपल्याच घशांत उतरले असें तिला वाटलें, परंतु ती अशी सहजासहजीं स्वतःला शह लावून घेणारी नव्हती. ती म्हणाली, " कर्तव्य खरं पण त्यालाही मर्यादा आहे. त्यांनीं तरी माझ्या मनाप्रमाणं का वागूं नये ?"

" पतीनें पत्नीच्या मताप्रमाणं वागावं कीं, पत्नीनें पतीच्या मताप्रमाणें वागावं, हें मला कळलं म्हणजे मग मी तुझ्या प्रश्नाचं उत्तर देतें."

" यांत काय कळायचं ? पण हा समान हक्काचा काळ आहे. पत्नी म्हणजे पतीची बटीक नव्हे, हें तूं विसरतेस ?"

" हा अलीकडे वाद चालू आहे खरा ! पण पतीच्या छत्राखालीं राहूनच पत्नीनें आपल्या समान हक्काचा उपभोग घेतला पाहिजे हेंहि तूं विसरूं नकोस !"

" त्याच्या छत्राखालीं राहणं म्हणजे आपण त्याची बटीक आहोंत हें कबूल करणं होय. मग त्यांत समान हक्क राहिले कुठें ? त्यांनीं वाटेल तसं वागावं आणि आमच्या वागण्याला मात्र त्यांनीं वेसण घालावी, हा न्याय कुठला ?"

" हा आर्यधर्माचा न्याय ! पाश्चात्य धर्मानें हा अन्याय असूं शकेल. पण आपण आर्य आहोंत हेंहि आपण लक्षांत ठेवलं पाहिजे."

" आणि हेंच मुळीं मला पसंत नाहीं. पाश्चात्य लोक हे मनुष्य आहेत आणि आपण काय पशु आहोंत काय ?"

" समान हक्काच्या विचारानें हा तुझा युक्तिवाद दिसायला जरी बरोबर दिसला तरी कृतींत—अनुभवांत त्याचा फोलपणाच सिद्ध होणार. सांग पाहूं तुझा अनुभव ? तूं आज इतके दिवस स्वतंत्र वृत्तीनें वागत आहेस—पुरुषासारखे हक्क अनुभवित आहेस, तुझा अनुभव मला ऐकूं दे."

पुनः उत्तर देण्यास शांताबाई गोंधळली. ती स्वतंत्र वृत्तीनें वागूं लागतांच नाटकाला जाऊं लागली, सिनेमा पाहूं लागली, रात्रीं अपरात्रीं गाड्यांतून फिरूं लागली आणि पुरुषाप्रमाणें उदरनिर्वाहाकरितां नोकरी धरली, इतक्या गोष्टी जरी

तिनें पुरुषासारख्या समान हक्काच्या केल्या तरी त्यांत तिला सुख लाभलें काय ? तिच्या मनाला शांति मिळाली काय ?—पतिछत्राच्या शीतल छायेंत आर्यस्त्रीला जें सुख, जी शांति आणि जो लौकिक आहे, त्या गोष्टीला ती पारखीच होती. ह्या सर्व गोष्टी अगदीं त्रिवार सत्य आहेत पण तिला ह्या गोष्टीची अद्यापि जाणीव झाली नव्हती. आणि ती जाणीव होण्यास तिला अजून जगाचा बराच अनुभव घ्यावयाचा होता.

"सांग—तुझा अनुभव मला सांग ?"

"अनुभव काय सांगूं ?"

"का बरं ? समान हक्काच्या जोरावर स्वतंत्र वृत्तीनें वागण्याचा तुला काय अनुभव आला तो सांग ? उलट ह्या स्वतंत्र वृत्तीच्या वागण्यानें कांहीं खड्तर प्रसंगच तुला अनुभवावे लागले असतील खरं ना ?"

"असे प्रसंग आल्याशिवाय पुरुषासारखे आपण हक्क अनुभवितों हे तरी कसें कळणार ?"

"पण त्याच्याबरोबर कुलशीलाला कांहीं धक्का पोंचतो याचा कांहीं विचार केलास का ?"

"आपलें मन खंबीर असल्यावर धक्का पोंचणार आहे ?"

"पण हा तुझ्या मनाचा खंबीरपणा दुष्ट जगाचे आघात सोसायला टिकेल अशी तुझी खात्री आहे काय ? मी तर म्हणतें कीं, ह्या दुष्ट जगाच्या तुफान दर्यांत तूं आपलें शीलरूपी जहाज नावाड्याशिवाय वल्हवीत आहेस. विवाहित स्त्रीला पती हाच नावाडी आहे. त्या नावाड्याशिवाय स्त्रीनें स्वातंत्र्य वृत्तीनें राहणें म्हणजे जगाला तिच्या शीलाबद्दल साशंक होण्यास अवसर देण्यासारखं आहे."

"पण आज अशा कित्येक अविवाहित स्त्रिया स्वतंत्रपणानें समाजाचें कार्य करीत आहेत. त्यांच्या शिलाबद्दल जग नाहीं तें कुठें साशंक होत ?"

"होतं किंवा नाहीं, हें आपणास कसं कळणार ? कारण हा प्रश्न फार नाजुक आहे. आम्ही मुंबईत आल्यापासून मी हा समाजांत चाललेला सांवळागोंधळ फार बारकाईनें निरिक्षण करीत आहे. एखाद्या प्रदर्शनांत स्त्रियांनीं स्वयंसेविका बनणं, 'प्याक्सीफेट' मध्यें काम करणं, फंड गोळा करण्याकरितां दारोदार फिरणं, हेंच ना तें समाज कार्य ? अशा रीतीनें स्त्रिया काम करूं लागल्या म्हणजे त्यांच्या नटण्यामुरडण्यानें आणि गोंडस चेहरेपट्टीमुळें आर्थिक दृष्टीनें फायदा होत असेल पण त्यांत त्यांना सुख आहे का ? त्यांच्या मनाला शांति आहे का ? आणि त्यांत

त्यांना लौकिक आहे का ? मी एकदां एके ठिकाणीं वाचलं होतं कीं आंग्ल युवतीनें भर चव्हाट्यावर उभं राहून दहा पौंडाला आपलं एक चुंबन विकून कोणतसं समाजकार्य केलं. पण तीच बाई घरीं बसली असतांना खरोखरीच ज्याला मदतीची अपेक्षा आहे असा एक भिकारी आला असतां तिनें दरवाजा बंद करून घेतला. यावरून काय सिद्ध होतं ? त्या बाईनें दहा पौंडाला चुंबन विकून जें समाजकार्य केलें तें लौकिकाकरितां केलें. पण त्या कृत्याला मी समाजकार्य असं केव्हांहि म्हणणार नाहीं. समाजकार्याची खरी कळकळ जर तिच्या अंतःकरणांत असती तर तो भिकारी आला असतां तिनें आपला दरवाजा बंदच करून घेतला नसता. आपल्याकडे देखील हाच प्रकार चालू आहे. वर्तमानपत्रांत आपलं नांव यावं, मनोरंजन किंवा चित्रमयजगतांत आपला फोटो यावा म्हणूनच ही समाजकार्याच्या नांवाखालीं धडपड ?—शांता, तुला जास्त तें काय सांगूं ! पण ह्याहिपेक्षां अत्यंत किळसवाण्या गोष्टी माझ्या पहाण्यांत आल्या आहेत. ' कीर्तन ऐकण्याऐवजीं स्त्रियांचे चेहरे न्याहाळणारे पुरुष जास्त ' असा पुरुषावर येणारा सर्वसाधारण आक्षेप तूं ऐकला आहेस ना ? तसाच किंबहुना त्याच्या पुढल्या पायरीचा प्रकार ह्या स्त्रियांनीं चालविलेल्या समाजकार्यांत आहे. "

" एकूण तुला आपल्या स्त्रिवर्गापेक्षां पुरुषांचाच जास्त अभिमान दिसतो ?"

" नाहीं—तसं नाहीं. "

" तसं नाहीं तर कसं ? तुझ्या भाषणावरून तर असं स्पष्ट दिसतं कीं, स्त्रिया म्हणजे अगदीं कुचकामाच्या ! स्वतःच्या जबाबदारीनं कोणतेंहि काम करण्यास त्या अगदीं नालायक ! इतकंच नव्हे तर त्या केवळ पशु ! "

" असं मी केव्हांहि म्हणणार नाहीं. इतकंच नाहीं तर स्त्रियांबद्दल पुरुषांइतकाच मला अभिमान आहे. कर्तव्याच्या दृष्टीनें स्त्रियांच्या आणि पुरुषांच्या कर्तव्यांत फरक आहे आणि तीं दोघांचीं निरनिराळीं कर्तव्यें सारखींच महत्त्वाचीं असून परस्परांवर अवलंबून आहेत. "

" मग समाजकार्यांत स्त्रियांबद्दल तुझं मत असं कां असावं ? "

" माझं मत काय आहे हें कळून घेण्यापूर्वी ' समाजकार्य ' म्हणजे काय याची नीट व्याख्या झाली पाहिजे. "

" मग स्त्रिया समाजकार्य करीतच नाहींत असं कां तुझं म्हणणं आहे ? "

" नाहीं, तसं नाहीं. यांतहि कांहीं स्त्रिया अगदीं निरपेक्ष बुद्धीनें समाजकार्य करितात, हेंहि मला कबूल आहे. पण मी म्हणतें, ज्यांत समाजाची नीतीच

ज्यास्त प्रमाणांत बिघडते, तें सामाजकार्यच नव्हे. महात्मा गांधींची स्त्री पतीला सांवलीप्रमाणें चिकटून जें कार्य करीत आहे तेंच खरं खरं समाजकार्य होय. एखाद्या प्रदर्शनांत स्वयंसेविका बनून आपल्या नटण्याफटण्याचें आणि तिरप्या भांगाचें प्रदर्शन केल्यानें समाजकार्य होत नाहीं. तूं शाळेंत नोकरी धरलीस ती केवळ चरितार्थासाठीं धरलीस. यांत तूं कोणतं समाजकार्य केलंस ? तुम्हाला स्वतंत्र वृत्तीनं वागायचं असेल तर कुलशीलाला धाब्यावर बसवून खुशाल वागा, पण त्यावर पांघरूण घालण्याकरितां ' समाजकार्य ' असं त्याला नांव देऊं नका. ' समाजकार्य ' हें फार पवित्र कार्य आहे. आणि तें कार्य करायला तशींच पवित्र माणसं लागत असतात. नाहींतर उद्यां वेश्या जें काम करीत आहेत, त्या कार्या-लाहि समाजकार्य असंच नांव द्यावं लागेल. "

" छेग बाई कमू ! तुझ्याशीं बोलायला मी कोठून पुरी पडणार ! " उत्तर द्यावयाला जागा राहिली नाहीं, तेव्हां शांताबाईनें हें कांहीं तरी उत्तर दिलें.

" बरं नको बोलूं ! राहिलं ! पण आतां हे दामुअण्णा आले आहेत त्यांच्या बरोबर तूं केव्हां जाणार घरीं ! "

" मी साफ येणार नाहीं, असं मी त्यांना कालच स्पष्ट सांगितलं. "

---

## ११........ पोटगीची व्यवस्था

अरेरे ! इतका वेळ दातांच्या कण्या शिजवून शेवटीं उपड्या घड्यावर पाणीच ना ! कमलिनीला अत्यंत वाईट वाटलें. आपण इतका वेळ जें बोललों, त्याचा शांताबाईच्या मनावर कांहींच उपयोग झाला नाहीं, त्यामुळें तिची उमेद खचली. आपण तिला वळवूं असें येतांना तिला वाटलें होतें. परंतु शांताबाईचा पूर्वीचा हट्टी स्वभाव अद्यापि कायम आहे, त्या स्वभावांत काडीचाहि फरक झालेला नाहीं, हें कमलिनीच्या आतां चांगलें प्रत्ययास आलें. तिला आपल्या आईविषयीं मात्र पूर्ण खात्री होती. आपण शांताबाईला घरीं नेलें तर आपली प्रिय आई तिला खात्रीनें वळवील असें वाटून ती म्हणाली, " शांता, आतां बाई फार वेळ झाला. तुझा यशवंत दादा अद्यापि आला नाहीं. मग चलेनास आमच्या घरीं आतां ! मी इकडे आलें तेव्हां आईनें आणि आजीनें तुला घरीं घेऊन येण्याविषयीं मला आग्रहानें सांगितलें आहे. मग काय ? येतेस ना ?—चल. "

शांताबाईच्या मनांत जावयाचें नव्हतें. परंतु पुनः तिचा विचार बदलला, दादाजवळ पैसे आहेत आणि सकाळपासून तो बाहेर गेलेला! तेव्हां तो आतां इतक्यांत परत आल्यास कोणत्या स्थितींत येईल, हें तिला ठाऊक होतें. कमलिनी असतांना तो जर दारूच्या निशेंत रंगून आला, तर आपली काय शोभा राहणार, असा विचार करून ती म्हणाली, "कमला, प्रथम मी थोडा चहा करतें, तो घेऊं आणि मग जाऊं!"

"छे! मला नको चहा! आणि मी चहाच घेत नाहीं. आणि घरांतहि कोणी घेत नाहीं. चहा व्हायचा म्हणजे कोणी पाहुणे आले तरच, नाहीं तर आमच्या घरांत हें चहाचं बंडच नाहीं."

कमलिनी चहा घेत नाहीं हें ऐकून तिला बरें वाटलें. ती गोष्ट तिच्या पथ्यावरच पडली. कारण तिच्या घरांत त्यावेळीं दूधहि नव्हतें आणि साखरहि नव्हती. आणि ह्या वस्तु बाहेरून आणावयाच्या म्हणजे बाहेरच्या बाजूला बसलेल्या दामु-अण्णाला त्या आणावयास सांगितल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. वास्तविक तिला स्वतःला त्यावेळीं चहाची अत्यंत जरूरी भासत होती, सबंध दिवसांत तिला दहा बारा वेळां चहा घेतल्याशिवाय चैनच पडत नव्हतें. मुंबईत आल्यापासून तिला हें चहाचें एक जबरदस्त व्यसनच लागलें होतें. एखाद्या दिवशीं जेवण नसलें तरी चालेल पण चहा मिळाला नाहीं म्हणजे एखाद्या वेड्याप्रमाणें स्थिति होते, असें सांगणाऱ्या व्यक्ति अलीकडे पुष्कळ झाल्या आहेत, त्यांपैकींच शांताबाई ही एक होती. मुंबई पुण्यासारख्या शहरांत तर ह्या चहाबाज मंडळीची संख्या दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणावर आहे. परंतु हें चांगलें नाहीं. बरें! चांगलें नाहीं म्हणावें तर घरीं येणारा पाहुणा कितीहि 'बडा' असला तरी त्याला एक कप चहा देऊन त्याची चहा करतां येते. अशा रीतीनें पाहूण्याची एका कपांत चहा झाल्यावर इतर आदरातिथ्याची जरूरीच रहात नाहीं, मग चहाचा निषेध कोण करणार? कित्येक घरांत तर ही चहाची भट्टी अष्टौप्रहर पेटलेलीच असते. पण हें वाईटच आहे!

शांताबाई कपडे करून तयार झाली. तिचा दादा येण्याचें चिन्ह दिसेना. तेव्हां दरवाजा बंद करून त्याला कुलूप लावण्याचा तिनें विचार केला. तोंच श्रीमंताजवळ राहून पुढें पुढें करण्याची संवयी लागलेले रावबहादुरांचे कारकून दामुअण्णा पुढें होऊन म्हणाले, "वहिनीसाहेब, दरवाजा बंद करून घ्यावयाचा असेल नाहीं बरं!—कुठं आहे कुलूप! मी लावतों, आपण व्हा पुढें! पण आपले दादासाहेब यावयाचे असतील ना? मग मी राहूं कीं काय इथं!"

" नको; कुलूपच लावा. दादाजवळ आहे दुसरी किल्ली!" कुलूप पुढें करून शांता म्हणाली.

दरवाजाला कुलूप लावून मंडळी बाहेर पडली. त्यावेळीं सायंकाळचा सुमार होत आला होता. रस्त्यानें जात असतां त्या दोघी मैत्रिणी आणि त्यांच्या मागून दामु अण्णा अशीं तीं त्रिवर्ग गिरगांव रस्त्याच्या वळणावर आलीं, त्याच सुमाराला समोरून एक व्यक्ति येत असतांना शांताबाईच्या दृष्टीस पडली, क्षणभरच तिला भीति वाटली. होतां होईल तों आपण त्या व्यक्तीच्या दृष्टीस पडूं नये म्हणून ती चटकन् कमलिनीच्या आड झाली आणि आपलें तोंड चुकविण्याचा तिनं प्रयत्न केला. परंतु तो तिचा प्रयत्न निष्फळ झाला. आपणास पाहतांच कोणी तरी एक स्त्री तोंड चुकविण्याचा प्रयत्न करीत आहे, हें त्या व्यक्तीच्या लक्षांत आलेंच! अर्थात् ती स्त्री कोण आहे हें समजून घेण्याची जिज्ञासा होऊन ती व्यक्ति मुद्दाम त्याच बाजूला झाली. आणि " मी तुला पाहिलें " हें दर्शविण्याकरितां ती व्यक्ति मुद्दाम खांकरली, आणि वळून म्हणाली, " कोण शांताबाई कां?—इतकं तोंड कां लपवितां?"

शांताबाई गोंधळली. त्यांतून कमलिनी तिच्या तोंडाकडे पाहूं लागतांच ती जास्तच गोंधळली. इतक्या अवधींत ती व्यक्ति त्यांच्या पुढें येऊन उभी राहिली.

" गोपाळराव, तुमच्याबरोबर भाषण करण्याची माझी इच्छा नाहीं." धैर्य करून शांताबाई म्हणाली.

" भाषण न करून कसं चालेल? माझं तुमच्याकडे ऋण आहे तें फिटेपर्यंत तरी मजबरोबर बोललंच पाहिजे."

" तुम्हांला काय बोलायचं असेल तें दादाला भेटून बोला—चला, दूर व्हा, आम्हांला जाऊं द्या."

" कोण? दादा! ते दारूबाज यशवंतराव किं नाहीं? त्याच्याजवळ काय बोलायचं? मला जें बोलायचं तें तुमच्याजवळ!" असें म्हणून एखाद्या अट्टल पाजी मनुष्याप्रमाणें गोपाळरावानें डोळे मिचकाविले.

हा प्रकार शांताबाईला अगदीं असह्य झाला. परंतु ती काय करणार? शक्य तितका तिरस्कार तिनें चर्येनें व्यक्त केला, इतकेंच! त्या हलकट मनुष्यानें तिच्या तोंडावर तिच्या दादाला भर रस्त्यांत दारूबाज म्हटलेलें ऐकून घ्यावें लागलें. कारण वस्तुस्थितीच तशी होती. नाहींतर तिनें गोपाळरावाचा तेथें उद्धार केला असता अशी आमची खात्री आहे. सासरीं असतांना तिच्या पतीनें " तुझा दादा त्या

दारुड्या देसाईच्या नादानें दारूबाज बनला आहे " असें एकदां म्हटलें असतां तिनें आकाशपाताळ एक केलें होतें, ती हकीकत वाचक विसरले नसतीलच ! पण आज परिस्थितीमुळें तीच वाघीण अगदीं गोगलगाय बनली !

" मग काय शांताबाई ! मी तुम्हाला केव्हां भेटूं ? तुम्ही एकट्याच असाल असा वेळ मला सांगा ! "

" गोपाळराव, दूर व्हा. माझा दादा दारूबाज आहे पण तुम्ही तर हलकट पाजी अहांत ! व्हा दूर–" असें रागातिशयानें बोलून शांताबाई पुढें झाली.

" अस्सं काय चंडिके ! पाहून घेईन ! केव्हां तरी सांपडशील माझ्या तडाख्यांत ! " असें म्हणून मिशावर पिळ देत गोपाळराव हळुहळू आपल्या रस्त्यानें गेला. हा सर्व प्रकार आमच्या कथानायिकेला अगदीं चमत्कारिक वाटला. आतां ह्या सर्व गोष्टीचें आपणास स्पष्टीकरण करावें लागणार हें शांताबाई जाणून होती. ती त्या पुढच्याच विचारांत होती, इतक्यांत समोरून पुनः दोन व्यक्ति येतांना तिच्या दृष्टीस पडल्या. त्यांपैकीं एक नेने मास्तर आणि दुसरी आनंदीबाई नांवाची बालविधवा मास्तरीण होती. हें मास्तर-मास्तरणीचें जोडपें शाळेंतील विद्यादानाचें पवित्र कार्य आटोपून आतां हवा खाण्याच्या उद्देशानें बाहेर पडलें होतें.

" कां शांताबाई तुम्ही म्हणे नोकरी सोडली ? " आनंदीबाई जवळ आल्यावर म्हणाली.

" मी इतके दिवस समजत होतें कीं, तुम्ही आजारी अहांत पण काल मला नेने मास्तरांनीं सांगितलं कीं तुम्ही नोकरी सोडली. "

" होय. मी नोकरी सोडली. पण कां सोडली हें नाहीं का नेन्यांनीं सांगितलं ? विचारा—त्यांना विचारा ? पण सांगायला आहे का त्यांना तोंड ? " कपाळाला आठ्या घालून नेने मास्तराकडे पहात शांताबाई म्हणाली.

" सांगायला त्यांत भीति कसली ? शांताबाईनें दाखविलेल्या तिरस्काराकडे दुर्लक्ष करून पोक्तपणाचा आव आणीत नेने मास्तर म्हणाला, " तुमचं आमचं पटलं नाहीं, म्हणून तुम्ही आम्हांला सोडलं ! आणि ज्यांचं आमचं पटलं, त्या आमच्याजवळ राहिल्याच आहेत " असें म्हणून नेने मास्तरानें बाजूला उभी असलेल्या आनंदीबाईकडे पाहिलें.

" कमू, थोड्या वेळापूर्वीं आपणास एक हलकट आणि पाजी गृहस्थ भेटले, आतां हे दुसरे ! विद्यादानासारख्या पवित्र कामावर यांची नेमणूक असून मुलांना नीतीचे धडे हे शिकवित असतात. पण यांचं वर्तन महार देखील लज्जेनें खालीं पहायला लावील असं आहे. "

" शांताबाई, तोंड सांभाळा, फार वहात चाललांत् ! "

" ह्या शांताबाईची आठवण विसरलां वाटतं ?—आनंदीबाई, ह्या नेन्यांच्या-बरोबर जरा जपून वागा, इतकंच मी आतां सांगते. चल—कमू..." असें म्हणून ती चालूं लागली. थोडें पुढें गेल्यावर ती कमलिनीकडे वळून म्हणाली, " कमू, ह्या मेल्या पुरुषांची तूं इतकी तरफदारी करतेस, आणि त्यांचा तुला इतका अभिमान आहे पण माझा जीव तर ह्यांच्यावर उभा जळतो. मला ह्या थोड्या दिवसांत जे कांहीं अनुभव आले ते जर तुला सर्व सांगितले तर तूंही माझ्याच सारखं म्हणशील. अशा ह्या मेल्या पुरुषांकडून कसलं होणार आहे सामाजकार्य ! "

" शांता, तुझा अनुभव कसाहि असो आणि स्त्रियांबद्दल माझं मत कसंहि असो पण ' सामाजकार्य ' म्हणून जें म्हणतात तें मात्र अगदीं निराळं आहे. समाजकार्याची खरी व्याख्या फारच थोड्यांना कळली आहे. "

" पण तुला कळली आहे ना ?"

" कळून काय उपयोग ? त्याप्रमाणें आपल्या हातून कार्य झालं तरच ती कळली असं म्हणायचं ! "

" मग मला तरी सांग ? मला तरी कळूं दे ती व्याख्या ! "

" समाजकार्य यांतील ' समाज ' म्हणजे काय ? आणि तो कसा बनतो ? "

" निरनिराळीं कुटुंबें एकत्र झालीं म्हणजे समाज बनतो. "

" कुटुंबें म्हणजे काय ! "

" तूं तर माझी परिक्षाच घेऊं लागलीस कमू ? "

" यांत परिक्षा कसली ? व्यक्तिपासून कुटुंब, कुटुंबापासून सामाज आणि समाजापासून राष्ट्र अशी परंपरा आहे खरं ना ? मग आतां तूंच सांग कीं, प्रथम शिखर तयार करायचं किं प्रथम पाया तयार करायचा ? "

" यांत सांगायचं काय ? प्रथम पाया रचला पाहिजे, हें उघडच आहे. "

" होय, उघड आहे पण अलीकडील सुशिक्षित म्हणविणारी मंडळी पाया सोडून शिखर तयार करीत आहेत. "

" असं कसं होईल ? "

" कसं होईल म्हणून शंका कशाला ? होत आहे किंवा नाहीं हें तूंच पहा प्रथम व्यक्ति मग कुटुंब नंतर समाज, त्यानंतर राष्ट्र अशी ही परंपरा असतांना आपण व्यक्ति आणि कुटुंब यांच्याकडे दुर्लक्ष करून समाज सुधारण्याचा प्रयत्न

करीत आहोत. वास्तविक प्रथम व्यक्ति सुधारली, मग कुटुंब सुधारलें पाहिजे. तेव्हां कुठें आपणास समाज सुधारतां येईल. प्रत्येक व्यक्तीनें स्वतःला मिळालेल्या शिक्षणाचा उपयोग आपलें कुटुंब सुधारण्याकडे प्रथम केला पाहिजे. "

" मग यांत तूं जास्त तें काय सांगितलेंस ? प्रत्येकांचं तें कर्तव्यच आहे. आणि त्या प्रमाणें ते करतातहि ! "

" इथंच सर्व चुकतं ! मीं तर असं खात्रीनें म्हणतें कीं, प्रत्येक कुटुंबांतील प्रत्येक व्यक्ति ह्या आद्य कर्तव्याकडे आज डोळेझांक करीत आहे. उदाहरणाकरितां तुझीच गोष्ट घेऊं. तुझ्यामुळें एक कुटुंब आज दुःखी आहे. अशीच प्रत्येक कुटुंबाची स्थिति आहे. प्रत्येक कुटुंबांतील प्रत्येक व्यक्ति ही समाजाची एक घटकावयव आहे. "

" शेवटीं सर्व खापर आणून तूं माझ्या कपाळावर फोडलंस म्हणायचं ! "

" मी कशाला फोडूं ! आतां समाजकार्याची गोष्ट निघाली तेव्हां असंच म्हटलं पाहिजे कीं, हें खापर समाजच तुझ्या कपाळावर फोडीत आहे. प्रत्येकानं आपलं कुटुंब सुधारलं म्हणजे पर्यायानें समाज सुधारतो. "

मंडळी घराजवळ आली. त्यावेळीं रस्त्यावर एक सुंदर गाडी उभी होती. कमलिनीला पाहतांच दरवाजांत उभा असलेला गाडीवान अदबीनें बाजूला झाला, तें पाहून शांताबाई म्हणाली, " कमु, ही गाडी तुमची का ? "

" होय, बाबा ऑफिसमधून आले वाटतं ! आज लवकर आलेले दिसतात. कायरे विश्राम, बाबा आले का ? "

" होय. आज बाबासाहेबांच्या जिवाला बरं नाहीं वाटत म्हणून फिरायला न जातां मला गाडी घरींच आणायला सांगितली. "

कमलिनीनें उत्तर दिलें नाहीं. ती आणि शांताबाई आंत गेल्या आणि दामुअण्णा वर गेला. आंत येतांच शांताबाईला सर्वत्र पालटलेला मनु दिसूं लागला. खुर्च्या, टेबल, कपाट, आरसे. तसबिरा, खिडक्यांना पडदे, जमिनीवर म्याटिंग अशी जिकडे तिकडे झकपक व्यवस्था पाहून ती अगदीं थक्क होऊन गेली. कमलिनी त्याच्या शेजारीं पुण्यांत रहात असतांना त्यावेळच्या राहणींत आणि आतांच्या राहणींत तिला जमीन अस्मानाचा फरक दिसूं लागला. इतकी सुधारणा होऊन शिवाय दरवाजांत स्वतःची गाडीघोडा पाहून ' कमू ' आतां पूर्ण सुखी आहे असें तिला वाटलें. पुण्यांत असतांना कमलिनीला आपणापेक्षां किती तरी कमी दर्जानें लेखीत असे. तिचे वडील जयरामपंत म्हणजे अगदीं जुन्या पद्धतीचे कर्मठ

आहेत असें ती समजत असे परंतु आतां तिच्या स्थितीबरोबर स्वतःची स्थिती तुलनात्मक दृष्टीनें पाहून आपण स्वतःला सुधारक आणि सुशिक्षित असे म्हणवीत होतों, तो आपला सुधारक आणि सुशिक्षितपणा म्हणजे आपल्या वडिलांच्या ह्या-तींतील एक पाण्याचा बुडबुडा होता, असें आतां तिला वाटलें. एका व्यक्तीनें कुटुंब सुधारतें आणि अशीं अनेक कुटुंबें मिळून समाज सुधारतो ह्या कमलिनीच्या म्हणण्याची आतां तिला, त्या घरची प्रत्यक्ष वस्तुस्थिति पाहून खात्री पटली.

" कोण शांतू का ? " आश्चर्यानें सुमतीबाई म्हणाली, " किती हा फरक पडला तुझ्यांत ! अगदीं ओळखतां आलं नाहीं. अलीकडे आजारीबिजारी होतीस कीं काय ?

इतक्यांत ' यजमान वर बोलावितात ' असा एका नोकरानें येऊन सुमती-बाईना निरोप कळविला. तेव्हां ती उठतां उठतां म्हणाली, " कमू, शांतूला चहा दे. मी येतें वरून जाऊन ! "

एखाद्या धनिकाच्या घरांत गेल्यावर तेथील श्रीमंती थाट पाहून मनाची एक प्रकारें कुचंबणा होते तशी स्थिति शांताबाईची झाली. तरी अद्यापि तिला आमच्या कथानायिकेनें माडीवर नेलें नव्हतें. परंतु पाहिलेल्या एकंदर गोष्टीवरून तिचा डौल आणि सुधारकी ताठा पार मावळला इतकी गोष्ट मात्र खरी ! तिचे वडील शंकर-राव स्वतःला सुधारक म्हणवीत होते. आणि पुण्यास एकमेकांजवळ रहात असतांना जयरामपंताकडे त्यांचें रोज येणें जाणें असे. त्यावेळीं ते जयरामपंतांना ' कर्मठ ' म्हणून प्रत्येक गोष्टींत त्यांची हेटाळणी करीत असत. परंतु वस्तुस्थिति मात्र अगदीं निराळी होती. जयरामपंत हेच खरे सुधारक होते. आणि शंकरराव हे केवळ बोलके सुधारक होते. ही बोलकी सुधारणा जगजाहीर करण्यांत त्यांनीं आपल्या स्वतःची, घरादारांची आणि मुलाबाळांची कशी होळी करून घेतली, ती आतांपर्यंतच्या हकीकतीवरून वाचकांना माहीत झालीच आहे. परंतु जयरामपंताची सुधारणा ही खरी सुधारणा होती. कोणत्याही गोष्टीचें आंधळेपणानें अनुकरण करा-यचें नाहीं, आणि ज्या गोष्टी मनाला पटल्या त्या अमलांत आणतांना लोकापवा-दाची भीति बाळगायची नाहीं, असा त्यांचा करारी स्वभाव होता. पुण्याहून आल्या-पासून त्यांची बढती होत गेली होती, आणि त्या बढतीबरोबर त्यांची सांपत्तिक स्थिति जसजशी सुधारत गेली, त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या मनाला पटतील; आणि आपल्या ऐपतीला झेपतील अशा सुधारणा हळुहळु अमलांत आणल्या. जगाच्या दृष्टीनें आज ते पूर्ण सुखी होते. परंतु खरी गोष्ट मात्र तशी नव्हती. आपल्या

मुलीबद्दल त्यांचें मन सदा सर्वदा कष्टी असे. आज ते कचेरींतून लवकर आले होते. आज त्यांना जांवयाकडून—रघुनाथाकडून पत्र आलें होतें. कमलिनीला विलायतेला पाठविण्याचें नक्की ठरल्यावर त्यांनीं रघुनाथास पत्र लिहिलें. परंतु ह्या पूर्वी पाठविलेल्या पत्रांची जी गत झाली तीच गत ह्याहि पत्राची झाली. त्यांनीं पाठविलेलें पत्र न उघडतां जसेंच्या तसें परत येऊन त्याबरोबर रघुनाथानें लिहिलेलें एक स्वतंत्र पत्र आलें होतें. त्या पत्रांत फारसा मजकूर होता असें नाहीं. ज्या दोन चार ओळी लिहिल्या होत्या, त्या त्यांच्या दुःखी मनावर असह्य डाग देणाऱ्या होत्या. त्या पत्रानें त्यांना आज अत्यंत अस्वस्थ केलें होतें. कचेरी सुटण्याच्या सुमारास तें पत्र त्यांना मिळालें. आज नित्य नियमाप्रमाणं कचेरी सुटल्यावर फिरावयास न जातां ते घरीं आले, त्याबद्दल सुमतीबाईला कांहीं विशेष वाटलें नाहीं. क्वचित् प्रसंगीं इतर ठिकाणीं जावयाचें असलें म्हणजे जयरामपंत असे लवकर घरीं येत असत, त्याप्रमाणें आज आले असतील असें तिला वाटलें. ती वर आली त्यावेळीं जयरामपंत आरामखुर्चीवर स्वस्थ बसल्यासारखे तिला दिसलें.

" आज कुठं बाहेर कां जायचं आहे ? " वर आल्यावर सुमतीबाईनें विचारलें.

" कुठंहि जायचं नाहीं. "

" पण मुद्रा अशी सचिंत का ? "

" हें पहा—आपल्या जांवयाकडून पत्र आलं आहे. वाचा—"

" काय आहे पत्रांत ? कमूला बोलाविलें आहे कां ? वन्स बऱ्या आहेत ना ?" असें म्हणून सुमतीबाईनें पत्र हातांत घेतलें आणि उघडून वाचण्यास सुरवात केली. पत्रांतील त्या चार ओळी वरून नजर फिरतांच तिचीहि चर्या बदलली.

" काय वाचलंस पत्रांत ? वाच पाहूं पुनः ! "

पतीच्या आज्ञेप्रमाणें सुमतीबाई पुनः पत्र वाचूं लागली—

" **न. वि. वि.**

**आपण वरचेवर पत्रें लिहितां, त्या सर्वांचा मतलब मी पूर्णपणें जाणून आहें. आपल्या मुलीबरोबर माझ्या दुर्दैवानें माझा विवाह झाला आहे तेव्हां तिच्या पोटगीची व्यवस्था करण्यास माझी तयारी आहे. आपण व्यर्थ पत्र लिहिण्याचे ह्यापुढें श्रम घेऊं नयेत. सोबत आमच्या मुंबईच्या अडत्यावर पांच हजारांची हुंडी पाठ-**

**विली आहे. त्या रकमेच्या व्याजांतून आपल्या मुलीच्या पोटगीची व्यवस्था करावी. कळावें. आपला—रघुनाथ."**

" वाचलंस पत्र ?—किती मूर्ख पोर आहे हा ! " इतकें बोलून जयरामपंतांनीं एक दीर्घ श्वास सोडला !

---

## १२....... मशीन आणलें

त्या दोघी मैत्रिणी माडीवर आल्या जिन्यांतून वर चढतांना सर्व पायऱ्यांवर म्याटिंग पसरलेलें पाहून शांताबाई अगदीं स्तंभित झाली. वर गेल्यावर कसकसा थाट आपल्या दृष्टीस पडेल, याचा विचार करीतच ती कमलिनीच्या मागून वर आली. पुढल्या बाजूला मोठा दिवाणखाना होता, पुढें सुंदर गच्ची असून त्याच्या कठड्यावर चायना मातीच्या फुलझाडांच्या सुंदर कुंड्या ठेविल्या होत्या. तें घर भर रस्त्यावर असल्यामुळें तेथें बसलें असतां सहज घटका दोन घटका मनाची करमणूक होत असे. त्या रस्त्यावरून सायंकाळीं मोटारगाड्यांची तर एकसारखी शर्यतच लागलेली दिसत असे. दिवाणखान्याच्या पलीकडे चार मोठ्या खोल्या होत्या. पैकीं दोन खोल्या कमलिनीच्या उपयोगांत असत. एका खोलींत ती झोंपत असे आणि दुसरी खोली तिची ' स्टडी ' रूम होती. परंतु प्रवेश परीक्षा झाल्यापासून त्या स्टडीरूमचें रूपांतर होऊन ती आतां म्युझिक रूम बनली होती. आतांपर्यंत अभ्यासक्रमांत येणारीं पुस्तकें इकडे तिकडे पडलेलीं असत, तीं आतां कोंपऱ्यांतील कपाटांत व्यवस्थेनें रचून ठेवलेलीं दिसत होतीं. आणि त्या पुस्तकांऐवजीं त्या टेबलावर मौलाबक्ष गायन वादन सेरिजचीं पुस्तकें व बाजूला एका कोपऱ्यांत झांकून ठेवलेलें टाईप रायटिंगचें मशिन होतें. शिवाय कोपऱ्यांतील खुंट्यांवर एक दिलरुबा, एक गवसणींत बांधलेली सतार आणि खिडकीजवळ उघडून ठेवलेली बाजाची पेटी होती. ह्याशिवाय त्या खोलींत घडीच्या दोन आराम खुर्च्या, एक फिरती खुर्ची, कपडे ठेवण्याचें मोठा आरसा लावलेलें एक कपाट वगैरे पॉलिश केलेलें लाकडी सामान होतें.

कमलिनीनें आपल्या मैत्रिणीला खोलींत आणलें. आंत येतांच ती खोलीची अंतर्व्यवस्था पाहून शांताबाई म्हणाली, " कमू, ही तुझी का खोली ? वा: ! तूं तर अगदीं रंगेलच झाली आहेस ! पण हा सर्व प्रकार तुझ्या बाबांना आवडतो का ? मी तर समजत होतें—"

" बाबांना या गोष्टींचा तिरस्कार आहे असं का तूं समजतेस ! उलट बाबांना ह्या गोष्टींची इतकी आवड आहे कीं, रोज तास अर्धा तास पेटी, दिलरुबा नाहीं-तर सतार वाजवून मी त्यांची करमणूक केल्याशिवाय त्यांना बरंच वाटत नाहीं. "

" म्हणजे !—हीं सर्व खोलींत आहेत, हीं वाद्यें तूं वाजवितेस कीं काय ! केव्हां एवढं शिकलीस तूं ? "

" ह्या गायनवादन सेरिजवरून मी कांहीं शेलकीं शेलकीं पद्यें वाजवूं लागलें आहे. "

शांताबाई पुढें झाली आणि बाजाच्या पेटीपुढें बसली. तिनें बराच वेळ कांहीं सूर काढण्याचा प्रयत्न केला; परंतु तिला कांहीं जुळेना.तेव्हां पेटीचे पडदे दाबीत दाबीत ती म्हणाली. " मला किनई कमू ! पेटी शिकण्याची फार आवड आहे. खरंच किती मधूर आणि मनाची करमणूक करणारं हें वाद्य आहे ?

" मला ह्या वाद्यापेक्षां दिलरुबा जास्त आवडतो. "

" मग मला तरी कांहीं वाजवून दाखीव ! "

कमलिनी दिलरुबा घेऊन बाजूच्या खुर्चीवर बसली, आणि तो साफ करून ' पावना वामना ' हें पद कौशल्यानें वाजवूं लागली. हळूहळू तिनें येत असलेलीं दोन चार पदें वाजवून दाखविलीं.

" बरीच तयारी झालेली दिसते तुझी कमू ! पण हें काय ? टेबलावर हें टाईपरायटिंगचें मशीन आहे वाटतं ! तुला येतं का टाईपरायटिंग ? "

" हो. "

" तुला येतं ! मग तूं सर्वांगीच बनली आहेस म्हणायची ! माझ्याहि मनांतून अलीकडे टाईपरायटिंग शिकण्याचं फार आलं आहे. परवां मी दादानं आणलेल्या एका वर्तमानपत्रांत Wanted a lady typist. Salary rupees sixty Per month. ' ( एक स्त्री टायपिस्ट पाहिजे. महिना पगार साठ रुपये. ) अशी जाहीरात पाहिल्यापासून वाटतं कीं आपण टाईपिस्ट व्हावं. "

" मग त्यांत कठीण काय आहे ! थोडा अभ्यास करशील तर तुला देखील टायपिस्ट होतां येईल. फार सोपं आहे. एकदां मशीनवर बोटं बसलीं आणि अक्षरांची गति वाढली म्हणजे झालं ! "

" बघूं—मला दाखीव तरी ! मी थोडा प्रयत्न करून पाहतें. "

कमलिनीनें टाईपरायटिंग मशीनवरचें झांकण काढलें आणि एक कोरा कागद मशीनमध्यें घातला. थोड्या वेळांत तिनें पटपट चार ओळी छापून दाखविल्या तें

पाहून शांताबाई म्हणाली "तुला ही देखील बरीच प्राक्टिस आहे किं ग ?"

"याहिपेक्षां बोटांची गति वाढली पाहिजे. टाईपिस्ट म्हणून नोकरी करायची तर हाताला ह्याच्या दुप्पट गति पाहिजे."

"इतकी गति यायला किती दिवस लागतील ?"

"तें प्रॅक्टिस करण्यावर अवलंबून आहे. एकदां बोटं 'सेटल' झाल्यावर जशी संवय वाढवावी तशी गति आहे."

"पण हीं बोटं 'सेटल' होण्यास किती दिवस लागतील ?"

"फक्त आठ दिवसांचा अभ्यास. हें पहा, ह्या अक्षरांची मांडणी केली आहे कीं, थोड्याशा अभ्यासानें डोळे मिटून सुद्धां दोन्ही हाताच्या बोटांनीं काम करतां येतं." असें म्हणून थोड्या वेळांत तिनें त्या यंत्राची सर्व माहिती करून दिली. परंतु त्यावेळीं शांताबाईच्या मनांत नाना विचारांचें काहूर उसळलें. तिला घटकेंत वाटे कीं, टाईपरायटिंग शिकावें; घटकेंत वाटे, पदें शिकावीं; तर घटकेंत वाटे कीं पेटी शिकावी ! पुनः त्या तिन्ही वस्तूंकडे नजर जातांच, त्या सर्वांत आपण प्राविण्य मिळवावं असाहि गोंधळलेला विचार तिच्या मनांत येई.

दिवे लावण्याच्या सुमारास शांताबाई घरीं जाण्यास निघाली. तिला कमलिनीच्या आईनें आणि आजीनें सासरीं परत जाण्याविषयीं परोपरीनें सांगून पाहिलें, परंतु शांताबाईच्या मनावर त्याचा कांहीं एक परिणाम झाला नाहीं. म्हातारीनें तर तिला इतकें सुद्धां सांगून पाहिलें कीं 'तुझ्या अशा हट्टामुळें तुझा नवरा दुसरं लग्न करून घेईल. त्यांना सर्व गोष्टी अनुकूल आहेत मग मात्र पुढें तुझे हाल कुत्रासुद्धां खाणार नाहीं.' परंतु इतकी तिला दहशत घालून देखील कांहीं उपयोग झाला नाहीं. इतकेंच नव्हे तर ती घरीं परत येत असतां वाटेंत तिच्या मनांत आपल्या नवऱ्या-संबंधीं चुकून देखील विचार आला नाहीं. आपणास नवरा आहे, ही गोष्ट ती विसरूनच गेली होती. आपणास पेटी चांगली वाजवितां यावी, आपण टायपिस्ट व्हावें, आपल्या गाण्याची वाहवा व्हावी हेच विचर तिच्या मनांत घोळत होते. कमलिनी पंधरा वीस दिवसांनीं विलायतेला जाणार तोंपर्यंत रोज नियमानें दुपारीं जाऊन तास दोन तास गायन-वादन आणि टाईपिंग शिकावें असा विचार करीत ती घरीं आली. यशवंतराव घरीं येऊन बराच वेळ झाला होता. शांताबाई आली त्यावेळीं आश्रमाचा म्यानेजर धरणें धरून बसलेला होता. शांताबाई आंतल्या खोलींत जाऊन बाहेर काय गोष्टी चालल्या आहेत, त्या ऐकण्याच्या उद्देशानें दरवाजाजवळ खुर्ची घेऊन बसते न बसते तों गोपाळराव मोतीवाले आंत आले. त्यानें सुरवात केली

ती एकदम खड्या सुरांत केली, " काय यशवंतराव, तुम्ही वचनाचे मोठे धड आहांत ! काढा—आतां माझी सर्व रक्कम काढा ! आज मी तुमच्याकडून माझे सर्व रुपये घेतल्याशिवाय हालणार नाहीं. हं—उठा, उघडा आपली तिजोरी ! तुमच्यासारख्या सभ्य गृहस्थांना पैसे देऊन शेवटीं आम्हींच भर रस्त्यांत 'पाजी हलकट' ठरलों ! आजकाल दुनियाच अशी उलटी चालली आहे. ज्याचं करावं बरं तो म्हणतो माझंच खरं !—हं—उठा, काढा पैसे ! उगाच आतां शब्दाला शब्द वाढवीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. मीच तुम्हांला प्रथम पैसे दिले नसते, तर भर रस्त्यांत पाजी कशाला ठरलों असतों ? "

" पण गोपाळराव, असा एकदम त्रागा कां करतां ?—झालं काय ? तुम्हाला कोण म्हणालं पाजी ? "

" आपल्या भगिनी शांताबाई ! ऐनवेळीं मी तुम्हांला साह्य केलं, चार दिवस स्वतःच्या घरीं तुमचा पाहुणचार केला, त्या सर्व उपकारांची फेड तुमच्या बहिणीनें भर रस्त्यांत आमची अब्रू घेऊन केली."

" तुमचे किती रुपये आहेत गोपाळराव ? " आश्रमाच्या म्यानेजरानें विचारलें.

" रुपये आहेत पुष्कळ ! तुमचं पहिलं बिल, मी रुपये दिले तेव्हांच चुकतं झालं. त्यानंतर तुमचं दुसरं बिल दिलं का यशवंतरावांनीं ? "

" छे हो ! त्याकरितांच तर मी आतां आलों आहे. आम्हांला असं गिऱ्हाईक नकोच आहे. एका बिलाला पन्नास हेलपाटे घालतो कोण ? "

" का यशवंतराव गप्प कां ? तुम्ही तर नाकावरील माशी उडूं देत नाहीं आणि तुमच्या त्या शांताबाई तर नाकावर माशी सुद्धां बसूं देत नाहींत. भर रस्त्यांत त्यांनीं आमच्यावर तोंडाचा सारखा पट्टा सुरू केला होता. आतां येथें असत्या तर तुमच्या समक्ष त्यांची लगाम आवळली असती.—"

" कोणाची लगाम आवळणार तुम्ही—? " बाहेर येत शांताबाई म्हणाली, " तुम्हाला जर कांहीं लाजलज्जा असती तर तुम्ही इकडे आलाच नसतां. पण तुम्ही कसले ?—मनुष्य म्हणवून घेण्यासहि तुम्ही लायक नाहीं."

" हे पहा गोपाळराव—" यशवंतराव म्हणाला, " तुम्ही मला ही एक वेळ क्षमा करा. मी आठ दहा दिवसांत तुमची सर्व रक्कम कसेंहि करून देऊन टाकतों."

" आणि माझी काय व्यवस्था करणार ? " म्यानेजर म्हणाला, " मी उद्यां-पासून तुमच्याकडे येणारे डबे बंद केले आहेत. बिल दिल्याशिवाय मी—"

" तुमचंहि बिल देण्याची मी व्यवस्था करतों. ह्या चार आठ दिवसांत माझी

एक मोठी रक्कम येणार आहे."

"ठीक आहे. रक्कम आल्यावर बिल द्या मग पुढं डबे पाठवावयाचे किंवा नाहीं याचा मी विचार करीन."

"छे! छे! असं नका करूं! तुमचं बिलतर चुकतं होईलच पण तोंपर्यंत तुम्ही आम्हांला उपाशी मारणार कीं काय!"

"त्याला माझा नाइलाज आहे." असें म्हणून म्यानेजर उठून बाहेर गेला. गोपाळरावानेंहि मुकाट्यानें तोच मार्ग स्वीकारला, आंत येतांच त्यानें पहिल्यानें मोठें आवसान आणलं होतें, परंतु शांताबाई येऊन कडकडतांच त्याचें आवसान गळलें. शांताबाईनें रस्त्यांत त्याची शोभा केली होती, त्यावरून आतां ती कडकडत आंतून आलेली पाहतांच त्याचें धाबें दणाणलें. आतां आपण एखादा अधिकउणा शब्द बोललों तर आपल्या श्रीमुखांत कडड् असा ध्वनि उमटल्यावांचून राहणार नाहीं, असें वाटूनच त्यानें आटोपतें घेतलें. ते दोघे निघून गेल्यावर शांताबाई पुढं झाली आणि म्हणाली, "दादा आतां पुढं काय करायचं? हा असा प्रकार आतां किती दिवस चालणार? उद्यां जर डबे बंद झाले तर—"

"शांते, तूं आतां येथून चालती हो!" एकदम रागानें यशवंतराव म्हणाला.

शांताबाई दचकली! आजपर्यंत तिचा दादा अशा रीतीनें तिच्यावर केव्हांहि रागावला नव्हता. परंतु आजचा हा पहिला प्रसंग असून तोहि इतक्या जोरांत होतांच शांताबाई दचकली यांत विशेष आश्चर्य नाहीं. ती एखाद्या चित्राप्रमाणें आपल्या दादाच्या मुखाकडे पहात राहिली. आपला दादा असा एकाएकीं रागावला कां हेंच तिच्या लक्षांत येईना.

"अशी पहात काय राहिलीस? चांगला नवरा आपण होऊन बोलावितो मग तुला काय झालं? उगाच माझ्या मागें तुझं शुक्लकाष्ट कशाला?"

"दादा, तूंच का बोलतोस हें? तुला हें बोलणं शोभतं का?"

"होहो, मीच, मीच बोलतों! तुला माझ्या अशा स्थितींत माझ्याजवळ राहण्याची जरूरी काय? नाहीं मला उद्योगधंदा! मी स्वतःचं पाहूं कीं, तुझी काळजी वाहूं? जा—तो "भ्याड' दामुअण्णा आला आहे त्याच्याबरोबर आपल्या सासरीं मुकाट्यानें आज चालती हो!"

दादा रागावण्याचें कारण आतां तिच्या लक्षांत आलें. मनुष्याच्या हातांत पैसा खेळत असला म्हणजे त्याची वृत्ति प्रसन्न असते आणि तेंच तो ज्या दिवशीं निष्कांचन असतो, त्या वेळीं मात्र त्याची वृत्ति एखाद्या पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणें

होते, हा यशवंतरावाच्या आतांच्या वागणुकीवरून शांताबाईला अनुभव आला. आतां आपण दादाला उत्तर देणें म्हणजे आगींत जास्त तेल ओतल्याप्रमाणें होईल असें वाटून ती अगदीं गप्प राहिली. पुष्कळ वेळ ती खिडकीजवळ असलेल्या खुर्चीवर मुकाट्यानें बसली होती. थोड्या वेळापूर्वी कमलिनीच्या घरून येत असतां वाटेंत तिच्या मनांत जे अनेक विचार घोळत होते, त्यांपैकीं आतां एकहि विचार शिल्केंत नव्हता; फक्त आतां आपलें पुढें काय होईल हा एकच विचार तिच्या मनांत सारखा चक्राकार गतीनें फिरत होता. बराच वेळ झाल्यावर यशवंतराव उठला. त्याला आतां मनस्वी भूक लागली होती. परंतु करतो काय ? खिशांत एक पै सुद्धां नव्हती. सकाळीं घरांतून बाहेर पडतांना त्याच्या खिशांत बरेच रुपये खुळखुळत होते, परंतु महालक्ष्मीवरील घोड्याच्या शर्यतीनें ते सर्व रुपये त्याच्या खिशांतून काढून घेतले होते. सर्व पैसे हरल्यावर तोंडांत मारल्यासारखी स्थिति होऊन यशवंतराव घरीं येत असतां वाटेंत त्याला म्यानेजर भेटला. त्याला चुकवितां येणें शक्य नव्हतें. तो घरीं येऊन बसतो तों दुसरे गोपाळराव आले. त्यांचा खटका उडाला, तों मागून शांताबाई पुढें आली. अशा रीतीनें रंगभूमीवर एकामागून एक पात्रें येऊं लागल्यामुळें यशवंतरावाला शर्यतींत पैसे गेल्याचें दुःख करण्यास अवसरसुद्धां मिळाला नाहीं.

थोड्या वेळानें यशवंतरावाचा राग पुष्कळ कमी झालां. खिडकींतून चिमुकलें तोंड करून आपली बहीण बसलेली पाहून त्याला कसेंसेंच वाटलें. रागाच्या भरांत आपण तिला, तिचा कांहीं एक अपराध नसतां फार बोललों, याबद्दल त्याला वाईट वाटलें; आतां आपण बहिणीची समजूत केली नाहीं तर सर्व रात्रभर ती अशीच विचार करीत खिडकींतच बसून राहील, अशी त्याची खात्री होती. शिवाय आज सायंकाळीं आश्रमांतून भोजनाचा डबाहि आला नव्हता, तेव्हां आतां तिला रात्रीचा उपासच होणार त्यामुळें ती प्रथम रागावलेलीच असणार आणि त्यांतून आपला राग ! असा पोक्त विचार करून यशवंतराव हळूच उठला आणि तिच्या पुढें येऊन उभा राहिला.

" शांता, रागावलीस का ? असं काय बरं ! तू अशी रागावूं लागलीस तर मग मी काय करावं ? तूंच सांग—मी तुला अधिक उणा शब्द बोललों, त्यावेळीं माझी मनस्थिति कशी बरं होती ? ती एकामागून एक चांडाळ मंडळी येऊन डोकं पिचवूं लागली, तेव्हां मी तरी काय करायचं ? आतां तो महापाजी हलकट म्यानेजर बोलल्याप्रमाणें डबा देखील पाठविणार नाहीं आणि माझ्या

जवळ वीष खायला एक पैसाहि नाहीं. अशा वेळीं मी कां बरं रागावूं नये तूंच सांग ? शांता, मी रागावलों म्हणून तुला राग आला काय ?—बोल— शांता,—नाहींना तूं राग सोडत ? आतां मी तरी काय करणार ? छे बुवा ! आतां आपणाला हा व्यापच नको ! जावं आतां कुठंतरी तोंड घेऊन असें वाटूं लागलं आहे. असं हालांत आणि लोकांच्या शिव्या घेत दिवस काढण्यापेक्षां एकदांच जीवाचं कांहीं बरं वाईट करून घेतलेलं काय वाईट !" असें म्हणून तो एकदम मागें वळला. तें पाहून शांताबाई घाबरली. पैशाच्या अडचणीमुळें मनुष्य टेकीस आल्यावर त्याच्या मनांत निराशेचे विचार घोळूं लागतात, आणि ते विचार एकदां का विकोपाला गेले म्हणजे मग कुठल्याहि गोष्टीचें भान न राहून मनुष्याच्या हातून कांहींतरी वेडावाकडा प्रकार होतो. असें तिनें कुठेंसें वाचलें होतें. त्याची तिला आठवण झाली. यशवंतरावानें शेवटचें वाक्य उच्चारलें, तें अशाच निर्वाणीच्या स्वरांत उच्चारलें आणि त्या विचारांत तो एकदम वळला, हा सर्व प्रकार तिला भीतिदायक वाटला.

" दादा, तूं असा हताश का झाला आहेस ? " त्याच्या मागून उठून त्याच्या खांद्यावर हात ठेवीत शांताबाई म्हणाली, " तुझ्याजवळ सकाळीं रुपये होते ना ? ते पैसे काय झाले ? इतक्यांत कसे संपले ? "

" कसे संपले तें काय सांगूं ! केला एक मूर्खपणा ! आतां काय त्याचं ! आतां पुष्कळ हळहळलों, तरी गेलेले पैसे थोडेच परत येणार आहेत ! "

" हें तुझं असं होतं ! कोणतीहि गोष्ट करतांना प्रथम तुला भान रहात नाहीं, मागावून बसतोस असा हळहळत ! प्रथम दामुअण्णाकडून रुपये घ्यावयाचे नव्हतेस; बरं, घेतलेस ते ज्या निमित्तानें घेतले होतेस, त्याप्रमाणें बिलं चुकतीं केलीं असतींस तर आतां हा रडत बसण्याचा प्रसंग तरी आला नसता. "

" तें सर्व खरं ! पण शांते, मी आतां बोलतों तर तुला राग तर नाहींना येणार ? मी म्हणतों—नाहीं—माझी अशी इच्छा—नव्हे तुला असा आग्रह आहे कीं, तूं आतां ह्या दामुअण्णाबरोबर आपल्या सासरीं जावेंस. "

" तें कधींहि होणार नाहीं. मी सासरीं जाणार नाहीं, हें एक वेळ नव्हे, दोन वेळ नव्हे तर तुला त्रिवार सांगतें, ह्या एका गोष्टीशिवाय तूं वाटेल तें दुसरें काम मला सांग, मी करीन पण ही गोष्ट मी करणार नाहीं. "

" शांता असा भलताच हट्ट धरूं नकोस ! तुझ्यामुळें माझा पाय अडकून राहिला आहे. मी एकटा असतों तर वाटेल तें केलें असतें ! पण—"

" माझा तुला भार झाला आहे काय ? पण माझा तुला असा कां भार वाटावा ? मी आतांपर्यंत तुझ्यावर असा कोणता भार टाकला दादा ! आतां ही रिकामी आहे इतकीच ना ? पण त्याबद्दल तुझ्यामागं शुक्लकाष्ट लागलं आहे, असं खोंचून कुजट बोलायला नको होतं, समजलास दादा ! मी आतां आठ पंधरा दिवसांत सारखी रात्रंदिवस प्रॅक्टिस करून टाईप रायटिंग शिकणार ! माझी खात्री आहे, मला कुठेंही पन्नास साठ सहज मिळतील. "

" मिळतील पण शिकणार कुठें ? क्लासला फी कोठून द्यायची ? "

" ती माझी मी सर्व व्यवस्था केली आहे.आतां मी जयरामकाकांच्या कमू-कडे गेलें होतें. तेथें मशीन आहे. मी तेथें रोज जाऊन तास दोन तास शिकणार आहे. परवां ' लेडी टाईपिस्ट ' पाहिजे अशी मी एक जाहीरात वाचली आहे. "

टाईपरायटिंग शिकायचें हें ठरलें. पुढें बराच वेळ त्यांच्या गोष्टी झाल्यावर जेवणाचा प्रश्न पुढें आला. दोघांनाहि सणसणीत भूक लागली होती. पण करतात काय ? जवळ कांहीं नव्हतें. किंवा दुकानांतून कांहीं फराळ आणण्यास खिशांत पैसे नव्हते. शेवटीं स्वतःशीं थोडा विचार करून यशवंतराव उठला आणि शेजारच्या खोलींत गेला. तेथें दुसरें बिऱ्हाड होतें. यशवंतराव तेथें गेला, त्यावेळीं शेजारचे बिऱ्हाडकरू कृष्णाजीपंत नुकतेच जेऊन बाहेर येऊन बसले होते. ही सर्व शेजारची मंडळी यशवंतरावाबरोबर विशेष सलगीनें वागत नसत. एक ' प्याश-नेबल बी. ए. ' आहे इतकेंच ती सर्व मंडळी यशवंतरावाला महत्त्व देत होती. आणि तीच स्थिति शांताबाईची होती. ती स्वतः होऊन केव्हांच शेजारीं बसण्या-उठण्याकरितां जात नसे. नेहमीं आपल्या आढ्यतेंत असे. त्यांतून शेजारपाजारच्या बायका सर्व संसारी ! त्यांचा रिकामपणाचा वेळ म्हणजे दुपारचा आणि त्यावेळीं शांताबाई उद्योगांत असे. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें जातां येतां ती इतर बाय-कांबरोबर जे दोन शब्द बोलत असे तितकेंच ! असो.

" कृष्णाजीपंत,—" शेजारच्या बिऱ्हाडाजवळ जाऊन दरवाजांतून यशवंतराव म्हणाला, " आपणाजवळ दहा रुपयांची मोड आहे काय ? मघांपासून मीं पाय दुखविले पण सुटे रुपये मिळाले नाहींत. "

" छे ! महिनाअखेर आली. आतां इतके रुपय कुठून असणार ? "

" मग असं करा, मला आठ आणे असले तर द्या, मग नोट मोडल्यावर तुमचे आणून देतों, आठ आण्याकरितां मला नोट मोडावी लागत आहे. "

" नाहींत—आठ आणे सुद्धां नाहींत. फार झालं तर एखादी चवली असेल. "

आणि खरोखरीच कृष्णाजीपंताजवळ एक चवली होती. पण ती त्यांनीं दुसऱ्या दिवशीं ऑफिसमध्यें जाण्यासाठीं ट्रामकरितां राखून ठेविली होती. यशवंतरावाची निराशा झाली. त्यानें डाव मोठा सुंदर जुळविला होता. आपणाजवळ नोट आहे असें भासवून तिचे सुटे रुपये मिळत नाहींत ह्या सबबीवर शेजारच्या कृष्णाजीपंताकडून आठ आणे आणण्याचा त्याचा विचार होता पण तो विचार साधला नाहीं. तेव्हां तो पुढच्या खोलीकडे वळला. ह्याच युक्तिची पुनरावृत्ति करून आतांची वेळ भागविण्याचा त्याचा विचार होता. तो पुढल्या बिऱ्हाडांत गेला त्यावेळीं तेथें कोणी नव्हतें. ती वेळ जेवण्याची असल्यामुळें पुढील बैठकीची खोली रिकामीच होती. फक्त दिवा थोडा बारीक करून ठेवला होता. यशवंतराव आंत आला. परंतु तेथें कोणी नाहीं असें पाहून निराश होऊन तो परत जाण्याकरितां वळला, त्यावेळीं दरवाजाजवळ असलेल्या खुंटीवर चायनासिल्कचा टांगलेला कोट त्याच्या दृष्टीस पडला. चटकन् यशवंतरावाच्या मनांत दुसरा विचार आला आणि तात्काळ हातानें त्या विचाराची अंमलबजावणी केली ! दरवाजांतून झटकन् बाहेर पडतांना त्यानें एकदां आंत वळून पाहिलें. आपणांस कोणी पाहिलें नाहीं अशी खात्री होतांच त्यानें तो कोट आपल्या खाकेंत मारला आणि तडक बाहेरचा रस्ता धरला. मोठ्या सडकेवर आल्यानंतर त्यानें कोटाचे खिसे तपासले. त्यांत एक नोटबूक, एक पेन्सिल, एक रेशमी रुमाल आणि दोन दिडक्या इतक्या वस्तु त्याला मिळाल्या.

" कांहीं हरकत नाहीं ! दोन पैसे आतां बाळगून आहे ! " स्वगत म्हणत यशवंतरावाची स्वारी पुढें निघाली. एकदोन रस्त्यांचीं वळणें घेतल्यावर त्याचें ठराविक मारवाड्याचें दुकान आलें. यशवंतरावानें राजरोसपणें तो कोट त्याच्यापुढें ठेविला आणि त्या वस्तूवर दहा रुपये मागितले. आपण कापडावर रक्कम देतच नाहीं, असेंच त्या मारवाड्याचें म्हणणें पडलें. कपडा गहाण घेऊन त्यांत आपलें नुकसान होतें, वगैरे सारखी बडबड करतां करतां शेवटीं दोन रुपये त्या मारवाड्यानें यशवंतरावापुढें ठेवले. प्रथम यशवंतरावानेंहि बरेच आढेवेढे घेतले. कपडा आणि शिलाई मिळून आपणांस त्या कोटाला वीस रुपये खर्च झाले असतां आपल्या गरजेच्या वेळीं आपणास दहा रुपये सुद्धां मिळूं नयेत, अशी कुरकुर करीत त्यानें ते दोन रुपये उचलले आणि खिशांत घातले.

' दोन पैशावरून दोन रुपये खिशांत आले, कांहीं वाईट सौदा झाला नाहीं. आतां आजची वेळ भागवून नेण्यास कांहीं हरकत नाहीं, ' असें म्हणत यशवंतरावाची स्वारी एका हॉटेलमध्यें शिरली, तेथें त्यानें कांहीं फराळाचे जिन्नस घेतले.

शांताबाई त्यांची वाटच पहात होती. तो घरीं आल्यावर दोघांनीं मिळून यथास्थित फराळ केला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं यशवंतराव माधवाश्रमांत गेला, आणि चार दिवसांत कसेंहि करून बिल चुकतें करतों, असें कबूल करून जेवणाचा डबा घेऊन आला. आतां चार दिवस जेवणाची दगदग मिटली, इतक्यावरच त्यानें समाधान करून घेतलें, चार दिवसांनंतर पुढें काय व्यवस्था करायची त्याचा विचार चार दिवस झाल्यावर करूं असें त्यानें ठरवून स्वारी पुनः बेफिकिर झाली. शांताबाई मात्र दुपारीं कमलिनीच्या घरीं टाईपरायटिंग शिकण्याच्या हेतूनें गेली. तिला आतां एक प्रकारची चिंता लागलेली दिसली. 'माझ्या मागें तुझं शुक्लकाष्ट का ?' हें तिच्या दादानें उच्चारलेलें वाक्य तिला भेदक वाटलें. आतां आपण कोणत्याहि रीतीनें दादावर आपला भार टाकावयाचा नाहीं, असा तिनें निश्चय केला. आणि त्या निश्चयाप्रमाणें तिनें टाईपिस्ट होण्याचें ठरविलें.

ती कमलिनीच्या घरीं गेली त्यावेळीं आमची कथानायिका गडबडींत असलेली तिला दिसली. शोधाअंतीं तिला कळलें कीं, रात्रीं जयरामपंतांची प्रकृति एकाएकीं बिघडली. रात्रीं अवेळीं डॉक्टर आणण्यापर्यंत पाळी आली. तो प्रकार म्हणजे असा चमत्कारिक झाला कीं, त्यांनीं आपल्या जांवयाला पाठविलेल्या पत्राचें उत्तर गेल्या प्रकरणांत दिलें आहे. तें पत्र वाचून त्यावर विचार करीत असतां त्यांच्या मनाला अत्यंत दुःख झालें. आपल्या लाडक्या कन्येच्या नशिबीं आतां सुखच नाहीं, असेंहि त्यांना वाटलें. अशा रीतीनें पुष्कळ वेळ विचार करीत असतां रात्रीं नित्य नियमाप्रमाणें कमलिनी आपल्या पित्याजवळ गेली. 'आज शांता आली होती, आणि अशा अशा आमच्या गोष्टी झाल्या, इत्यादि सर्व हकीकत तिनें आपल्या वडिलांना सांगितली. तेव्हां ईश्वराच्या ह्या परस्पर-विरोधी खेळाचें त्यांना मोठें कौतुक वाटलें. शांतीला तिचा नवरा अत्यंत आग्रहानें बोलावितो आणि आपली मुलगी पतिगृहीं जाण्यास तयार असतां तिचा नवरा तिला विरोध करतो; वास्तविक शांता म्हणजे अत्यंत उच्छृंखल, हट्टी आणि गृहिणी होण्यास नालायक असतांहि आणि नवऱ्याबरोबर इतका जबरदस्त खटका उडाला असतांहि ईश्वर तिच्या 'नशिबीं पतिसुख आहे' असें स्पष्ट दाखवितो, आणि आपली मुलगी सर्वतोपरी गृहीणी होण्यास लायक असतांहि ईश्वर 'तिच्या नशिबीं पतिसुख नाहीं' असें दाखवितो, ह्या दोन गोष्टींचा पंत विचार करीत असतां कमलिनी दिलरुबा घेऊन दिवाणखान्यांत आली. त्याचवेळीं त्यांच्या

विचाराचा अतिरेक झाला होता. मुलीला आंत येतांना पहातांच पंतांच्या तोंडून कांहीं स्पष्ट उद्गार बाहेर पडले. ' अरेरे ! अशा गोड पोरीच्या नशिबीं पति-सुख नसावं काय ? ईश्वरा कायरे हा तुझ्या घरचा न्याय ?—कमू–बाळे कमू ! तूं फुटक्या नशिबाचीच आहेस काय ? ' असें म्हणतां म्हणतां त्यांना जोराचा हुंदका आला आणि तो आंतल्या आंत दाबण्याचा प्रयत्न करीत असतां एकाएकीं त्यांचा श्वासोच्छ्वास बंद होऊन जीव घाबरा झाला !

" बाबा—बाबा असं काय झालं एकाएकीं ? " कमलिनी धांवत पुढें होऊन आपल्या पित्याला सांवरीत म्हणाली. इकडे श्वास सुटावा म्हणून पंत स्वतः छाती चोळूं लागले, अंगाला पिळे देऊं लागले, त्यांची अगदीं घाबरगुंडी वळली. परंतु हुंदक्याबरोबर कोंडलेला श्वास मात्र मोकळा झाला नाहीं. ही त्यांची स्थिति पाहून कमलिनीनें आरडाओरड केली. सर्वजण दिवाणखान्यांत धांवत आले, तोंपर्यंत पंत बेशुद्ध झाले.

झालें ! डॉक्टर बोलवावा लागला. बऱ्याच वेळानें पंत शुद्धीवर आले, पण त्या घटकेपासून त्यांच्या छातींत दुखूं लागलें. हृदयाचे ठोके फार जलद पडूं लागले. कपाळाच्या शिरा आणि नाडीचे ठोकेहि जलद प्रमाणांत होऊं लागले, ती सर्व रात्र त्यांची छाती शेकण्यांत व डॉक्टरनें दिलेलें तेल चोळण्यांत गेली. दुसऱ्या दिवशीं ते पडून होते. डॉक्टरानें त्यांना स्वस्थ पडून पूर्ण विश्रांति घेण्यास सांगितलें.

ही सर्व आधल्या दिवशीं रात्रीं घडलेली हकीकत कमलिनीनें शांताबाईला सांगितली. त्या दोघी बराच वेळ गोष्टी बोलत होत्या. शेवटीं शांताबाई म्हणाली, कमू , माझं एक काम आहे आणि तेवढ्याकरितां मी आतां आलें होतें. माझ्या मनांतून येथें रोज येऊन टाईपराइटिंग शिकावं असं आहे. पण तुझे बाबा आजारी आहेत, आणि मी येथें बसलें, तर मशीनचा ' कडकड ' असा आवाज होऊन त्यांना त्रास होईल. "

" होय. डॉक्टरानें त्यांना विश्रांति घेण्यास सांगितलें आहे. बिलकुल गडबड होतां उपयोगीं नाहीं. "

" म्हणून म्हणतें कीं मी हें मशीनच दोन दिवस घरीं घेऊन जातें. म्हणजे मला प्रॅक्टिस करावयला पुष्कळ वेळ मिळेल. "

" ठीक आहे. जा घेऊन मी कुठं नको म्हणतें. "

---

" शांते, तुझ्या मनांत आहे तरी काय ? काळवेळ कांहीं तरी पाहशील कीं नाहीं ? दिवस नाहीं, रात्र नाहीं, सारखी तूं फड्फड् करीत त्या मशीनवर बसली आहेस तुला कंटाळा तरी कसा येत नाहीं ? मी दुपारीं बाहेर गेलों, तेंव्हांपासूनच तूं मशीन घेऊन बसली आहेस ना ? मध्यंतरी कितीदां उठली होतीस ? चहा तरी घेतलास कीं तोही नाहीं ? "

" नाहीं घेतला अद्यापि चहा ! तूं आतां म्हणालास तेंव्हां मला चहाची आठवण झाली. पण दादा, हें पाहिलंस कां—" असें म्हणून शांताबाईंनें पोष्टांतून आलेलें मोठें पाकीट आपल्या दादाच्या हातांत दिलें. यशवंतरावानें आंतून कागद बाहेर काढला आणि वाचला.

" तुला ' ट्रायल ' देण्याकरितां उद्यां ऑफिसमध्यें बोलाविलं आहे. आतां काय आमच्या शांताबाई टाइपिस्ट झाल्या ! आनंदाची बातमी ! उद्यां ट्रायल देण्याकरितां जायचं म्हणून ही आज मशीनवर सारखी झोड घेतली आहेस वाटतं ?'

कमलिनीकडून टाईप रायटिंगचें मशीन आणून आज सहा दिवस झाले. त्या मशीनवर तिनें सारखी रात्रंदिवस झोड घतली होती. दोन दिवसांतच तिच्या बोटाला गति आली. आतां आपणांस टाईप राईट करतां येऊं लागलें असें पाहून तिनें वर्तमान पत्रांतील जाहीरात पाहून त्या पत्त्यावर ' लेडी टाईपिस्ट ' म्हणून नोकरीचा अर्ज पाठविला. तिनें नुकतेंच यशवंतरावांच्या हातांत दिलेलें पाकीट त्या नोकरीबद्दल केलेल्या अर्जाचें उत्तर होतें. आतां आपणाला दरमहा साठ रुपयांची जनरल पोष्ट ऑफीसांत टाईपिस्टची जागा मिळणार अशी तिला खात्री वाटूं लागली. ती एकटीच मशीनवर प्रॅक्टिस करीत बसली असतां तिच्या डोळ्यापुढें साठ रुपये दिसत होते, मुलींच्या शाळेंत मास्तरकी करीत असतां फक्त पंधरा रुपयेच तिला मिळत होते. आतां त्या पगाराच्या चौपट पगार आपणास मिळणार ह्या आनंदांत ती आज दंग होती. तिला चहाची इतकी आवड पण त्याचीसुद्धां आठवण झाली नाहीं मग जेवणाची कोठून होणार ? नाहींतर आज सहा दिवस झाले, आश्रमांतून जेवणाचा डबा बंद झाल्यापासून त्यांचे जेवणाचे हालच चालले होते. यशवंतरावानें जवळच्या एका [illegible] दुपारी दोन ताटें ब्राह्मणाकडून आणवावीं आणि रात्रीं कांहींतरी थंड फराळ किंवा चहाचिवडाआणवून ती वेळ मारून न्यावी. आज चारसहा दिवस खर्च करीत असलेले पैसे यशवंतरावानें कोठून

आणले होते, त्याची कल्पना गेल्या प्रकरणांतील हकीगतीवरूत लक्षांत येण्यासारखी आहे. त्यांतून गेले दोन दिवस सर्व चाळींत बरीच गडबड उडालेली दिसत होती. प्रत्येक बिऱ्हाडकरू आपल्या खोलींतून कांहींना कांहीं वस्तू चोरीला गेल्याची ओरड करूं लागला. सर्वजण चोराच्या पाळतीवर डोळयांत तेल घालून होता. परंतु अद्यापि चोराचा पत्ता लागला नव्हता. चोरानें यशवंतरावाच्या खोलींत अजून प्रवेश केलेला नव्हता असें दिसतें कारण 'आपल्या खोलींत कांहीं चोरी झाली' अशी ओरड अद्यापि शांताबाईनें केली नव्हती. परंतु ह्याच्यापुढें भविष्यकाळाविषयीं कोणी ग्वाहि द्यावी ?

"बोटं कशीं अगदीं दुखून आलीं आहेत !" बोटं मोडीत शांताबाई म्हणाली, "आतां उद्यांला ट्रायल देतांना मी खात्रीनं पास होईन. ह्या मशीनवर सहा दिवसांत मी सहा महिन्यांची प्रॅक्टिस केली. आज मशीन जवळ होतें म्हणून इतकें काम झालं ! उद्यां नोकरी लागतांच प्रथम हें कमूचें टाईपरायटिंग मशीन नेऊन दिलं पाहिजे ! पण दादा तूं चहा घेऊन येतोसना ?"

"आणतोंना ! चहा आणतों आणि कांहीं फराळाचेंहि घेऊन येतों, पण शांते, मशीन परत नेऊन देण्याची इतकी घाई कां ? माझ्याहि मनांतून दोन दिवस प्रॅक्टिस करायची आहे,"

"तूं प्रॅक्टिस करणार ? घरांत पांच मिनिटं तुझा पाय टिकेल तेव्हां ना ?

"घरांत पाय न टिकायला काय झालं ? आतां मला काय काम आहे ?" असें म्हणून यशवंतराव उठला आणि बाहेर जाऊन त्यानें फराळाचें सामान आणि चहा आणला. आजच्या फराळाकडे शांताबाईचें लक्ष नव्हतें. तिचें सर्व मन दुसऱ्या दिवसाच्या ट्रायलमध्यें गुंतलें होतें. इकडे यशवंतरावाच्या मनांतहि निराळेच विचार चालू होते. तो म्हणाला, "शांते तुला आतां ही नोकरी लागली म्हणजे तुझी एक काळजी दूर झाली. मीहि आतां नोकरीच्या उद्योगांत आहे. येथें मुंबईच्या मुंबईत जर मला नोकरी मिळती तर फार बरं होतं !"

"मग काय मुंबईच्या बाहेर तुला एखादी नोकरी सांगून आली आहे कीं काय ?"

"मुंबईच्या बाहेर नोकरीला काय तोटा ? लाहोरला एक 'डेली' निघतो. तिकडे सबएडिटरची जागा आहे. माझ्या मनांतून तेथें अर्ज टाकावा असें फार आहे. कारण पगार चांगला दिडशें असून कामहि कांहीं विशेष नाहीं. पण ही मुंबई सोडण्याचं अगदीं जीवावर येतं ?"

"पण दादा, इतकं लांब जाऊन करायचं आहे काय? मला आतां ही नोकरी लागल्यावर आपलें सर्व ठीक चालेल. तोंपर्यंत तूंहि खटपटींत रहा; मिळेल तुला इकडेच एखादी नोकरी!"

नोकरीकरितां असें वणवण फिरण्याचें यशवंतरावाला मुळींच कारण नव्हतें. तो जर हाताचा धड असता तर पूर्वीच्याच जागीं त्याला इतक्या अवधींत चांगली बढतीसुद्धां मिळाली असती. पण हें बाळ पडलें सुलक्षणी!

दुसऱ्या दिवशीं दहा वाजतां शांताबाई जनरल पोष्ट ऑफिसांत गेली. बरोबर तिचा दादाहि होता. ट्राममधून उतरल्यावर तिला कचेरीपर्यंत पोचवून यशवंतरावाची स्वारी आपल्या उद्योगाला निघून गेली. कचेरीचा अनुभव नसल्यामुळें प्रथम शांताबाई अगदीं भांबावूनच गेली. त्यांतून ती कचेरी म्हणजे मुंबई शहराच्या टपालखात्याची मुख्य कचेरी! एखाद्या मोठ्या गोठ्यांत दावणीला हारीनें बांधल्याप्रमाणें एका रांगेनें मांडलेल्या टेबलखुर्च्यांवर सारखे कारकूनच कारकून! शांताबाई आंत जातांच ती सर्वांच्या दृष्टीची केंद्र बनली. ती जाहीरातीवरून आलेली नवीन टाईपिस्ट उमेदवार आहे असें कळतांच जिकडे तिकडे खाणाखुणा आणि खांकरणें सुरू झालें. त्या कचेरींत लेडी टाईपिस्ट चार होत्या. परंतु दक्षिणी लेडी टाईपिस्ट हीच पहिली. रीतिप्रमाणें मुख्य कारकुनानें तिला आपल्या खोलींत नेऊन तिची ट्रायल घेतली. तिचा हा पहिलाच प्रसंग आहे हें जाणून त्या मुख्य कारकुनानें तिची परीक्षा घेतांना तिला योग्य त्या सवलती दिल्या आणि 'एक महिना उमेदवारी झाल्यावर आपण नक्की ठरवूं' असें त्यानें तिला सांगितलें व रोज कुठें बसावयाचें, कोणकोणतें काम करावयाचें तेंहि तिला सांगून टाकलें.

ज्या अधिकाऱ्याच्या हाताखालीं शांताबाईला काम मिळालें, त्यांचें नांव मिस्टर के. राजाध्यक्ष असें होतें. परंतु सर्व कारकून त्यांस 'शेट' किंवा 'साहेब' ह्या दोन्हीं बहुमानाच्या पदव्यांनीं हाका मारीत असत. पहिल्या दिवशीं शांताबाईला कांहीं विशेष काम पडलें नाहीं. सर्व दिवसांत तिनें दोनचार पत्रें टाईप करून दिलीं परंतु तीं पत्रें कशीं टाईप करायची त्याबद्दल माहिती करून घेण्याकरितां तिला पन्नासवेळां शेटच्या टेबलाजवळ जावें लागलें. दुपारच्या वेळीं शेटनें तिच्याकरितां शिपायाजवळून चहा मागविला.

"ही शांताबाई जोशी कोण?" इतर कारकुन मंडळींत तर्क कुतर्क चालू झाले! "ब्राह्मणाची, त्यांतून विवाहित, तरुण आणि फ्याशनेबल! कोण असावी ही! कुठं रहाते, त्याचा उद्यां पत्ता काढला पाहिजे."

" कां !—पत्ता काढून काय करावयाचा विचार आहे ! " दुसरा कारकुन म्हणाला, " बाकी आपल्या शेटजीची चैन आहे गड्या ! "

मुख्य टपाल कचेरींतील कारकुनांचीं तोंडें तीं ! काय मुक्ताफळें बाहेर पडतील तीं खरीं ! परंतु त्या कारकुनांतून एकाकडूनहि शांताबाईला त्रास झाला नाहीं. त्यांची वटवट फक्त तोंडाची ! सायंकाळीं साडेपांच वाजतां कचेरी सुटली. त्यावेळीं ' तुम्ही आतां एकट्याच जाणार काय ? कुठें राहतां ? ' अशी शेटनें चौकशी केली. शांताबाई गिरगांवांत रहात आहे असें कळतांच एका पोक्त अशा गिरगांवांतच राहणाऱ्या कारकुनास तिच्या बरोबर जाण्यास सांगितलें. त्याचें नांव परशुरामपंत होतें. त्यानें वाटेंत बरीच माहिती मिळविली. ' आपणांस भाऊ आहे तो. बी. ए. पास असून नोकरीच्याच खटपटींत आहे. पूर्वी पुण्यास रहात होतों. परंतु वडील निवर्तले असून पतीचें सरळसुत नाहीं, म्हणून आपण त्यांच्याजवळ रहात नाहीं.' इ० गोष्टी तिनें परशुरामपंताला सांगितल्या, हळुहळू गोष्टी करीत तीं दोघेजणं गिरगांवांत आलीं. घरीं जाण्यापूर्वी आपणास टाईपिस्टची दरमहा साठाची नोकरी लागली ही आनंदाची बातमी कमलिनीला सांगावी, अशा हेतूनें ती कमलिनीच्या घराकडे वळली. मशीन आणल्यानंतर ती आजच प्रथम तिच्या घरीं गेली. दरवाजाजवळ दोन गाड्या उभ्या होत्या. त्यावरून कोणीतरी पाहुणे मंडळी आली असावी असा तिनें तर्क केला. ती आंत गेली परंतु सर्व माजघरांत अगदीं सामसुम होतें. वास्तविक खालच्या माजघरांत म्हाताऱ्या आजोची बैठक असायची, पण ती देखील कुठें दिसेना म्हणून शांताबाई माडीचा जीना चढू लागली. वरच्या दिवाणखान्यांत कांहीं तरी गडबड आहे असा तिला संशय आला. इतक्यांत एक युरोपियन आणि एक नेटिव्ह असे दोन डॉक्टर बाहेर आले. शांताबाईनें सात दिवसापूर्वी मशीन आणलें त्यावेळीं जयरामपंतांची प्रकृति थोडी बिघडली होती, हें तिला माहित होतें. क्षुल्लक कारणाचा फार भयंकर परिणाम होतो तो असा ! जांवयाकडून आलेल्या पत्राचा मनावर परिणाम होऊन जयरामपंतांना हें दुखणं आलें. नुकत्याच येऊन गेलेल्या डॉक्टरांनीं तो मुदतीचा ताप—निमोनिया ताप आहे असें सांगितलें. बिचाऱ्या सुमतीबाईची अगदीं गाळण उडाली. म्हातारी तर प्रत्येक देवाला दोन दोन नवस करूं लागली. आज पंत अगदीं निचेष्टित पडले होते. त्यांना स्वतःच्या देहाचें सुद्धां भान राहिलें नव्हतं. खरोखरीच त्यांची स्थिति फार भयंकर होती. ह्या मुदतीच्या तापाचे कांहीं ठराविक दिवस पार पडेपर्यंत त्यांच्या जीविताबद्दल शाश्वती नव्हती. थोडक्यांत फार सांगावयाचें म्हणजे चालू घटकेला त्यांच्या जीविताचें मृत्युबरोबर मोठें तुमुल युद्ध चाललें होतं !

शांताबाई वर आल्यावर तिनें दिवाणखान्यांत डोकावून पाहिलें. अद्यापि एक डॉक्टर पंतांच्या उशाजवळ बसलेला होता! कमलिनी आणि सुमतीबाई एका बाजूला आणि म्हातारी पायाजवळ धरणें धरून बसली होती. दरवाजांत शांताबाईला पाहतांच कमलिनी उठली आणि बाहेर आली. दोघीहि पलीकडच्या खोलींत गेल्या. दरवाजांतून आंत पाऊल टाकिपर्यंत कमलिनीनें धीर धरला होता. परंतु आंत येतांच तिचें अवसान गळालें, तिनें शांताबाईच्या गळ्याला मिठी मारली. आणि ती हुंडक्यावर हुंदके देऊं लागली. शांताबाईला हा प्रकार अगदींच चमत्कारिक वाटला.

"शांता आतां आमचं कसं होइल?—" हुंदके देत कमलिनी म्हणाली, "आमचे बा—बा!"

"कमू, असं वेड्यासारखं काय करतेस? गप्प, रडूं नकोस! तुझे बाबा बरे होतील. अशी धीर काय सोडतेस?" अशा रीतीनें औपचारिक समजूत करीत असतां शांताबाई तिच्या तोंडाकडेच पहात राहिली. दगडालाही द्रव फोडील अशी कमलिनीची डबडबलेली मुद्रा पाहून तिच्या डोळ्यापुढें दुसरेंच एक चित्र उभे राहिलें. प्रत्यक्ष आपले वडील किंवा मातुश्री निवर्तले असतांहि स्वतःला असा दुःखाचा आणि शोकाचा उमाळा आलेला तिला आठवेना! आणि इकडे तर कमलिनीचे बाबा फक्त आजारी आहेत तों तिची अशी स्थिति! तिचें अतःकरण कोमल म्हणावें किंवा तिचें आपल्या वडिलांवर प्रेम आहे म्हणावें, हेंच तिला कळेना. बापावर प्रेम करतां येतें याचेंच तिला आश्चर्य वाटलें. कदाचित् हें आमचें लिहिणें सुद्धां वाचकांना चमत्कारिक वाटेल. परंतु आतांपर्यंत आमच्या शांताबाईच्या चित्रित झालेल्या चरित्रावर थोडा बारकाईनें विचार केल्यास तिच्या स्वभावाची वाचकांना सहज कल्पना होईल.

पहिला दुःखाचा उमाळा कमी झाल्यावर कमलिनीनें तिची चौकशी केली. दामुअण्णा निराश होऊन परत गेला तें तिनें सांगितलें. परंतु इतक्या वेळांत ती चारदां उठून दिवाणखान्यांतून डोकावून आली. त्यांतल्या त्यांत शांताबाईला टाईपिस्टची नोकरी लागली हें ऐकून आनंदहि झाला. आणि इतक्या लवकर टाईपरायटिंग शिकल्याबद्दल तिनें तिचा [illegible] म्हणून गौरवहि केला, चहा घेऊन झाल्यावर शांताबाई घरीं जाण्याकरितां निघाली. आज जर पंताची प्रकृति चांगली असती आणि कमलिनीची मनःस्थिति आनंदी असती तर तिची हार्मोनियमची पेटी घरीं नेण्याचा शांताबाईचा विचार होता. परंतु तेथील गडबड पाहून ती कांहींच बोलली नाहीं.

शांताबाई घरीं आली. यशवंतराव मात्र अद्यापि घरीं आला नव्हता. आणि बरीच रात्र होईपर्यंत तो आलाहि नाहीं. शांताबाईला फार भूक लागली होती. सकाळीं नवीन नोकरीवर जावयाचें म्हणून तिचें जेवण घाईघाईनेंच झालें होतें. त्यानंतर तिला कचेरींत आणि कमलिनीकडे असा दोन कप चहाच मिळाला होता. घरीं आल्यावर ती स्वस्थ विचार करीत आरामखुर्चीवर पडली होती. परंतु आज तिच्या विचारांना नवीन दिशा लागूं पहात होती. तिच्या नजरेपुढें कमलिनीचें एक ताजें चित्र होतें. कमलिनी आपल्या वडिलांच्या छत्राखालीं सुखी आहे. तिला ममता करायला आणि करून घ्यायला मायेचीं माणसें आहेत, तशीं आपणाला नाहींत. आपणास आपलें म्हणायला घरसुद्धां नाहीं; वगैरे अनेक नवीन विचार तिच्या डोक्यांत येऊं लागले. आणि लवकरच ह्या नवीन विचारांनीं तिचें डोकें अगदीं भांबावून गेलें. आपणास आज असें कां होतें, हें तिच्या लक्षांत येईना. बहुतकरून हा भूकेचा खेळ असावा असें तिला वाटलें. कारण त्यावेळीं दहा वाजून गेले होते, अजून तिचा दादा आला नव्हता. भूकतर कडकडून लागली होती. आणि तिच्याजवळ एक पैसासुद्धां नव्हता. शेजारींपाजारीं जाण्याची व याचना करण्याची तिला संवय नव्हती. ती मनांतल्या मनांत दादावर अतिशय चिडली. परंतु त्या चिडण्याचा तरी काय उपयोग! त्या योगानें तिच्या भूकेचें शमन थोडेंच होणार होतें? आतां फक्त थोडें पाणी पिऊन झोपावें असाच शेवटीं तिनें विचार ठरविला. ती उठली तोंच ताड्दिशीं दरवाजा उघडून यशवंतराव आंत आला. त्याच्या हातांत आज पुष्कळ सामान होतें. फराळाचे जिन्नस, कांहीं शेलकी फळफळावळ, इंग्लिश बिस्किटाचे दोन डबे, चॉकलेटच्या वड्या शिवाय एक लेडीचा इंग्लिश स्लिपर इतक्या वस्तु त्यानें आणल्या होत्या. त्या सर्व टेबलावर ठेवतांच शांताबाईचा राग क्षणांत मावळला. बहिणीच्या रागाची गुरुकिल्ली त्याला सांपडली होती, ती कुठें व कशी फिरविली असतां शांता शांत होते हें त्याला चांगलेंच माहीत झालें होतें. दोघांनीं गप्पा गोष्टी करीत हांसत विनोद करीत फराळ केला, शांताबाईनें आपल्या नोकरीबद्दल, कामाबद्दल आणि शेटबद्दल सर्व हकीकत भावाला सांगितली.

" आतां दादा, तुलाहि एखादी पन्नास पाऊणशेंची नोकरी लागली म्हणजे आपण स्वयंपाकाला एखादी बाई ठेऊं. हा रोज उठून त्रास कोणी काढावा! एखादी पोक्त बाई मिळाली म्हणजे आपलें ठीक जुळेल!" शांताबाई म्हणाली, ' पण दादा, आज तूं इतक्या जिनसा आणल्यास तरी कोठून! त्या दिवशीं, आश्रमाच्या म्यानेजरला म्हणाला होतास ते पैसे आले वाटतं!"

" कुठले आले आहेत पैसे! अग त्या दिवशीं वेळ मारून नेण्याकरितां मी ती दिली थाप! आतां म्हणावं बैस शंख करीत! आमचा डबा बंद केलास काय!"

" पण दादा, त्या गोपाळरावाचे पैसे प्रथम देऊन टाक. तो अगदीं पाजी मनुष्य आहे. त्याची मला फार भीति वाटते."

" पाजी असो की सात पाजी असो करतो काय तो!"

" करीत नाहीं कांहीं! पण त्याचा संबंध नको. आज तूं हे पैसे कुठून आणलेस! हेच दिले असतेस तर त्याला!"

" आज आणलेले पैसे का!—" यशवंतराव थोडा विचार करीत म्हणाला, " मी तो एक लेख-इंग्लिशमध्यें तो मोठा लेख लिहिला होता, त्याचे वीस रुपये आले."

" खरंच दादा, तूं मराटींत कां लिहित नाहींस? एखादी सुंदर कादंबरी लिहिशील तर चांगले पैसे मिळतील!"

" मराठी कादंबरी लिहून पैसे मिळतील? अग, हे भिकार मासिककार पैसे देणार? ह्यांना फुकट लेख आणि गोष्टी पाहिजेत."

अशा रीतीनें गप्पा गोष्टी करीत शांताबाईचा फराळ झाला. पण यशवंतरावाच्या पुढें बरेच पदार्थ जशाचे तसे होते. तो तिच्याबरोबर बोलत होता पण त्याचें मन दुसऱ्याच एका गोष्टींत गुंतलें होतें. शेवटीं त्याला रहावेना. तो उठला आणि खुंटीवर टांगलेल्या कोटाच्या खिशांतून त्यानें एक चपटी बाटली काढली.

" ताई, आज तुला नवीन नोकरी लागली, आनंदाच्या प्रित्यर्थ आज तूं सुद्धां हें—"

" इश्श! दादा हें रे काय? मला का तूं हें आज देणार?—दादा, नाहीं बरं—हें कांहीं चांगलं नाहीं! त्या मेल्या बाळा देसाईनं हें तुला व्यसन लावलं—"

शांताबाईच्या बोलण्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. आतां कुठें यशवंतरावाच्या फराळाला खरी सुरवात झाली. शांताबाई उठून पलीकडे असलेल्या आरामखुर्चीवरच एक पुस्तक घेऊन बसली. मधून मधून यशवंतराव तिला आग्रह करीत होता. रात्रीं बारावाजेपर्यंत त्यानें ती बाटली खलास केली. शांताबाई वाचतां वाचतां त्या खुर्चीवरच झोंपली. आतां तिला भावाचें व्यसन बरेंच अंगवळणी पडलें होतें. आणि यशवंतरावहि आपल्या व्यसनांत आतां बराच निर्ढावला होता. पूर्वी थोडी दारू घेतल्यावर त्याची गलीतगात्र स्थिति होत असे. परंतु हल्लीं दारूच्या ग्लासांचे बरेच फेरे घेतल्याशिवाय त्याला निशाच येत नसे.

पूर्वी थोडी जास्त दारू पोटांत जातांच ती भडभडून बाहेर येत असे परंतु आतां ओकाऱ्या देणाऱ्या इतर दारूबाजास हांसत असे. थोडक्यांत म्हणायचें म्हणजे आतां यशवंतराव पक्का दारूबाज बनला होता.

दुसऱ्या दिवशीं दिवस बराच वर येईपर्यंत यशवंतराव निजलेला होता. त्याच्या उठण्यावर शांताबाईचा चहा होता. त्यानें बाहेर जाऊन चहा आणल्याशिवाय ती कोठून चहा पिणार ? दादानें लवकर उठावें म्हणून ती त्याला सारख्या वरचेवर झांका मारीत होती. शेवटीं नवाच्या सुमारास यशवंतरावाची स्वारी उठली. तों इकडे शांताबाईची स्नानाची वेळ झाली. दादानें रात्रीं नवीन स्लिपर आणला आहे. तेव्हां नवीनच लुगडें नेसून ऑफिसांत जावें असा विचार करून नवीन लुगडें काढण्याकरितां ती आपली ट्रंक उघडूं लागली. एक दोनदां कुलूपांत किल्ली घालून पाहिली परंतु किल्ली फिरेना; म्हणून तिनें जरा जोरानें कुलूप ओढलें तों कुलूप उघडें ! दोन दिवसापूर्वी तिनें ट्रंक उघडली होती. त्यावेळीं बरोबर कुलूप लावल्याचें तिला चांगलें स्मरण होतें. मग आज ट्रंक उघडी कशी, हें कोडें तिला उलगडेना ! तिनें दोन दिवसाचें पुष्कळ स्मरण करून पाहिलें. शेवटीं ट्रंकेचें झांकण उघडलें तों काय ? आंत रचून ठेवलेले सर्व कपडे अस्ताव्यस्त ! हा प्रकार पाहून आपली ट्रंक कोणी तरी उघडली होती खास, अशी तिची खात्री झाली. तिनें भराभर कपडे बाहेर काढले. त्यांत एक भारी किंमतीचें, जरीची किनार असलेलें तिच्या आवडीचें एक लुगडें तिला दिसेना. तिनें पुनः पुनः कपडे तपासून पाहिले परंतु त्या लुगड्याचा तपास लागेना. इतक्यांत यशवंतराव चहा घेऊन आला त्याबरोबर शांताबाईनें विचारलें, " दादा, हें पाहिलंस का ? माझी ट्रंक कोणी तरी उघडली होती. माझं एक जरीचं लुगडं गेलं ? "

" गेलं ! आश्चर्य आहे !—बरं पण चहा घे प्रथम ! हा थंड होतो.—"

" दादा, मी थट्टा करते असं का तुला वाटतं ? खरंच माझं लुगडं चोरीला गेलं ! "

" हं—आतां आलं लक्षांत ! अलीकडे आपल्या चाळींत बऱ्याच चोऱ्या झाल्या, त्याच चोराचें हें काम असलं पाहिजे. पण हा चोर आपल्या खोलींत कसा आला बुवा ?" चहाचा कप तोंडाला लावतांना यशवंतराव म्हणाला. त्या वेळची त्याची एकंदर वर्तणूक आणि शब्द उच्चार शांताबाईला संशयास्पद वाटले. आतांपर्यंत आजुबाजूला चोऱ्या होत होत्या आणि त्याबद्दल शेजारपाजारचे बिऱ्हाडकरू ओरड करीत होते, ही गोष्ट शांताबाईला माहीत होती. परंतु स्वतःवर

पाळी आली नसल्यामुळें तिनें त्या गोष्टीकडे दुर्लक्ष केलें होतें. बाहेरचा कोणीतरी चोर आहे असें समजून ती गप्प होती. परंतु आतां स्वतःची चोरी होऊन दादाचीं उत्तरें ऐकतांच त्या घरांतल्या चोराचें सर्व चरित्र एखाद्या चित्राप्रमाणें तिच्या डोळ्यापुढें एकदम उभें राहिलें.

"दादा, आतां आलं माझ्या लक्षांत ! माझं लुगडं कुठें गेलं तें तुलाच माहीत आहे—दादा माझं लुगडं कुठं आहे !"

"म्हणजे !"

---

## १४....... यशवंतरावाचें प्रयाण

सर्व दिवस शांताबाईला केचरींत चैन पडलें नाहीं. आपलें एक भारी किंमतीचें लुगडें गेलें म्हणून तिच्या मनाला रुखरुख लागली. सासरहून येतांना तिनें स्वतःचे जे कपडे आणले होते, त्यांत तें लुगडें तिनें आवडीनें म्हणून घेतलें होतें. आपल्या दादानें तें कोणातरी मारवाड्याच्या दुकानीं गहाणच ठेवलें असावें आणि त्यावर कांहीं रुपये आणले असावे असेंच तिला वाटलें. ह्या बाबतींत तिला आपल्या दादाचा बिलकूल विश्वास नव्हता. ह्याच्या पूर्वी त्यानें ऑफिसांतील घड्याळ, आपल्या डॉक्टर मित्राचें पाकीट आणि घड्याळ, त्याचप्रमाणें स्वतःच्या सासरीं आणि प्रत्यक्ष आपल्या वडिलांची केलेली चोरी ह्या सर्व गोष्टी तिला एकामागून एक आठवूं लागल्या. आपल्या शेजारपाजारीं होत असलेल्या चोऱ्या, ह्या सर्वांचें मूळ आपला दादाच असला पाहिजे असें आतां तिला वाटूं लागलें. दामुअण्णाकडून घेतलेले रुपये संपल्यापासून आज बरेच दिवस दादाच्या हातांत सारखे पैसे खेळतात, त्याचें कारण ह्या सर्व चोऱ्या अशी आतां तिची खात्री झाली. सकाळीं तिची कचेरीची वेळ भरत आली होती, म्हणून तिनें हें प्रकरण वाढविलें नाहीं, परंतु आतां संध्याकाळीं घरीं गेल्यावर दादाचा पिच्छा पुरवून त्याला लुगडें परत आणावयास लावायचें असा तिनें निश्चय ठरवून ठेवला.

आज शांताबाईचें मन अस्वस्थ असल्यामुळें कामाकडे तिचें लक्ष लागेना. तिच्या शेटनें तिला दोन-चारदां विचारलें; दुपारीं चहा घेत असतां मुद्दाम जवळ बसवून चौकशी केली परंतु तिनें सर्व उडवाउडवी केली. तिची एखाद्या बाचकलेल्या पाडसाप्रमाणें झालेली स्थिति पाहून शेटजींच्या मनांतहि कांहीं निरनिराळेच विचार येऊं लागले. "तुम्हीं जर कोणत्या संकटांत असाल तर मला सांगा. मी

तुमचें संकट दूर करण्याचा शक्य तो प्रयत्न करीन, कदाचित पैशांची अडचण असेल तर तसें मला कळूं द्या. मी थोडीबहुत मदत करीन. मग तुमचा महिना भरून पगार झाल्यावर माझी फेड करा.'

अशा रीतीनें सांगून पाहिलें परंतु शांताबाईनें त्याला कोणत्याच गोष्टीची दाद लागूं दिली नाहीं. संध्याकाळ केव्हां होते आणि आपण घरीं केव्हां जातों, याची ती सारखी वाट पहात होती.

शेवटीं एकदांची संध्याकाळ झाली. शांताबाई तडक घरीं आली. परंतु दरवाजाला कुलूप होतें. यशवंतरावाची स्वारी बाहेर गेली होती. आतां तिला आपल्या दादाची वाट पाहण्यापलीकडे दुसरा उपायच नव्हता. तिनें जवळ असलेल्या किल्लीनें दरवाजा उघडला. तोंच खोलीच्या कोंपऱ्यांत असलेल्या टेबलाकडे तिची दृष्टि गेली आणि तिच्या छातींत धस्स झालें ! तेथें टेबलावर ठेवलेलें टाईपरायटिंगचें मशीन तिला दिसेना. घाईघाईनें ती आंतल्या खोलींत गेली. तेथेंहि मशीन नव्हतें. क्षणांत अनेक विचार तिच्या मनांत उसळून गेले. आतांपर्यंत दादानें जे अनेक चोरीचे व्यवहार केले, तसाच प्रकार ह्या मशीनचा झाला असेल काय ? अशी तिला अंधुक शंका येऊं लागली. तें मशीन दुसऱ्याचें आहे, तेव्हां आपला दादा असें करणार नाहीं, असें तिचें भगिनीप्रेम तिला सांगूं लागलें. कदाचित् आपण कचेरींत गेल्यावर मशीन मागण्याकरितां कमलिनीकडून कोणीं मनुष्य आला असेल, आणि दादानें तें दिलें असेल, असाहि एक विचार तिच्या मनांत आला. आणि बराच वेळ हा विचार तिच्या डोक्यांत राहिल्यामुळें तोच तिला पटूं लागला. ती पुनः बाहेर पडली आणि दरवाजाला कुलूप लावून मनाची खात्री करून घेण्याकरितां ती कमलिनीच्या घरीं जाण्यास निघाली. ती वेळ आघल्या दिवसासारखीच होती. ती कमलिनीच्या घराचवळ पोंचली त्यावेळीं रस्त्यांत दरवाजाजवळ डॉक्टरांच्या गाड्या उभ्या होत्या. शांताबाई खालीं चौकशी करून वर माडीवर गेली; तेव्हां दिवाणखान्यांत बरीच गर्दी होती. नुकतेच आलेले डॉक्टर, पंतांच्या कचेरींतील त्यांचे स्नेही, आणि घरांतील मंडळी, सर्व जण पंतांच्या पलंगासभोंवतीं जमा झाले होते. शांताबाई एकदां डोकावून पलीकडे असलेल्या कमालिनीच्या खोलींत जाऊन बसली. तेथें पूर्वीच्या जागेवर कमलिनीच्या टेबलावर तिला मशीन दिसलें नाहीं. कदाचित् मशीन आणलें असेल आणि तें बाहेरच्या दिवाणखान्यांत ठेवलें असेल अशी तिनें मनाची समजूत करून घेतली. पुष्कळ वेळ झाला. डॉक्टर आणि इतर मंडळी निघून गेल्यावर

कमलिनी मोकळी झाली. तिनें शांताबाईला आलेलें पाहिलें होतें. आज देखील तिची चर्या अगदीं निस्तेजच दिसत होती. अद्यापि डॉक्टर सुद्धां पंताबद्दल कोणतीच आशा दाखवित नव्हते, त्यामुळें घरांतील सर्व मंडळीच्या तोंडचें पाणी पळालें होतें.

" कमू, कसं आहे तुझ्या बाबांचें ? " कमलिनी खोलींत आल्यावर शांताबाईनें विचारलें.

" काय सांगू ? डॉक्टर तर अजून निराशच आहेत. आजचा सातवा दिवस! हे कांहीं ठराविक मुदतीचे दिवस टळल्याशिवाय आपणास निश्चयात्मक कांहींच सांगतां येत नाहीं, असें डॉक्टर म्हणतात. शांता ईश्वराला आमची दया येईल कांग ? " कमलिनीच्या डोळयांतून अश्रुधारा सुरू झाल्या. शांताबाईनें तिची समजूत करून तिला धीर दिला आणि शेवटीं विचारलें, " कमू, टाईप रायटिंगचें मशीन आणलें ना परत ? "

" केव्हां !—नाहीं ! कां बरं ! तूं परत पाठविलंस का ? "

" मी नाहीं पाठविलं ! पण मला तसं वाटलं ! मी आतां ऑफिसांतून परत आल्यावर मला टेबलावर मशीन दिसलं नाहीं म्हणून तसं वाटलं ! "

" नाहीं. मीं कशाला उगाच मागवीन. आणि मशीनवर बसायला मनाला तितकी स्वस्थता तरी कुठं आहे ! "

" पण कमू, तुझं विलायतेला जाण्याचं काय झालं ! " विषय बदलण्याच्या हेतूनें शांताबाई म्हणाली.

आतां कसली विलायत ! बाबांच्या प्रकृतिपुढें कसली आली आहे विलायत ! वास्तविक आतांपर्यंत माझी सर्व जय्यत तयारी व्हावयास पाहिजे होती. आजपासून सातव्या दिवशीं माझं बोटींत बसायचं ठरलं होतं. पण आतां काय ! बाबांचे कसेलसाहेब आणि त्यांची मडम काल बाबांच्या खबरेला आले होते. तेव्हां ते म्हणाले, कांहीं काळजी करूं नको. पंतांना बरें होऊं दे. मग मागाहून विलायतेला ये. आम्हीं सर्व व्यवस्था करूं पण तुला नेऊं."

कमलिनी बोलत होती आणि शांताबाई ऐकत होती परंतु तिच्या भाषणाकडे लक्ष पोचविण्याइतकें शांताबाईचें मन स्वस्थ नव्हतं. मशीनचें काय झालें ! हा एकच प्रश्न तिच्या डोक्यांत होता. आतां तिला मशीनच्या सुरक्षितपणाबद्दल काळजी वाटूं लागली होती. ती जाण्याकरितां उठली. कमलिनीनें तिला चहाचा आग्रह केला. परंतु चहा घेण्याइतकी देखील तिच्या मनाला स्वस्थता नव्हती.

ती पुनः तडक घरीं आली. अद्यापि दरवाजाला कुलूपच होतें. दादा आला नाहीं, हें तर सिद्ध झालें. आतां दादा परत येईपर्यंत स्वस्थ बसण्याशिवाय तिला मार्गच नव्हता. दरवाजा उघडून ती आंत गेली. पुनः एकदां तिनें दोन्ही खोल्या पाहिल्या. परंतु मशीन नाहीं. ती पुनः आंत पाहूं लागली तोंच एकदम दचकली ! दादाची ट्रंक तिला दिसेना. बाहेरच्या खोलींत पहाते तों तेथें त्याच्या गादीची वळकटीहि दिसेना ! एकाद्या पुतळीप्रमाणें ती त्या दरवाजांतच उभी राहिली. तिचें डोकें भणभणूं लागलें. आपला दादा कुठें गेला, किंवा ट्रंक, गादी आणि मशीन घेऊन कोणीतरी चोर दुपारीं चोरी करून गेला, हें तिला कांहींच कळेना. इकडे तिकडे तिनें बरीच शोधाशोध केली. टेबलवर कांहीं लिहून ठेवलें असेल म्हणून पाहिलें परंतु कुठेंच कांहीं दिसेना. शेजारीं चौकशी करावी, म्हणून ती बाजूच्या खोलींत गेली. तेथें चौकशी केली परंतु शोध लागला नाहीं दुसऱ्या खोलींत गेली, तेथें मात्र तिला इतकें कळलें कीं, ' चार वाजण्याच्या सुमारास यशवंतराव ट्रंक आणि गादी घेऊन एका व्हिक्टोरिया गाडींत बसून गेले ! "

दादा गेला ! आपला दादा कुठें तरी गेला इतकी गोष्ट शांताबाईला कळली. ती आपल्या खोलींत आली आणि खिडकीजवळील खुर्चीवर विचार करीत बसली. दादा कुठें गेला असेल, हें तिला कळेना. आपण ऑफिसांतून आलों. त्यावेळीं दादाची ट्रंक आणि गादी होती किंवा नाहीं, हें तिच्या लक्षांत आलें नव्हतें. मशीनच्या गडबडींत त्यावेळीं तिचें लक्ष गादीकडे गेलें नाहीं. आपणास एकटेंच ह्या खोलींत रहावें लागणार हा विचार मनांत येतांच तिला भीति वाटूं लागली. अंधार पडत चालला, तरी दिवा लावण्याचें तिला भान राहिलें नाहीं. ती किती वेळ तशीच शून्य मनानें खिडकीजवळ बसून राहिली होती. त्या रात्रीं खाण्याची गोष्ट तर राहूंद्याच पण तिला चहासुद्धां मिळाला नाहीं. तसेंच अंथरुणावर पडावें लागलें ! अर्धी रात्र उलटेपर्यंत ती विचार करीत होती. आतां जेवणाचा डबा कोण आणणार, बाजारांतील एखादी वस्तु लागल्यास ती आपणास कशी मिळणार वगैरे अनेक विचार तिच्या मनांत येत होते. परंतु प्रसंग पडल्यावर मनुष्य धीट बनतो आणि त्याला युक्त्याहि तशा सुचूं लागतात, असं म्हणतात तें अगदीं खरें आहे. दुसऱ्या दिवशीं उठतांच शांताबाई आपल्या शेजारीं गेली. शेजारच्या बिऱ्हाडांत लक्ष्मीबाई आणि कृष्णाजीपंत रहात होते. त्यांना दोन मुलें होतीं. एकाचें नांव वामन आणि दुसऱ्या मुलाचें नांव सुदाम असें होतें. मोठा मुलगा इंग्रजी तिसरी आणि धाकटा मुलगा मराठी चौथी इयत्ता शिकत होता. कृष्णाजी-

पतांना रेल्वेंत दरमहा साठ रुपये मिळत होते. शांताबाई शेजारच्या लक्ष्मीबाईकडे जाऊन बसली. आज इतके महिने ती जवळ रहात होती परंतु आपण होऊन शांताबाई केव्हांच कुणाकडे गेली नव्हती. आपल्या शेजारच्या बायका म्हणजे अशिक्षित, घर संसाराला वाहिलेल्या आणि नवऱ्याच्या बटीक अशी तिची समजूत झालेली. त्या बायकांत मिळून मिसळून वागणें म्हणजे त्यांना उगाच महत्त्व देणें असेंच ती समजत असे. पण आतां प्रसंग पडतांच त्याच बायकांची तिला मनधरणी करावी लागली. शेजारीं जाऊन तिनें लक्ष्मीबाईला सांगून तिच्या वामनाला बोलावून आणलें. आणि त्याच्याकडून प्रथम तिनें चहा आणविला. तिच्याजवळहि कांहीं फारसे पैसे नव्हते. सर्व ट्रंक झाडून पाहतां आठ बारा आण्याचे पैसे निघाले.

दहा वाजायला आले परंतु जेवणाचा डबा आला नाहीं. आश्रमांतून डबा बंद झाल्यावर यशवंतरावानें एका खाणावळींतून डबा आणण्याची व्यवस्था केली होती. त्याचेहि पैसे दिले नव्हते. 'उद्यां सकाळीं बाकी आणून द्याल तर डबा पाठवूं' असें त्या खाणावळवाल्यानें यशवंतरावास ताकीद देऊन ठेविली होती. त्याप्रमाणें त्याला पैसे पोचले नाहींत म्हणून त्यानें डबा पाठविला नाहीं. परंतु हा गोंधळ शांताबाईला काय माहीत ? तिनें दहा वाजेपर्यंत वाट पाहून शेवटीं ऑफिसचा रस्ता धरला, बरोबर तिनें रुमालांत बांधून एक बिस्किटांचा डबा घेतला; परंतु त्यानें काय होणार ? अन्नाची सर त्याला थोडीच येणार आहे ? आज आपणांस जेवण नाहीं, उपवास पडला ह्या विचारानेंच ती गळून गेली. 'आज तुमची प्रकृति बरी नाहीं काय ?—तुमच्या मनावर कसलं तरी दडपण आहे. मला कां सांगत नाहीं ? मी येथील अधिकारी म्हणून संकोच बाळगूं नका—' इत्यादि बऱ्याच गोष्टी शेटनें केल्या. परंतु शांताबाईस वाचा फुटली नाहीं. तिला एकदां वाटे कीं, सर्व हकीकत शेटजीस सांगावी, परंतु तात्काळ तिचा अभिमानी स्वभाव आडवा येई. फक्त 'मला आज बरें वाटत नाहीं !' इतकेंच उत्तर देऊन तिनें वेळ मारून नेली.

आतां घरीं गेल्यावर जेवण करावें असा विचार तिच्या मनांत आला. पण तो विचारांतच राहिला. जेवण करावयाचें कशाचें ? नाहीं धान्य किं इतर साहित्य ! तिच्या सुधारण्याच्या व स्वातंत्र्याच्या घातुक विचारांनीं तिला किती परस्वाधीन बनविलें होतें पहा ! इतक्या अडचणींत आणि संकटांत ती आली होती. तरी तिचा अभिमानाचा ताठा कांहीं कमी झाला नव्हता. असो. संध्याकाळीं ती घरीं आली.

दरवाजा उघडून आंत पाऊल टाकणार तों पोष्टाच्या शिपायानें तिच्या गैरहजिरींत दरवाजाच्या फटींतून टाकलेलें पत्र तिच्या दृष्टीस पडलें. लवकर लवकर तिनें तें उचललें. अक्षर पाहतांच तें पत्र आपल्या दादाचें आहे अशी तिची खात्री झाली. तिनें तें पत्र फोडून वाचण्यास सुरवात केली—

'माझी प्रियकर बहीण शांता,

'हें पत्र जेव्हां तुझ्या हातांत पोष्टाचा शिपाई देईल तेव्हां मी तुझ्यापासून फारच दूर गेलेला असेन. दूर म्हणजे किती ?—लाहोरला. लाहोरच्या 'उईकली' पत्राचा मी सबएडिटर झाल्याची एकदम तार आली. तुला भेटायचें पण तार 'अर्जंट कॉल' ची होती. तुला वाईट वाटेल कारण तुला भेटलों नाहीं पण माझ्या धाकट्या प्रियकर बहिणी, तुला आनंदच होईल कारण मला सबएडिटरची जागा मिळाली. तूं सुशिक्षित आहेस तेव्हां तुला सांगायला नकोच कीं तूं नीट जपून सांभाळून वाग आणि आनंदांत रहा. मी आतां एडिटर झालों. माझी प्रत्येक आठवड्याला तुला खबरबात कळवायची म्हणजे 'उईकली' पाठवायचा ! तूं मात्र तुझा डेली रिपोर्ट पाठवीत जा.

तुझा वडील भाऊ—'यशवंत.'

एका ग्रॅज्युएटानें मराठींत लिहिलेलें हें पत्र ! हेंच पत्र यशवंतरावानें इंग्रजी भाषेंत लिहिलें असतें तर किती तरी सुंदर लिहिलें असतें. त्याची इंग्रजी भाषा सुंदर होती आणि त्याच शिफारशीवर त्याला वरील नोकरी मिळाली होती ही गोष्ट खरी ! पण जन्मभाषेबद्दल ही कोण अनास्था ! नीट वाक्य जुळून चार ओळींचें मराठी पत्र आणि पत्राचा मायना सुद्धां आमच्या बी. ए. ना लिहितां येऊं नये काय ? मराठी भाषेसंबंधानें ही यशवंतरावाचीच अशी शोचनीय अवस्था असें नाहीं, तर आज असे कित्येक ग्रॅज्युएटस् निघतील कीं, त्यांचें मातृभाषेचें अगाध ज्ञान पाहून त्याची कींव केल्याशिवाय राहावत नाहीं. मुंबई पुण्यांतील कॉलेजांत शिकवीत असलेले कांहीं प्रोफेसर ह्याच सदरापैकीं आहेत. त्यांना म्हणे इंग्रजींत सुंदर बोलतां येतें परंतु मराठींत बोलतांना त्यांची अगदीं धांदल उडते ! वाहवारे प्रोफेसर !

शांताबाईनें पत्र वाचलें. आपला दादा लाहोरला गेला इतकी गोष्ट तिला ह्या पत्रावरून कळली. परन्तु मशीनचें काय झालें ? हें मात्र कळलें नाहीं. आणि तें कळूं नये म्हणून तर यशवंतरावानें इतकी चलाखी केली होती. आज त्याला बऱ्याच संकटांना तोंड द्यावयाचें होतें. आणि तीं सर्व संकटें कशीं टाळावीं ह्याचा विचार करीत असतां त्याला लाहोरच्या नोकरीचें स्मरण झालें. त्यानें तात्काळ नोक-

रीचा अर्ज लिहिला आणि तो पोष्टानें पाठवून दिला. परंतु अर्जाचें उत्तर यावयास चार दिवस लागणार आणि इकडे तर घरभाडें, आश्रमाचें बील, खाणावळीचें बील, गोपाळरावाचा तगादा ह्या सर्व भानगडी अंगावर आलेल्या! त्या सर्वांना 'पैसे देतों' म्हणून मुकरर केलेला दिवस येऊन ठेपला. तो चुकविण्याचा मार्ग त्याला सुचेना. डोकें भणभणूं लागलें. तें शांत करण्याचें औषध म्हणजे दारूची बाटली! पण ती आणायला जवळ पैसे नाहींत म्हणून इकडे तिकडे शोधतांना शांताबाईची ट्रंक दृष्टीस पडली. तात्काळ त्या ट्रंकवर प्रयोग होऊन आंतून एक लुगडें बाहेर आलें, हळुहळू त्याला पाय फुटून तें मारवाड्याच्या घरांत गेले. दोन दिवसांपूर्वी जो एवढा बाजार झाला तो त्याच पैशावर! ती चोरी जर शांताबाईला इतक्या लवकर उमगली नसती तर टाईपरायटींगच्या मशीनवर दुसऱ्या दिवशीं घाड आली नसती, अशी आमची खात्री आहे. शांताबाईनें लुगड्याबद्दल संशय घेतांच यशवंतरावाची स्वारी गडबडली. तो प्रकार गेल्या प्रकरणांत येऊन गेलाच आहे. त्यावेळीं तिला ऑफिसांत जाण्याची घाई असल्यामुळें तिनें तें लुगड्याचें प्रकरण जास्त वाढविलें नाहीं. ती ऑफिसांत निघून गेल्यावर यशवंतरावानें आपले पुढले सर्व बेत आंखले आणि ते तात्काळ अमलांतहि आणले. मशीन नेऊन मारवाड्याकडे ठेवली, त्याचे पाऊणशें रुपये आले. ते रुपये घेऊन स्वारी घरीं आली. आणि ट्रंक बेडिंग घेऊन तडक बोरीबंदर स्टेशनवर निघाली. आतां आपल्या मागें बिलाकरितां घरवाल्याच्या मनुष्यानें बोंब मारिली किंवा आश्रमाच्या म्यानेजरानें शंख केला अथवा प्रत्यक्ष बहिणीनें मशीन गेल्याबद्दल दांत ओंठ खाल्ले तरी त्यांची त्याला पर्वा नव्हती.

पत्र वाचून शांताबाईला अत्यंत दुःख झालें. लुगडें गेलें त्याच ठिकाणीं मशीन गेलें अशी तिची खात्री झाली. आतां कमलिनीकडे जावयास आपणाला तोंड नाहीं, हा विचार मनांत येऊन तिला जास्तच वाईट वाटलें. सकाळपासून पोटांत अन्न नसल्यामुळें तिला त्रास झालाच होता, आणि त्यांत ही भर पडली!

---

## १८........ अति प्रसंग

स्वतंत्रपणानें वागण्यांत काय सुख आहे, याची आतां शांताबाईला थोडी थोडी कल्पना होऊं लागली. तिनें ती रात्र जागून विचारांत घालविली. आतां आपणांस महिना साठ रुपये मिळतील, त्या पैशांत आपल्या सर्व प्रकारच्या गरजा सहज

भागतील, ही एक गोष्ट तिच्या खळबळलेल्या मनाला किंचित् स्वस्थ करीत होती; परंतु महिना भरून पगार हातीं येईपर्यंत महिन्याचे बाकी राहिलेले वीस बावीस दिवस निष्कांचन स्थितींत निघावे कसे, हा एक विचार तिला झोंप येऊं देईना. गोपाळराव मोतीवाले, आश्रमाचें बील, खाणावळ, घरभाडें इ. बरेंच देणें होतें. त्या सर्व पैशांपेक्षां तिला गोपाळराव ह्या व्यक्तीबद्दल भयंकर भीति वाटत होती. कारण त्या व्यक्तीबद्दल निरनिराळया वेळीं तिला अनुभव तसे खडतर आले होते. इतके दिवस तिला तिच्या दादाचा आधार होता पण आतां ती एकटी होती.

अशा ह्या मनःस्थितींत, आतां घरांत एकटे बसून चार दिवस काढणें तिला भाग होतें, कारण त्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. स्वतंत्रपणानें वागण्याकरितां नोकरीचा पेशा पत्करून जरी तिनें पुरुषी थाट आणला होता तरी स्वभावासिद्ध स्त्रियांचे हक्क बिनतक्रार तिच्यावर अंमलबजावणी करीतच होते. ती आज अस्पर्श झाल्यामुळें चार दिवस का होईना तिला परस्वाधीन होणें भाग होतें. तिचा अगदीं नाइलाज झाला. नुकतीच नोकरी लागलेली आणि आपण चार दिवस घरीं राहणार म्हणून तिच्या मनाला तळमळ लागली. परंतु तळमळ लागून उपयोग काय ? तो सर्व दिवस तिनें खिडकींत बसून काढला. नाहीं म्हणायला दुपारच्या प्रहरीं शेजारच्या मुलाकडून चहा आणवून कांहीं बिस्कुटें तिनें खाल्लीं इतकेंच ! कोण ही दैना ! एका सुशिक्षित म्हणविणाऱ्या मुलीनें स्वतःच्या अरेरावी वर्तनामुळें स्वतःवर हे प्रसंग ओढवून घेतले होते. परंतु ह्या तिच्या वर्तनाबद्दल तिच्यापेक्षां तिची वडील मंडळीच विशेष दोषाला पात्र ठरतात. कारण त्यांनींच तिच्या शिक्षणाची दिशाभूल केली होती.

संध्याकाळ होत आली. शांताबाई अद्यापि खिडकीजवळच बसली होती. त्यावेळीं रस्त्यांतून सारखी रहदारी चालू होती. परंतु कोणत्याहि विशिष्ट गोष्टीकडे तिचें लक्ष नव्हतें, तिचे नेत्र अनेक देखावे पहात होते. परंतु मन निरनिराळया अनेक विचारांत गुंतलें असल्यामुळें त्या देखाव्यांची तिच्या मनाला जाणीव होत नव्हती. रस्त्यांतून जाणाऱ्या येणाऱ्यांची दृष्टि सहज खिडकीकडे जात होती. कित्येक तिच्याकडे टक लावून पहात होते. एक बनिया गृहस्थ तर रस्त्यांच्या कडेला उभा राहून बराच वेळ खिडकीकडे पहात होता. शांताबाईनें त्याच्याकडे पुष्कळ वेळां पाहिलें परंतु तो आपणाकडे अगदीं रोखून पहात आहे ही गोष्ट तिच्या लक्षांत देखील आली नाहीं. उलट तिच्या पहाण्यानें आणि आत्मगत विचारांत स्वाभाविकरित्या होणाऱ्या हातवाऱ्यानें भलतीच परिस्थिति मात्र उत्पन्न झाली. तो बनिया गृहस्थ संध्याकाळीं फेरफटका करण्याकरितां निघालेला

होता. हे लोक विशेष शोकी असतात, हें सर्वश्रुत आहेच! गोवें–मालवण इत्यादि ठिकाणच्या कसबिणीकलावंतिणी आणि वेश्या यांची मुंबईत वसाहत करणारे हेच शोकीन लोक!

मनुष्य आपल्या विचारांत एकटाच असला म्हणजे मनांतल्या विचारांना अनुसरून त्याचा अंगविक्षेप आणि हातवारे अगदीं नकळत होत असतात. अशा प्रकारें शांताबाईकडून होणारे हातवारे आपणास अनुलक्षून आहेत असें समजून तो बनिया गृहस्थ माडी चढून वर आला. जिना मध्यभागीं असल्यामुळें त्याला दोन खोल्या ओलांडाव्या लागल्या. त्या दोन्ही खोल्यांतून डोकावून पाहतां त्या बनिया गृहस्थाला थोडें चमत्कारिक वाटूं लागलें. कारण ह्यापूर्वीं तो गृहस्थ कैकवेळां वेश्यांच्या चाळी धुंडाळून आलेला असा निर्ढावलेला शोकीन गृहस्थ होता. परंतु ह्या चाळींतील बिऱ्हाडकरूंची राहणी ओळखीची दिसेना. कारण वेश्यांची राहणी इतकेंच नव्हे तर त्या रहात असलेल्या चाळीसुद्धां कोणालाहि सहज ओळखतां येतात. नाहीं म्हणायला अलीकडे मात्र ह्या वेश्यांच्या राहणींत बराच फरक पडूं लागलेला आहे. कुलीन घराण्यासारखी सभ्य राहणी कित्येक वेश्यांच्या ठिकाणीं पहाण्यास सांपडते. तरी देखील वेश्या त्या वेश्याच!

दरवाजा किंचित् लावलेला होता. त्या बनियानें हळूच दरवाजा उघडून आंत डोकावून पाहिलें. आपणाकडे कोणी आले आहे अथवा आपण करीत असलेल्या हातवाऱ्याचा विपर्यास करून ‘ आपण बोलाविलें आहे ’ असें समजून कोणी एक गृहस्थ वर आले आहेत, याची तिला कल्पनाहि नव्हती. ती आपल्याच विचारांत बसलेली होती. इकडे तो बनिया हळूच आंत आला आणि क्षणभर थांबून आपण आलों आहोंत हें सुचविण्याकरितां हळूच खोकूं लागला. शांताबाईनें चटकन् माग वळून पाहिलें. कोणी परका मनुष्य आपल्या खोलींत आलेला आहे, हें पाहून तिनें विचारलें, “ कोण पाहिजे तुम्हाला ? ”

उत्तराऐवजीं त्यानें खुर्ची जवळ ओढली आणि तीवर बसत बसत किंचित् तिरक्या दृष्टीनें शांताबाईकडे पाहिलें. हा प्रकार पाहून आतां मात्र तिला आश्चर्य वाटलें. प्रथम तो आलेला पाहून ‘ हा मनुष्य कोणाचो तरी चौकशी करण्याकरितां आला असावा असें ’ समजून “ कोण पाहिजे ? ” असा तिनें प्रश्न केला, त्याचें उत्तर हें अशा चमत्कारिक वर्तनांत मिळतांच तिला आश्चर्य वाटणें साहजिकच होतें. पुनः तिनें तोच प्रश्न जरा जोरानें केला, तेव्हां त्यानें हांसत हांसत उत्तर दिलें:—“ हं–हं–तुम्हीपन बसा. आमी का आले ते तुमी जानते—बसा—तुम्हीबी बसा—”

आतां मात्र शांताबाईला राग आला. ती त्या बनियाकडे जरा रोखून पाहूं लागली परंतु त्याकडे दुर्लक्ष करून तो पुढें म्हणाला, "तुमी इकरे एकलाच राहते काय ? तुमचा कोन कोन माणस हाय इकरे ?"

"तुम्हाला काय पाहिजे ? तुम्ही कोणाची चौकशी करण्याकरितां इकडे आलां ?"

"मीतो तुमालाच पाहायला आला. आणि का आला तेबी तुमी जानते !" असें म्हणून तो बनिया पुनः हसूं लागला. आतां मात्र त्याचें वर्तन शांताबाईला असह्य झालें. ती एकदम रागानें पुढें झाली आणि म्हणाली, "हा काय फाजील-पणा तुम्ही मांडला आहे ? ओळखीशिवाय आंत यायला तुम्हाला लाज कशी वाटली नाहीं ? तुम्ही एकदम खोलीच्या बाहेर व्हा—"

"तुमी असा रागावते कसाला ? ओळखाण नाहीं पण आतां ओळखाण होईल. पण तुमी असा आमचाजवळ बसा, मग होएल ओळखाण."

"कोण तऱ्हेवाईक मनुष्य आहांत हो तुम्ही ! मुकाट्यानें खोलीबाहेर जातां कीं—"

"इतका राग कसाला करते ? तुमी आमाला वर बोलावला आणि आतां असा घुस्सा करते ?"

"मी वर बोलवलं ? तुम्ही शुद्धीवर आहांत काय ?"

"तो काय आमी झुटा बोलते ? तुमी आमच्यावर घुस्सा केला पण आमी नाई करेल तुमच्यावर घुस्सा"! इतकें बोलून तो उठला आणि हांसत हांसत एक एक पाऊल पुढें होऊं लागला. शांताबाई रागानें लाल झाली होती परंतु करते काय ?

"हा बेशरमपणा पुष्कळ झाला ! तुम्ही प्रथम खोलीच्या बाहेर व्हा—"

"असा काय करते—" तो बनिया आतां शांताबाईच्या अगदीं जवळ येऊन ठेपला.

"दूर व्हा—"

तो निर्ढावलेला शोकीन बनिया शांताबाईच्या रागाला भीक न घालतां तिच्या खांद्यावर हात ठेवणार तोंच गोपाळराव मोतीवाला आंत आला. त्यानें क्षणांत तेथील परिस्थिति ओळखली. शांताबाईची मात्र आतां दोन संकटांच्या कैचींत सांपडल्यासारखी स्थिति झाली.

"केम शेटजी, तमे अहिया शुं काम आयवा हता ?" गोपाळराव पुढें होऊन विचारूं लागला. शांताबाई मागें झाली आणि बनिया आतां थोडा गडबडला.

"काम—काम शुं हशे मारा साहेब ?"

" काम नथी त्यारे तमे ऊपर आयवा शामाटे ? "

" एउंनें मने उपर बुलावा !" शांताबाईकडे बोट दाखवून तो बनिया म्हणाला.

" तुम्ही बोलावलं का ह्या शेटजींना वर ! इथपर्यंत आली का आपली मजल शांताबाई ? वाः—चांगलं ! "

" कोणी बोलाविलं ?–मी ! तुम्हांला कांहीं लाजलज्जा शरम आहे का ? व्हा—बाहेर—बाहेर व्हा तुम्ही दोघेही ! हलकट, पाजी, नाहीं तर ! "

शांताबाई आपणावरहि उलटलेली पाहून गोपाळराव थोडासा चकित झाला.

इकडे त्या बनियानें हळुहळू दरवाजा गांठला; आणि मुकाट्यानें आपला रस्ता धरला.

शांताबाई, माझी लाजलज्जा काढण्याचे आतां आपण व्यर्थ श्रम घेऊं नका ! आपली लाजलज्जा आतां नीट संभाळा म्हणजे झालं ! उगाच नाकानें कांदे सोलण्यांत आतां काय अर्थ आहे ? माझ्या सारख्या स्वजातीयापेक्षां हा बनिया—बाहेरून मुद्दाम घरांत बोलाविलेला परजातीचा मनुष्य तुमची लाजलज्जा चांगली सांभाळून ठेवील नाहीं का ? "

" गोपाळराव, तुम्ही येथून चालते व्हा—" अगदीं दांत ओंठ खावून शांताबाई म्हणाली. तिला हें गोपाळरावाचें वरील भाषण अगदीं असह्य झालं.

" ओरड—आणखी मोठ्यानें शंख करून नाहींतर पांचजन्य करीत ओरड ! जमूं दे इथं आजुबाजूची मंडळी म्हणजे हा बनिया इथं कोणत्या कामाकरितां तूं बोलाविला होतास तें सर्वांना सांगतों. हं ओरड—"

एकाद्या चवताळलेल्या पण नखें काढलेल्या आणि दांत पडलेल्या वाघिणीप्रमाणें शांताबाईची अवस्था झाली. परंतु तिच्याकडे दुर्लक्ष करून तो पुढें म्हणाला " कां थांबलीस का ?—पण तुझा दादा कुठें दिसत नाहीं तो ? कुठें बाहेर गेला आहे वाटतं तुला असे व्यवहार करायला सांपडावं म्हणून ! पण तें जाऊं दे.—शांता, असं कां आतां ओढून ताणून चंद्रबळ आणूं पाहतेस ? अग अशा ह्या बनियापासून तुला असं काय सुख होणार आहे ? तूं माझ्याजवळ रहा—पहा, मी तुला कसं सुखांत ठेवीन ? मग काय ?–माझ्याजवळ रहाणार ना ? " असें म्हणत तो तिच्याजवळ गेला.

ह्या वेळीं शांताबाईच्या हातांत जर एकादें शस्त्र असतें तर तिनें तें गोपाळरावाच्या छाताडांत खुपसलें असतें, इतकी ती रागानें देहभान विसरली होती. तो जवळ आलेला पाहतांच तिनें दोन्ही हाताच्या मुठी वळून त्याच्या तोंडावर जोरानें

प्रहार केला. इतक्यांत घरभाडें वसूल करणारा मनुष्य आणि त्याच्याबरोबर खाणावळीचे पैसे मागणारा मनुष्य असे दोघेजण आंत आले. त्यांना पाहतांच शांताबाईला धीर आला.

" शांते, ह्याचा वचपा मी कधींतरी काढीन बरं "

" जा--मेल्या चांडाळा,. तुझ्याकडून काय होणार आहे ? मी एकटी असलें तरी तुला पुरून उरेन समजलास ? "

" बरं पाहीन ना आतां ! " शांताबाईच्या फटक्यानें सुजलेल्या डोळ्यावर हातरुमाल धरीत गोपाळराव म्हणाला.

इतक्यांत शांताबाईची दृष्टि दरवाजाकडे गेली. तेथें मि. राजाध्यक्ष म्हणजे तिच्या ऑफिसांतील ' शेट ' उभे होते. ते स्वतः येण्याचें काय कारण ? शांताबाई प्रथम ऑफिसांत नोकरीकरितां आली, त्यावेळीं तिचें नांव कळतांच त्यानीं बाहेरून तिची चौकशी केली. रावबहादूर जोशांची ती सून आहे असें कळतांच त्यांना अत्यंत आश्चर्य वाटलें. कारण रावबहादुरांचा आणि त्यांचा चांगलाच परिचय होता. रावबहादुरांचें घराणें चांगलें नांवलौकिकाचें आणि श्रीमंत असतां त्यांच्या सुनेला नोकरी करण्याचा प्रसंग कां यावा, हें कोडें पडून त्यांनीं ह्या चार दिवसांत बरीच बारकाईनें माहिती मिळविली. शेवटीं खरा प्रकार त्यांना कळला. ' तुमची सून माझ्या ऑफिसांत माझ्या हाताखालीं नोकरी करते ' अशा अर्थाचें रावबहादुरांना पत्र लिहावें, असा विचार त्यांच्या मनांत आला होता परंतु शांताबाई आज ऑफिसांत नं आल्यामुळें, हा काय प्रकार आहे, हें स्वतः पहावें म्हणून ते आले होते, त्यांना पाहतांच शांताबाईला अत्यंत आश्चर्य वाटलें. आणि तितकीच ती खजीलही झाली.

' का गोपाळराव, काय झालं तुमच्या डोळ्याला ? तुमची आणि शांताबाईची ओळख आहे वाटतं ? ' मि. राजाध्यक्ष आंत येऊन विचारूं लागले.

' हो, चांगली--फार दिवसांची आहे ' इतकें संतापानें वाक्य गोपाळरावाच्या तोंडून बाहेर पडतें तोंच शांताबाईनेंहि तितक्याच संतापानें त्याचें वाक्य पुरें केलें ' होय-तीच ओळख आतां मी त्याच्या तोंडावर पटवून दिली ! '

' बरं बरं ! मीहि पटवीन तुला अशीच ओळख ! ' असें म्हणून गोपाळराव बाहेर पडला.

' तुम्ही ओळखतां का ह्या चांडाळाला ? ' शांताबाईनें विचारलें.

' हो. हा होता कीं आपल्या पोष्टांत ! माझ्याच हाताखालीं दोन वर्षें होता.

पण एका रजिस्टर पारसलची अफरातफर केल्यामुळें त्याला नोकरी सोडावी लागली. तो किती योग्यतेचा मनुष्य आहे हें मी ओळखून आहें. पण त्याची आणि तुमची ओळख कशी झाली ?

ह्या प्रश्नाचें काय उत्तर द्यावें याचा विचार करीत असतां भाड्याकरितां आलेला मनुष्य म्हणाला, " यशवंतराव कुठें आहेत ? "

" ते काल लाहोरला गेले. "

" केव्हां येतील ? "

" तें नाहीं सांगतां येत. त्यांना तेथें नोकरी लागली. "

" मग आतां भाड्याचे पैसे ? दोन महिन्याचें भाडें आहे. आजचा वायदा होता ! "

" आणि मलाहि आजच बोलाविलें होतं ! " खाणावळीचा मनुष्य मध्येंच म्हणाला. इतक्यांत दुसऱ्या खाणावळीचा मनुष्य म्हणजे माधवाश्रमाचा बीलकलेक्टर आलाच ! त्याच्याकडे पाहून शांताबाई म्हणाली, " दादा इथं नाहीं. आणि आतां माझ्याजवळहि तुम्हांला द्यायला पैसे नाहींत. हा महिना भरूं द्या, मग तुमच्या पैशांची व्यवस्था करतें. "

" आतां आम्हाला थांबायला वेळ नाहीं. असे आम्हीं किती हेलपाटे घालावे ? "

" किती आहेत तुमचे पैसे ? सांगा—" शेटनीं विचारलें. तिघांनीं आपापले आंकडे सांगतांच त्यांना दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं बोलावून शेटनीं त्यांची रवानगी केली. नंतर बराच वेळ त्यांच्या गोष्टी झाल्या. शांताबाईनें शेवटपर्यंत त्यांना कोणत्याच गोष्टीची दाद लागूं दिली नाहीं, शेवटीं काळोख पडूं लागला असें पाहून शेटजी जाण्याकरितां उठले.

" मग आणखी तीन दिवस कांहीं तुम्ही ऑफिसमध्यें येणार नाहीं तर ? पण तुमची जेवणाखाण्याची व्यवस्था ? खाणावळींतून मागवितां वाटतं ? मग आज आलं होतं का ताट ?—नाहीं ना ? मग काय, आज सर्व दिवस तुम्हीं उपाशींच आहांत वाटतं ? वाः !—आतां मी मनुष्य पाठवून तुमच्या ताटाची व्यवस्था करतों. पण असें कशाला ? तुम्ही चार दिवस आमच्या घरींच चला. इथं एकटं राहणं मला रास्त दिसत नाहीं. "

परंतु शांताबाई ह्या गोष्टीला कबूल झाली नाहीं. शेवटीं नाइलाजास्तव शेट निघून गले.

---

गेल्या प्रकरणांत घडलेल्या गोष्टींना एक महिना झाला. नोकरीचा महिना भरून शांताबाईला साठ रुपये पगार मिळाला. त्यांपैकीं तिला फक्त पंचवीस रुपयेच आपल्या शेटला, त्यांच्याकडून घेतलेल्या कर्जापोटीं देतां आले. अद्यापि शंभर रुपये देणें बाकी राहिलें होतें. ह्या एका महिन्यांत विशेष लिहिण्यासारखी अशी एकच गोष्ट घडली. शांताबाई रहात होती, त्या चाळीच्या समोरच असलेल्या पुढल्या चाळींत एक नवीन बिऱ्हाड आलें होतें. तेंहि एक फ्याशनेबल जोडपें होतें. शांताबाई खिडकींत उभी राहिली म्हणजे समोरच्या खिडकीकडे तिचें साहजिक लक्ष जाऊन तेथील सर्व प्रकार तिला स्पष्ट दिसत असे.

शांताबाईचा दिनक्रम अगदीं आंखलेला होता. सकाळीं उठून चहापान होईपर्यंत तिची स्नानाची वेळ होई. साडेनवाच्या सुमारास ताट येई. जेवण वगैरे होईपर्यंत दहा वाजत. तेथून ऑफिसची वेळा संपून संध्याकाळीं सहा वाजतां ती परत येई. घरीं आल्यानंतर ती कुठेंही बाहेर जात नसे. वास्तविक ती संध्याकाळीं चौपाटीवर फिरावयास जावयाची. परंतु गोपाळरावाच्या भीतीमुळें घराबाहेर पडण्याचें तिला धैर्यच होत नसे. रात्रीं ताट आल्यावर जेऊन थोडावेळ खिडकींत किंवा शेजारीं लक्ष्मीबाईकडे जाऊन बसावें अथवा एखादें पुस्तक असल्यास तें वाचीत पडावें, असा तिचा रोजचा कार्यक्रम होता. तिनें आपल्या दादाला पांच सहा पत्रें लिहिलीं, परंतु त्याच्याकडून अद्यापि एकहि पत्र आलें नव्हतें. त्यामुळें तिला दादाची आठवण होई तेव्हां थोडा वेळ तिच्या मनाला हुरहुर वाटे इतकेंच !

पण अलीकडे तिच्या विचारांना एक नवीन विषय मिळाला होता. समोरच्या चाळींत आलेलें बिऱ्हाड हाच तिच्या विचाराचा विषय होता. आपल्या समोर राहणारी ती स्त्री चांगली सुशिक्षित अशी दिसत असून आपल्या नवऱ्यापुढें एखाद्या मोलकरणीप्रमाणें वागते, याचें तिला राहून राहून आश्चर्य वाटे. सकाळीं तिला वेळ नसल्यामुळें संध्याकाळच्या गोष्टी तिला पहावयास मिळत असत. तो बाहेरून येतांच त्याची टोपी कोट काढून खुंटीवर ठेवणें, तोंड धुण्याकरितां पाणी देऊन झाल्यावर तोंड पुसण्यासाठीं स्वच्छ रुमाल पुढें करणें; नंतर फराळाकरितां कांहींतरी पुढें आणून ठेवणें, तोंच पुनः चहाचा कप आणणें इतक्या गोष्टी करून पतीच्या जवळ बाजूला खुर्चीवर न बसतां जवळच चोरासारखें तिष्ठत उभें राहणें, इत्यादि प्रकार पाहून शांताबाईला त्या स्त्रीची कींव येत असे आणि क्वचित् प्रसंगीं अतिशय

राग येई. ह्या अशा शिकलेल्या स्त्रिया आपला समान हक्क आपल्या हातानें घाल-
वितात याबद्दल तिला वाईट वाटे, ह्या बाबतींत एकदां तिला बोलावें आणि स्त्रियांच्या
हक्काची जाणीव करून द्यावी असेहि विचार शांताबाईच्या मनांत येत असत. परंतु
तिची ओळख नसल्यामुळें गप्प बसून तेथील प्रकार विलोकन करण्यापलिकडे तिला
कांहींच करतां आलें नाहीं. शेवटीं एके दिवशीं त्या स्त्रीबरोबर तिची ओळख
झाली. शांताबाईनें आपले दोन रेशमी रुमाल खिडकीजवळ धुवून वाळत घातले
होते. ते दुपारीं वारा जास्त असतां उडून बाहेर पडले. त्यावेळीं समोरच्या खिडकींत
ती स्त्री उभी होती. तिनें ते रुमाल खालच्या सोप्यांत पडतांना पाहिले. खालीं
कोणी नव्हतें. आतां ते जर आपण वर आणले नाहींत तर कोणीतरी ते उचलून
नेतील असें वाटून तिनें खालीं जाऊन ते रुमाल आणले. संध्याकाळीं शांताबाई
ऑफिसांतून परत आली. चहा वगैरे घेऊन झाल्यावर खिडकीजवळ जातांच
समोरच्या खिडकींत ती स्त्री उभी असलेली तिच्या दृष्टीस पडली.

"हे तुमचे रुमाल—" ती स्त्री खिडकींतून रुमाल दाखवित म्हणाली,
"दुपारीं खालीं पडले होते. ते कोणी उचलून नेईल म्हणून मी वर आणले."

"ओ, थ्यांक यू! मला त्याची आठवण नव्हती. फेका–मी येथून झेलते—"

"छेः! इतकें लांब कसे फेंकतां येतील?"

"फेंका–त्यांत काय अवघड? जोरानें फेंका—"

तिनें फेंकले पण खिडकीपर्यंत न येतां ते पुनः खालीं पडले!

"पहा–मी म्हटलं ना? थांबा, मीच घेऊन येतें." असें म्हणून ती स्त्री
चटकन् खिडकींतून मागें झाली. आणि थोड्या वेळानें रुमाल घेऊन शांता-
बाईच्या खोलींत आली.

"खरोखरींच मला ह्या रुमालांची आठवण सुद्धां नव्हती. तुम्ही जर पाहिलें
नसतें तर हे खात्रीनें पुनः दिसले नसते. कोणीतरी सहज उचलून नेले असते.
बसा उभ्या किती वेळ राहणार?—बाकी उभे राहण्याची तुम्हाला संवयच
आहे म्हणा!" शांताबाई हांसत हांसत म्हणाली!

"मला उभं राहण्याची संवयी ती कशी?

"तेंच मला तुम्हांला सांगायचं आहे फार दिवस. पण इतके दिवस ओळख
नसल्यामुळें मला सांगतां आलं नाहीं. आतां ओळख झाली, आतां सांगतें बसा–"

"आतां बसायला नाहीं मला वेळ! आतां इतक्यांत तिकडचं कचेरींतून
येणं होईल."

" हेंच तें ! पक्की गुलामगिरी करतां म्हणायची ! "

" इश्श ! त्यांत कसली गुलामगिरी !—पण आतां नको ! बोलत बसलें तर बोलणं वाढतं ! आतां जातें. येईन—आतां ओळख झालीच आहे. "

" पण थांबा जरा—मला रुमालाबद्दल तुमचे आभार तरी मानूं द्या. "

" त्यांत कसले आभार मानायचे ! मी असं काय मोठंसं काम केलं ? "

" कां नाहीं ! काम मोठं असो वा क्षुल्लक असो, तुम्ही माझ्या उपयोगीं पडलां, मला तुमचे आभार मानलेच पाहिजेत. "

" बरं बाई माना आभार. "

" पण तुमचं नांव नाहीं सांगितलंत तें ? "

" माझं नांव अनुसया—"

" आणि माझं शांता. "

इतक्यांत अनुसयेची दृष्टि समोरच्या खिडकींत गेली. आपले पतिराज आले असें पाहतांच ती चटकन् मागें वळली आणि " शांताबाई, जातें मी आतां. येईन उद्यां—" असें म्हणून खोलीबाहेर गेली.

दुसऱ्या दिवसापासून खिडकींतूनच 'कसं आहे ?—बरं आहेना ? अशी एकमेकींची 'विचारपूस' होऊं लागली. हळुहळू त्यांची ओळख वाढून मैत्री जुळली. अनुसयेचे पतिराज एका मोठ्या कंपनींत नोकर होते. नवीनच बिऱ्हाड बदललेलें असल्यामुळें ते ऑफिसांतून सुटतांच तडक घरीं येत असत. परंतु आतां आपल्या कुटुंबाची आणि चाळींतील इतर स्त्रियांची चांगली दाट ओळख झालेली पाहून ते सायंकाळीं कचेरींतून सुटल्यावर जिमखान्यांत जाऊं लागले. अर्थात् त्यांना घरीं यावयास रात्र होई तोंपर्यंत अनुसयेला शांताबाईकडे येऊन बसण्यास वेळ मिळूं लागला. कधीं कधीं शांताबाईहि तिच्या घरीं जाऊं लागली. अशा रीतीनें दोघी मैत्रीणी झाल्या.

आणखी पांच महिने लोटले. आज शांताबाईच्या हातांत तिचा भर पगार पडला होता. गेल्या महिन्यांत तिनें शेटजींच्या कर्जाचा शेवटचा हप्ता दिला होता, त्यामुळें ह्या महिन्याला भर पगार हातीं पडल्यामुळें तिची वृत्ति बरीच उल्हसित होती. आतां आपल्या मनाप्रमाणें चांगलीं पोलकीं, लुगडीं, रुमाल इत्यादि वस्तु खरेदी करतां येतील म्हणून तिला स्वाभाविकच आनंद झाला होता. त्यांतून तिला कचेरींत विशेष काम करावें लागे, असेंहि नाहीं. कारण शेट तिच्याबरोबर फार ममतेनें वागत असत. आपण वरिष्ठ आणि ती एक लहान पगारावर टाईपिस्ट

आहे, असा त्यांनीं भेदभावच ठेवला नव्हता. परंतु हें त्यांचें वर्तन इतर कारकु- नांच्या शंकाकुशंकांना भर देत असे. ' आपल्या शेटचा शांताबाईबरोबर कांहीं- तरी सांवळा गोंधळ आहे ' अशा अर्थाच्या त्यांच्या आपापसांत कुचेष्टा चालत असत. परंतु खरी वस्तुस्थिति किती निराळी होती, त्याचा उल्लेख मागें एका प्रकरणांत केला आहेच. रावबहादुरांचा आणि त्यांचा परिचय असल्यामुळें त्यांची शांताबाईवर इतकी ममतेची नजर होती. गेल्या पांच सहा महिन्यांत त्यांचा रावबहादुर आणि वसंतराव यांच्याबरोबर बराच पत्रव्यवहार झाला होता. असा हा त्यांचा पत्रव्यवहार सुरू असतांना शेटजीनें कैक वेळां संधि पाहून शांताबाईला तिच्या श्वशुरगृहीची हकीकत विचारण्याचा प्रयत्नहि केला; परंतु ' ह्या बाबतींत आपणास कांहींएक विचारूं नये ' असें सांगून ती मौन्यव्रत धरीत असे.

सायंकाळीं कचेरी सुटण्यापूर्वी शांताबाईला हाक मारून शेटनीं तिच्या हातांत तीन चार पत्रें दिलीं आणि तीं वाचून स्वतःचें मत कळविण्यास सांगितलें. शांताबाई पत्रें घेऊन आपल्या जागेवर आली. तीं सर्व पत्रें शेटच्या नांवें लिहिलीं असून पोष्टानें आलेलीं होतीं. तिनें पहिलें पत्र पाकिटांतून बाहेर काढून वाचण्यास सुरवात केली. पत्र इंग्रजी भाषेंत लिहिलें होतें. पहिलें वाक्य—' आपलें पत्र पावलें. आपण इतके आस्थापूर्वक वेळोवेळीं पत्रें लिहितां त्याबद्दल मी आपला आभारी आहें. मी मुंबईस यावें असें आपण आग्रहानें लिहितां, त्याप्रमाणें मी येण्याचा विचार ठरविला आहे. माझा माझ्या पत्नीबरोबर पुनर्मिलनाचा योग तुम्हीं जुळून आणण्यासाठीं हमी घेतां—" इतकें पत्र वाचतांच, पत्र पाठविणारा कोण आहे, हें पाहण्याकरितां पत्राच्या शेवटीं पाहिलें तों वसंतराव जोशी अशी सही पाहतांच ती एकदम दचकली. तात्काळ तिनें पत्र बंद केलें. आपल्या पतीचा आणि शेटचा पत्रव्यवहार चालू असेल अशी तिला कल्पनाहि नव्हती. इतकेंच नव्हे तर त्याची ओळख असेल अशी शंकाहि तिच्या मनांत ह्यापूर्वी कधीं आली नाहीं. परंतु आतां तीं पत्रें पाहून त्यापूर्वी कैकवेळां त्यांनीं आपणांस श्वशुरगृहाबद्दल प्रश्न विचारले. त्याचें कारण आतां तिच्या लक्षांत आलें. आपले पतिराज आपणाविषयीं काय लिहितात, तें वाचावें असा एक विचार तिच्या मनांत आला. परंतु पुनः तिच्या हट्टी मनानें उचल घेतली. आणि ती त्याच झटक्यांत उठली आणि शेटजवळ येऊन म्हणाली, " हीं पत्रें माझीं नव्हत. हीं आपल्या नांवें आलीं आहेत हीं पत्रें वाचण्याचं मला कांहीं कारण नाहीं. "

" पण तीं आपण वाचावीं अशी माझी इच्छा आहे. पत्रें कुणाकडून आलीं

आहेत, तें आपणास कळलं ना ? ”

“ म्हणूनच तीं वाचण्याची माझी इच्छा नाहीं. ”

“ आपल्या नांवें जर एखादें पत्र आलें असतें तर तें आपण वाचलें असतें किंवा नाहीं. ”

“ वाचलेंच असतें किंवा नाहीं हें कांहीं आतां सांगतां येत नाहीं. पण तें जाऊं द्या, मी आतां जातें. साडेपांच वाजून गेले. आज मला पुष्कळ काम आहे. ” असें म्हणून शांताबाईनें आपली शाल घेतली.

बाहेर पडत असतां शांताबाईनें चुकून सुद्धां शेटकडे वळून पाहिलें नाहीं. अद्यापि शेटजीला तिचा स्वभाव कळला नव्हता. त्यांच्या झालेल्या पत्रव्यवहारांत शांताबाईचा स्वभाव अत्यंत हट्टी आणि एककल्ली आहे, असें स्वानुभवावरून वसंतरावानें लिहिलें होतें, त्याची त्यांना आतां प्रतीति आली. ह्यापूर्वी त्यांना सहा महिन्याच्या अनुभवावरून असें वाटूं लागलें होतें कीं, शांताबाई ही एक लहरी आणि अलीकडच्या फ्याशनला बळी पडलेली हूड मुलगी आहे. आपण जर यांत विशेष आस्थेनें मन घातलें तर त्या पतिपत्नीचें पुनः सूत जुळवून देऊं. आणि ह्या विचारानेंच त्यांनीं शेटच्या पत्रांत वसंतरावाला मुंबईत येण्याबद्दल आग्रहान लिहिलें होतें. तो आतां मुंबईला येणार तेव्हां पूर्वीपासून शांताबाईच्या मनाची तयारी करावी, ह्या उद्देशानेंच त्यांनीं आज वसंतरावाचीं पत्रें तिला वाचावयास दिलीं. परंतु त्याचा काय उपयोग झाला ?

कचेरींतून बाहेर पडल्यावर थोडा वेळ ट्रामगाडीची वाट पाहून शांताबाई हळुहळू चालूं लागली होती. आज बऱ्याच महिन्यांनीं पतीविषयीं विचार तिच्या मनांत आला. अलीकडे नोकरी लागल्यापासून आपलें लग्न झालें आहे, ही गोष्ट ती जवळ जवळ विसरूनच गेली होती. कचेरींतून ती घरीं आल्यावर शेजारच्या अनुसयेकडे जावें, तेथें चहा घेत तास दोन तास गप्पागोष्टी कराव्या, तेथून परत खोलींत आल्यावर खाणावळींतून आलेल्या डब्याचा समाचार घ्यावा. नंतर झोंप येईपर्यंत एखादी कादंबरी किंवा नाटक वाचावें. सकाळीं मात्र तिला इकडे तिकडे करण्यास वेळच मिळत नसे. कारण दहाला तिला कचेरींत हजर व्हावें लागे. अशा ह्या नित्यक्रमांत तिला भावाचीही क्वचित आठवण होई. परंतु आठवण झाली म्हणजे ती तात्काळ बसून यशवंतरावाला एखादं खरमरीत पत्र लिही. अशीं आतांपर्यंत तिनें दहावीस पत्रें लिहिलीं परंतु एकाहि पत्राचें तिला कधीं उत्तर आलें नाहीं. आपला दादा लाहोरला गेला आहे, तेथें त्याची काय खबरबात आहे हें कळा-

यला तिला दुसरा कोणताही मार्ग नसल्यामुळें त्याचा विचारच करण्याचें सोडून देण्यापलीकडे तिला कांहीं करतां येत नव्हतें.

ट्रामच्या विचारांत चालतां चालतां शांताबाई धोबीतलावपर्यंत आली. इतक्यांत तिच्या बाजूला एक गाडी एकदम उभी राहिली. शांताबाई बाजूला होऊन पुढें जाण्याच्या विचारांत होती, तोंच तिला गाडींतून स्वतःच्या नांवानें हांक मारलेली ऐकूं आली. शांताबाईनें वर पाहिलें तों गाडींत कमलिनी तिला दिसली त्याबरोबर तिची चर्या खर्रदिशीं उतरली. कमलिनीला पाहतांच तिला टाईपरायटर मशीनची आठवण झाली.

" कां शांता, आहेस तरी कुठं तूं ?—ये बैस गाडींत ! " शांताबाई गाडींत बसल्यावर कमलिनी म्हणाली, " शांता, इतके दिवस आली नाहींस कधीं घरीं ? आतां काय, तूं बनली आहेस मोठी ऑफिसरीण ! "

" तसं नव्हें ! मी समजत होतें कीं तूं ठरल्याप्रमाणें विलायतेला गेलीस म्हणून ! "

" छेः कसली विलायत आणि कसलं काय ? बाबा दुखण्यांतून उठल्यावर एक महिना आम्ही माथेरामला गेलों होतों. तिकडून आल्यावर मी लगेच मेडिकल कॉलेज जॉइन' केलं. "

" मग विलायतेचा बेत रहीत केलास वाटतं ? "

" तसंच कांहीं म्हणतां येत नाहीं ! इथला ' कोर्स 'आटपून ' एल्, एम्. ॲन्ड एस् ' झाल्यावर ' एम्. डी. ' होण्याकरितां विलायतेला जाण्याचा माझा निश्चय आहेच ! बरं पण; तुझी काय खबर आहे ? तुझा यशवंतदादा कसा आहे ? "

" दादा गेला आहे लाहोरला. तेथें त्याला सब एडिटरची जागा मिळाली आहे. आणि माझं आपलं ठीक चाललं आहे. "

" बरं, तिकडची हकीकत—वसंतरावांचं कांहीं पत्रबित्र ? "

" कुणाला ?—मला ? काय म्हणून ? "

" तूं त्यांची पत्नी म्हणून ? "

" हें पहा कमू, तुला ह्या भलत्याच—मला आवडत नाहींत त्या गोष्टी बोलायच्या असतील तर तूं आपली गाडी उभी कर. मी आपली चालत जातें कशी ? "

" शांतू अद्यापि तुझ्या डोक्यांत पतिविरुद्ध वेड आहेच तर ! पण वसंतराव

दोन चार दिवसांत मुंबईंत येणार आहेत, हें तरी तुला ठाऊक आहे का ? बाबांना कालच त्यांचं पत्र आलं आहे. आणि ते आमच्याकडेच उतरणार आहेत." कमलिनीचें भाषण ऐकून शांताबाईची चर्या गंभीर झाली.

थोड्या वेळानें गाडी घराजवळ येऊन उभी राहिली. 'आईला आणि आजीला भेटून चहा घेऊन जा' असा कमलिनीनें आग्रह केला म्हणून तिच्या बरोबर ती वर गेली. थोड्या वेळानें शांताबाई आली आहे असें कळतांच सुमतीबाई आणि आजी वर आल्या. शांताबाईला पाहून त्या दोघींना अति आनंद झाला. सुमतीबाईनें आचाऱ्याला सांगून तिच्याकरितां चहा मागविला आणि तिची आणि तिच्या दादाची सर्व हकीकत विचारण्यास सुरवात केली. शांताबाई मात्र मन मोकळें करून बोलत नव्हती. कारण बोलतां बोलतां कमलिनी मशीनची गोष्ट काढील अशी तिला भीति वाटत होती. परंतु मशीनबद्दल कांहींच गोष्ट न निघतां सुमतीबाई म्हणाली, "कायग शांतू. आतां वसंतराव आल्यावर कसंग करणार तूं ? आतां नोकरी सोडणार कीं काय ?—खरंच ! आतां किनई शांतू, तूं कांहीं लहान नाहींस ! हे संसाराला लागायचे तुझे दिवस, आतां किती दिवस हें वेड डोक्यांत ठेवणार ? झालं, तो पोरपणचा हुडपणा आतां गेला. तूं अशी वागून तुझा निभाव कसा लागणार ?"

"कां—आतां माझं काय वाईट चाललं आहे ?—हा पहा, आजच माझा पगार झाला. माझा निभाव न लागायला काय झालं ?"

मग काय, आतां वसंतराव आल्यावर तूं जाणार कचेरींत आणि त्यानीं घरांत बसून काय करायचं ?"

कां आई—" मध्येंच कमलिनी तोंडा आड पुस्तक धरून हांसत हांसत म्हणाली, "वसंतराव आले कीं घरांत बसून करतील स्वयंपाक ! आज इतके महिने झाले, शांताबाई खाणावळींतील जेवण जेऊन जेऊन कंटाळली आहे. खरंनाग शांता ?"

"कंटाळलें तर खरीच ! रोज रोज थंडगार अन्न खावं लागतं !"

"मग खरंच कां तूं नवऱ्याला जेवण करायला लावणार ?" आजीनें आश्चर्यानें विचारलें. म्हातारीला हा विनोद खराच वाटला हें पाहून कमलिनी आणि शांताबाई मनापासून मोठ्यानें हांसल्या.

"आतां सर्व नवऱ्यांच्या नशिबीं स्वयंपाकच येणार आहे. आतांपर्यंत त्यांनीं आम्हांला पुष्कळ छळलं, पण आतां नाहीं ते दिवस राहिले आजीबाई ! कमू

तुझ्या आणि माझ्या मागें हा नवरोबांचा घोषा नाहीं म्हणूनच तर आपणाला इतकं करतां आलं खरं ना ?"

"काय करतां आलं ?—नोकरी करतेस तेंच ना ? मग त्यांत काय मोठंस केलंस ? दुसरं कांहीं साधन नाहीं म्हणून पोटासाठीं ही नोकरी करतेस दुसरं काय ? पण हें किती दिवस ? जन्मभर करीन म्हणशील तर तें शक्य आहे काय ? आज नाहीं उद्यां—शेवटीं तुला नवऱ्याचे पाय धरावे लागणार !" सुमतीबाई म्हणाली.

"मी कध्धीं कध्धीं सुद्धां धरणार नाहीं." हें शांताबाईचें उत्तर ऐकून सुमतीबाई अगदीं स्तंभित झाली. क्षणभरानें ती आपल्या सासूकडे वळून म्हणाली, हें असलं भलतंच वेड ! ह्या पोरीचं पुढें व्हायचं तरी कसं ?"

"व्हायचं काय ? अग प्रथम कडू तें शेवटीं गोडच !"

"त्या पोरीच्या हातांत काय आहे ! हा सर्व ग्रहांचा खेळ आहे." असें म्हणून म्हातारीनें कमलिनीकडे पाहून पुढें म्हटलें, "ही आपली बया आणि ही दुसरी बया, ह्या दोघींचा ग्रहमानच तसा आहे. ह्या दोघींचा शेवट चांगलाच होणार !"

"हें कशावरून तुम्ही सांगतां आजीबाई ?" थट्टेखोर आवाजांत शांताबाईनें विचारलें.

"कशावरून सांगतों म्हणजे ? आमच्या घरच्या ह्या सतीनें—माझ्या सुमतीनें मला प्रश्न विचारला आणि मी म्हातारी तिला सांगतें. माझी म्हातारीची वाचा कधींहि खोटी ठरणार नाहीं बरं पोरी !"

---

## १७........ लाहोरची सफर

शांताबाई घरीं येईपर्यंत दिवे लागले. रस्त्यांत येतांच पहिला उद्गार तिच्या मुखांतून बाहेर पडला तो मशीनबद्दल होता. 'सुटलें एकदांची ! मशीनबद्दल मला कमू कांहीं विचारते कीं काय म्हणून भीति वाटत होती पण नाहीं ! शेवटपर्यंत त्याबद्दल गोष्टच निघाली नाहीं.' निदान आजच्या पुरतें संकट टळलें, असें वाटून तिला एक प्रकारचें समाधान झालें, तोंच वसंतराव—आपले पतिराज एक दोन दिवसांत मुंबईत येणार हें दुसरें संकट तिच्या पुढें दत्त म्हणून उभें राहिलें. आपणांस पत्र नाहीं, त्याअर्थी त्यांच्या येण्याजाण्याशीं आपणाला कांहीं एक कर्तव्य नाहीं, अशी तिनें आपल्या मनाची समजूत करून घेतली. परंतु पुनः

तिला वाटे कीं, कदाचित् मुंबईंत येणें झाल्यावर आपल्याच घरीं जर त्यांनीं बिऱ्हाड केलें तर मग काय ? परंतु ते आपणाकडे येणारच नाहींत असेंच तिचें मत तिला सांगत होतें. आणि यदाकदाचित् आलेच तर आपली स्वतंत्र बाण्याची राहणी पाहून आपण समानहक्काबद्दल भांडून निघालों, तें यथायोग्य होतें अशी त्यांची खात्री होईल आणि इतःपर आपल्या वाटेस जाण्याच्या भानगडींत ते पडणार नाहींत, असाहि एक विचार तिच्या मनांत आला. परंतु हा विचार फार वेळ तिच्या मनांत टिकला नाहीं. कारण आपल्या घरीं त्यांनीं बिऱ्हाड केल्यास आपणालाच त्यांची सर्व प्रकारें उठबस करावी लागणार आणि तसें करणें म्हणजे आपण ज्या तत्त्वाकरितां सासर सोडलें, त्या तत्त्वाला बाध येऊन आपली मानहानीच होणार त्या पेक्षां ते मुंबईंत असेपर्यंत आपणच कुठें तरी जावें म्हणजे सर्व खटपटच मिटेल, असा विचार मनांत येऊन तिनें खासगी रीतीनें आठ दिवसांची रजा काढून पुण्यास जाण्याचें ठरविलें. पुण्यांत तिच्या मैत्रिणी पुष्कळ होत्या. कोणाकडेहि गेल्यास आपणास कोणी नाहीं म्हणेल असें तिला वाटेना !

घरीं येतांच तिनें आपल्या खोलींतील दिवा लावला. तोंच शेजारच्या खिडकींतून अनुसयेनें तिला हांक मारली आणि 'शांताबाई तुमच्या नांवाची एक तार आली होती. दोनदां तारेचा शिपाई येऊन चौकशी करून गेला.' असें ती खिडकींतून सांगत आहे तों तारेचा शिपाई तिसऱ्यांदा आला. पावती लिहून देऊन शांताबाईनें तारेचा लिफाफा हातांत घेतला आणि फोडला. ती तार वाचून खिडकींत उभी असल्यामुळें दिव्याच्या प्रकाशांत तिची चर्या स्पष्ट दिसत होती. क्षणांत तिची चर्या निस्तेज झाली. त्यावरून तार कांहीं चांगली नाहीं हें अनुसयेच्या लक्षांत आलें. तिनें 'कोणाची तार ?—तारेंत काय आहे ?' असे एक दोन प्रश्न शांताबाईला विचारले परंतु ती स्वगत विचारांत मग्न असल्यामुळें अनुसयेचे प्रश्न तिनें ऐकले नाहींत. तितक्या अवधींत खाणावळींतील मनुष्य जेवणाचा डबा ठेवून गेला त्याची सुद्धां तिला जाणीव झाली नाहीं. बऱ्याच वेळानें तिची मुद्रा निश्चयी दिसूं लागली. अद्यापि अनुसया आपल्या खिडकींतच उभी होती. कोणाकडून तार आली आहे, हें कळावें अशी तिची इच्छा असल्यामुळें ती शांताबाईकडे पहात उभीच होती.

शांताबाई, कोणाची आली आहे तार ? कांहीं कमीजास्त प्रकार तर नाहींत ?"

" तार लाहोरहून आली आहे. आमचा दादा अतिशय सीक आहे आणि मला त्यानें तात्काळ बोलाविलं आहे.."

" मग जाणार कीं काय ?"

" गेलं हें पाहिजेच."

तार आल्यामुळें आपल्या मनाप्रमाणेंच योगायोग जुळून आला असें शांताबाईला वाटलें. मुंबईस येणाऱ्या इक्काच्या पाहुण्याला टाळण्याकरितां हा खरोखरीच अपूर्व योग आला आहे. तेव्हां आपण तारेंत लिहिल्याप्रमाणें आतांच्या आतां निघण्याचें करावें असा विचार करून तिची गडबड सुरू झाली. तरी देखील तिचें मन अस्वस्थ झालेंच होतें. सहा महिन्यांत एक बोटभर चिठी नसतां आज एकदम तार आली आहे. त्याअर्थी आपला दादा फारच आजारी असला पाहिजे असें वाटून तिला जेवणाचे दोन घांसहि धडपणें खाववले नाहीं. तिनें कसेंबसें आपलें जेवण उरकलें. आणि डबा पाण्यानें धुवून ती शेजारीं अनुसयेकडे आली. त्यावेळीं अनुसयेचे पतिराज नुकतेच घरीं आले होते. शांताबाईला आलेली पाहून ते आंत गेले आणि अनुसया बाहेर आली.

" कांहो शांताबाई, इतक्या गडबडींत ?–निघालांत वाटतं ? पण आतां तुम्हाला गाडी कुठली ?" अनुसयेनें विचारलें.

" त्याबद्दलच चौकशी करायला आलें आहे." शांताबाई म्हणाली, " तेवढी घरांत चौकशी करून सांगा ना ? आणि हें पहा, हा डबा इथं ठेवतें उद्यां खाणावळींतून तो मुलगा आला म्हणजे द्या त्याला आणि मी बाहेरगांवीं गेलें आहे, तेथून आल्यावर पुनः निरोप पाठवीपर्यंत डबा बंद ठेवायचा, असें त्याला सांगा."

" पण शांताबाई आंत या ना ?" असें म्हणून अनुसयेनें तिला खुर्ची दिली. आणि ती आंत गेली थोड्या वेळानें वामनराव स्वतःच बाहेर आले. आणि म्हणाले, " तुम्हांला लाहोरहून तार आली आहे. असं ही सांगते."

" होय. आमचा दादा अतिशय सीक असल्याची तार आली म्हणून मी निघालें आहे. मला आतां कोणती गाडी आहे, सांगाल का ?"

" गाडी केव्हां आहे तें मला नक्की ठाऊक नाहीं. पण सकाळीं आठला दिल्ली एक्सप्रेस आहे इतकं मला ठाऊक आहे. कदाचित् रात्री नवाची मेलहि असेल."

" ती केव्हां जाऊन पोंचेल लाहोरला ?"

" दोन दिवस लागतात इतकं मी ऐकलं आहे, "

" इतकं का लांब आहे लाहोर ? "

" लांब म्हणजे चांगलं बारा तेराशें मैल आहे. "

" अग बाई, इतक्या लांब शांताबाई तुम्ही एकट्या कशा जाणार ? "

शांताबाईहि क्षणभर विचारांतच पडली. लाहोर इतकें लांब असेल अशी तिला कल्पनाहि नव्हती. फार झालें तर पुण्याइतकाच आणखी प्रवास केला म्हणजे लाहोरला जातां येत असेल अशी तिची मूळ कल्पना होती. परंतु लाहोर म्हणजे पुण्याच्या दहापट लांब आहे तेव्हां तेथें पोंचण्यास पुण्याच्या दसपट वेळ लागणार असें तिनें मनांतच गणित केलें.

" आतां असं करा, सकाळीं एक्सप्रेस आहे हें तर नक्की आहे. तेव्हां तुम्ही दिवसा उजेडी जावं हें चांगलं ! मी आतां जेऊन सर्व चौकशी करून येतों. तोंपर्यंत तुम्हीही कांहीं फराळाचं वगैरे घ्यावयाचं असेल तें घेऊन तयारी करून ठेवा म्हणजे सकाळीं घाई होणार नाहीं. "

वामनरावांची सूचना शांताबाईला मानवली. तिनें वसंतरावाला टाळण्याकरितां पुण्यांत जाण्याचा बेत इतक्या तडकाफडकी केला, त्याचें कारण आज तिच्याजवळ साठ रुपये होते. त्यांत लाहोरची तार अगदीं अकल्पितच आली. त्यामुळें पुण्यांत जाऊन कुणाकडे उतरावें म्हणून डोकें खाजविण्यापेक्षां लाहोरला जाणें अवश्य आहे असें म्हणून तिनें शेवटीं तोच बेत केला. आज जर तिच्या हातांत पगाराचे रुपये नसते तर मात्र तिचा सर्व प्रकारानें गोंधळ होणार होता. ती बराच वेळ वामनरावांची वाट पहात बसली होती. अनुसया आपलें गृहकृत्य आटपीत होती. तों सर्व स्वयंपाकघरांतला पसारा पाहून शांताबाई म्हणाली. " हा रोज उठून सारखा पसारा उरकायचा तुम्हाला कंटाळा कसा नाहीं येत, अनुसयाबाई ? मी मघांपासून पहातें आहे. तुमचं हाताचं यंत्र सारखं चाललं आहे. ओणवं राहून तुमची कंबर कशी नाहीं दुखत ? "

" यांत पसारा कसला ! आणि कंबर ती काय दुखायची ! आहे कसलं मला काम ! इनमिन दोन माणसांचं जेवण ! मला तर उलट ह्या कामाचा आनंदच आहे. आपल्या हक्काच्या कामाचा कंटाळा करून कसं चालेल ? "

" इथंच तर तुमचं आणि माझं मत जुळत नाहीं. तुमचं हक्काचं काम असं तुम्हाला कोणी सांगितलं ? कुणी कायदा तर पास करून ठेवला नाहींना ? "

" असं काय उरफाटं बोलतां शांताबाई ? कायदा कसला यांत ? घर हें गृहिणीचं राज्य आहे. "

" आणि ही स्वयंपाकाची खोली म्हणजे गृहिणीची राजधानी आहे असंच ना!"

" अगदीं असंच ! " अनुसयेनें हांसत हांसत उत्तर दिलें. तिला हा वाद वाढविण्याची इच्छा नव्हती. शांताबाईबरोबर ह्या बाबतींत कितीहि सप्रमाण वाद घातला तरी शेवटीं ' आपलं तें खरं ! ' असंच ती म्हणणार, हें तिला पूर्ण माहित होतें. म्हणून तिनें विषय बदलण्याकरितां विचारलें, "पण शांताबाई, तुम्ही इतक्या लांब एकट्या कशा हो जाणार ? लाहोर तेराशें मैल लांब आहे ना ? "

" मग त्यांत काय झालं ? मी एकदां मोरहून एकटी आलें आहे. "

" कसा बाई तुम्हाला एकटं जाण्याचा धीर होतो, कोण जाणे ! "

"धीर धरला म्हणजे सर्व कांहीं होतं ! मला तर कांहींएक भीति वाटत नाहीं."

थोड्या वेळानें वामनराव परत आले. त्यांनीं सर्व माहिती आणिली होती. अद्यापि शांताबाई बसलेली पाहून ते म्हणाले. " आतां गाडी नाहीं. सकाळीं सव्वा आठ वाजतां आहे, पुढें अकराला मेल आहे आणि साडे तिहीला एक गाडी आहे. सेकंड क्लासचें भाडें साडे चोपन रुपये आहे. आणि तीन दिवसांचा प्रवास आहे. " इतकेंच बोलून वामनराव थांबले. गाडीचें भाडें ऐकतांच शांताबाई चपापली. परंतु तिच्याजवळ किती माया आहे तें वामनरावाला काय माहिती ? तिच्या एकंदर राहणीवरून ती सेकंड क्लासांतूनच प्रवास करील असा त्यांनीं अंदाज केला तोहि कांहीं चुकीचा नव्हता. आणि ह्याच अंदाजावरून ते पुढें म्हणाले, "इतक्या लांबचा प्रवास करायचा म्हणजे तो सेकंड क्लासांतून केला असतां सुखावह होईल. कारण सेकंडक्लास प्यासेंजरला रेल्वेकडून सर्व सुखसोयी मिळतात. मग काय उद्यां सकाळच्या गाडीनें जाण्याचं ठरलं ना ? तुम्हाला फराळाकरितां कांहींतरी बरोबर घेतलं पाहिजे. थोडी फळफळावळ, थोडे चुरमे लाडू शेर दोन शेर शंकरपाळे—"

" त्या ऐवजीं एखादा बिस्किटांचा डबा घेतला तर ? " शांताबाईनें मध्येंच विचारलें.

" वाः—फार चांगला ! मी म्हटलं कीं, तें कांहीं तुम्हाला चालणार नाहीं. पण नाहीं ! मग काय ? तें जर चालतं तर मग कांहींच काळजी करण्याचं कारण नाहीं. ठिकठिकाणीं मोठमोठ्या स्टेशनावर ' रिफ्रेशमेन्ट ' ची व्यवस्था असते. "

" तें नाहीं मला जुळणार ! मी आपलीं बिस्किटें आणि थोडी फळफळावळ घेईन. "

" बरं, तेंहि कांहीं वाईट नाहीं. मग उद्यां सव्वा आठची गाडी ठरली तर ? "

शांताबाई, आम्हीं येऊं का स्टेशनवर ?" मध्यंच अनुसयेनें आपल्या पतिकडे पहात विचारलें.

" कशाला उगाच इतके श्रम घेतां ? त्यांतून तुम्हाला हें गृहिणीराज्य सांभाळायचं आहे ना ? " असें म्हणून वामनरावाकडे पहात हांसत शांताबाई पुढें म्हणाली, " आणि तितक्यांत ह्यांची दरबारची वेळ होईल ! "

शेवटीं शांताबाईबरोबर स्टेशनवर जाण्याचें ठरलें. त्या रात्रीं शांताबाईला स्वस्थ झोंप आली नाहीं. कचेरीची काय व्यवस्था करावी, टिकीट कोणतें काढावें, बरोबर काय घ्यावें, येथील खाणावळ आणि खोली याबद्दल काय व्यवस्था लावावी, इत्यादि, अनेक प्रश्न तिच्या मनाला गोंधळून सोडीत होते. पहाटेच्या सुमाराला तिला किंचित् झोंप लागते न लागते तों उजाडलें. तिनें चटकन् स्नान करून घेतलें. इतक्यांत अनुसया हातांत एक डबा घेऊन आली.

" शांताबाई हा डबा तुमच्या ट्रंकमध्यें ठेवा. "

" काय आहे त्यांत ?— पाहूं ? " शांताबाईनें डबा हातांत घेतला तों तिला गरम लागला. " हें काय आतां केलं वाटतं ? कशाला इतके श्रम घेतलेत अनुसयाबाई ? "

" असूं द्या हो ! इतक्या लांब जाणार तुम्ही ! बाजारचं कांहीं विकत घेऊन काय होणार आहे ? घरच्या जिनसाची सर का बाजारच्या जिनसांना येणार आहे ?" साताच्या सुमारास मंडळी फराळ आणि चहा घेऊन तयार झाली. ती सर्व व्यवस्था अनुसयेनें केली होती. स्टेशनवर जातांना वाटेंत फळफळावळ आणि एखादा बिस्किटांचा डबा घ्यावयाचा असें शांताबाईनें ठरविलें होतें. पण त्यांपैकीं कांहींच जुळलें नाहीं. टिकिट काढतांना तिनें सेकंडक्लासचें टिकिट काढावें अशी वामनरावांची इच्छा होती. " पैशाबद्दल प्रश्न असेल तर मी थोडेबहुत देतों पण तुम्हीं ह्या लांबच्या प्रवासाकरितां सेकंड क्लासचेंच टिकिट काढावें " अशी त्यांनीं प्रेमाची सूचना केली. परंतु त्यांच्याकडून पैसे घेणें शांताबाईच्या मानी स्वभावाला रुचलें नाहीं. शेवटीं तिनें मनाचा हिय्या करून पगाराच्या आलेल्या सहाहि नोटा वामनरावांच्या स्वाधीन केल्या. आपणांस तिसऱ्या वर्गाचेंच टिकिट काढा असें सांगतां सांगतां त्या गडबडींत राहून गेलें. कारण स्टेशनवर अतोनात गर्दी होती. थोड्या वेळानें वामनराव टिकिट घेऊन आले.

हें काय सेकंड क्लासचें टिकिट ! " तिकिट व बाकी पांच रुपये सुटे तिच्या हातांत वामनरावानें दिले तेव्हां शांताबाईनें आश्चर्यानें विचारलें.

" कां बरं ? "

शांताबाईनें पुनः उत्तर मात्र दिलें नाहीं. मुकाट्यानें ती गाडींत बसली. सेकंड क्लास असल्यामुळें तिला सोईस्कर जागा मिळाली. सर्व व्यवस्था नीट लागली. अनुसया आणि वामनराव यांनीं घेतलेल्या श्रमाबद्दल आभार मानून त्यांचा प्रेमाचा निरोप घेतला वगैरे सर्व गोष्टी सुरळीत होऊन गाडी देखील चालू झाली परंतु शांताबाईच्या मनाला किंचित्‌हि स्वास्थ्य नव्हतें. सर्व पगार पहिल्या सपाट्यांत टिकिटींत गेला. आतां फक्त तिच्या जवळ पांचच रुपये शिल्लक होते. इतक्या पैशांत आतां तिला इतक्या लांबचा प्रवास करणें होता. परंतु ईश्वरकृपेनें, तोहि पार पडला. अनुसयेनें दिलेला डबाच शेवटीं प्रवासांत तिच्या उपयोगीं पडला. नाहीं म्हणायला मधून मधून ती चहा घेत असे इतकेंच !

तीन दिवसाच्या प्रवासानें ती अतिशय त्रासून गेली. दिवसा खिडकीजवळ बसून सृष्टिसौंदर्य पाहण्यांत तिचा वेळ जाई परंतु संध्याकाळ होतांच दुसऱ्या दिवशीं सकाळपर्यंत स्वस्थ पडून राहण्याशिवाय तिला दुसरा मार्गच नव्हता. त्या सर्व प्रवासांत तिच्या डब्यांत कोणीहि आलें नाहीं, त्यामुळें तर तिला तो प्रवास अत्यंत कंटाळवाणा गेला. शेवटीं योग्य दिवशीं सायंकाळीं तिनें लाहोरचें स्टेशन गांठलें. तिला तिचा दादा कुठें राहतो, हें देखील माहीत नव्हतें. फक्त तो कोणत्या वर्तमानपत्रांत लिहितो, त्या पत्राचें नांव मात्र आठवत होतें. स्टेशनवर उतरतांच सर्वांचे डोळे तिच्याकडे लागले. एक दक्षिणी स्त्री बरोबर कोणीहि नसतां एकटी इतक्या लांब आलेली पाहून साहजिकच सर्वांना आश्चर्य वाटलें. स्टेशनवर तिचें स्वागत करण्याकरितां कोणी आलेले दिसेना, असें पाहून स्टेशन-मास्तरानें तिला कुठें जावयाचें, याबद्दल चौकशी केली. आपणांस अमुक एका वर्तमानपत्राच्या ऑफिसमध्यें जावयाचें आहे, असें कळतांच त्या सज्जन स्टेशन मास्तरानें तिला गाडी पाहून देण्याची व्यवस्था केली. केव्हां एकदां आपल्या दादाचें बिऱ्हाड गांठतों असें तिला झालें होतें. स्टेशनांतून बाहेर पडतांच तिला जहांगिरशहानें बांधलेली अनारकाली नांवाची मशीद दिसूं लागली. आपणांस येथें बऱ्याच ऐतिहासिक गोष्टी पाहाण्यास सांपडतील म्हणून तिला आनंद झाला. मिशन कॉलेज, चीफकोर्ट, तारआफिस, लॉरेन्स गार्डन इत्यादि प्रेक्षणीय स्थळांवरून तिची गाडी एका भव्य इमारतीजवळ येऊन उभी राहिली. तेथें चौकशीकरतां एक पंजाबी गृहस्थ बाहेर आला. शांताबाईनें आपल्या दादाबद्दल विचारलें तेव्हां त्यानें एक शिपाइ बरोबर देऊन कुठें जावयाचें तें सांगितलें. तेथून जवळच बाजारपेठेला लागूनच एक दगडी इमारत होती. त्या इमारतींत एका ब्लॉकमध्यें

यशवंतराव रहात होता. गाडीचें भाडें चुकतें करून शांताबाई वर आली. तेथें दुसऱ्या मजल्यावर शेवटच्या ब्लॉकमध्यें यशवंतराव रहात होता. खोली प्रशस्त असून एका कोपऱ्यांत यशवंतराव झोंपला होता. जवळच एक मुलतानी छोकरा एका स्टुलावर बसून खिडकींतून बाहेरची मौज पहात होता. एका बाजूला दोन खुर्च्या व एक मोठें टेबल, त्यावर अस्ताव्यस्त पडलेलीं पुस्तकें आणि कांहीं वर्तमानपत्रें होतीं. एका कोंपऱ्यांत वॉशिंगस्टॅन्ड आणि नळ होता. मध्यभागीं विजेचा दिवा आणि पंखा होता. कॉटच्या जवळ एक खुर्ची होती. त्या खुर्चीवर औषधाच्या दोन बाटल्या, ग्लास आणि खुर्चीखालीं तस्त ठेवलेलें होतें. यशवंत-रावानें अंगावर ब्लॅंकेट घेतलें होतें. कानाच्या वर फडका गुंडाळलेला होता. यावरून त्या ठिकाणीं कांहींतरी जखम झाली असावी, असें स्पष्ट दिसत होतें. शांताबाई आंत येतांच तिच्या पावलांच्या आवाजावरून यशवंतरावानें वळून पाहिलें. त्यांची चर्या निस्तेज झालेली होती.

"कोण शांता ?—आलीस !" इतकेंच खोल स्वरांत बोलून यशवंतरावानें एक दीर्घ श्वास सोडला. शांताबाई एकदम कॉटजवळ गेली. आपल्या दादाची ती करुणास्पद अवस्था पाहून तिचा कंठ भरून आला. तिच्या तोंडांतून शब्दहि बाहेर पडला नाहीं. त्यावेळीं यशवंतरावाच्या अंगांत सणसणीत ताप होता.

"दादा, काय ही तुझी अवस्था झाली ?" शांताबाईच्या नेत्रांतून अश्रुधारा सुरू होत्या.

यशवंतरावाला तो अपघात झाला होता. थोडक्यांत चुकलें नाहींतर त्या अप-घातांतच त्यांची अखेर व्हावयाची ! आठ दिवसांपूर्वी आपल्या एका स्नेह्याकडे तो पार्टीला गेला होता. त्या ठिकाणीं विशेष पेय पोटांत गेलें. रात्रीं बरोबर मनुष्य देऊन त्याला घरीं पोंचवावें लागलें. त्यावेळीं त्याला स्वतःची शुद्ध नव्हती. बरो-बरच्या मनुष्यानें त्याला नीट सांवरून धरून सर्व जिना चढून वर आणलें. शेवटीं एकच पायरी राहिली होती. त्या शेवटच्या पायरीनें अखेरीस त्याला दगा दिला. ती एक पायरी चुकतांच यशवंतराव सर्व जिना पुनः घडघडत खालीं आला. त्याचा डावा हात मुरगळला, छातीला जबरदस्त मार बसला आणि कपाळ फुटलें. बिचारा बरोबर आलेला मनुष्य भयभीत होऊन मोठमोठ्यानें ओरडूं लागला. तात्काळ आजूबाजूची मंडळी गोळा झाली. आणि यशवंतरावाला उचलून त्याच्या खोलींत नेलें. पुढें त्याचे मित्र आले. त्यांनीं डॉक्टर आणला. दोन दिवस यशवंतराव अगदींच अत्यावस्थ होता. आपली आतां धडगत नाहीं

असें पाहून त्यानें शांताबाईला तार करण्यास सांगितलें. मुंबईहून गेल्यापासून यशवंतराव तेथें बराच सुधारला होता. पहिले दोन महिने त्यांनीं आपल्या गुणांनीं सर्वांना आपलेंसें केलें. त्यानें लिहिलेला लेख तेथें प्रत्येकजण मान डोलावून वाचीत असे. पहिले दोन महिने पाऊणशें आणि तिसऱ्या महिन्यापासून त्याला शंभर रुपये पगार मिळूं लागला. तितक्या अवधींत निरनिराळया ओळखी होऊन मित्रमंडळींची संख्याहि वाढली. दोन तीन महिन्यांच्या पगारांतून जमवून एकदम शंभर रुपये मुंबईस पाठविण्याचा त्याचा पहिला विचार होता. आणि तोंपर्यंत बहिणीला पत्रहि लिहावयाचें नाहीं असा त्याचा निश्चय होता. रुपये हातांत पडल्यावर तिचा राग खात्रीनें शांत होईल, मग आपण पत्रांत हळूहळू सर्व गोष्टी कबूल करूं असा त्यानें विचार ठरविलेला होता. परंतु दोन महिन्यांनीं मित्रमंडळीच्या संगतीनें त्याचें पूर्व व्यसन पुनः पुढें आलें आणि मनांत केलेले सर्व विचार मनांतच जिरून गेले. हळुहळूं त्याचें दुसरें व्यसनहि डोकावूं लागलें. प्रथम त्यानें ऑफिसांतील जाहिरातीच्या कारकुनावर प्रयोग केला. रोज शेंपन्नास रुपये जाहिरातीचा वसूल असे. त्या कारकुनाजवळ बसतां बसतां एके दिवशीं त्यानें त्याच्या टेबलावरील नोटाचें पुडकें उचललें. त्या पांच रुपयांच्या चार नोटा होत्या. थोड्या वेळानें त्या कारकुनाला संशय येऊन त्यानें तपास केला. नोटा कुठें गेल्या हें त्याला कळतांच त्या दिवसांपासून तो यशवंतरावाला विशेष जपूं लागला. पुढें कांहीं दिवसांनीं दुसऱ्या एका कारकुनाचें पाकिट आणि घड्याळ गेलें. परंतु लवकरच तेंहि मिळालें. अशा रीतीनें एकामागून एक गोष्टी उघडकीला आल्यावर यशवंतरावर सर्वांची करडी नजर असे. त्याला उघड बोलावयास कोणालाही धीर होईना. कारण वरिष्ठ मंडळीवर त्यानें आपल्या गुणानें तसेंच वजन पाडलें होतें. महिन्याचा शंभर रुपये पगार आतां त्याला पुरेनासा झाला होता. गेल्या दोन महिन्यांत त्यानें पांच पन्नास रुपये कर्जच करून ठेविलें होतें. त्यांतून हा एकाएकीं अपघात झाला त्यामुळें तर खर्चाचें तोंड जास्तच मोठें झालें.

यशवंतरावाच्या वरिष्ठानें एक कारकून त्याच्या शुश्रूषेकरितां दिला होता. तो जातीचा पंजाबी असून फारच प्रेमळ अंतःकरणाचा होता. आज आठ दिवस झाले तो रात्रीं यशवंतरावाकडे त्याला सोबत म्हणून निजायला येत असे. यशवंतराव रहात होता त्या ब्लॉकचें भाडें तेरा रुपये होतें. विजेच्या दिव्याचा खर्च महिना चार रुपये, घरांत काम करण्याकरितां ठेवलेल्या छोकऱ्याला महिना तीन

रुपये आणि हॉटेलचें बील पंधरा रुपये, असे एकंदर पस्तिस रुपये आणि किरकोळ पांच मिळून महिना चाळीस रुपयांत त्याचा सर्व खर्च होत असे. परंतु बाकी राहिलेले साठ रुपयेहि त्याच्या व्यसनाला पुरत नसत, शांताबाई आल्यावर थोडा-वेळ विचारपूस झाल्यावर तिचें मन बरेंच शांत झालें. हा सर्व दारूमुळें प्रकार घडला हें तिच्या लक्षांत आलें परंतु त्यावेळीं ती कांहींच बोलली नाहीं. चहा वगैरे घेऊन झाल्यावर तिनें स्नानाची गोष्ट काढली. त्या ठिकाणीं स्नानाची सोय उत्तम होती. शांताबाईचें मनसोक्त स्नान होतांच तिला मनस्वी भूक लागली. यशवंतरावानें आपल्या छोकऱ्याकडून हॉटेलांतून जेवण मागविलें होतें. तें त्यानें आणून आंतल्या खोलींत जेवणाच्या टेबलावर नीट मांडूनहि ठेवलें होतें. तो साहेबी थाट आणि त्या अन्नाच्या प्रकाराकडे पाहून शांताबाईला कसेसेंच वाटलें. परंतु पोटांत तीन दिवस अन्न नसल्यामुळें ती मुकाट्यानें जेवायला बसली. एक दोन घास तिनें घशाखालीं लोटले. परंतु तिसरा घांस मात्र खालीं उतरेना. तिच्या पोटांत मळमळूं लागलें. तात्काळ ती उठली आणि तोंड धुतलें. लाहोरला येऊन आपल्या दादाची राहणी इतकी भ्रष्ट झाली असेल अशी तिला कल्पनाहि नव्हती. आतां तिचा दादा इतक्या गोष्टींत प्रवीण झाला होता कीं, त्या गोष्टीची कल्पना करूनच तिच्या अंगावर शहारे आले असते, त्याच गोष्टी आतां तिला स्वनेत्रांनीं पहावयाच्या होत्या, खाण्यापिण्यांत किंवा वागण्यांत आतां त्याला ताळच उरला नव्हता. लाहोरला आल्यापासून तेथील मित्र मंडळीच्या सहवासानें 'खाना पिना और मौज उडाना' हा मंत्र अगदीं त्यानें पाठ करून ठेवला होता. आपण कोण, आपला जन्म कोणत्या कुळांत झाला आहे याची त्याला आतां पूर्ण विस्मृति झाली होती.

दिवे लागतांच हळुहळूं यशवंतरावाची मित्रमंडळी त्याच्या समाचाराला येऊं लागली, शांताबाई आपल्या दादाच्या उशाजवळ खुर्चीवर बसलेली होती. ती कोण आहे, हें कळायला त्या मंडळींना वेळ लागला नाहीं, बऱ्याच उशीरा रात्रीं यशवंतरावाकडे त्याला सोबत म्हणून निजण्याकरितां येणारा पंजाबी कारकून आला. आपणाला पत्ता सांगून बरोबर शिपाई देणारा तो हाच मनुष्य असें शांताबाईनें तात्काळ ओळखिलें. त्यानें येतांच यशवंतरावाच्या औषधाची व प्रकृतीची चौकशी केली. आणि नंतर ऑफिसांत त्या दिवशीं घडलेल्या गोष्टींची त्याला माहिती दिली. तो मधून मधून इंग्रजींत तर मधून हिंदुस्थानी भाषेंत बोलत होता. हळुहळू तो शांताबाई बरोबरही बोलूं लागला. प्रथम मुंबईच्या गोष्टी झाल्यावर शांताबाईनें आपल्या जेवणाची गोष्ट काढली. तीन दिवस प्रवासांत काढून येथें प्रथमदर्शनीं आपणांस कोणत्या प्रकारें अन्न मिळालें, आणि त्यामुळें आपण भुकेमुळें कशा

तडफडत आहों, हें सांगून ती म्हणाली, " येथें ब्राह्मणाची खाणावळ नाहीं का ? —नाहींतर स्वतःचें अन्न स्वतः करण्याची पाळी येणार. "

पंजाब्यानें तात्काळ बाजारांत जाऊन प्रथम खाणावळीची चौकशी केली. एक खाणावळ होती परंतु ती फार दूर होती, तेथें जाऊन त्यानें दर ठरविला आणि येतांना पुऱ्या भाजी आणि दूध बरोबर आणलें. नाइलाजास्तव त्यावरच शांताबाईला भूक भागवावी लागली. दुसऱ्या दिवसापासून मात्र तिची व्यवस्था नीट लागली.

हां हां म्हणतां पंधरा दिवस केव्हांच निघून गेले, नाहीं म्हणायला दुसऱ्या दिवशीं आपल्या दादाच्या प्रकृतीचा मान पाहून तिनें दोन पत्रें लिहिलीं. एक आपल्या शेटजीला आणि दुसरें अनुसयेला. पहिल्या पत्रांत तिनें एकाएकी लाहोरला कां आलों, तें लिहून झाल्यावर आठ दिवसाची रजा मिळावी म्हणून लिहिलें आणि दुसऱ्या पत्रांत मात्र अगदीं साद्यंत हकीकत लिहिली. आपण आठ दिवसांनीं परत मुंबईस जाऊं असें तिला वाटलें होतें. परंतु पंधरा दिवस होऊन गेले तरी यशवंतरावाच्या प्रकृतीस आराम पडेना आणि त्याला तशा असहाय्य स्थितींत एकटा टाकून जाण्याचें तिला धैर्य होईना. जवळ जवळ महिना झाला तेव्हां यशवंतराव उठून बसूं लागला. अद्यापि त्याचा हात आणि डोकें बांधलेलेंच होतें. एके दिवशीं बोलतां बोलतां शांताबाईनें मशीनची गोष्ट काढली. त्यावेळीं यशवंतरावानें सर्व गोष्टी सरळ रीतीनें कबूल केल्या. ज्या मारवाड्याकडे तिचें लुगडें गहाण पडलें होतें त्याच मारवाड्याकडे तें मशीन शंभर रुपयाला गहाण पडलें होतें. त्याचे व्याजासह रुपये दिले असतां तें परत मिळेल इतकें ऐकून शांताबाईला थोडा धीर आला. आपण मुंबईस असतां ज्या अनेक उचापती केल्या आणि त्याबद्दल डोळ्यांत पाणी आणून यशवंतरावानें शांताबाईची क्षमा मागितली.

" दादा आतां मी एक दोन दिवसांत परत जातें. आठ दिवसांची रजा काढली पण इथं तर महिना होऊन गेला. आतां तुला पुष्कळ बरं वाटूं लागलं आहे. आणखी आठ चार दिवसांनीं तूं ऑफिसांत जाऊं लागशील, आतां मी जावं हें चांगलं. मग काय केव्हां माझी रवानगी करतोस ? "

" इतक्या लांब आल्यासारखी आणखी थोडे दिवस रहा. आतां मी हिंडूं फिरूं लागतांच तुला सर्व शहर दाखवितों. शिवाय येथें ऐतिहासिक स्थळेंहि पुष्कळ आहेत; तीं पहा आणि मग जाण्याचा विचार कर, तोंपर्यंत माझा पगारहि येतोच आहे."

होय ! इतक्या लांब येऊन कांहींएक न पहातां परत जाणें, म्हणजे मूर्खपणा आहे. असें वाटून शांताबाईनें आपल्या दादाच्या शब्दाला मान दिला.

---

लाहोरला येऊन शांताबाईला एक महिना झाला. आतां तिच्या मनाला जाण्याची तळमळ लागली. यशवंतराव आतां हिंडूं फिरूं लागला होता. त्याच्या आग्रहावरून आणि त्याच्या मित्रमंडळींनीं तेथील प्रेक्षणीय स्थळांची विशेष वाखाणणी केल्यावरून ती आणखी आठ दिवस राहिली. रोज सायंकाळीं एक एक स्थळ पाहण्याचें ठरवून तिनें अकबरशहानें बांधलेला किल्ला, जहांगिरशहानें बांधलेली अनारकाली मशीद आणि शहादरा मनोरा, शहाजहाननें बांधलेला शिश महाल आणि औरंगजेबानें बांधलेली अपूर्व कामगिरीची जुम्मामशीद; शिवाय रणजितसिंगाची समाधि आणि पानिपतच्या रणसंग्रामांत अहमदशहानें उपयोग केलेली प्रचंड तोफ इत्यादि प्रेक्षणीय स्थळें पाहिलीं. अशा रीतीनें तो आठवडा मोठ्या आनंदांत गेला. अलीकडे दोन रात्रीं यशवंतरावाला घरीं येण्यास बरीच रात्र होऊं लागली. हें चिह्न कांहीं ठीक नाहीं, असें जाणून आपल्या भावाची कानउघाडणी करण्याचा तिनें निश्चय केला. परंतु तो निश्चय अमलांत येण्यापूर्वीच संकट पूर्णावस्थेंत आलें होतें. त्या दिवशीं सकाळपासूनच आपल्या छातींत आणि कुशींत दुखूं लागलें आहे अशी यशवंतरावाची कुरकुर सुरू झाली. संध्याकाळ होईपर्यंत तें दुखणें बळावलें. तें इतकें कीं, त्या सर्व रात्रींत त्याला क्षणभरहि चैन पडलें नाहीं. वास्तविक दुसऱ्या दिवसापासून त्याला कचेरींत हजर व्हावयाचें होतें. परंतु ह्या नवीन उद्भवलेल्या दुखण्यामुळें कचेरीच्या ऐवजीं त्याला डॉक्टराकडेच जाणें भाग पडलें.

" जितकें लवकर कराल—म्हणजे ह्या एक दोन दिवसांत जर तुम्ही 'लिव्हर' चें 'ऑपरेशन' कराल तरच तुमचा तरुणोपाय आहे. " डॉक्टरानें आपलें स्पष्ट मत दिलें !

हें एक नवीन संकट आलें ! डॉक्टरची ऑपरेशन फी देण्यास जवळ पैसा नसल्यामुळें सरकारी हॉस्पिटलमध्यें जाऊन ऑपरेशन करण्याचें ठरलें. शांताबाईला आपल्या बंधूच्या जीविताविषयीं भीति वाटूं लागली. हें दुखणें मोठें कठीण त्यांत आजारी बहुधा दगावतो, असें तिनें ऐकलें होतें. परंतु यशवंतरावाच्या सुदैवानें त्याचें ऑपरेशन यशस्वी रीतीनें पार पडलें.

दोन महिने यशवंतरावाला दवाखान्यांत पडून रहावें लागलें. अद्यापि त्याला उठून बसण्याची शक्ति नव्हती. इकडे तर शांताबाईची अगदीं चमत्कारिक स्थिति

झाली. मुंबईहून अनुसयेचीं पत्रांवर पत्रें येऊं लागलीं. खोलीचें भाडें चढूं लाग-
ल्यामुळें तिला पुनः स्वतःच्या कर्जाबद्दल काळजी वाटूं लागली. भावाजवळ कांहीं
मागावें तर तोच कर्जांत बुडालेला! आपण परत जातांना त्याच्याकडून रेल्वेच्या
भाड्यापुरते पैसे मिळतील किंवा नाहीं याचीच तिला शंका होती. आणि ती शंका
खरीहि होती, कारण यशवंतराव चांगला बरा होऊन कामावर जाऊन त्याचा
पहिला पगार आला. परंतु शांताबाईच्या वाट्याला त्यापैकीं एक पैसाहि आला
नाहीं. दुसऱ्या महिन्यालाहि तीच स्थिति! अशा रीतीनें ' ह्या महिन्यांत तुझी
मुंबईला रवानगी करतों, पुढल्या.महिन्यांत अगदीं अवश्य करतों ' असें करतां
करतां शांताबाईचा लाहोरांत मुक्काम आठ महिने वाढला. तिला त्या ठिकाणचा
अत्यंत वीट आला. परंतु करते काय? पांच पन्नास रुपये जवळ असल्याशिवाय
मुंबईला जाणें अशक्य होतें. तोंड दाबून बुक्याचा मार कसा असतो, याची आतां
तिला कल्पना होऊं लागली. दुसऱ्याच्या ताबेदारीचा तिला किती तिटकारा होता
हें वाचकांना अवगत आहेच. प्रत्यक्ष पतीची ताबेदारी तिला सहन झाली नाहीं.
पण आतां ती मनांतल्या मनांत जळफळत भावाच्या घरीं पडून राहिली होती.
तिच्या दृष्टीनें तिच्या मनाचा विचार केला असतां खरोखरी आतांची तिची
स्थिति अत्यंत केविलवाणी झाली होती असेंच म्हणावें लागेल.

शेवटीं हजार खटपटी करून यशवंतरावानें तिच्या रेल्वे भाड्याची सोय करून
तिची मुंबईस रवानगी केली. आतां पुनः पूर्वीप्रमाणें शेटजी जवळून कांहीं रुपये
घेऊन चढलेलें भाडें आणि खाणावळीचें बील चुकतें करावें आणि प्रत्येक महि-
न्याच्या पगारांतून शेटजींच्या रकमेची फेड करावी, असा तिनें विचार ठरविला
होता. परंतु मुंबईत येतांच तिचे सर्व विचार जागच्या जागींच राहिले! आल्या-
बरोबर पहिल्या दिवशीं ती शेजारीं अनुसयेच्या घरीं उतरली. दुसऱ्या दिवशीं
कचेरींत जातांना तेथें सर्व प्रकार निराळा दिसूं लागला. शेटची बदली झाली
होती; कारकुनांत बरेच नवीन उमेदवार दिसत होते; ती काम करीत होती, त्या
टाईपिस्टच्या जागेवर नवीन कायमचा मनुष्य ठेवलेला होता. असा हा सर्वत्र
फरक पाहून ती विचारांत पडली. तिनें आठ दिवसांची रजा काढली होती, त्या
रजेचें शेंपूट आठ महिन्यावर लांबलें अर्थात् तिची नोकरी गेली!

आतां मोठा पेंच पडला! सोळा रुपयांप्रमाणें नऊ महिन्यांचे जवळ जवळ
दिडशें रुपये भाडेंच तिच्यावर चढलें होतें. आपण लाहोरला गेलों त्याच वेळीं
सर्व सामान अनुसयेच्या खोलींत ठेऊन बिऱ्हाड सोडलें असतें, तर आज आपण

इतक्या विवंचनेंत पडलों नसतों, असें तिला वाटूं लागलें. परंतु लाहोरला इतके महिने काढावे लागतील असें तिला स्वप्न तरी पडलें होतें काय? एकादा दागीना मोडावा, तर तिच्या जवळ तसाहि एखादा जिन्नस नव्हता, होते नग ते देसाईनें केव्हांच लांबविले! बरें, सामानावर भाडें भागवावें तर त्या सामानाची तरी तितकी किंमत येईल किंवा नाहीं, हीहि एक शंकाच होती. मग आतां पुढें काय करावें, ह्या विचारांत तिचें मन घोटाळूं लागलें. घरीं आल्यावर तिनें आपली सर्व कर्मकहाणी अनुसयेला सांगितली. परंतु ती कर्मकहाणी सांगत असतां आपण आतां अगदींच हताश झालों आहोंत, असें मात्र तिनें भासविलें नाहीं. कारण तितका स्वतःच्या कर्तृत्वाचा तिला अभिमान होता. 'एक नाहीं तर दुसरी नोकरी मिळेल' असें म्हणून वामनरावांना दुसऱ्या नोकरीच्या शोधांत राहण्याबद्दल तिनें विनंति केली.

"आपण अगदीं चमत्कारिक परिस्थितींत सांपडलों आहोंत, करितां कांहींहि करून भाड्याकरितां रुपये एकदम पाठवून दे" अशा अर्थाचीं तिनें यशवंत-रावाला पत्रावर पत्रें लिहिलीं. परंतु त्याचा कांहींचे उपयोग झाला नाहीं. यशवंत-रावानें तिच्या पत्राला उत्तर न लिहिण्याची जणूं काय प्रतिज्ञाच केली होती. मुंबईत एक महिना होत आला. अद्यापि दुसरी नोकरी मिळेना किंवा पैशा-बद्दलहि कुठेंहि व्यवस्था होईना, असा जेव्हां प्रकार झाला, तेव्हां मात्र तिला स्वतंत्रतेचें सुख जाणवूं लागलें. पांचपंचवीस ठिकाणीं नोकरीचे अर्ज करून कांहीं उपयोग होईना असें पाहून पुनः एखाद्या शाळेंत तरी नोकरी मिळाली तर पहावी, म्हणून तिनें त्या दिशेनें प्रयत्न चालविले. दोन दिवसांनीं म्युनिसिपल स्कूल्सचे चेअरमन कडून तिला बोलाविणें आलें. हे चेअरमन चांगले विद्वान आणि पोक्त होते. परंतु त्यांचा लौकिक मात्र अगदीं निराळा होता. शांताबाईला त्यांनीं दोनचारदां निरनिराळ्या वेळीं घरीं बोलाविलें. बिचारी आशेला लागून एकदां त्यांनीं बोलाविल्याप्रमाणें रात्रीं सुद्धां त्यांच्या घरीं गेली. परंतु तेथें गेल्या-वर चेअरमन साहेबांच्या भाषेचा चमत्कारिक ओघ पाहून त्यांच्या नांवानें हात चोळीतच तिला परत यावें लागलें.

भायखळ्यावर अमेरिकन मराठी मिशन स्कूलमध्यें एक जागा असल्याची बातमी तिला वामनरावांनीं सांगितली. तेथें तरी प्रयत्न करून पहावा म्हणून ती तेथेंहि जाऊन आली. त्या शाळेंत पंधरा रुपयांची एक जागा होती. शांताबाईचें त्या पगारावर भागण्यासारखें नव्हतें. कारण भाडें सोळा रुपये आणि जाण्या-

येण्याबद्दल ट्रमभाडें शिवाय किरकोळ खर्च आणि खाणावळ होती तो खर्च निराळा ! अर्थात् ती नोकरी तिला नाकारावी लागली. तेथून ती निराशाजनक स्थितींत परत येत असतां जे. जे. हॉस्पिटलजवळ तिला ट्राम बदलण्याकरितां उभें राहवें लागलें. त्यावेळीं चाराचा सुमार झाला होता. मेडिकल कॉलेज नुकतेंच सुटलें होतें. आपणास कमलिनी ह्या बाजूला भेटेल अशी तिला कल्पनाहि नव्हती. ती स्वतःच्या वर्तमान आणि भविष्य स्थितीचा कष्टप्रद विचार करीत ट्रमची वाट पहात उभी होती. इतक्यांत कांहीं विद्यार्थीबरोबर कमलिनी तिच्याचजवळ येऊन उभी राहिली. शांताबाईचें त्यांच्याकड लक्ष नव्हतें. परंतु कमलिनी बरोबरच्या विद्यार्थीबरोबर बोलूं लागतांच तिचा आवाज शांताबाईनें ओळखला. तिनें चटकन् बाजूला वळून पाहिलें. दोघींची एक दृष्टि झाली. इतक्यांत ट्रमहि आली. दोघीहि ट्राममध्यें बसल्या. तेथें गर्दी असल्यामुळें औपचारिक प्रश्नउत्तराशिवाय त्यांची कांहीं विशेष भाषा झाली नाहीं.

" आतां घरीं चल. " ट्राममधून उतरतांच शांताबाईचा हात धरून कमलिनी म्हणाली, " मी आतां तुला जाऊं देणार नाहीं. किती—एका वर्षानें ना आज भेटते आहेस ? होतीस तरी कुठं ? वसंतराव येणार असं कळतांच दडी मारलीस ती आतां बाहेर येतेस वाटतं ? "

आज शांताबाईचें अंतःकरण आपल्या बालमैत्रिणीजवळ उघड झालें. दीड वर्षापूर्वी कमलिनीचे वडील अत्यावस्थ असतांना तिची केविलवाणी अवस्था पाहून शांताबाईनें जसें तिचें शांतवन केलें होतें, तशीच केविलवाणी अवस्था आपली कर्मकथा सांगतांना आज शांताबाईची झाली. तिनें आपल्या स्वातंत्र्याचा पाढा कमलिनीपुढें वाचला. सासर सोडल्यापासून आपण कोणकोणते प्रसंग अनुभविले; त्या सर्व गोष्टी सांगून झाल्यावर आपल्या भावाचीं कृत्यें आपणास कसकशीं निस्तरावीं लागलीं, तींही तिनें सांगितलीं. आणि सांप्रत आपण कोणत्या स्थितींत आहोंत, तें सांगत असतांना ती म्हणाली, " ह्या भाड्यापायीं माझा जीव अगदीं मेट्यास आला आहे. उद्यां उजाडतांच भय्या येऊन उभा राहील. काय करावं तेंच कळेनासं झालं आहे. नोकरीची आशा होती पण तीहि नाहीं. अगदीं रडकुंडीस जीव आला आहे कमू ! "

कोमल हृदयी कमलिनीला हा वृत्तांत ऐकून अत्यंत वाईट वाटलें. ती चटकन् म्हणाली, " शांता, असं जर आहे तर मी बाबांना सांगून सर्व व्यवस्था करतें. पण तुला पसंत पडेल तेव्हां ! कारण तुझा स्वभाव पडला मानी ! "

" आता मानेवर येऊन बसल्यावर काय करतेस त्या स्वभावाला कमू ! ह्या दादाच्या पायीं मी अशी संकटांत पडले, नाहींतर माझं कसं छान चाललं होतं ! नाहीं कुणाचं घेणं, नाहीं कुणाचं देणं ! "

" मी प्रथम आईच्या कानावर घालतें. पण शांता आतां नोकरीबद्दल काय करणार ? कुठेंच जर नोकरी लागली नाहीं तर ! "

" तर कांहीं माझी घडगत नाहीं. "

" मग तूं नरसिंग ' किंवा ' मिडवायफरी ' कां शिकत नाहींस ? आमच्या कॉलेजमध्यें मी तुझी व्यवस्था करतें. एकदां का तूं नर्स झालीस तर महिना शेंदिडशें मिळायला कांहीं हरकत नाहीं. पहा हा एक मार्ग आहे. "

क्षणभर विचार करून शांताबाई म्हणाली, " दादाचं ऑपरेशन केलं, त्यावेळीं मी हॉस्पिटलमध्यें होतें. तेथें दोन नर्सीस होत्या. त्यांची चांगली ओळख झाल्यावर त्यांनींहि मला नर्स होण्याबद्दल आग्रह केला होता. दादाचं सर्व काम मीच करीत असें. तें काम फारसं कठीण आहे असं नाहीं मला वाटत. "

" कठीण नसलं तरी कष्टाचं आणि जोखमाचं मात्र आहे. मग काय, आहे का विचार ? खरंच—मला वाटतं, तूं हाच कोर्स घ्यावास म्हणजे दोघीहि पुनः एकत्र होऊं ! "

" होऊं खऱ्या पण ही पैशाची माझ्या मागची कटकट मिटल्याशिवाय मला कांहींहि सुचायचं नाहीं. "

" मी आतां बाबा आल्यावर विचारतें. बाबा कधींहि नाहीं म्हणणार नाहींत."

" मग जातें बाई मी ! संध्याकाळ होत आली." असें म्हणून शांताबाई उठली. " पण कमू मला केव्हां कळविशील ? उद्यां आहे रविवार तेव्हां बाबा घरांत असतील ना ? मला त्यांच्यापुढें येण्यास आतां धीरच होणार नाहीं."

" का—आमच्या बाबांची का तुला भीति ? अहाहा ! माझे बाबा म्हणजे ?—दयेचे सागर आहेत. पण शांता, तूं आतां आईला सुद्धां भेटणार नाहींस वाटतं ? तूं आलीस तें आईला देखील माहीत नाहीं. थांब, मी आईला आणि आजीला सांगून येतें." कमलिनी खालीं गेली.

शांताबाईनें एकदां चहुंकडे दृष्टि फिरविली. खोलींतील टापटीप, आणि सुखाच्या साधनांची अनुकूलता पाहून तिला कमलिनीच्या सुखाचा हेवा वाटूं लागला. कमलिनीच्या मागें भाड्याचा ससेमिरा नव्हता, खाणावळीच्या बिलाची कटकट नव्हती; उलट सर्व सुखें दत्त म्हणून तिला अनुकूल असल्याबद्दल शांताबाईनें आपल्या

चालू स्थितीशीं तिची तुलना केली यांत नवल नाहीं. आपणास अशा स्थितींत राहतां आल्यास आपणासारखी सुखी कोण आहे, असाहि एक विचार तिच्या मनांत आला परंतु त्याचवेळीं तिच्या हट्टी आणि वृथाभिमानी मनांत असा एक विचार यावयास पाहिजे होता कीं, आपल्या बालमैत्रिणीला सध्यां अनुकूल आहेत तीं सर्व सुखें किंबहुना त्यांहिपेक्षां जास्त सुखें आपणास पतिगृहीं अनुकूल असतां आपण होऊनच त्या सर्व सुखांना स्वतः पारखें झालों आहोंत. तिला सासरीं काय कमी होतें? ताटावरून पाटावर आणि पाटावरून ताटावर अशी तिची ऐषआरामी मिजास होती. कामकाजाकरितां घरांत नोकर चाकर, कोडकौतुक पुरविण्यास सासुसासरा आणि लाड पुरे करण्यास प्रेमी नवरा असें सर्वतोपरी सासरीं जिकडे तिकडे सुखच सुख असतांहि तिला ही अशी भाकरीसाठीं दुसऱ्याची चाकरी करावी लागली, याला दैवयोग म्हणावा, प्राक्तन म्हणावें कीं ही अवदसा म्हणावी!

सुमतीबाईला भेटून चहा घेतल्यावर शांताबाई घरीं आली. अनुसया तिची वाटच पहात होती. लाहोराहून [illegible] शांताबाई तिच्याच घरीं जेवत असे. अद्यापि मागलें खाणावळीचें बील दिलें नसल्यामुळें तिनें खाणावळींतून डबा मागविला नव्हता. आज इतके दिवस ती शेजारीं जेवीत होती, पण आतां तिला ओशाळल्यासारखें वाटूं लागलें. आपलें बस्तान किती सुंदर जुळलें होतें परंतु दादामुळें तें सर्व ढांसळून जाऊन पुनः आपलें गाडें पूर्वस्थितीवर आलें हें पाहून ती मनांतल्या मनांत आपल्या दादावर संतापून जाई. घरीं आल्यावर तिनें अनुसयेला सर्व गोष्टी सांगितल्या. नर्स आणि मिडवाईफ ह्या दोहोंतून आपण नर्स व्हावें; कारण लाहोरला असतांना हॉस्पिटलमध्यें दादाच्या सुश्रुषेंत दोन महिने घालविले त्यावेळीं त्या कामाची आपणास चांगली माहिती झालेली आहे, तेव्हां तें काम आपण लवकर शिकून आपणास प्राप्तीचा मार्ग मोकळा होईल असें तिचें मत पडलें. त्या रात्रीं तिला स्वप्नेंहि तींच पडलीं. हॉस्पिटल, रोगी, डॉक्टर आणि नर्सीस ह्याच व्यक्ति तिला स्वप्नांत दिसत होत्या.

दुसऱ्या दिवशीं रविवार असल्यामुळें नोकरीच्या शोधाकरितां तिला कुठेंहि जावयाचें नव्हतें; त्यामुळें ती बऱ्याच उशीरां उठली. आतां कमलिनीकडून आपल्या प्रश्नाला कोणता जबाब येतो, त्याकडे तिचें लक्ष लागलें. कमलिनीच्या वडिलांनीं जर आपणास पैशांची मदत केली नाहीं तर मात्र आपली पूर्ण फजिती होणार अशा विचारानें तिच्या मनाला एक प्रकारची धडकी भरली. कोणाजवळूनहि दोन पैसे उसने आणीन म्हणावें तर कोणाची ओळख नाहीं. फक्त शेजारचे वामनराव

मात्र होते. परंतु त्यांच्याकडून तरी उसनवार किती रुपये मिळणार ? पांच पंचवीस रुपये देण्यापलीकडे त्यांची हिम्मत नव्हती. उठल्यापासून तिच्या मनांत हेच सर्व विचार घोळत होते. अशा विचारांत तिनें एकदांचें तोंड धुतलें. आणि आतां ती चहा घेण्याकरितां शेजारीं अनुसयेच्या घरीं जाण्याकरितां बाहेर येणार तों दरवाजांत भाडें वसूल करणारा भय्या तिला दिसला. त्याबरोबर तिच्या छातींत धस्स झालें ! नऊ दहा महिन्याचें भाडें वसूल करणें असल्यामुळें तो भय्या वाटेल तें बोलूं लागला. एक तर ती भय्याची जात! त्याच्या तोंडून फिर्याद, टांच इत्यादि शब्द बाहेर पडले त्यांत आश्चर्य कोणतें ? बिचाऱ्या शांताबाईची स्थिति अगदीं मेल्यासारखी झाली. त्यांतून रविवार असल्यामुळें आजुबाजूची बिऱ्हाडकरू मंडळी घरींच होती. त्यांच्यापुढें हे आपल्या अब्रूचे धिंडवडे निघत असलेले पाहून तिच्या मनाची स्थिति काय झाली असेल याची वाचकांनींच कल्पना करावी. अशा वेळीं धरणीकंप होऊन त्यांत आपण गडप व्हावें अगर साक्षात् परमेश्वर येऊन त्यानें तरी ह्या संकटमय अवस्थेंतून सोडवावें, असें वाटून एक वेळ तिनें खरोखरीच खालीं ज़मिनीकडे, नंतर आकाशाकड पाहिलें. तिची स्थिति अत्यंत करुणास्पद झाली होती. अशा बिकट समयीं परमेश्वराला जर आपल्या लेंकरांची दया आली नाहीं, तर तो दयाघन कसा ? त्याचवेळीं रस्त्यांत एक गाडी येऊन उभी राहिली. थोड्या वेळानें जयरामपंत वर आले. त्यांना पाहतांच शांताबाईनें मोठ्या जुलमानें दाबून धरलेला गहिंवर एकदम बाहेर आला. आतांपर्यंत तिच्यावर अनेक प्रसंग येऊन गेले, त्यावेळीं ती धैर्यानें आणि प्रसंगावधानानें सुरक्षित बाहेर पडली होती. परंतु असें गहिंवरून येण्याचा हा तिचा पहिलाच प्रसंग होता. तिला इतके जोराजोरानें हुंदके येऊं लागले कीं, ती आतां एखाद्या लहान मुलीप्रमाणें डोळयांवर पदर धरून ओक्साबोक्सीं रडूं लागली. हा प्रकार पाहून जयरामपंतहि किंचीत् काळ गोंधळले. परंतु दरवाजाजवळ उभा असलेला भय्या पाहून तो कोण आहे व कशाकरितां उभा आहे हें त्यांच्या लक्षांत आलें. त्यांनीं पुढें होऊन त्याच्याजवळ चौकशी केली आणि सर्व पावत्या घेऊन भाडें चुकतें केलें.

"हें आणखी एका महिन्याचें आगाऊ नोटीस न दिल्याबद्दल भाडें. ही खोली आम्ही पुढल्या पहिल्या तारखेपासून सोडली आहे." असें म्हणून पंत आंत आले व शांताबाईकडे पहात क्षणभरानें पुढं म्हणाले. "हं, शांता, चल खालीं गाडी आणली आहे. चल आतां घरीं ! तुझं काय घ्यायचं असेल तें सांग."

एखाद्या हुकमी मुलीप्रमाणें शांताबाई गाडींत बसली. आपण काय करतों, हें

देखील तिला कळलें नाहीं. गाडी चालू झाल्यावर ती भानावर आली. आपलें मन इतकें नरमळें कसें झालें याचें तिला क्षणभर आश्चर्य वाटलें. आजपर्यंत ती अशा प्रकारें कोणालाही वळली नव्हती. ह्यापूर्वी पंतांनींही दोनचारदां प्रयत्न केले होते. परंतु त्यावेळीं नाहीं आणि आतांच त्यांना हें असें अकल्पित यश कसें आलें ? त्यांनाहि क्षणभर आश्चर्य वाटलें. रात्रीं कमलिनीनें त्यांच्या कानावर सर्व हकीकत घातल्यावर ' शेंदोनशें रुपये तिला पाहिजे असतील तर ते मी देतों आणि जुळल्यास तिलाहि येथें राहण्याकरितां घेऊन येतों.' असें ते म्हणाले होते. तथापि ती हट्टी पोर आपल्या घरीं राहण्याकरितां येईलच अशी त्यांना मागच्या अनुभवावरून खात्री वाटेना.

अनुसया चहाकरितां शांताबाईची वाट पहात होती, आज रविवार असल्यामुळें ती उशीरां उठणार हें तिला माहीत होतें. परंतु नऊ वाजलेले पाहून तिला हांक मारण्याकरितां ती खिडकींत आली. शांताबाईच्या खोलीच्या खिडक्या बंद होत्या. म्हणून ती हांका मारूं लागली. तेव्हां शेजारच्या मुलानें ती गाडींत बसून निघून गेल्याचें तिला सांगितलें. अनुसयेला मोठें आश्चर्य वाटलें. आपणांस न विचारतां ती गेली कशी व कुठें गेली हें तिला कांहींच कळेना. पुढें चार दिवसांनीं मात्र त्या सर्व गोष्टीचा शांताबाईकडूनच उलगडा झाला. ती गोष्ट निराळी ! पण ज्या वेळीं चहाकरितां बोलविण्यासाठीं अनुसया खिडकींत आली त्यावेळीं शांताबाई काय करीत होती ? आपल्या बाळमैत्रिणीबरोबर तिच्या प्रेमळ कुटुंबांत चहाच घेत बसली होती. पंतांना आदल्या दिवशीं रात्रीं कमलिनीकडून सर्व वृत्तांत कळल्यावर शांताबाईच्या आयुष्याला कांहींतरी निराळें वळण लावावें असा त्यांनीं निश्चय केला व त्यावर बराच विचार करून जें कांहीं करायचें त्यांनीं ठरविलें होतें तें आतां पंत त्या पहिल्याच बैठकींत तिला सांगत होते.

" शांता, आतांपर्यंत बरे वाईट प्रसंग तूं आपल्या हट्टी स्वभावामुळें स्वतःवर ओढून घेतलेस. तुझ्या डोक्यांत जें एक घातुक वेड शिरलें आहे, त्याबद्दल आम्ही किती जरी सांगितलें तरी तें तुला पटलें नाहीं. आणि पुढेंहि पटेल किंवा नाहीं याची मला शंकाच आहे. आपण करतों तें सर्व बरोबरच आहे, असेंच तुला वाटतें. पण एक काळ असा येईल कीं, त्यावेळीं तुझें मन पश्चात्तापानें अगदीं होरपळून निघेल. तुझ्यां डोक्यांत ' स्त्रियांना स्वतंत्रपणें वागण्याची मुभा असावी, पुरुषांसारखे त्यांना हक्क असावे ' हे विचार अगदीं वज्रलेपासारखे दृढ होऊन बसले आहेत. हे तुझे विचार चुकीचे आहेत असें मी म्हणत नाहीं. पण

विचारांची तुझ्याकडून चुकीची अंमलबजावणी होत आहे इतकेंच ! मुंबईसारख्या ह्या बकाली शहरांत तूं एकटीनें स्वतंत्र रहावेंस ही गोष्ट अगदी मूळापासून मला पसंत नाहीं. आतांपर्यंत झाल्या त्या गोष्टी होऊन गेल्या परंतु ह्यापुढें मात्र मी तुला अशा उच्छृंखल रीतीनें वागूं देणार नाहीं. माझ्या ऐवजीं तुझे वडील शंकरराव जर हयात असते तर त्यांनीं तुला अशा रीतीनें वागूं दिलें असतें काय ? तुझा दादा यशवंत किती झालं तरी पुरुष आहे, तेव्हां त्याची गोष्ट निराळी आणि तुझी गोष्ट निराळी ! म्हणून म्हणतों आतां ह्यापुढें जर तूं माझ्या मताप्रमाणें वागशील तर लवकरच असा एक काळ येईल कीं त्यावेळीं तुला तुझ्या मताप्रमाणें स्वतंत्रपणें आणि आमच्या मताप्रमाणें जननिंदेला पात्र न होतां वागतां येईल. आतां तूं येथेंच रहावेंस अशी माझी इच्छा आहे. दोन वर्षांनीं कमू डॉक्टर होईल आणि तूंहि ' क्वॉलिफाईड नर्स ' होशील. बोल माझी ही योजना तुला पसंत आहे काय ! "

शांताबाई काय उत्तर देणार ? तिनें गप्प राहूनच पंतांच्या योजनेला आपली संमति दिली.

---

## १९........ एकच गोष्ट

तो काळ किती लवकर निघून गेला ? हां हां म्हणतां दोन वर्षे निघून गेलीं. कमलिनीची नुकतीच शेवटची परिक्षा आटोपली होती. शांताबाईहि आपल्या कामांत पूर्ण तरबेज होऊन गेल्या चार महिन्यांत तिला ' नर्स ' म्हणून दोन चार ठिकाणाहून बोलावणींहि आलीं होतीं. ह्या दोन चार खेपा मिळून तिनें शें दिडशें रुपये सुद्धां मिळविले. आतां एखाद्या आजाऱ्याच्या शुश्रुषेकरितां तिला रात्रीं बोलाविलें तर ती दहा रुपये आणि दिवसाचे पांच रुपये घेऊं लागली.

कमलिनीची परीक्षा होतांच आतां आपण पूर्वी ठरल्याप्रमाणें विलायतेला जावें असा विचार तिच्या मनांत येऊं लागला. मुलीची उत्कट इच्छा पाहून पंतांनीं शेवटीं ' होय ' म्हणून विलायतेस ' रिटायर ' होऊन गेलेले आपले पूर्वीचे मि० कसेलसाहेब यांच्याशीं पुनः कमलिनीबद्दल पत्रव्यवहार सुरू केला. इकडे कमलिनी एल्. एम्. ॲण्ड एस्. च्या परिक्षेत उत्तम रीतीनें उत्तीर्ण झाल्याचें ज्या दिवशीं कळलें त्याच दिवशीं कसेलसाहेबाचेंहि ' मुलीला पाठवावी. सर्व पूर्व ठरल्याप्रमाणें बिनचुक व्यवस्था करून तिला एम्. डी. ' करून पाठवितों,

असें पत्र आलें. तात्काळ आमच्या कथानायिकेचें जाण्याचें ठरलें. तीं दोन वर्षें तिच्या सहवासांत शांताबाईनें मोठ्या आनंदांत घालविलीं. वाटेल तेव्हां पेटी वाजवावी किंवा दिलरुबा छेडावा अथवा सतारीवर बोटें फिरवावीं आणि कंटाळा आला तर कमलिनीबरोबर फिरायला जावें, अशा रीतीनें ती कमलिनीच्या अगदीं निकट सहवासांत आनंदांत असतांना सुद्धां चुकूनहि वसंतरावांचें नांव काढलेलें तिला खपत नसे. त्या एका गोष्टीशिवाय सुमतीबाईचें, म्हाताऱ्या आजीचें किंवा कमलिनीचें ती वाटेल तें ऐकत असे. वस्तुस्थिति जरी अशी होती, तरी पंतांचा आणि रावबहादुरांचा नेहमी खासगी पत्रव्यवहार होत असे.

आपली मुलगी विलायतेला गेल्यावर शांताबाईनें आपल्याच घरीं रहावें अशी पंतांची आणि सुमतीबाईची इच्छा होती. अलीकडे पंधरा दिवस ती वाळकेश्वरीं एका श्रीमंत आजाऱ्याकडे त्याची शुश्रूषा करण्याकरितां जात असे. परंतु दोन दिवसांपासून त्या श्रीमंत आजाऱ्याची तिला शंका येऊं लागली होती. वास्तविक तो आजारी चांगला बरा झाला असतांहि आणि डॉक्टरानेंहि तसें सांगितलें असतांहि आपला पांच रुपये रोज देऊनहि तो आपणास कां बोलवितो, हेंच तिला कळेना. परंतु खरी स्थिति कांहीं निराळी होती. तो धनिक गृहस्थ बराच रंगेल होता. आजारीपणांत शांताबाई शुश्रूषेकरितां त्याच्याजवळ राहिल्यापासून ती कायमचीच आपल्याजवळ रहावी, असें त्याला वाटूं लागलें. परंतु तसें बोलण्याचा मात्र त्याला धीर होईना. आज तिच्याजवळ गोष्ट काढूं, उद्यां काढूं असें करतां करतां सहज चार सहा दिवस गेले. शेवटीं कमलिनीचा विलायतेला जाण्याचा दिवस उद्यांवर आला असें पाहून शांताबाईनें 'आपण उद्यांपासून येणार नाहीं.' असें तिनें त्या आजाऱ्याला स्पष्ट सांगितलें. 'आतां तुम्हांला नर्सची कांहींएक आवश्यकता नाहीं' असें समजावून सांगितलें असतां देखील 'उद्यांचा दिवस या. मला तुम्हांला कांहीं सांगायचें आहे. तें ऐका आणि जा.' असें त्यानें तिला विनवून सांगितलें.

आमची कथानायिका विलायतेला जाण्याकरितां सकाळीं निघाली. तिला बंदरावर पोंचविण्याकरितां तिच्या कॉलेजमधील कांहीं मित्र प्रोफेसर आणि इतर पंतांची स्नेह मंडळी आली. शांताबाई देखील बंदरावर जावयाची पण तिला आपल्या 'पेशन्ट'कडे थोडावेळ त्याच्या आग्रहाप्रमाणें जावयाचें होतें तें ऐकून कमलिनीला शंका येऊं लागली. कारण विलायतेला जाणार असें कळतांच वसंतराव मुद्दाम मुंबईस येऊन सरदारगृहांत उतरले होते. परंतु ती गोष्ट शांताबाईला

मात्र माहीत नव्हती. आपण विलायतेला जाणार तेव्हां तूं माझं काय प्रिय करशील?' असें शांताबाईला विचारून तिचें आणि वसंतरावाचें जातां जातां बंदरावर पुनर्मिलन करून द्यावें असा कमलिनीनें विचार ठरविला होता. परंतु ती वाळकेश्वरीं जाऊन तशीच बंदरांत येतें' असें म्हणूं लागली तेव्हां 'वसंतराव येथें आले आहेत ही गोष्ट कळली म्हणून ही बंदरावर येण्याची टाळाटाळ करते' अशी कमलिनीला शंका आली.

बंदरावर जातांना 'शांता कुठें आहे?' असें एकदां पंतांनीं विचारलें, तेव्हां 'ती वाळकेश्वरीं आपल्या पेशन्टकडे गेली आहे, तेथून लवकर निघून ती बंदरावर येणार आहे.' म्हणून कमलिनीनें उत्तर दिलें. अर्थात् पंतांना कांहींच बोलतां येईना. कारण नर्सच्या पेशाप्रमाणें तिला हजारों निकडीचीं कामें दूर सारून प्रथम आपल्या पेशन्टकडे लक्ष पुरविलें पाहिजे, असें त्यांचें मत होतें. त्यांना कांहींच वाईट वाटलें नाहीं. उलट आपली बाल मैत्रीण इतक्या दूर जात असतां तिला पोंचविण्यास जाण्याऐवजीं ती आपलें कर्तव्य करण्यांत इतकी दक्ष आहे' हें पाहून पंतांना आनंद झाला.

शांताबाईचें सर्व चित्त बंदराकडे लागलें होतें. परंतु पेशन्टकडून लवकर सुटका होईल असा तिला कांहीं रंग दिसेना. आज तर तिच्या पेशन्टनें पूर्ण आजाऱ्याचें ढोंग केलें होतें इतकेंच नव्हे तर त्यानें आपल्या घरांतील मंडळींनाही अमदीं घाबरून टाकलें होतें. घरांतल्या मंडळींनीं डॉक्टरला टेलीफोन करण्याचाहि विचार केला होता. परंतु शांताबाईच्या सांगण्यावरून त्यांना धीर आला. ह्या गडबडींत दहा वाजले. शांताबाई जाण्याकरितां चळवळ करूं लागली. आतां ही जाणार असें पाहून शेवटीं त्या राजेश्रीनें आपलें मन उघड करण्यास सुरवात केली. प्रथम नर्सला अगदीं जवळ बोलावून आपल्या पलंगावर बसावयास सांगितलें.

तुम्हांला आज असं कां वाटतं? वास्तविक तुमची प्रकृति माझ्या दृष्टीनें पुष्कळ बरी आहे. मग असं का?" शांताबाई शांतपणें विचारूं लागली. परंतु तिला एकदम उत्तर न देतां तिच्याकडे पहात क्षणभरानें त्यानें आपला हात तिच्या मांडीवर ठेवला. इतका प्रकार झाला तरी शांताबाईच्या मनांत कोणत्याहि प्रकारची शंका आली नाहीं. तिनें नर्सचा पेशा उचलल्यापासून त्या पेशाला लागणारे सर्व गुण—कोमल मन, मृदु भाषण आणि आस्थेचें वर्तन—तिच्या ठिकाणीं स्वाभाविकच दृग्गोचर झालें होतें.

"नर्स शांता, तुमची कोण कोण मंडळी आहेत?" त्या पेशन्टनें विचारिलें.

" माझी कोणी मंडळी इकडे नाहींत भाऊ आहे पण तो लाहोरला असतो. "

" मग तुम्ही इकडे कुठें रहातां ? "

" एका मैत्रिणीच्या घरीं सध्यां मी रहातें. ती आजच—" असें म्हणून तिनें आपल्या रिस्टवॉचकडे पाहिलें, " आतां इतक्यांत बंदरावर गेली असेल कारण आज ती विलायतेला जाणार आहे. मीहि आतां येथून थेट बंदरावरच जाणार आहें. तुम्हाला आतां बरं वाटतं ना ? माझी आतां विशेष आवश्यकता दिसत नाहीं. ह्या चार्टवर लिहून ठेवल्याप्रमाणें औषधाची व्यवस्था करा म्हणजे झालें. मी उद्यां येईन. "

" पण जरा थांबा —थांबा, मला तुम्हाला कांहीं—जरा थांबा—थांबा, मला तुम्हाला कांहीं —जरा बसा—तुम्ही एकट्या राहातां ना ? मी–मी म्हणतों—" आपलें मन उघड करण्याचा त्या व्यक्तीनें बराच प्रयत्न चालविला. परंतु एकाएकीं उघड बोलण्याचा त्याला धीर होत नव्हता.

" तुम्हाला असं काय वाटतं ? तुमच्या मनांतून काय सांगायचं आहे ? "

"तूं–तूं आतां माझ्याजवळच रहा !" मनाचा हिय्या करून तो शेवटीं बोलला !

आज मला गेलंच पाहिजे. पंधरा दिवसांपूर्वी तुमची प्रकृति जशी होती, तशी जर आज असती तर कदाचित् मला आपणाजवळून हालतां आलें नसतें पण आज तसं नाहीं. तुमची प्रकृति आतां पुष्कळ बरी आहे. मी गेलें तरी तुमचें चालण्या-सारखं आहे. "

" नाहीं, नाहीं ! तूं आता मला टाकून गेलीस तर मी जीवंतसुद्धां राहाणार नाहीं !–शांता ! "

" हें काय ?–असं काय वेड्यासारखं !–"

" काय वाटेल तें म्हण पण शांता तूं मला पाहिजेस ! " असें म्हणून तो चटकन् बिछान्यावर उठून बसला आणि शांताबाईला त्यानें एकदम कवटाळून धरलें !

तीन वर्षांनीं आज असा प्रसंग शांताबाईवर आला ! तिनें झटकन् स्वतःला मोकळें करून घेतलें आणि दूर होऊन ती किंचित् रागांतच म्हणाली, " हें वर्तन तुम्हांला शोभत नाहीं. तुम्ही आजारी अहांत. मी नर्स म्हणजे तुम्हाला बहिणीच्या ठिकाणीं आहें. आतां मी येथें एक क्षणहि राहूं इच्छित नाहीं—"

शांता, अशी निष्ठूर होऊं नकोस ! " असें म्हणून तो पलंगावरून खालीं उतरला. आणि तिच्या आड उभा राहिला. " मी आतां पुष्कळ बरा आहें. फक्त

तूं मजजवळ राहावेंस म्हणून मी अद्यापि आजारी आहे. पहा–मी तुझ्यासाठीं वाटेल तें करीन. शांता, मला नाहीं म्हणूं नकोस ! ”

“ हा फाजीलपणा पुष्कळ झाला. व्हा दूर. मी आतां आपल्या घरीं इतःपर केव्हांहि येणार नाहीं–जवळ याल तर उगाच शोभा करून घ्याल. मागें सरा—” असें म्हणून शांताबाई चटकन् खोलीच्या बाहेर पडली आणि घरांतील मंडळींना न भेटतां आपल्या मार्गाला लागली. आपल्या रागाचें खरें वर्तन आतां तिच्या लक्षांत आलें. क्षणभरच तिच्या डोक्यांत रागाची एक भयंकर उसळी आली, परंतु पुनः विवेक करून तिनें आपलें डोकें शांत केलें. रस्त्यांत आल्यावर तिनें एखादी भाड्याची गाडी मिळाली तर तेथूनच बंदरावर जाण्याचा बेत केला. परंतु सर्व रस्त्यांत भाड्याची गाडी दृष्टीस पडली नाहीं. शेवटीं हळुहळू ती घरापर्यंत आली आपण कमलिनीला पोंचविण्याकरितां बंदरावर गेलों नाहीं हें पाहून सुमतीबाईना वाईट वाटेल हें ती जाणून होती. कारण आतां अकरा वाजून गेले होते. आतां आपण बंदरावर जाण्याकरितां निघणार तों कमलिनीला पोंचवून आलेली मंडळी आपणास वाटेंत भेटतील असें वाटून तिनें बंदरावर जाण्याचा विचार रहित केला.

ती घरीं आली. आतां ती माजघरांत जाणार तों आंत चाललेल्या संवादांत स्वतःचें आणि आपल्या दादाचें नांव ऐकून ती दरवाजांतच थबकली. दुसऱ्या भागाच्या उपोद्घातांत दिलेला, सुलोचनाबाई आणि सुमतीबाई यांचा संवाद वाचकांच्या लक्षांत असेलच ! शांताबाईनें तो संवाद आडून ऐकला. ‘ शांता आणि यशवंत घरदाराशिवाय गांवभर फिरतात.’ ‘ सुधारणेच्या पांघरुणाखालीं मुलांना मिळालेलं घातुक शिक्षण. ’ ‘ दोघं मुलं आईबापाच्या मृत्यूला कारण झालीं ’ इत्यादि सर्व वाक्यें तिनें ऐकलीं !

‘ आडून ऐकणारा नेहमीं स्वतःची निंदाच ऐकत असतो, ’ असें म्हणतात, त्याची आतां शांताबाईला पूर्ण प्रचीति आली. आंत चाललेला सरळ संवाद पण तिच्या अंतःकरणावर डाग देणारा प्रत्येक शब्द ऐकून ती तशीच मागें फिरली. आज सर्वच गोष्टी अगदीं चमत्कारिक होत होत्या. कमलिनीला पोंचविण्याकरितां बंदरावर जाणें आपलें कर्तव्य असतां तेथें जातां आलें नाहीं; नंतर वाळकेश्वरीं घडलेला प्रकार; आणि आतां ह्या ऐकलल्या गोष्टी, तिचें डोकें भणभणून टाकण्यास पुष्कळ झाल्या. ती घरांतून बाहेर पडली ती अनुसयेच्या घरीं आली. तेथील बिऱ्हाड सोडल्यापासून मधून मधून ती अनुसयेकडे येऊन घटका दोन घटका बसतहि असे. त्याचप्रमाणें आज देखील ती सहज भेटण्याकरितांच आली असेल

असें अनुसयेला वाटलें. शांताबाई बराच वेळ अगदीं स्तब्ध बसून होती. आज दोन वर्षे ती जयरामपंताकडे रहात होती. सुमतीबाईनें किंवा म्हाताऱ्या आजीनें तिच्यांत आणि कमलिनींत मुळींच भेदभाव ठेवला नव्हता. जणूं काय ती आपलीच मुलगी आहे, असें त्याचें वर्तन होतें. इतक्या प्रेमळ भावानें सुमतीबाई वागत असतां तिनेंच शेजारच्या बाईजवळ आपणाबद्दल असे उद्गार काढावे, त्याअर्थी त्या उद्गारांत बराच सत्यांश आहे, असें आतां तिला वाटूं लागलें. ' आपणास घातुक शिक्षण मिळालं ' ह्या म्हणण्याचें तिला कांहीं विशेष वाटलें नाहीं. पण ' आईबापाच्या मृत्यूला आपण बहिणभाऊ कारण झालों, ह्या वाक्याचा मात्र तिच्या मनावर फार परिणाम झाला. आणि त्याचाच ती आतां इतक्या खोल रीतीनें विचार करीत होती.

" शांताबाई, आज तुम्ही अशा दुःखी कष्टी कां दिसतां ? तुमची मैत्रिण आज विलायतेला गेली म्हणून कीं काय ? " बराच वेळ वाट पाहून शांताबाई कांहीं बोलत नाहीं असें पाहून अनुसयेनें विचारलें.

" आज अशा कांहीं विलक्षण गोष्टी घडून आल्या आहेत कीं, कोणत्या एका गोष्टीचा प्रथम विचार करावा हेंच मुळीं मला कळेनासें झालें आहे. आज कमू विलायतेला गेली पण जातांना मला कांहीं तिला भेटतां आलें नाहीं. "

" कां बरं ? असं कसं झालं ? "

शांताबाईनें उत्तरादाखल वाळकेश्वरीं घडलेली सर्व हकीकत तिला सांगितली. आणि त्या बरोबरच पूर्वींहि अनुभवलेल्या प्रसंगापैकीं एक दोन प्रसंग ओघाओघानें सांगितले. तें ऐकून अनुसया म्हणाली, " शांताबाई, धन्य आहे बाई तुमच्या धैर्या-पुढें ! इतके का तुमच्यावर प्रसंग आले ? पण शांताबाई, आजपर्यंत मी तुमच्याजवळ बोललें नाहीं पण आतां ओघालाच गोष्ट आली म्हणून तुम्हाला विचारतें. रागावणार नाहीं ना ? "

" विचारा—अगदीं खुशाल जें पाहिजे तें मला विचारा !

क्षणभर अनुसयेनें स्वतःशीं विचार केला. आजपर्यंत तिच्या आणि शांताबाईच्या पुष्कळ गोष्टी झाल्या होत्या. परंतु शांताबाईबरोबर ती कधींहि वादविवादाच्या भानगडींत पडली नाहीं. कारण ती हट्टी आणि ' आपलं तें खरें ' असें म्हणणारी आहे, ही गोष्ट थोड्या दिवसाच्या सहवासानें अनुसयेच्या लक्षांत आली होती. शांताबाईचे स्त्रीस्वातंत्र्याचे विचार तिला मुळीं पसंत नव्हते. आज ओघालाच गोष्टी आलेल्या पाहून तिनें हळुहळू बोलण्यास सुरवात केली.

" आज तुमच्यावर वाळकेश्वरीं जो प्रसंग आला त्याला काय कारण झालें ?— तसेंच ह्यापूर्वी जे तुम्ही आतां सांगितलेत ते प्रसंग यायला काय कारणं झालीं ? "

" मी नाहीं तुमच्या प्रश्नाचा अर्थ समजलें ! "

" अर्थ समजला असता तर हे असे अनर्थाचे प्रसंगच तुमच्यावर आले नसते. अहो, हे प्रसंग तुम्ही स्वतंत्रपणानें वागण्याच्या बाण्यामुळें स्वतःवर ओढवून घेतले. हेंच जर तुम्ही पतीच्या छत्राखालीं असतां तर तुमच्यावर असे प्रसंगच येते ना ! "

" पतीच्या छत्राखालीं राहून मग स्त्रीस्वातंत्र्याची महति ती काय राहिली ! " शांताबाईची स्वातंत्र्याची वृत्ति एकदम उसळली. ती आपले आगापूर्वीचे सर्व विचार पार विसरून गेली !

" तुमच्या आधुनिक मताप्रमाणें महति नाहीं ही गोष्ट मीहि मान्य करतें. पण शांताबाई, आपलें महाभारत असं सांगतें कीं, पतिशिवाय सतीला गतीच नाहीं. " अनुसयेनें महाभारताचें नांव काढतांच शांताबाईनें कपाळाला आठ्या घातल्या. ती एकदम म्हणाली, " ही महाभारती गोष्ट मला सांगूं नका अनुसयाबाई ! हीं भारत-भागवताचीं पुराणं तुमच्यासारख्या भोळ्या बायकांना फसविण्याकरितां पुरुषांनीं लिहिलेलीं भारुडं आहेत. तुम्ही म्हणतां तशी उक्ति मुळांतच नाहीं. उलट मी म्हणतें, पुरुषांनाच सतीशिवाय गति नाहीं. आपला वरचष्मा राहण्याकरितां पुरुषांनीं ही शब्दांची अशी फिरवा फिरव केली आहे. "

" केली असेल कदाचित् ! " पुराणाबद्दल शांताबाईचें काय मत आहे, तें कळावें ह्या उद्देशानें पडती बाजू घेऊन अनुसयेनें उत्तर दिलें.

" कदाचित् म्हणून शंका कशाला पाहिजे ? केलीच आहे बरं अनुसयाबाई ! अहो अगदीं प्रथमपासून विचार करून पहा म्हणजे ह्या पुरुषांनीं आपला अरेरावी-पणा चालावा म्हणून काय काय बंड करून ठेविलीं आहेत, तीं तुमच्या लक्षांत येतील. ह्या आपमतलबी पुरुषांनीं आपली सत्ता रहावी म्हणून आचार आणि रूढी कशा एकतंत्री चालविल्या आहेत, त्या नाहींका तुमच्या लक्षांत येत ? मुलगी लहान असते, तेव्हां ती आपल्या आईबापाच्या घरीं स्वतंत्रच असते. तिचें लग्न होईपर्यंत हा हक्काचा प्रश्न उद्भवत नाहीं. पण तिच्या लग्नाची बोलीभाषा सुरू होतांच ह्या स्वार्थी पुरुषांच्या कारवाईला सुरवात होते. "

" त्यांत पुरुषांची कारवाई कशी शांताबाई ? "

" कां बरं ? हे पुरुष एकदां मुलीला पाहयाला आले कीं झाली ह्यांच्या अधिकाराला सुरवात ! मुलीला ते चालवून पहातील, वाकवून पाहतील, वाचायला सांगतील, सुईत दोरा ओवायला सांगतील, असे नाना थेर करून त्या गरीब बिचाऱ्या मुलीला कशी अगदीं तरवारीच्या धारेवर धरून आपली सत्ता गाजवितात. जशी काय ती बाजारची वस्तूच ! तिला मन नाहीं कीं अंतःकरण नाहीं."

" खरंच ! गाईला आत्मा नाहीं असं इंग्रज लोक म्हणतात, तसंच स्त्रियांना मन नाहीं असं आमचे हिंदुलोक समजतात. असंच ना शांताबाई ?" किंचित् हिणावण्याच्या स्वरांत अनुसया बोलली. परंतु शांताबाईच्या तें लक्षांत आलें नाहीं. पुरुषजातीबद्दल आपला तिटकारा व्यक्त करण्याची तिला घाई झालेली होती. ती पुढें म्हणाली, "अगदीं एखादा बिजवर—तिजवर, वयानें थेरडा—चाळीस पन्नास वर्षांचा असून स्वतः रूपानें काळा कुरूप असा जरी हिडिस असला तरी चौथ्या लग्नाकरितांहि मुलगी कशी सुंदर, शिकलेली आणि बांधेसूद पाहिजे असेंच म्हणतो. एक मुलगी पसंत पडली नाहीं तर दुसरी ! दुसरी नाहीं तर तिसरी ! पण मुलींना तशी आवडनिवड करूं देतात का ? आपणासहि सुंदर, शिकलेला, बांधेसूद असा नवरा असावा, असं मुलींना वाटत नाहीं वाटतं ? पण अशी आवडनिवड करण्याचा मुलींच्या हातीं ह्या पुरुषांनीं अधिकारच ठेवलेला नाहीं; म्हणून अनुसयाबाई, आपणाला ह्या पुरुषांबरोबर आपल्या हक्काकरितां भांडायचं !

" मग शांताबाई, तुमचं लग्न झालं त्यावेळीं तुम्ही काय केलंत् ? तुमचा हक्क तुम्ही गमावलां कीं काय ?"

" मी कसा गमावीन ?"

" मग काय, आपल्या आवडीप्रमाणें आपल्या पतीची निवड केलीत म्हणायची !—खरं ना ? मग आतां तुमचं आणि तुमच्या पतीचं का पटूं नये ?"

" त्याचं कारण, माझं स्वतंत्रपणाचं वागणं त्यांना पसंत नाहीं हेंच !"

" मग ह्यावरून काय बरं सिद्ध होतं ? अशी निवडानिवड करणं हें काम किती तरी कठीण आहे. बाह्य गोष्टीवरून निवड केल्यामुळें तुमची अशी फसगत झाली. म्हणून मी म्हणते कीं, ही निवडानिवड करण्याची कठीण कामगिरी वडील माणसाकडेच असावी. बरं पण शांताबाई, तुमचं स्वतंत्रपणानं वागणं तुमच्या पतिराजांना पसंत पडेना म्हणून ही स्वतंत्रवृत्ति धरली पण नांवांत मात्र अद्यापि तुम्ही परतंत्रच आहांत ! आपल्या नांवापुढें तुम्ही पतीचं नांव आणि आडनांव कां लावतां ? नांवांत तरी पुरुषांना असा वरचष्मा कां करूं देतां ?

तुमच्यासारख्या स्वतंत्रबाण्याच्या स्त्रीला पुरुषाच्या–पतीच्या नांवानं जगानं ओळखावं हें नाहीं मला पसंत!"

"पण ह्या नोकरींत सगळ्या नांवाची आवश्यकता असते ना?"

"असली म्हणून काय झालं? इतर हक्काकरितां जशा तुम्ही भांडतां तसं नांवाकरितांहि तुम्हीं भांडलं पाहिजे. मद्रासेकडे म्हणे मुलांना स्त्रियांच्याच नांवानं ओळखतात, तसं इथं झालं पाहिजे. पण जोंपर्यंत आमच्या स्त्री हक्काची मजल इतकी पुढें गेली नाहीं तोंपर्यंत तुम्ही फक्त 'श्रीमती शांताबाई असंच नांव घ्यायला पाहिजे आहे. बरं पण तें जाऊंद्या. शांताबाई, मी तुम्हाला एक प्रश्न विचारतें—हो, पण तुम्ही रागावणार नाहींना?"

"नाहीं, अगदीं रागवणार नाहीं. खुशाल विचारा. तुम्हाला ज्या ज्या शंका येतील त्या त्या विचारा; म्हणजे मलाहि विचार करायला बरं पडेल. आतां हेंच पहाना. तुम्ही ही नांवाची शंका काढिली. मी म्हणतें, स्त्रियांनीं ह्याहि प्रश्नाचा विचार केला पाहिजे. हं—विचारा?"

"विचारूं?—तुमच्या पतीचं तुमच्यावर 'प्रेम' आहे का? तसंच तुमचं तुमच्या पतीवर प्रेम आहे का?"

"ह्या प्रश्नाचं उत्तर—!" शांताबाई विचारांत पडली. "छेः! मला तसं कांहींच सांगतां येत नाहीं. पण—पण अनुसयाबाई, प्रेम म्हणजे काय हो? कादंबऱ्यांतून आपण वाचतों तेंच ना प्रेम? नवरा बायकोनं एकमेकांच्या गळयांत गळा घालून अहोरात्र बसणं हेंच का प्रेम?"

"इश्श! कांहींतरी बोलतां झालं! हें प्रेम काय आहे हें जर तुम्हाला कळलं असतं तर फार बरं झालं असतं!"

"काय बरं झालं असतं अनुसयाबाई?"

"म्हणजे हा हक्काचा प्रश्नच उद्भवला नसता. कारण 'प्रेम' वाटेल ती झीज सोसण्यास तयार असतं. प्रेमांत 'स्वतंत्र' आणि 'परतंत्र' हा भेदच रहात नाहीं. परंतु ज्या ठिकाणीं पतिपत्नींत खरं प्रेम नाहीं, त्या ठिकाणींच मात्र तुम्हीं म्हणतां त्या हक्काकरितां मारामारी सुरू होते. खऱ्या प्रेमांत खरं सुख आहे, तसं सुख जगांत कशांतहि नाहीं. पतीविषयीं तुमच्या अंतःकरणांत प्रेम असतं तर हक्काकरितां तुमच्या मनानं कधींहि कुरकुर केली नसती. खऱ्या प्रेमाची गोष्ट कांहीं निराळीच आहे. ती अशी शब्दानें सांगूं म्हटल्यास सांगतांच येत नाहीं, बरं पण शांताबाई, तुम्ही तुमच्या मताप्रमाणं हक्कासाठीं पतीबरोबर भांडलां आणि

आतां मनाप्रमाणं हे पुरुषासारखे समान हक्क भोगतां पण मला इतकंच सांगा कीं, तुम्हीं आहांत ह्या हल्लींच्या स्थितींत सुखी आहांत काय ?

शांताबाई चटकन् 'होय' म्हणून उत्तर देणार होती परंतु पुनः तिला विचार पडला. ती विचारांत पडली असें पाहून आपल्या भाषणाचा तिच्या मनावर परिणाम होऊं लागला आहे, असें वाटून अनुसया पुढें म्हणाली, "कुठून असणार तुम्ही सुखी ? दोन वेळां जेवायला मिळालं—मनासारखे कपडे घातले, त्यांत तुम्ही सुख मानून घेत असाल तर प्रश्न नाहीं. पण त्यांत तरी कसलं आलं आहे सुख शांताबाई ? नोकरी करतां, पैसे मिळवितां आणि मनाप्रमाणं वागतां यांत कोणतं सुख तुम्ही अनुभवितां सांगा ? स्वातंत्र्यानें वागण्याचं यांत काय सुख आहे ? उलट परक्यांची नोकरी करायची, नर्सचं काम करायचं म्हणजे रोग्यांची शुश्रूषा करायची, ती देखील एक प्रकारची गुलामगिरीच कीं नाहीं ? त्यापेक्षां तुम्ही स्वतःच्या पतीच्या 'नर्स' व्हा. म्हणजे जी एक गोष्ट तुम्हाला अझूनपर्यंत मिळाली नाहीं, ज्या गोष्टीची तुम्हाला अद्यापि ओळख पटली नाहीं, ज्या गोष्टीच्या अभावीं तुम्ही पतीबरोबर हक्काकरितां भांडलां ती गोष्ट तुम्हाला मिळेल."

"कोणती गोष्ट ती ?" एकदम विचारांतून जागेपणांत येऊन शांताबाईनें विचारलें.

"ती गोष्ट कोणती, ती मी आतां सांगून कळायची नाहीं. पण इतकी मात्र गोष्ट खरी आहे कीं, तुम्हाला सुखी व्हायला आणखी एका गोष्टीची आवश्यकता आहे. करा विचार आणि आपल्या मनानेंच काढा शोधून ती गोष्ट !"

---



## पतिप्रेम

शांताबाईच्या मनाला एक खाद्य देऊन अनुसया उठली. गोष्टी बोलतां बोलतां तीन वाजले. आतां चहाची वेळ झाली असें पाहून ती चहा तयार करण्यासाठीं चूल पेटविण्याच्या उद्योगाला लागली. शांताबाई अद्यापि जेवली नव्हती. सकाळीं चहाबरोबर कांहींतरी न्याहारी करून ती पेशन्टकडे जात असे. तेथून दुपारीं एक वाजतां परत येऊन जेवण होतांच दोन वाजतां जात असे. आज सकाळीं ती चहाच घेऊन गेली होती. कारण लवकर येऊन कमलिनीबरोबर जेऊन ती बंदरावर जाणार होती. परंतु तो सर्व कार्यक्रम वाळकेश्वराच्या एका प्रकारामुळें चुकला. अकरा वाजून गेल्यावर ती घरीं आली. पण तेथें दुसरा प्रकार होऊन ती

दरवाजांतून परत फिरली आणि तशीच अनुसयेकडे आली. ती जेऊनच आली असेल असें समजून अनुसयेनें प्रथमपासूनच गप्पागोष्टीला सुरवात केली. इतका वेळ झाला; गोष्टी करण्यांत दंग झाल्यामुळें आपण जेवलों नाहीं, ही गोष्ट शांताबाई विसरली होती. आतां अनुसया चुलीजवळ जातांच तिला स्वतःच्या जेवणाची आठवण व्हायची पण विचारांत तिचें मन इतकें गढून गेलें होतें कीं, अनुसया करीत असलेला तो सर्व चहाकरितां चुल पेटविण्याचा खटाटोप ती फक्त डोळयांनीं पहात होती. पण त्या देखाव्याची तिच्या मनाला जाणीव होत नव्हती.

" आपणास कोणत्या गोष्टीची आवश्यकता आहे, ' याचा शांताबाई विचार करीत होती. परंतु तिला अशी एकहि गोष्ट आठवेना कीं त्या गोष्टीमुळें आज आपलें अडून राहिलें आहे. पुष्कळ किचार करून ह्या प्रश्नाचें तिला उत्तर मिळेनासें होतांच ' आपण सुखी आहोंत का ? ' हा दुसरा प्रश्न तिच्या डोक्यांत आला. ह्या प्रश्नावर तिचा विचार सुरू झाला. इतक्या वेळांत अनुसयेनें चहा तयार करून तिच्या-पुढें ठेवला. शांताबाई विचारांत अगदीं गढून गेली आहे, हें तिच्या लक्षांत होतें. कांहींतरी बोलून तिच्या विचारांत व्यत्यय आणावा असेंहि तिला वाटलें. परंतु आपण ज्या सांगितलेल्या एक दोन गोष्टींचा शांताबाई विचार करीत आहे त्या गोष्टींची जर तिच्या मनानें समाधानकारक उत्तरें दिलीं, तर त्यापासून कांहींतरी फायदाच होऊन तिच्या आयुष्याला निराळें वळणहि लागेल असा विचार करून अनुसयेनें अगदीं मुकाट्यानें कांहीं एक न बोलतां चहाचा कप तिच्यापुढें ठेवला. पुष्कळ वेळ झाला. चहा थंड होऊं लागला असें पाहून शेवटीं ती नाइलासास्तव म्हणाली, " शांताबाई चहा घ्याना ? थंड देखील झाला असेल तो ! "

शांताबाईनें एखाद्या कळसूत्री बाहुल्याप्रमाणें चहाचा कप उचलून तोंडाला लावला. आज तिला चहाची चव देखील कळली नाहीं. चहा पिऊन होतांच कप खालीं ठेऊन पुनः ती विचारमग्न स्थितींत बसली. अनुसया थोडे तांदुळ घेऊन तेथेंच मुकाट्यानें बसली. थोड्या वेळानें तिचे तांदुळहि निवडून झाले. तोंपर्यंत चार वाजून गेले. आतां तिला स्वयंपाकाला लागण्याची वेळ होत आली. अली-कडे वामनराव लवकर घरीं येत असत. इतके दिवस ती पतीकरितां संध्याकाळीं चहा आणि फराळाचें करीत असे. पण त्यामुळें रात्रींच्या जेवणाला उशीर बसूं लागला. म्हणून वामनरावांच्याच सांगण्यावरून चहा आणि फराळ बंद करून ती लवकरच जेवण करून ठेऊं लागली. त्यामुळें चहा आणि फराळाचा खर्च बंद होऊन जेवणहि चांगलें जाऊं लागलें. संसारीदृष्टीनें ती एक काटकसर होऊन खर्चाची बचत होऊं लागली होती. असो.

‘ आपण सुखी आहोंत का ?—’ ह्या प्रश्नालाहि शांताबाईचें मन उत्तर देईना. सासरहून निघाल्यापासून आतांपर्यंत लोटलेल्या काळाचें ती सिंहावलोकन करूं लागली. पुण्यास आल्यावर मातापित्याच्या मृत्यूनंतरचा प्रसंग, तेथून मुंबईत आल्यानंतरचा सर्व काळ, त्या काळांत जगांतील दिसलेली वाईट बाजू, नोकरी आणि नंतर नर्स म्हणून चालविलेला स्वतंत्र उद्योग; ह्या सर्व प्रसंगावर तिनें आपले मनचक्षू फिरविले परंतु त्यांत एक दिवस. सुखाचा किंवा मनाला शांति मिळालेला असा एखादा दिवस तिला आठवेना. सासरीं असतांना आपल्या मनाला चिंता नसल्यामुळें एक प्रकारची शांति अनुभवतां येत होती. परंतु आपण स्वतंत्र वृत्तीनें वागूं लागल्यापासून तशा प्रकारची शांतीसुद्धां अनुभवितां आला नाहीं, असें आतां विचाराअंतीं तिला वाटूं लागलें. अशी शांति किंवा सुख आपणास कां अनुभवितां आलें नाहीं, याचा विचार करतां करतां कोणत्यातरी गोष्टीची आपणास उणीव आहे, अशी एक अस्पष्ट कल्पना चटकन् तिच्या मनांत आली ती गोष्ट कोणती ?

आपण समान हक्काकरितां पतीबरोबर विरोध केला; तो समान हक्क आतां पूर्णपणें आपल्या मताप्रमाणें अनुभवीत असतां आपणास शांति कां मिळूं नये ? त्या समान हक्काकरितां आपण पतीची ताबेदारी सोडली. पण आतां परक्यांची मात्र आपण ताबेदारी करूं लागलों; ही गोष्ट आतां तिच्या लक्षांत आली. पतीच्या ताबेदारीला आपण ‘ बटिक ’ ही संज्ञा आपण दिली होती, पण आतां आपण जी दुसऱ्याची ताबेदारी करीत आहोंत त्या ताबेदारीला काय नांव द्यावें ? उलट ती गुलामगिरीच नाहीं कां ? त्यापेक्षां पतीची ताबेदारी काय वाईट ! आपण आतां नर्स होऊन दुसऱ्यांची रात्रंदिवस सेवा करतों आणि पैसे मिळवतों. पण असा पैसा मिळवतांना आपणास परपुरुषांचें-रोग्यांचें कितीतरी मन सांभाळावें लागतें; आपल्या कामांत किंचितहि चुकारपणा आपण होऊं देत नाहीं. रात्रींच्या रात्रीं रोग्याच्या उशाजवळ डोळयांत तेल घालून बसावें लागतें; आणि इतकेंहि करून मनाला स्वस्थता नाहीं ती नाहींच ! तेंच आपण पतिगृहीं असतांना किती मोकळया मनानें चिंतारहित होतों, याची तिला आठवण झाली. अशा रीतीनें विचार करतां करतां ‘ समान हक्क ’—‘ स्वतंत्रता ’ ज्याकरितां आपण इतके हाल भोगीत आहोंत, त्या दोन गोष्टी आहेत तरी काय ? याचाच शेवटीं तिला उलगडा होईना. इतकीं वर्षे आपण भ्रामक समजुतीनें, कोणत्या विचारानें, हट्टी आणि हेकेखोर स्वभावाला बळी पडून खऱ्या जलाऐवजीं मृगजलांत पोहत होतों

असं तिला आतां वाटूं लागलें. तेंच जर आपण इतक्या आस्थेनें, एक दिलानें आणि कर्तव्य म्हणून अनुसया म्हणते त्याप्रमाणें पतीची ' नर्स ' होऊन त्यांची शुश्रूषा केली असती तर—! आपणास सुख लाभलें असतें, आपल्या मनाला शांतिहि मिळाली असती. पण अनुसया म्हणते, ती एक गोष्ट कोणती ?

इतका विचार करून अद्यापि ' ती गोष्ट कोणती ? ' हें शांताबाईच्या लक्षांत येईना. विचार—विचार—आणि विचार ! एकसारखा विचार करून ती थकली. आज सर्व दिवसांत चमत्कारिक प्रसंगामुळें मुळांत तिचें डोकें त्रासून—खळवळून भकल होतें त्यांतून ती जेवली नसल्यामुळें प्रदीप्त झालेल्या जठराग्नीच्या ज्वाला तिचें डोकें भडकवीतच होत्या; शिवाय हा विचार !

इतक्यांत बाहेरचा दरवाजा वाजला. अनुसया चटकन् उठून बाहेर आली. कोण आलें आहे हें तिनें जाणलें. कारण वामनरावांची ती येण्याची वेळ होती. अनुसयेनें दरवाजा उघडला. वामनराव आंत आले. आणि नित्याप्रमाणें हांसत-मुखानें पत्नीची हनुवटी धरून त्यांनीं तिच्या आरक्त गालावर आपली प्रेमाची खूण ठेविली !

" हें काय गडे ! सोडा मला–आंत शांताबाई बसल्या आहेत. त्या पाहतील—"

पाहिलें ! शांताबाईनें तो प्रकार पाहिला. दरवाजाच्या फटींतून तो सर्व प्रकार तिला सहज दिसला. त्या प्रकाराच्या दृश्य चित्रानें इतका वेळ तिच्या डोक्याला सतावून सोडणाऱ्या प्रश्नाला आतां उत्तर दिलें. आपणाला ज्या एका गोष्टीचा आभाव आहे ती गोष्ट तिला आतां समजली आणि खरें सुख कोणत्या गोष्टींत लपलें आहे, त्याचीहि तिला आतांच जाणीव झाली. ती गोष्ट म्हणजे–' पतिप्रेम ' !

पतीच्या बाहूंतून अनुसया आपली सुटका करून घेत असतां आंतल्या खोलींत धाडकन् पडल्याचा आवाज झाला. अनुसया आणि वामनराव दोघेहि गडबडीनें आंत आले. शांताबाई जमिनीवर अस्ताव्यस्त निचेष्टित पडली होती ! त्या दोघांनीं पुष्कळ खटपट केली परंतु शांताबाई शुद्धिवर येईना. शेवटीं धांवत जाऊन वामन-रावांना शेजारच्या डॉक्टरला घेऊन यावें लागलें अनुसयेनें घाईघाईनें गादी अंथरून तीवर हळूंच शांताबाईला निजविलें. डॉक्टरानें येऊन तपासल्यावर ' मानसिक श्रमाच्या अतिरेकामुळें ' हा प्रकार झाला असें सांगून तिला स्वस्थ पडूं देण्याची आज्ञा केली. डोक्याला पूर्ण विश्रांति मिळाल्याशिवाय ती शुद्धिवर येणार नाहीं, करितां तिला शुद्धिवर आणण्यास कृत्रिम उपाय न करतां शुद्धिवर आल्यानंतर देण्याकरितां औषधयोजना करून डॉक्टर साहेब निघून गेले. अनुसया

आणि वामनराव तिच्या उशाजवळ बसून राहिले. थोड्या वेळानें वामनरावांनीं विचारल्यावरून आपला आज कोणत्या विषयावर वादविवाद झाला, त्याचा शांता-बाईच्या मनावर काय परिणाम झाला, आणि ती दुपारपासून कशी विचारांत मग्न होती इत्यादि सर्व गोष्टी तिनें सांगितल्या.

"तुम्ही आतां जयरामपंतांकडे जाऊन त्यांना सर्व कळवा. आज त्यांची मुलगी विलायतेला गेली, तिला पोंचविण्याकरितांहि शांताबाईला जातां आलें नाहीं. त्यामुळें आणि अद्यापि शांताबाई घरीं कां आली नाहीं म्हणून ती मंडळी काळजींत असतील." असें अनुसयेचें म्हणणें पडतांच वामनराव उठले. आणि अनुसया तिकडेच बसून राहिली. पंतांच्या घरीं जाण्याचा वामनरावांचा हा पहिलाच प्रसंग होता. ते जेव्हां पंतांच्या घरीं गेले त्यावेळीं योगायोगहि असाच जुळून आला होता कीं, दिवाणखान्यांत पंत आणि वसंतराव गोष्टी बोलत बसले होते. आणि त्यांच्या गोष्टीहि शांताबाईबद्दलच चालल्या होत्या. कमलिनी विलायतेला जाणार म्हणून मुद्दाम वसंतराव भोरहून आले होते. त्यांनीं आपल्याच घरीं उतरावें अशी पंतांची इच्छा होती, परंतु शांताबाई त्यांच्या घरीं रहात असल्यामुळें मागील अनुभवाचा विचार करून वसंतराव सरदारगृहांत जाऊन उतरले होते.

"पंत, तुम्ही कांहींहि म्हणा पण मी मुंबईत आलों आहें, असं तिला कळलं असलं पाहिजे." वसंतराव बोलत होते. "आणि म्हणूनच मला टाळण्याकरितां ती बंदरावर आली नाहीं. बरं तसं नाहीं म्हणावं तर ती दुपारीं जेवणाकरितां येत असते ना ? मग आज कां नाहीं आली ?"

"पण तिला कळायला मार्ग कोणता ? तुम्ही येणार ही गोष्ट मला आणि फक्त कमूलाच माहीत होती. आणि तिला सांगायचं नाहीं असं कमूच मला म्हणाली होती." पंतांनीं उत्तर दिलें.

"बरं तर मी आतां जातों. तुमच्या सांगण्याप्रमाणें आतां इतक्यांत तिचा परत येण्याचा वेळ होईल. तेव्हां मी येथून जावें हेंच उत्तम ! माझी भेट न घेण्याची जर तिची इतकी उत्कट इच्छा आहे तर मग मीच होऊन का तसा जुलमानें प्रसंग आणावा ? जातों मी !" असं म्हणून वसंतराव उठले. आणि त्याच संधीला वामनराव दिवाणखान्यांत आले. परस्परांचा नमस्कार झाल्यावर वामनराव म्हणाले, "आपली व माझी ओळख नाहीं. पण मी आपलें नांव ऐकलें आहे. आपल्या घरीं राहण्याकरितां येण्यापूर्वी शांताबाई आमच्या बिऱ्हाडाच्या शेजाराला रहात होत्या. त्या आज दुपारीं आमच्या कुटुंबाला भेटण्याकरितां आल्या—"

" पण ती आपल्या पेशन्टकडे वाळकेश्वरीं गेली होती." मध्येंच पंत म्हणाले.

शांताबाईचें नांव निघतांच जाण्याकरितां निघालेले वसंतराव दरवाजांतच उभे राहिले. वामनरावांनीं आंत आल्यावर एक वेळ त्यांच्याकडे पाहिलें. परंतु ते ओळखीचे नसल्यामुळें त्यांच्याकडे दुर्लक्ष करून वामनराव पुढें म्हणाले, " होय. शांताबाई पेशन्टकडे जाऊन लवकर आल्या. परंतु घरीं येईपर्यंत अकरा वाजले म्हणून त्या बंदरावर न जातां आमच्या घरीं आल्या. त्यांच्या आणि आमच्या कुटुंबाच्या बऱ्याच गोष्टी झाल्या. त्या आतां मी सर्व सांगत बसत नाहीं. वाटेंत सांगतों. पण आपण प्रथम आमच्या घरीं चला. शांताबाई बेशुद्ध पडल्या आहेत—"

" काय बेशुद्ध ?—म्हणजे ? झालं काय तिला ? " एकदम पंत म्हणाले.

" काय झालं तें मला सांगतां येत नाहीं. डॉक्टरनें ' मानसिक श्रमाचा अतिरेक झाल्यामुळें बेशुद्ध पडल्या ' असें सांगितलें आहे."

" चला—वसंतराव तुम्हीहि चला—पण तुमचं नांव नाहीं मला कळलं ? " पंतांनीं विचारलें.

" माझें नांव वामन गणेश देशमुख."

" आणि यांचं नांव वसंतराव. रावबहादुर जोशांचे हे चिरंजीव आणि शांताबाईचे पतिराज. होयना ? " पंत वसंतरावाकडे पहात हांसत म्हणाले.

" होय. पण नावडते पतिराज—" वसंतरावांनींहि किंचित् हास्य करून उत्तर दिलें.

पंत तयार होत असतां सुमतीबाई वर आली. तिला शांताबाईची हकीकत सांगतांच तीहि ' मी बरोबर येतें,' असें म्हणूं लागली. तेव्हां तिला ' चल ' म्हणून पंत बाहेर आले. वसंतरावांना नेण्याकरितां दरवाजांत गाडी उभी होती, त्या गाडींत मंडळी बसली. वाटेंत वामनरावांनीं थोडक्यांत सर्व हकीकत त्यांना सांगितली. ' तुम्ही सुखी आहांत काय ? '—' तुम्हाला एका गोष्टीची उणीव आहे, ती गोष्ट कोणती हें कळतांच तुम्हांला सुख म्हणजे काय हें कळेल.' इत्यादि आपल्या पत्नीच्या शांताबाईबरोबर झालेल्या गोष्टी, त्या भाषणावर शांताबाईनें केलेला विचार, नंतर आपण कचेरींतून घरीं आल्यावर घडलेला प्रकार, वगैरे हकीकत वामनरावांनीं त्यांना सांगितली. वाटेंत पंतांचे ' फ्यामिली ' डॉक्टर आपल्याबरोबर घेतले. सर्व मंडळी वामनरावांच्या बिऱ्हाडीं आली. अद्यापि शांताबाई बेशुद्ध स्थितींतच होती. डॉक्टर गोखले यांनीं परीक्षा करून पूर्वीच्या डॉक्टराप्रमाणेंच आपलें मत दिलें आहे.

" हिला आतां घरीं नेतां येईल का ? " पंतांनीं डॉक्टर गोखल्यांना विचारलें.

" नेतां येईल पण फ़ार सावधगिरीनें नेलें पाहिजे."

डॉक्टरानें परवानगी देतांच सुमतीबाई, अनुसया, आणि पंत यांनीं वसंतरावांच्या साह्यानें तिला हळूंच उचलून गाडींत ठेवलें. ती शुद्धिवर येईपर्यंत आपल्याच घरीं असावी, असें वामनरावांचें मत होतें, परंतु डॉक्टरनें परवानगी दिल्यावर त्यांना गप्प बसावें लागलें. हळुहळू गाडी घरीं आली. पुनः मोठ्या व्यवस्थेनें त्यांनीं शांताबाईला उचलून वर नेलें आणि आमच्या कथानाइकेच्या रिकाम्या झालेल्या खोलींत तिला पलंगावर आणून निजविलें. सर्व घरांत गोंधळ झाला. रात्रीं अकरा वाजेपर्यंत शांताबाईच्या पलंगाजवळ सर्व मंडळी बसून होती. शेवटीं डॉक्टरनें ती केव्हां शुद्धिवर येईल याचा नेम नाहीं असें सांगितल्यावरून पंतांनीं जेवण आटोपून घेण्याचा विचार केला. आजी आणि सुमतीबाई खालीं गेल्या. बरीच रात्र झाली असें पाहून वामनराव आणि डॉक्टर जाण्याकरितां निघाले. त्यांना पोंचविण्याकरितां पंत त्यांच्याबरोबर बाहेरच्या दिवाणखान्यांत आले फक्त वसंतराव मात्र आतां खोलींत एकटेच आपल्या पत्नीजवळ राहिले. पांच वर्षांनंतर असा प्रसंग आज वसंतराव अनुभवित होते. पत्नीच्या उशाजवळ बसून ते अत्यंत सचिंत पण मननपूर्वक तिच्या मुखाकडे एकाग्र दृष्टीनें पहात होते. त्याच संधीला शांताबाई किंचित् हालचाल करूं लागली. थोड्या वेळानें एक दिर्घ श्वास सोडून ती अस्फुट स्वरांत पुटपुटली—" ती गोष्ट !—अहाहा !—पतिप्रेम !—पण—"

शांताबाईनें हळूंच डोळे उघडले, प्रत्यक्ष आपले पतिराज अगदीं आपणाजवळ बसलेले आहेत असें दृष्टीस पडतांच आपण स्वप्नच पहात आहोंत असा तिला भास झाला. तिनें पुनः घट्ट डोळे मिटून घेतले. ती जागी झाली असें पाहतांच तिचा स्वभाव किती चमत्कारिक आहे, हें माहीत असल्यामुळें वसंतराव मुकाट्यानें उठले आणि बाहेर जाऊं लागले.

" थांबा ! " डोळे उघडतांच वसंतराव जातांना पाहून शांताबाई म्हणाली.

वसंतराव किंचित गोंधळूनच उभे राहिले आणि ती उठूं लागली असें पाहून म्हणाले, " उठतां कशाला ? श्रम होतील ! "

परंतु शांताबाईनें त्या भाषणाकडे लक्ष दिलें नाहीं. ती धडपडून पलंगावरून उठली. आणि खालीं उतरली. उठतांना तिचा किंचित् बाजूला झोंक गेला. ती पडते किं काय असें वाटून वसंतरावांनीं चटकन् पुढें होऊन तिला सावरण्याकरितां हात पुढें केले. तों त्या पसरलेल्या बाहूंत ती पडली ! तो प्रसंग मुद्दाम घडून आला

किंवा स्वाभाविक घडून आला इतका विचार करण्यास त्यावेळीं वेळच राहिला नाहीं. शांताबाईनें आपल्या पतिला एखाद्या वेलीप्रमाणें चिकटून घट्ट मिठी मारली त्या अकल्पित स्पर्शानें दोघांच्या मनांत एक अननुभूत भावनेचा उद्भव झाला.

" मला क्षमा—" शांताबाईला शब्दोच्चार करवेना. वसंतरावांनीं हळूच तिचें मुखकमल वर केलें. परस्परांचीं एकदृष्टि झाली आणि क्षणार्धांत एकमेकांच्या ओठाचें मिलन होऊन हृदयाला हृदय मिळालें !

वसंतराव आणि शांताबाई यांच्या पुनर्मिलनाचा तो आनंद अपूर्व होता. सर्वत्रांना आनंद झाला. पतिछत्राची सांवली पडतांच शांताबाईच्या स्वभावांत आणि आचार विचारांत एकदम क्रान्ति घडून आली. तिच्या ठायीं शालीनता विनय, प्रेम इत्यादि गुणधर्म दृग्गोचर होऊं लागलेले पाहून सर्वत्रांना मोठें आश्चर्य वाटलें. आमची कथानायिका कमालिनी विलायतेला जाऊन पोंचते न पोंचते तों तिला वडिलांच्या पत्राबरोबरच वसंतराव आणि शांताबाई यांनीं निर-निराळीं लिहिलेलीं पत्रें मिळालीं. ' इतकीं वर्षें तपश्चर्या केल्याचें फळ मिळालें, मला माझ्या गृहिणीचा लाभ झाला ! ' असें वसंतरावांनीं आणि ' शेवटीं जगाचा कटु अनुभव घेऊन माझे डोळे उघडले. आतां मी माझ्या घरीं भोरला जाणार असें शांताबाईनें पत्रांत लिहिलें होतें.

पतिप्रेमांत आपल्या सौख्याची पूर्तता झाली असें आतां शांताबाईला वाटूं लागलें. गेलीं पांच वर्षें आपण खऱ्या सुखाऐवजीं खोट्या दुःखामागें लागून, खऱ्या स्वतंत्रतेच्या ऐवजीं खोट्या परतंत्रतेला भुलून आणि खऱ्या हक्का ऐवजीं खोट्या हक्काला बळी पडून व्यर्थ आयुष्याचा नाश केला, असें ती आपल्या पतिबरोबर बोलतांना पश्चात्तापानें सांगत असे, त्यावेळीं ' तूं जो स्वतंत्र उद्योग केलास आणि नरसिंग-टाइपिस्टच्या कला शिकलीस त्या दृष्टीनें विचार केला म्हणजे सदुपयोग केलास, असें वसंतराव तिला उत्तर देत.

---

# उपसंहार

पुढें आठ दिवस पंतांच्या घरचा पाहुणचार घेऊन वसंतराव आपल्या प्रिय पत्नी-सह परत भोरला जाण्याकरितां निघाले. त्यावेळीं म्हाताऱ्या आजीनें आपण केलेलें भविष्य खरें झालें म्हणून शांताबाईला आठवण केली; पंतांनीं म्हटल्याप्रमाणें 'पश्चात्तापाचा एक दिवस उजाडेल ' ह्या म्हणण्याची तिला ओळख पटली; सुमतीबाईनें गृहशिक्षणाची गाईलेली महति तिला पटूं लागली आणि अनुसयेनें म्हटलेलें 'पति-शिवाय सतीला गति नाहीं ' हें वाक्य तिच्या अंतःकरणफलकावर कोरून निघालें !

आपण अमुक दिवशीं परत भोरला येतों असें वसंतरावांनीं आपल्या वडिलांना पत्र लिहिलें. आपणाबरोबर शांताबाईहि येणार आहे असा उल्लेख मात्र त्यांनीं केला नाहीं. कारण गेलीं पांच वर्षें वसंतरावांनीं दुसरें लग्न करून आपला संसार चालवावा अशी रावबहादुरांची इच्छा आणि रमाबाईचें टुमणें मागें असल्यामुळें, त्यांच्यापुढें पत्नीसह जाऊन त्यांना आश्चर्यचकित करावें, असें त्यांनीं मनाशीं ठरविलें होतें. पत्र गेल्याप्रमाणें स्टेशनवर गाडी आली होती. रावबहादुर आणि रमाबाई मुलाकरितां जेवणाचीं थांबलीं होतीं. गेलीं तीन वर्षें वसंतराव आपल्या मातापितरांना सोडून कुठेंहि गेले नसल्यामुळें हें त्यांचें आठदहा दिवसांचें मुंबईत राहाणें रावबहादुरांना असह्य झालें होतें. शेवटीं गाडी येऊन दरवाजांत उभी राहिली. वसंतराव आणि मागून शांताबाई खालीं उतरून तिनें रावबहादुरांच्या पायांवर डोकें ठेवलें. इतक्यांत गाडीचा आवाज ऐकून रमाबाई आंतून बाहेर आली. तिच्याहि पायांवर डोकें ठेवून शांताबाईनें आशीर्वाद मिळविला.

" पण हें झालें कसं ?" आश्चर्यानें रावबहादुरांनीं विचारलें.

" आपल्या कृपाशीर्वादानें !—मुंबईत आमचें पूनर्मिलन—नव्हे तुमच्या इच्छेप्रमाणें मी हें पुनर्लग्न करून आलों."

---

# डॉक्टर कादंबरी

भाग तिसरा

## उपोद्घात.

" मग काय केलास विचार कादंबरी ? "

"मी इथून कधीं जायला निघेन, असं मला झालं आहे पण—"

" तसं वाटणं साहजिक आहे तुला ! पण माझा विचार असा होता—"

" मी ही आलेली चांगल्या पगाराची जागा पत्करावी; असाच ना ? "

कादंबरीनें किंचित् लडिवाळपणानें कसेलसाहेबांना मध्येंच थांबवून म्हटलें.

" होय, तूं म्हणतेस तसेंच ! ' कसेलसाहेब किंचित् स्मित करित म्हणाले " अनायासें आलेली ही नौकरीची संधि खरोखरीच तूं दवडूं नयेस. कां म्हण-शील तर मी तुला असें सांगेन कीं इथें आल्यासारखी तूं ' एम्. डी. ' ही झालीस. आतां त्या ज्ञानाबरोबर व्यवहारी जगांत त्याचा उपयोग कसा करायचा हें तुला इथल्या अनुभवानें कळणार आहे. तेव्हां हा लाभहि चांगलाच नाहीं कां शिवाय—"

" आणखी शिवाय काय पपा ! " कादंबरीच्या मनांत त्यांच्या पुढील विचारांची नीटपणें कल्पना न येऊन तिनें पुन्हां मध्येंच विचारलें. " ज्या ज्ञान संपादनासाठीं मी इथें आलें तें मिळाल्या नंतर त्याचा व्यावहारिक उपयोग करा-यला शिकण्याकरितां प्रत्यक्ष अनुभव घेण्याकरितां, मी परत जायची जितकी गडबड करतें, तितकीच उत्सुकता मला राहण्याविषयींही दाखविली पाहिजे, हें मला कबूल आहे. "

" हे कबूल आहेना ! मग त्याबरोबर असेंहि मनांत आण कीं, 'आपण आपला दिला तसाच गोड सहवास ह्या वृद्ध पित्याला देऊन जातांना पांच पंचवीस हजारांची मिळकतहि बरोबर न्यावी. ' हंसूं नकोस अशी. आम्हीं केवळ संपत्ति मिळविण्याकरितां हिंदुस्थानांत जाऊन राहतों ना ? तरी मग आमच्या इकडे येऊन तुला आमच्या पेक्षांही अधिक लाभ झाला, तर त्यांत तुला, तुझ्या वडि-

लांना आणि नातलगांना आनंद व अभिमान वाटणार नाहीं का ? "

" अनुभवाच्या ज्ञानाकरितां, आणि आपल्यासारख्या प्रेमळ पित्यासमान पूज्य वडिलांच्या सहवासाच्या आनंदाकरितां, मला आणखीहि इथें रहावें असें मनांत येतें. पण पपा, वडिलांच्या मिळकतीची ही कसली नवीनच कल्पना काढली तुम्ही ! मिळकतीच्या आशेनें मी इथें आणखी एक वर्ष राहूं ! मला मिळकतीची कांहीं जरूरी आहे असें वाटत नाहीं. माझ्या घरीं माझ्या बाबांनीं मला काय कमी ठेवलें आहे. पण हें माहीत नाहीं का आपल्याला मग मलाच आणखी मिळकत कशाला मिळवायला पाहिजे ! "

" मिळकत मिळवायला कशाला पाहिजे, हा तुझा प्रश्न कांहींसा बरोबर पण त्या बरोबर पुष्कळसा गमतीचा आहे; नाहीं का ? " कसेलसाहेब गंभीर हास्य करीत कादंबरीकडे मनोहर वात्सल्यानें पहात म्हणाले " कादंबरी, मिळवितां आलेली मिळकत वांया गेल्याचें कुठें कधीं ऐकलें आहेस कां तूं ! तुझ्या घरीं अलोट संपत्ति आहे, गोष्ट कबूल ! पण तुझ्या मिळकतीची जर त्यांत भर पडली बाकी, अलीकडे तुझ्याशीं बोलायचें म्हणजे मला थोडें विचारपूर्वकच बोलावें लागतें कारण तूं ज्ञानी आहेस. त्यांतून एम्. डी. तेव्हां आम्हां म्हाताऱ्यांना शब्दांत केव्हां पकडशील, हे कळणारहि नाहीं !–पण तें असो. संपत्तीचा उपयोग तुला अनेक चांगल्या सत्कृत्याकडे ती संपत्ति खर्च करितां येईल. मिळविलेला पैसा मुलाबाळांच्या कामीं—"

" काय मुलाबाळांच्या !—कुणाच्या मुलाबाळांच्या पपा ? " कादंबरीनें साश्चर्यच विचारलें.

" कां ? तुला त्यांत आश्चर्य कसलें वाटलें कादंबरी ? " कसेलसाहेबांनीं गंभीरपणानेंच तिला उलट प्रश्न केला. ते पुढें म्हणाले, " कादंबरी, तुझ्या संसाराच्या बाबतींत चांगलेपणाची कल्पना काढण्याबरोबर तुला जितकें आश्चर्य वाटतं तितकं मला खचित वाटत नाहीं. आणि तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणालाही वाटणार नाहीं ! तुझी व तुझ्या संसाराची कथा मला पूर्णपणें माहिती आहे. पण त्यावरून तूं जितकी तुझ्या संसाराच्या संबंधांत निराश होतेस, तितकं निराश व्हायला मला कांहींच कारण दिसत नाहीं ! जगांत परमेश्वर नाहीं असें नाहीं, तर तो सर्वकाळीं आणि अगदीं आपल्याजवळ आहे. तुझी आतां पर्यंतची खडतर तपश्चर्या परमेश्वराच्या ध्यानांत आली नसेल अशी कां तुझी कल्पना आहे ? नाहीं –तसें मुळींच नाहीं. त्याच्याजवळ तुझी तपश्चर्या पूर्ण रुजू असून त्या तपश्चर्येचं

फळ तो दयाघन तुला लवकरच दिल्याशिवाय राहणार नाहीं !

कसेलसाहेबांच्या या भाषणाचा कादंबरीवर कसल्या प्रकारचा परिणाम कोण जाणें, पण बराच झाला खरा ! ती किंचित् काळ गंभीर झाली ! आपल्या मनावर बसलेल्या दडपणास दूर करण्याकरितां तिनें बोलण्याचा ओघ फिरविण्याचा प्रयत्न केला. पण तिला तो साधला नाही. ती म्हणाली " तें कांहीं असो. पण केवळ मुलाबाळांकरितां तरी संपत्ति मिळवून ठेवावी, असं तरी मला कुठं वाटतं ? वडिलांनीं हाडांचीं काडें करून संपत्ति मिळव मिळव मिळवावी, आणि मुलांनीं ऐत खाऊ बनून ती छंदीफंदीपणांत गमावून बसावी, हें मला मुळींच पसंत नाहीं. मुलाबाळांना ज्ञानदान देऊन कर्तव्यतत्पर व स्वावलंबी बनविलें. म्हणजे वडिलांचें मुलांविषयींचं कर्तव्य संपलं ! नी आपल्या कल्पनेप्रमाणें मला जर मुलें बाळें झालीं तर पपा, माझ्या वडिलांनीं जसं मला ज्ञानदान दिलं, तसंच मी माझ्या मुलाबाळांना ज्ञानदान देऊन स्वावलंबी करीन ! मग त्यांच्याकरितां म्हणून तरी मला पैसे मिळवून ठेवण्याची काय जरूरी ?—"

कसेलसाहेबांनीं कादंबरीच्या बोलण्याचा एकंतर निष्कर्ष तिला परत हिंदुस्थानांत जाण्याची अत्यंत उत्कंठा लागली आहे, तेव्हां तिला दुसरा कोणताही विचार परवडणार नाहीं, असा काढला व तें साहजीकहि होतें. तेव्हां आपणहि आतां विशेष आग्रह करण्यांत तात्पर्य नाहीं, असें ठरवून त्यांनीं कादंबरीला विचारिलें. " एकूण तूं जाणारच म्हणतेस लवकरच—केव्हां करणार तयारी ? "

" मी परवांच निघायची तयारी करायची म्हणतें, माझें सारें लक्ष घरीं बाबांच्याकडे नी आईकडे लागलें आहे ? "

" ठीक आहे, तर मग कर तयारी ! " या वेळच्या कसेलसाहेबांच्या उद्गारांत हृदयांतील भरलेला जडप्राण प्रतीबिंबित झाला होता !

---

## १........ ' कीर्ती ' बोटीवर

प्रातःकाल इतकी सर्व बाजूंनीं सुंदर अशी दुसरी वेळ कोणती असणार ? त्यांतून अशा मनोहर वेळेचें महत्त्व विलायतेहून येऊन नुकत्याच सुएझबंदरावर थांबलेल्या ' कीर्ती ' बोटीवरील उतारूंना अधिकच वाटलें असल्यास नवल काय ? –स्थल, काल, आणि प्रसंग. या त्रयींचा हृदयंगम मिलाफ म्हणजे गीत-वाद्य-नृत्य या त्रयींच्या सन्मेलनापासून रसिक हृदयाला जो नितांत रमणीय आल्हाद प्राप्त

होतो, त्याच्याशीं तुलना केली तर ती सर्वथा जुळणारीच आहे यांत शंकाच नाहीं !

बोट नुकतीच थांबल्यामुळें सर्वांची एकच उडालेली धांदल! कोणी पाय मोकळे करण्याकरितां म्हणून होडींतून धक्क्यावर जाण्याची गडबड करीत आहेत, कोणी बोटींत हिंदुस्थानला येणाच्या तयारीनें चढत असतांना घाईनें त्यांची त्रेधा उडवीत आहे ! सूर्यबिंब नुकतेंच वर आल्यामुळें त्याचीं सौम्य व सुवर्णमय किरणें भूमध्य समुद्राच्या लाटांवर तांबड्या समुद्राच्या लहरीवर, आरबस्तानच्या भूप्रदेशावर, आणि इजिप्तच्या जवळपास मिरवणाऱ्या भागावर, मोठ्या डौलानं इतस्ततः विहार करीत आहेत ! जिकडे तिकडे उत्साहच उत्साह भरून राहिला आहे. कोळी लोक धक्क्यापासून बोटीपर्यंत, आणि बोटीपासून धक्क्यापर्यंत आपल्या छोट्याशा होड्या नेण्यांत चूर होऊन गेले आहेत. रात्रीं शांतपणें विश्रांति घेऊन नव्या दमानें सृष्टीशोभा पाहण्यास उत्सुक झालेल्या तरुण, हौसी, व ज्ञानप्रिय उतारूंचा जमाव ' कीर्ति ' बोटीवर बराच होता. आणि याच बोटीवर कसेलसाहेबांचा प्रेमाचा निरोप घेऊन हिंदुस्थानास यायला निघालेली आमची नायिका डॉक्टर कादंबरी होती. त्या ठिकाणीं नयनमनोहर सृष्टीसौंदर्य पाहतांना कादंबरीचें रसिक मन अगदीं तनमय झालें होतें. ' आपण आतां लवकरच जन्मभूमीवर पाय ठेवणार ' या सुखद विचारांत मग्न असतां झोपी गेलेली कादंबरी जागी होण्याबरोबर त्याच विचारानें तिचें स्वागत केलें होतें तिला अधिकच आनंद झाला. ती प्रसन्नतेनें सृष्टीशोभा पहाण्याकरितां डेकवर येऊन इकडे तिकडे येरझारा घालूं लागली. या क्षणीं तिच्या हृदयसागरावर उत्साहकारक अनंतविचारांच्या अनंत लाटा उसळत होत्या ! भूमध्य समुद्रांतील बोटीच्या मागें धांवणाऱ्या त्या गमती माशाची मौज,तांबड्या समुद्रांतील सूर्यप्रकाशामुळें तांबड्या दिसणाऱ्या खडकांची शोभा, आणि हलक्या सलक्या पण चमत्कारिक वस्तु विकावयास आणणाऱ्या सोमालीपोरांचे गमतीचे सवाल व गिऱ्हाईकांचें लक्ष वेधण्यासाठीं त्यांची बँडच्या चालीवर गाणीं, यामुळें प्रवाशांना भरपूर करमणुकीचीं साधनें उपलब्ध असल्याचा प्रत्यय येत असल्यास नवल काय ?

थोड्या वेळानें पहिल्या प्रथमची गडबड थांबली. कांहीं मंडळी स्नानाच्या वगैरे तयारीला लागली. धक्क्यावरून कांहीं मंडळी विश्रांति घेऊन परत येऊं लागली. जेवणाची वेळ जवळ येत चालल्यामुळें बोटीवरील ' कुक ' कंपनीच्या नोकरांची मारे तारांबळ उडून राहिली. बोटीवरील बहुतेक प्रवाशी—आमच्या कादंबरीशिवाय परदेशस्थ असल्यामुळें त्यांच्या रिवाजाप्रमाणें त्यांचें टेबलावरचें

जेवण तयार होत होतें. कादंबरीनें आपल्या जेवणाचा विशेष विलायतेंतल्या सर्व मुक्कामांत जो सतत पाळला होता, तोच जलप्रवासांत आगबोटीसारख्या सर्व तऱ्हेनें अडचणीच्या ठिकाणीं मोठ्या निश्चयानेंच कायम राखला होता. तो तिचा विशेष म्हणजे ती आपलें जेवण, ' कुक ' कंपनीच्या भटारखान्यांत तयार होऊन एका मेळ्यानें टेबलावर होणाऱ्या भोजनसमारंभांत न मिसळतां, आपल्या हातांनींच तयार करीत असें. स्वतःचें जेवण स्वतःच्या हातांनीं तयार करण्यांत तिला मुळींच कंटाळा येत नसे. ती ' एम्. डी. ' ची अत्युच्च डॉक्टरीची परीक्षा उत्तम रीतीनें पसार झाली असतांना, विलायतसारख्या स्त्रीस्वातंत्र्याचा निर्भयपणानें झेंडा फडकत असणाऱ्या ठिकाणीं तिनें कांहीं वर्षें घालविलीं असतांनाहि तिला स्वतःच स्वयंपाक करतांना ऐकून आमचा सुधारक समाज आश्चर्यानें थक्क होऊन जाईल. आणि ही गोष्ट सत्य असली तरी त्यांत तितकें आश्चर्य मानण्याचें आमच्या मतानें कांहींच कारण नाहीं. कारण विलायतेंत सुद्धां ती स्वयंपाक करीत असतांना तिच्या बरोबरच्या पारशी, ख्रिश्चन आणि युरोपियन भगिनी थट्टेच्या आवाजांत तिला ज्यावेळीं प्रश्न करीत कीं " हें काय असें तुम्हीं गांवढळ बायकासारखें करतां मिसेस कादंबरीबाई ! " आणि त्यावर कादंबरी त्यांच्याच थट्टेच्या आवाजांत पण असा झणझणीत टोला देई कीं, कांहीं पुसूं नये ! ती म्हणे, " तुम्हांला माझ्या अशा वागण्यांत गांवढळपणा वाटतो, तिथं माझा नाइलाज आहे. पण माझ्याकरितां माझ्या हातांनीं स्वयंपाक करण्यांत मला जितका आनंद वाटतो, तितकाच आम्हीं आर्य स्त्रिया पाश्चात्यांच्या अनुकरणानें कितीहि वाहवलों असलों तरी, या कामांत अजून तरी आम्हांला परावलंबी बनावें लागलें नाहीं, या विचारामुळें तितकाच अभिमान वाटतो ! "

आणि असें सणसणीत उत्तर, कादंबरीला तिच्या लहानपणीं तिच्या मातेकडून मिळालेल्या सर्वोत्कृष्ट गृहशिक्षणाच्या योगानेंच देतां येत असे, असें कोण म्हणणार नाहीं ? असो.

नित्याप्रमाणें इतर मंडळी जेवणाच्या तयारीच्या गडबडीला लागलेली पाहून कादंबरीनेंहि आपल्या कॅबीनमध्यें जाऊन स्वयंपाकाची सिद्धता केली. एकटीचें जेवण तयार करण्यास असा कितीसा उशीर लागणार ? स्वयंपाक तयार करून ठेऊन जेवणाची ठराविक वेळ होईपर्यंत वेळ जावा म्हणून एक कसलेंसें वाचावयाचें पुस्तक घेऊन कादंबरी डेकवरच्या मोकळ्या हवेंत पुस्तकाचीं पानें चाळीत पुन्हां येरझाऱ्या घालूं लागली !

कांहीं थोडा वेळ गेला नसेल तोंच कादंबरीच्या कॅबीनचा स्टुअर्ट दुरून कादं-बरीकडे कांहीं सहेतुकतेनें डोकावतो आहे, असें दिसलें. त्या स्टुअर्टकडे कादंबरीचें लक्षच नव्हतें, त्याला तिच्याशीं कांहींतरी बोलावयाचें—विचारावयाचें होतें. पण तितक्यांत तिचें लक्ष त्याच्याकडे गेलेंच! तो आपणाबरोबर कांहींतरी बोलायच्या किंवा आपलें कांहीं कामबिम आहे कीं काय याची चौकशी करण्याकरितां आला असावा, अशी कल्पना करून कादंबरीनें "काय आहे?" एवढेंच त्याला विचारलें.

स्टुअर्ट पुढें आला. आणि त्यानें कादंबरीला म्हटलें, "नाहीं, मी आपल्याला असें विचारायला आलों होतों कीं, आपण आतांपर्यंत बोटीवर एकट्याच हिन्दु-प्रवाशी असल्यानें आपलें जेवण स्वतंत्र करीत होतां. पण आज या बंदरावर दुसरेहि एक हिन्दु प्रवाशी बोटीवर चढले आहेत. तेव्हां बरोबर तुम्हींहि टेबलावरच जेवण घेणार कीं, नेहमींप्रमाणेंच चालविणार हें कळलें म्हणजे बरें! त्यांच्याकडे चौकशी करण्याकरितां गेलों त्यावेळीं ते म्हणाले, मी एकटाच हिन्दु प्रवाशी या बोटीवर आहे कीं, माझ्याप्रमाणें आणखी दुसरा हिन्दु कोणी आहे? असला म्हणजे आम्ही हिन्दुहिन्दु मिळून स्वतंत्र टेबलावर बसूं!"

कादंबरीनें चटकन् उत्तर दिलें "ते दुसरे हिन्दु प्रवासी कुठें आहेत? माझी जेवण घ्यायला कांहीं हरकत नाहीं. पण माझें जेवण मी करतें नी आतांही केलेंच आहे. त्यांची तशीच इच्छा असेल तर त्यांनीं माझ्याकडे यायला कांहीं हरकत नाहीं! कुठें आहेत तें?"

कादंबरी असें विचारीत आहे, तोंच समोरून त्याच बाजूला तो नवा हिंदु-प्रवाशी डेकवर फिरत फिरत आलेला त्या स्टुअर्टनें कादंबरीला दाखविला. इतक्यांत तोहि जवळ येऊन पोंचला. हा नवीन प्रवाशी एक बंगाली तरुण विलायतेंत उच्च शिक्षण संपादून आणि सर्व देशभर फिरत फिरत अनुभवजन्य ज्ञानाची जोड करीत करीत व प्रवास संपवून आपल्या आवडत्या मायदेशाला निघाला होता. हा घरचा दांडगा जमीनदार उच्च शिक्षणसंपन्न आणि हिन्दुस्थानवासी असल्यामुळें त्याला पाहतांच कादंबरीला साहजिक आपल्या देशबंधुच्या नात्यानें आदर वाटला. मधुचंद्रांना—त्या बंगाली तरुणाचें नांव,—पहातांच जसा कादंबरीच्या मनांत आदरभाव उत्पन्न झाला, तीच स्थिति कादंबरीसारख्या उच्च विद्याविभूषित विदुषीला—देशभगिनीला पाहतांच मधुचंद्राची झाली असल्यास, त्यांत मानवी-मनोधर्माला साजेसेंच होतें असें म्हटल्यावांचून गत्यंतर नाहीं!

कादंबरीबद्दल बोलतांना स्टुअर्टनें तिच्यासंबंधानें स्वतःला माहीत झालेली कच्ची हकीकत मधुचंद्रास सांगितलीच होती. तेव्हां आदरानेंच पुढें येऊन त्यानें कादंबरीला म्हटलें, "या बोटीवर आपण एकट्याच हिंदु प्रवासी आहांत हें आतांच मला यांच्याकडून कळलें. आपल्याला पाहून मला फार बरें वाटलें!"

कादंबरीनें निराळया शब्दांत पण त्याच अर्थांत मधुचंद्रांचा गौरव केला. अशा रीतीनें बोटीवर एकदेशी माणसें मिळालीं म्हणजे त्यांना कोण आनंद होत असेल याची कल्पना करणें फारसें कठीण नाहीं! अशा प्रकारचा अनुभव नेहमीं मिळण्यासारखा असतो. एकाच खेड्यांतील दोन माणसें आपल्या खेड्यांत असतांना परस्पराविषयीं पूर्णपणें बेफिकीर किंबहुना एकादे वेळीं द्वेषीहि असलीं, तरी कार्याकारणें तींच दूर प्रांतांत फार दिवसांनीं जर भेटलीं, तर त्यांना परस्परांबद्दल कोण आदर व प्रेम वाटत असलें पाहिजे! तीच स्थिति यावेळीं आमची डॉ. कादंबरी आणि मधुचंद्र बॅरिस्टर—मधुचंद्र बॅरिस्टरीची परिक्षा देऊनच परत येत होते—यांची झाली असल्यास नवल नाहीं.

दोघांची अशा रीतीनें बोटीवरील प्रवासाला शोभण्यासारखी घाईची ओळख झाल्यानंतर, एकमेकांची योग्यता, विद्वत्ता, दर्जा, नांव, गांव, वगैरे समजावून घ्यावयाला दोघांनींहि फारसा वेळ वाया जाऊं दिला नाहीं. इतकेंच नव्हे तर फारच थोड्या वेळांत प्रारंभीचा औपचारिकपणाहि मोकळेपणानें टाकून तीं दोघें बोलूं लागलीं. सुएझपासून हिंदुस्थानपर्यंत उरलेला प्रवास आतांपर्यंत गेलेल्या कांहींशा एकाकीपणाच्या उदासीनतेची उणीव बॅरिस्टर मधुचंद्राच्या सहवासानें भरून काढूं शकेल असें कादंबरीला वाटलें. आणि मधुचंद्रालाहि कादंबरीसारख्या विदुशिची ओळख व सहवास यांचा अलभ्य लाभच झाला, असें वाटून आनंद झाल्यास नवल नाहीं!

त्यानंतर डॉक्टर कादंबरी व बॅरिस्टर मधुचंद्र यांचें बोटीवर बाम्बे हार्बरला येईपर्यंत जेवण व तेंहीं कादंबरीनें तयार केलेलें एका ठिकाणीं व्हावयाचें असें कांहींसें ठरल्यासारखें झालें! त्यामुळें या दोघांनाही बोलायाचालाया वगैरे भरपूर वेळ मिळूं लागला. त्या वेळांत ...... साहजिक बुद्धीनें कादंबरीच्या लक्षांत बॅरिस्टर मधुचंद्राची विद्वत्ता, त्याच्या स्वभावाची एकंदर दिशा वगैरे संबंधीं कांहीं गोष्टी अचूक आणून ठेवल्या होत्या! पण कादंबरीच्या मनमोकळया पण खोल, मधुर पण स्पष्ट असलेल्या संभाषण-प्रसंगांनींहि तशा प्रकारचा कादंबरीच्या स्वभावाचा ठाव मधुचंद्राला लागणें शक्य नव्हतें.

परिचयानंतर बोट चालू असतांना डेकवर येऊन, प्रतिक्षणीं बदलणाऱ्या सृष्टी-सुंदरीचें निरीक्षण करीत असतां त्या सुंदरतेवर दोघांच्याही विद्वत्ताप्रचुर भरारीच्या काव्य कल्पनेच्या कोट्या ऐकायला मिळूं लागून त्यांचीं हृदयें निर्व्याज आनंदातिशयानें उचंबळून येऊं लागलीं ! त्याच दिवशीं दोन प्रहरीं डेकवर दोघेंही दोन इझिचेअर्सवर बसून समुद्राची शोभा पहात इकडच्या तिकडच्या गप्पासप्पा करीत बसली होतीं. कादंबरीला कांहींतरी विचारून तिच्याकडून गमतीचीं उत्तरें काढण्यांत मधुकरला कोण धन्यता वाटत होती ! त्यावेळेचा संभाषणांचा ओघ बोलतां बोलतां कोणीकडच्या कोणीकडेच वहावला होता !

" बाकी कादंबरीबाई, तुमचें नांव ऐकून देखील फारच आश्चर्य वाटलें. ' कादंबरी ' ह्या नांवांत नॉव्हेल्टी–नाविन्य कसें ओतप्रोत भरलें आहे ! "

" पण त्यांत आश्चर्य वाटण्यासारखं काय आहे ? "

" माझी अशी कल्पना होती कीं, अशीं नाविन्यपूर्ण नांवं कायतीं आमच्या बंगल्यामध्येंच ठेवण्याची चाल आहे. पण तुमचा महाराष्ट्रहि अशीं नांवें ठेवण्याच्या बाबतींत खूपच पुढें गेलेला आढळून आला. "

" तर मग माझ्या या नांवाचा थोडा पूर्व इतिहास कळला—" कादंबरी किंचित् स्मित करीत म्हणाली " तर तुम्हांला आतांच्याहूनहि फारच आश्चर्य वाटेल, अशी माझी खात्री आहे ! "

" तें कसं काय ? " मधुचंद्रानें उत्सुकतेनें विचारलें.

" माझ्या नांवांत नाविन्य आणण्यासंबंधानें बंगाल आणि महाराष्ट्र यांचीच परिस्थिति लक्षांत घेऊन भागायचें नाहीं. तर त्याहीपेक्षां विशेष म्हणजे माझ्या जन्माच्या वेळीं माझ्या ' कमलिनी, ' ' कलावती, ' या नांवाप्रमाणें मी माझ्या आवडीप्रमाणें माझें नांव मूर्तिमंत नॉव्हेल्टी—कादंबरी ठेवीन, असें एका ज्योतिष्यानें माझी पत्रिका पाहून भविष्य वर्तविलें होतें; हें विशेष नाहीं का ? "

हें ऐकून तर मधुचंद्र थक्कच झाला ! तो म्हणाला " आणि म्हणूनच आपलें नांव, ' कादंबरी ' हें कायमचेंच पडलें वाटतें ! "

" उघडच आहे !" कादंबरीनें सरळच उत्तर दिलें. " माझ्या पत्रिकेंत हें नांव आहेच. पण इंग्लंडला जाण्यापूर्वी माझें नांव ' कमलिनी ' होतें. आतां मी तें बदलून ' कादंबरी ' हें नांव धारण केलें आहे. "

नंतर, समुद्र, आकाश, आणि बोटीच्या पाठीमागें एक लांबच शुभ्र फेसाची विलसणारी चकचकीत ओळ, वगैरेकडे पाहण्यांत कांहीं थोडा वेळ गेला. पुन्हां

मधुचंद्राला कांहीं तरी विचारण्याची लहर लागली. औपचारिक प्रश्नांत पुन्हां पुन्हां विचारण्यासारखें काय आहे ? हें त्याचें त्यालासुद्धां पूर्णपणें कळत असतांना त्यानेंमागें केलेलाच प्रश्न पुन्हां कादंबरीला केला ! त्याचें त्याला हंसूंही आलें. आणि तें साजरें करण्याकरितां दुसऱ्याहि भाषणाची पुस्ती पहिल्या भाषणाला त्याकरितां प्रथमच जोडावी लागली. तो म्हणाला, " काय असेल तें असो पण कादंबरीबाई, तुम्हांला निरनिराळे प्रश्न विचारावे, आणि त्यांचीं उत्तरें मिळवावीं या हेतूनें मी प्रश्न विचारण्याच्या नादांत असतांना कशी माझी मौज होत आहे पहा ! मनांत नसतांनाही किंवा विचारलेला प्रश्नही पुन्हां विचारणें हास्यास्पद होणार असें असतांना मी पुन्हां त्याच मार्गानें जात आहें. आतां हेंच पहा ना, मी तुम्हांला तुमच्या घराची माहिती एकदोन वेळां तरी विचारली असेल. तरी पण आणखी विचारावीशीच वाटते. तुमच्या घरीं कोण कोण आहे म्हणता ? तुमचे वडील, मातुःश्री आणि वृद्ध आजी, होय ना ? "

" हो. "

" आणखी "

" आणखी सांगण्यासारखें—माझें असें म्हणायला दुसरें कुणीच नाहीं ! "

" असें का ! " असें म्हणून कांहीं थोडा वेळ थांबून मधुचंद्राला कसली तरी शंका आली. म्हणून त्यानें कादंबरीकडे एकवार कांहीं हेतूनें निमिषमात्र दृष्टिक्षेप केला. परंतु त्या दृष्टिक्षेपानें संशयनिवृत्ति व्हावी तशी झाली नाहीं. म्हणून म्हणा किंवा आणखी कांहीं अन्य कारणानें म्हणा, मधुचंद्रानें कादंबरीला सहज म्हणून पुनः विचारलें " तर मग आपण अजून अविवाहितच आहांत तर ? "

" छे ! मुळींच नाहीं. माझें लग्न झालें आहे ! " कादंबरीनें पटकन उत्तर दिलें ! ती पुढें म्हणाली, " पण अशी शंका तरी आपल्याला कशी आली ? " आमच्याकडे मुली वाढविण्याची चाल—कांहीं वर्षांपर्यंत वाढविण्याची चाल हलके हलके प्रचारांत येत चालली आहे हें खरें, पण त्यालाही अजूनपर्यंत बरीच अकुंचित अशीच मर्यादा आहे ! माझें लग्न माझ्या लहानपणींच झालें आहे. "

" होय का ? " बॅरिस्टर कांहींसें मनाशींच ओशाळून म्हणाले. पण लग्न झालें आहे, आणि तें लहानपणींच, असें कळतांच ते बरेच गोंधळून गेले !—थोड्या-वेळापूर्वी आई बाप आणि वृद्ध आजी याशिवाय आपलें म्हणायला दुसरें कोणी नाहीं असें, कादंबरी सांगते कशी ? स्त्रीला नवरा म्हणजे कोणीच नसतो काय ? अशी कल्पना—त्यांतून अस्सल हिन्दु स्त्रीची कल्पना—कशी असूं शकेल, हा एक

विचार. व दुसरा विचार असा कीं, ज्या अर्थी ही 'एम्. डी.' झालेली, त्या अर्थी हिचा नवराहि हिच्या विद्वत्तेला, रूपाला, शोभण्यासारखा बडा विद्वान्, खूप श्रीमान असला पाहिजे. आणि म्हणून बॅरिस्टर साहजिकच गोंधळले. ही त्यांची गडबड कादंबरीच्या लक्षांत आली नाहीं, असें नाहीं. पण त्याची तिला मौजच वाटली. कारण त्याचा उलगडा करणें तिला अशक्य असें मुळींच नव्हतें. यापुढें बॅरिस्टर आपल्याला काय विचारणार याची कल्पना ती करीत होती. तोंच तिनें कल्पना केल्याप्रमाणेंच बॅरिस्टरांनीं तिला प्रश्न केला. त्यांनीं विचारलें " मग ते कुठें आहेत? इंग्लंडांत कीं जर्मनींत! कुठच्या युनिव्हर्सिटीचे प्रोफेसर आहेत कीं ?-"

"छे, छे, तसा कांहीं प्रकार नाहीं. ते इंग्लंडांत नाहींत कीं जर्मनींतही नाहींत." त्यांच्या विचारण्याची कल्पना आल्यावर त्यांना पुढें बोलण्याची तसदी न देतां तिनें बॅरिष्टरला थांबवून त्यांना सांगून टाकलें." "आपण कल्पना करतां तितके ते शिकलेलेहि नाहींत ?"

" मग ?"

" तर ते एक केवळ महाराष्ट्रांतले शेतकरी आहेत!" कादंबरीच्या ह्या सांगण्यावर बॅरिस्टरचा प्रथम विश्वासच बसेना इतकी तिनें सांगितलेली हकीकत त्यांना असंभवनीय वाटूं लागली. पण 'असें नसतें, तर आणि तेही स्वतः संबंधाच्या इतक्या निराशेच्या प्रकारचें खोटें कोण सांगेल, असें वाटून असेलहि खरें, अशी त्यांनीं मनाची समजूत करून घेतली, परंतु ' कादंबरी जर विवाहित आहे. तिचा नवरा एक शेतकरी कां होईना—पण जिवंत आहे आणि ही इतकी विद्वान, चतुर, समंजस अशी असतांना नवऱ्याचा उल्लेखहि तिनें आपण विचारल्याशिवाय केला नाहीं; इतकेंच नाहीं तर आपलें माहेरच्या चारदोन मंडळीशिवाय या जगांत दुसरें कोणीच नाहीं असें स्पष्ट सांगितलें, तें कां ?'—हें गूढ बॅरिस्टर मधुचंद्राला उकलायचें होतेंच आणि त्यांनीं धाष्ट्यनें तेंहि गूढ उकलावयाचें म्हणून ठरवून पुनः कादंबरीला विचारलेंच.

" मग असें कसें हो कादंबरीबाई! मला तुमचा अर्थच नीटसा कळला नाहीं. आपले पतिराज असतांना ' माहेरच्याशिवाय दुसरें कोणी नाहीं ' असें तुम्ही कसें सांगितलेंच ?—आपल्या मनाला त्रास होण्यासारखा हा प्रश्न आहे अशी माझी कल्पना आहे, आणि असें असतांही मी विचारीत आहे याबद्दल क्षमा करा. पण मला तर हें एक गूढच वाटलें. म्हणून मी विचारण्याचें धाडस केलें आहे!"

" त्यांत गूढ असें कांहींच नाहीं. आणि आपला मला त्रास झाला ही कल्पना माझ्या दृष्टीनें खोटी नसली तरी मला त्रास होण्यासारखें त्यांत कांहींच नाहीं. आमच्या इकडची म्हण तुम्हांला माहित नसेल असेंही नाहीं. 'उत्तम शेती' हें जर खरें मानायचें, आणि आहेच तें—तर माझे पति शेतकरी आहेत यांत मला भूषणच वाटतें. पण—"

"पण काय ? भूषण वाटत असूनहि त्यांच्या बद्दलची माहिती द्यायची कशी राहिली ?" मधुचंद्रानीं मध्येंच विचारलें.

" पण त्यांनीं मला टाकलें आहे !" चेहऱ्यावर कसल्याही प्रकारचा विकार दिसूं न देतां तिनें सांगितलें. पण तें ऐकून बॅरिस्टरांना विजेचा धक्का बसल्यासारखा झाला ! त्यांनीं बाह्यतः तसें कांहीं दाखविलें नाहीं. पण कांहींशा आश्चर्यानें विचारलेंच !" आपल्याला आपल्या पतींनीं टाकलें आहे ?—कां कारण ?—?"

" कारण एक त्यांना कीं एक ईश्वराला ठाऊक ! मला कांहींच माहिती नाहीं ! माझ्याकडून मी पत्नीधर्माला कळून नकळून कृतीनें, वाचेनें, मनानें कधींच चुकलेली नाहीं, ही माझी खात्री आहे. आणि अशाहि स्थितींत मला लहानपणींच घराच्या बाहेर घालविल्यानें माझ्या ह्या पुढील आयुष्यांत लागलें ह्या प्रकारचें वळण लावण्याची पुण्याई माझ्या प्रिय मातापितरांची आहे. त्यांनीं मला थमप्र सुशिक्षण देऊन हा माझ्या शिक्षणाचा प्रचण्ड खर्च केला."

यापेक्षां कादंबरीच्या पतीविषयींची चर्चा अधिक करणें बरें नव्हे, असा विचार मनांत येऊन तो विषय मधुचंद्रानें तितकाच थांबवून बोलण्याच्या ओघांत अनायासेंच कादंबरीनें शिक्षणाकडे वळविला होता तिकडे ते वळले. ते म्हणाले " तुमच्या पहिल्या आयुष्याच्या भागाशीं पुढच्या अभ्यासाच्या 'करिअर' ची तुलना केल्यानंतरहि कौतुक वाटल्याशिवाय खचीत रहात नाहीं ! आणि माझी खात्री आहे कीं, आमच्या देशाचा उद्धार आपल्यासारख्या ज्ञानसंपन्न रत्नाच्या कडून होणार आहे ! आतां तुम्हीं हिंदुस्थानांत गेल्यावर तुम्हाला तुमच्या ज्ञानाचा फायदा तुमच्या देशबांधवांना द्यावयाला केवढा तरी प्रांत आहे. देशकार्य-देशहित करतांना तुम्हांला केवढी धन्यता आणि जीवितसार्थक्य वाटेल."

" होय " कादंबरी म्हणाली " माझ्याप्रमाणें आपलीहि स्थिति आहे, हें पाहून मलाहि किती आनंद होतो आहे म्हणून सांगूं ! मला माझ्या महाराष्ट्राचें कल्याण करण्याची जितकी हौस व हुरूप आहे त्याचप्रमाणें तुम्हांला तुमच्या बंगालची सुधारणा करण्याची हौस व हुरूप असून दोघांनाही आपल्या महत्त्वाकांक्षा शेवटास

नेण्यास साधनें सिद्ध आहेत. पण पहायचें आहे इतकेंच कीं, विलायत सोडल्या-पासून हिंदुस्थानच्या भूमीवर पाय ठेवीपर्यंत" विलायतेंत असतांना भावी देशकार्याचे रचलेले मनाचे मनोरे हिंदुस्थान जसजसें जवळ येत जाईल तसतसे कांहीं जीव धरून राहातात कीं, हलकेहलके कल्पनेच्या वातावरणांतच विर-घळत जाऊन शेवटीं जन्मभूमी गांठण्याबरोबर त्यांचा मागमुसहि राहतो कीं नाहीं एवढेंच !"

या कांहींशा विनोदी पण बऱ्याचशा मार्मिक अशा युक्तिवादानें बॅरिस्टर मधु-चंद्रालाहि खरोखरच वस्तुस्थितीदर्शनाचा किंचित् काल भास होऊन हसूं आलें. ते उत्तरादाखल म्हणाले. "आपण म्हणतां तें अगदींच कांहीं खोटें नाहीं. पुष्कळांच्या बाबतींत आपल्या कल्पनेप्रमाणेंच हुबेहुब करून दाखविलें आहे खरें ! तेव्हां—"

"तशीच स्थिति आपली होऊं द्यायची कीं, त्यापेक्षां कांहीं निराळें वळण गिरवायचें हेंच आपणाला सध्यां ठरवित बसणें भाग आहे. नाहींतर दूरदेशीं असतांना एकाद्या प्रतिभासंपन्न कवीच्या भरारीलाहि लाजविणारे देशाच्या कल्याणाची काळजी वाहण्यासंबंधीं विचार चालू असतात, त्याचा प्रत्यक्षांत यायच्या सुरवातीलाच—जन्मभूमीवर पाय ठेवल्याबरोबर—त्यांचा लोप होऊन देशकार्य राष्ट्रहित, लोककल्याण, राष्ट्रसेवा इत्यादि सर्व झूट म्हणून बाजूला सारून लगेच आपण परदेशाहून आलेले विद्वान झालेले, मोठ्या दर्जाचे, साहेबांच्या बरोबरीचे असें वाटून आपल्याच गरीब स्वदेश बंधूंना हिडिसफिडिस करण्यांत सारसर्वस्व मानण्यांत इतिकर्तव्य समजायचें हा प्रश्न आहे ?"

या कादंबरीच्या विचारसरणीवर मधुचंद्र खुष झाले. पण त्याचवेळीं त्याच्या हृदयफलकावर त्यांना कळून कीं न कळून कोण जाणें "जिचे विचार इतके थोर, जी इतकी विद्वान्, जी इतकी रूपगुणसंपन्न, तिला तिच्या पतीनें घराबाहेर घाल-वावी, हें नीचपणाचें कृत्य नव्हे काय ?" असलें वाक्य कोणी तरी कोरून गेलें !

पुढें असेंच कांहींतरी बोलत बोलत दोघेंहि विश्रांति घेण्याकरितां बऱ्याच वेळानंतर आपल्या कॅबिनमध्यें गेलीं !

---

" कादंबरीचा रुकार मिळेल काय माझ्या विनंतीला ? "

पूर्ण वेगांत चाललेल्या बोटीबरोबर, समुद्राचें पाणी आणि प्रभंजन मोठ्या गमतीनें खेळत होतें. क्षणाक्षणाला बोटीची गति मुंबई बंदराला वेगानें आपल्या-जवळ ओढून घेत होती. बोटींतील प्रवासी आपापल्या सोईप्रमाणें कोणी बैठे खेळ खेळण्यांत तर कोणी क्रिकेटादि खेळ खेळण्यांत गुंतून राहिले होते. दुसऱ्या वर्गांतील उतारू आपल्या कॅबीनमधल्या खिडक्या उघड्या टाकून भिंतीशीच तयार केलेल्या कॉटवर पडून निश्चल दृष्टीनें समुद्रशोभा पहात होते. कोणी मुंबईला परदेशाहून नवीनच येत असल्यामुळें नवीनपणाच्या प्रथमच्या हुरहुरीला प्रारंभ होऊन आपोआप सचिंत होते, तर फार दिवस परदेशांत काढून आतां लवकरच आपला मायदेश गांठणार, या विचारानें कोणाला सानंद गहिंवर येत होता !

तिसऱ्या वर्गांतील प्रवाशी तेथील गुदमरणें असह्य होत असल्यानें कांहीं तरी निमित्त काढून वर डेकवर येण्याचा प्रयत्न करून कोणी कांहीं बोलेल कीं, काय या विचारानें साशंक होऊन चौकसपणानें चोंहीकडे पहात, कोणी बोलायच्या आंत खालीं उतरलें म्हणजे मिळविली समजून आनंद मानीत. बोटीवरील कामगारांची फावल्यावेळीं एकत्र जमून ठराविक मस्करी चाललेलीच असे. त्याच क्षणाला डॉक्टर कादंबरी आपल्या कॅबीनमध्यें कॉटवर बसून खिडकी उघडून मुंबई बंद-राच्या दिशेकडे दृष्टि लावून अनेक प्रकारच्या कल्पना काढण्यांत तन्मय असतांना हातांतील पुस्तकांचीं मधून मधून पानें उलटण्याचेंहि कार्य करीत होती. तिला नकळत प्रतिक्षणीं बदलत जाणाऱ्या तिच्या मुखावरील फरकांवरून कोणीहि तिच्या-कडे थोडेसें लक्षपूर्वक पाहिलें असतें, तर तिच्या मनोभूमिकेवर अनंत विचाररूपी नट आणि कल्पनारूपी नटी कौशल्यानें नाचत असल्या पाहिजेत, हें त्यास सहज कळून आलें असतें. तरीपण तिच्या मनावर प्रामुख्यानें नृत्य करणारा कल्पना-तरंग कोणता असावा याची कल्पना करणें बरेंच दुरापास्त होतें.

पण तशी स्थिति आमच्या बॅरिस्टर साहेबांची नव्हती. त्यांच्या मनांतील विचारांची खळबळ इतकी जोराची होती कीं, त्यांची इच्छा नसती तरीसुद्धां त्यांना कोणत्या विचारांनीं पकडलें आहे, हें एकाद्या जगाच्या अननुभवी माणसानेंहि चटकन् सांगितलें असतें. त्यांना बोटीवर निरनिराळ्या ठिकाणीं खेळाचीं वगैरे

अनेक साधनें साध्य होण्यासारखीं होतीं. कोणत्याहि मंडळांत मिसळण्यास त्यांना फारसें कठिण गेलें असतें असेंहि नाहीं. आणि आम्हांला खात्रीपूर्वक असें वाटतें कीं, बॅरिस्टर मधुचंद्र बोटीवर चढतांच जर त्यांची व आमच्या विद्वान डॉ. कादंबरीची गांठ पडून तिच्या सहवासाची चटक त्यांना लागली नसती तर त्यांचें मन करमणूकीच्या अन्य साधनांकडे ह्या पूर्वी केव्हांच वेधलें गेलें असतें. पण या जगांत मोठ्यांत मोठी व निरतिशय हृदयंगम वाटणारी करमणुकीची वस्तु म्हणजे स्त्रीहृदय व स्त्रीसौंदर्य यांचा लाभ बॅरिस्टरांना पहिल्यांदांच झाल्यावर त्याहून किती तरी कमी प्रतीच्या करमणुकीच्या साधनांकडे त्यांचें लक्ष कशाला जाईल ? त्यांतून कालपासून तर बॅरिस्टरांच्या मनाची कसल्यातरी तीव्र विचारांनीं त्यांची एकसारखी तळमळ चालविली होती ! फार तर काय पण त्यांना गेल्या रात्रींत रात्रभर झोंप एक क्षणभरही आली नाहीं ! त्यांच्या विचारांचा अतिरेक झाला, त्यांचे विचार आवरून धरण्याची किंवा आंतल्या आंत दाबून टाकण्याची शक्ति त्यांच्या ठिकाणीं राहिली नाहीं. चुलीवर कढ येत चाललेल्या भातावर जर हलकेंसें झांकण असेल तर भाताची वाफ तें झांकण केव्हांच उडवून लावतें, व आंतील कढ उतूं जातो, त्याचप्रमाणें बॅरिस्टरांच्या मनावरचा त्यांचा कच्चा दाब उडून जाऊन प्रकरणाच्या प्रारंभीं आम्हीं दिलेलें वाक्य, ते आपल्या कॅबीनमध्यें विचारमग्न असतांना त्यांना न जुमानतां त्यांच्या मुखांतून बाहेर पडलें. त्यामुळें एकंदरींत त्यांच्या विचारसरणीच्या तळाशीं जायला फारसें कठीण असें कवच राहिलें नाहीं. कारण जगाचा नियमच असा आहे कीं, कोणतेंहि व्यंग जोंपर्यंत दुसऱ्याला दिसूं नये, याकरितां कडेकोट बंदोबस्त केलेला असतो एकादें अति सूक्ष्महि छिद्र जोंपर्यंत झांकून टाकण्याची खबरदारी घेतलेली असते तोंपर्यंतच तसला प्रयत्न कांहींसा सुसाध्य असतो,पण एकदां का यत्किंचित् कां होईना पण छिद्र पडलें, तर मग कोणाची इच्छा असो वा नसो, त्या छिद्रांतूनच त्याच्या हृदयांतील सर्व प्रकार जग तेव्हांच पाहूं शकतें. आणि तीच स्थिति या क्षणीं बॅरिस्टर मधुचंद्राची होती.

पहिलें वाक्य त्यांच्या मुखांतून बाहेर पडल्या बरोबर जरी थोडावेळ ते थांबले, आपण काय म्हटलें बरें ? आपलें बोलणें कोणीं ऐकलें बिकलें तर नाहीं, असें वाटून साशंकपणानें त्यांनीं उगाच एकवार चोंहीकडे नजर फिरविली; तरी कांहीं वेळानें पुनः ते पहिल्याच विचारांच्या स्वाधीन झाले. त्यांच्या दुर्बल मनाची परवा न करतां त्यांना त्यांच्या मुखानेंच कोणी तरी बोलावूं लागले " काय ?

कादंबरीला आपल्याशीं लग्न कर म्हणून; आपण तिला विचारावें ? काय हरकत आहे ? तिनें आपल्याशीं लग्न लावलें तर किती चांगलें होणार आहे ?—पण आम्ही दोघे विवाहबद्ध झालों. तर, आमचा विवाह दोघांनाही भावी आयुष्यांत कायमचा सुखकर होईल काय ?—कां होणार नाहीं ? जिनें एक दिवसाच्या अल्पावधींत आपल्याबद्दल मला विलक्षण चटक लावून सोडली, तिचा कायमचा सहवास सुखदायी होणार नाहीं, ही कल्पना तरी कशाला ? आणि ज्या अर्थी या इतक्या अल्पावधींत आम्हीं दोघांचेहि इतकें सहजासहजीं कल्पनेच्या बाहेर संघटन झालें, त्या अर्थी माझ्याहिबद्दल कादंबरीच्या मनांत विशेष भावना उत्पन्न झाली नसेल, असें खात्रीनें म्हणतां येणार नाहीं ? मग काय ? ती माझ्याशीं लग्न करायाला खात्रीनें तयार होईलच ! होय ! होईलहि पण तिला विचारायचें कसें ? मी इतका धीराचा प्रयत्न केव्हांपासून करतों आहे, पण अजून कांहीं तिला एकाएकीं विचारण्याची तयारी होत नाहीं ! बरें पण मला तिला विचारतां आलें आणि तिचीहि सम्मति मिळाली, तर काय लग्न करायचें ! खरेंच हा एक मोठा प्रश्नच आहे ! लग्नाविषयीं यापूर्वी मी माझ्या मनाशीं ठरवून ठेवलेल्या कांहीं गोष्टी ! मी अजिबात कसा विसरून गेलों, हें माझ्या ध्यानांतहि राहिलें नाहीं ! लग्न लावून घ्यायचें म्हणजे एकादी घोरपड कायमचीच आपल्या गळयांत बांधून घ्यायची—ती चांगली मिळाली तर ठीक—पण कांहीं केलें तर घोरपडच ती !—तिच्यापासून कायमची गळयांत पडल्यावर सुखाचें नांव कशाला ? तशाच दृष्टीनें पाहिलें असतें, तर विलायतेंत आपल्याला चांगल्या चांगल्या आंग्ल कुमारिकांशीं लग्न लावण्या-सारखे चारदोन प्रसंग तरी उत्कृष्ट प्रकारचे आले नव्हते काय ? मग ते आपण कोणत्या विचारानें मागें टाकले ? कायमचें लफडें आपल्या पाठीशीं नको म्हणूनच ना ?—मी आंग्ल युवतीशीं विवाहबद्ध झालों असतों, तर सुधारणेचें किती उंच शिखर गांठल्याचें श्रेय मला मिळालें असतें, आणि हिंदुस्थानानें माझा गौरव केला असता ? मग मी त्या गौरवाला जाणूनबुजून कां मुकलों ?—"

तर्कशास्त्रांत पूर्ण पारंगत झालेले विद्वान् प्रेमप्रवाहांतील तर्कनौकेंत बसून कसे वहात जातात, त्याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे आमचे बॅरिस्टर मधुचंद्र होत. क्षण-भर थांबलेले त्यांचे विचार पुनः सुरू झाले. '—नाहीं ! हिंदुस्थानानें माझा गौरव केला असता किंवा माझ्या कृतीबद्दल माझा उपहास केला असता ?—उपहासच केला असता, यांत शंकाच नाहीं. ' गोऱ्या कातडीला भुलून मी आंग्ल युवतीशीं विवाह केला, ' असेंच सर्वजण म्हणाले असते. पण कादंबरीबरोबर मी विवाह

केला, तर माझा देश कौतुकच करील ! आतां थोड्या अवधींत तिच्याशीं माझा जो सहवास झाला, त्यावरून मी तिच्याबरोबर लग्न करणेंच श्रेयस्कर, असं आतां वाटूं लागलें आहे. कादंबरीबरोबर विवाह केल्यानें बंगाल आणि महाराष्ट्र यांचा संयोग घडविण्याचें कार्य सहजीं घडून येणार असून बंगाल प्रमाणें महाराष्ट्रालाहि त्याबद्दल भूषणच वाटेल. आणि असं एकाकी राहण्यापेक्षां विवाह होऊन कादंबरी-सारख्या विद्वान सहचारीच्या साह्यानें माझ्या पूर्वसंकल्पित देशसेवेच्या पवित्र कार्याला मला कितीतरी उत्साह येईल. विवाह ही देशसेवेच्या कार्यांत धोंड नसून तें कार्य सुगम करणारी ती दिव्यवल्ली आहे असा मला लवकरच प्रत्यय येणार आहे असं मला आतां वाटूं लागलं आहे. मग काय होईल तें होवो ! कादंबरीला माझ्याशीं विवाह करण्याची आमची स्वारी आतां विनंती करणार ?—बस्स ठरला विचार ! आणि माझ्या विचारांचें प्रतिबिंब उमटून तिच्याहि अतःकरणांत ह्याच विचाराचा उदय झाला असल्यास, माझी विनंति—उभयपक्षीं सुखकर होणारी ही माझी विनंती ती केव्हांच मान्य करील, यांत शंकाच नाहीं. बस्—बस् ! ठरला तर माझा निश्चय ! आतां संधि पाहून, कादंबरीचें मन अजमावून मी ही विनंती तिच्या पुढें ठेवणार ! अहाहा ! असं जर झालं तर ?—आम्हाला किती किती तरी कार्य करितां येईल. ती ' एम. डी. ' आहे. मी तिला एक ' ग्रॅन्ड हॉस्पिटल ओपन ' करून देईन आणि स्वतः बंगाल, मद्रास, पंजाब आणि बाम्बे प्रेसिडेन्सीज मध्यें जाऊन बारमध्यें काम करीन. मग आम्हा दोघांना किती ' ग्रॅन्ड सक्सेस ' मिळेल !'—विचार करतां करतां वरील प्रमाणें कसला तरी एक विचार जेव्हां ठाम झाला, तेव्हां तात्पुरती तरी बॅरिस्टरच्या मनाची तळमळ शान्त झाल्या-सारखी दिसली. मनाला आपोआप थोडें हलकें वाटल्यासारखें होऊन मनावरचें एक प्रकारचें दडपण निघाल्यासारखें झालें आणि मनाच्या हलकेपणाच्या स्थितींत ते पडलेल्या जागेवरून चटकन् उठले आणि मनाला अधिक उत्तेजीत करण्या-करितां मोकळ्या हवेंत संचार करण्यासाठीं डेकवर आले तों त्याच्या आधींच कठड्याला टेकून, कांहीं तरी पद्य गुणगुणत निष्कामतेनें चोंहीकडे पहात डॉ. कादंबरी उभी असल्याचें मधुचंद्राला आढळून आलें. तिला तेथें पहातांच बॅरिस्ट-रसाहेबांस आनंद झाला. ते तिला हांक मारून तिच्याशीं कांहींतरी बोलणार तोंच तिनें बॅरिस्टरकडे पाहिलें आणि अहेतुकपणं किंचित् हास्यहि केलें. तिच्या स्मितांचें उत्तर बॅरिस्टरांनीं आपल्या स्मितानें दिलें. आणि पुढें होऊन तेथें असलेल्या एका इझिचेअरवर बसत बसत ते म्हणाले, " बसा हो कादंबरीबाई ! उभं राहून

पाय नाहींतका दुखत ? " असें म्हणून जवळच असलेली दुसरी खुर्ची त्यांनीं आणखी आपणाजवळ ओढून घेतली. मधुचंद्रानें ती खुर्ची इतकी जवळ ओढली होती कीं, कोणाहि स्त्रीला त्या खुर्चीवर बसण्यास संकोचच वाटला असता. परंतु कादंबरी अगदीं मोकळ्या मनानें त्या खुर्चीवर बसली. त्यावेळीं बॅरिस्टर मधुचंद्राच्या मुखमंडळावर एक प्रकारची अकल्पित टवटवी दृग्गोचर होत होती. तें कादंबरीच्या लक्षांत आल्याशिवाय राहिलें नाहीं. कोणीतरी एकानें बोलायला सुरवात करावयास हवीच होती; त्यांत ह्या ' टवटवी'चें कारण आमच्या कथानायिकेला मिळालें ' मग काय विचारतां ? तिनें तेथूनच सुरवात केली. ती म्हणाली. " कां बॅरिस्टरसाहेब, मुंबईबंदर आपणाला लवकर दिसणार, हें ही बोट जाणवूं लागतांच बोटींतीळ प्रवाशांना आपोआप आनंद आणि समाधान वाटत असेल नाहीं ?–उद्यां आपण मुंबईस उतरतांच स्वगृहीं जाण्याची-बंगालला जाण्याची कोण घाई कराल तुम्ही, खरंना ? माझं भविष्य कधींहि खोटं व्हायचं नाहीं. कारण त्याच घाईचीं पूर्व चिन्हं आतांपासूनच जणूं काय आपण दृष्टिगोचर करीत आहांत, असंच आपण आपल्या चेहऱ्यावरून दाखवीत आहांत ! "

" असं तर खरंच ! " कादंबरीच्या ' होस हो ' देऊन आपलेंहि म्हणणें कादंबरीपुढें तिनें मांडलें तितक्याच जोरांत आपणहि कसें मांडावें, याचा विचार करीत करीत बॅरिस्टर म्हणाले, " उद्यां मुंबईला उतरतांच आपापलें घर गांठण्याची प्रत्येकाला विलक्षण घाई व्हायची हें तर ठरल्यासारखेंच आहे. पण कादंबरीबाई, मी इतका वेळ विचार करीत असतां मला आतां असं वाटूं लागलं आहे कीं, प्रत्येकाला आपापल्या घरीं जाण्याची जरी अतोनात घाई असली, तरी त्या घाईत आपण काल म्हटल्याप्रमाणें विलायतेंत ठरविलेल्या कार्यक्रमाला अगदीं धाब्यावर बसविणार नाहीं, तीच व्यक्ति विलायतेंत मिळविलेल्या ज्ञानाचें चीज करील, असं ठरणार असल्यामुळें मला तरी निदान तशा तऱ्हेची खबरदारी घेतली पाहिजे."

" हो, तें तर अवश्य झालें पाहिजे ! " बॅरिस्टर आपल्या विचारतंद्रेंत कुठपर्यंत पुढें जाऊं शकतात हें अजमवण्याकरितां कादंबरीनें मुद्दाम खोंचकपणानें म्हटलें, " पण खरंच, काय हो बॅरिस्टर साहेब, विलायतेहून येणाऱ्या गृहस्थांचे विलायतेंत असतांनाचे विचार आणि लगेच ते स्वदेशीं येतांच येथें आल्यावरचे विचार, यांत जमीन अस्मानाचा फरक पडतो तो कां ?—आतां इतक्या विचारानंतर आपण आपल्या भाषा आणि वृत्ति यांत फारसा फरक पडूं देणार नाहीं, अशी

माझी खात्री आहे म्हणा! पण सर्वसाधारण रीतीनें इतरांच्या बाबतींत असें कां होतें, याचा आपण कधीं विचार केला आहे काय?—केला असल्यास तो विचार कृपा करून मला ऐकवा. माझ्यावर आपले उपकार होतील! कारण ज्यापक्षीं अटोकाट प्रयत्न करूनहि पूर्वी केलेला विचार निष्फळ होऊन कुठच्या तरी भलत्याच विचाराला व विकाराला जगाची सफर करणारा बळी पडतोच पडतो, त्यापेक्षां, अशी चूक होण्याला कांहीं तरी फार जबरदस्त कारणही असलेंच पाहिजे. खरंना?—आपल्याला कसें वाटतें?"

"तुम्हीं म्हणतां तशाच रीतीची स्थिति असते असा माझा देखील अनुभव आहेच. पण तसं कां होतं याच्या कार्यकारणाचा विचार करण्याचं आजपर्यंत माझ्या डोक्यांतच कधीं आलं नाहीं; आणि कसें आलें नाहीं याबद्दल माझं मला आतां आश्चर्यच वाटत आहे. तरी पण मला असें वाटतें—" बॅरिस्टरांनीं आपली कल्पनाशक्ति चालवायला आरंभ केला. "विलायतेहून कांहीं उच्चतर महत्त्वाकांक्षा उराशी बाळगून येणारा प्राणी स्वदेशीं आल्यावर जेव्हां त्या महत्त्वाकांक्षा व्यवहार्य करण्याच्या तयारीला लागतो, त्या वेळीं त्याला असं आढळून येत असावं, कीं आपल्या महत्त्वाकांक्षाना झेंपण्याइतकी शक्ति आमच्या स्वदेशाच्या आंगीं नाहीं. आणि म्हणून तो शेवटीं केवळ निराश झाल्यामुळेंच आपल्या महत्त्वाकांक्षांना नाइलाजानं रजा देत असावा!"

"हं तर मग—" बॅरिस्टरांच्या विचित्र विधानाला प्रत्युत्तर देण्यादाखल कादंबरी म्हणाली, "यांत दोष समाजसेवा करावयास सिद्ध झालेल्या असल्या व्यक्तींचा नसून तो दोष स्वदेशी अज्ञ बंधुजनांचाच आहे असंच तुमचं म्हणणं ना!"

कादंबरीच्या बोलण्याचा रोख काय आहे, याचा बॅरिस्टरांना नीटसा अंदाज न झाल्यानें ते किंचित् गोंधळल्यासारखे झाले. तेव्हां त्यांनीं चाचरत पण पूर्ण खुलासा झाल्याशिवाय कांहीं तरी बोलणं म्हणजे तें अधिकच मूर्खपणाचें होईल, असें वाटूनहि त्यांनीं विचारलें! "मी तुमच्या बोलण्याचा आशय नाहीं समजलों!"

"त्याचा कसला आला आहे आशय!—आपल्याला माझ्या बोलण्याचा आशय समजला नाहीं, म्हणजे मलाच नीट बोलतां आलं नसावं असं म्हटलं पाहिजे. बाकी बॅरिस्टरासारख्यांशीं माझ्यासारखीनें बोलायचें म्हणजे हास्यास्पद झाल्याशिवाय कसें राहणार?—म्हणून विचारतें, कीं विलायतेहून शिकून येणाऱ्यांची निराश होण्यांत चूक होते कीं स्वदेशीय, अज्ञ समाजाची, त्यांचा उपयोग करून घेतां न येणं ही चूक होते?"

कादंबरीनें आपली बाजू सावरली, इतकेंच नाहीं तर आपल्याला एकप्रकारचें महत्त्व दिलें, असें वाटून आपली 'निभावली' असें वाटून त्यांना पुढें बोलावयाला जोर आला, त्यांनीं सुरवात केली. "चूक कोणाची कां असेना ? पण चूक होते, हें जर निर्विवाद आहे, तर त्याचा प्रतिकार प्रथम अवश्य केला पाहिजे."

"होय. पण चूक कोणाची हें कळल्याशिवाय त्याच्या प्रतिकाराचा प्रयत्न करायचा हें शक्य तरी कसें ? एकाद्याचा पत्ता विचारल्यावांचून एकाद्याचा निरोप त्याला सांगायला धांवायचें या सारखाच हा असमंजस प्रकार नाहीं काय ? मला असें कळायला हवें आहे कीं विलायतेंत असतांना तिकडची उच्चतम उन्नति पाहून 'मीहि माझ्या देशांत अशीच उन्नति घडवून आणीन. समता, बंधुता, स्वातंत्र्य, उदात्तता यांचा फैलाव करीन,' म्हणून कल्पनामंदिरें रचणारे राजेश्री जन्मभूमी वर पाय ठेवतांच त्याचें प्रेमानें स्वागत करण्यास आलेल्या बाळपणाच्या लंगोटी मित्रास, हमाल समजून 'ए हमाल, उठाव बोजा' म्हणून आज्ञा करण्यास चुकत नाहींत. आपण श्रेष्ठ, बाकी सर्व हलक्या दर्जाचे, अशा रीतीनें समजून त्या दृष्टीनें ते लगेच वागूं लागतात. ही चूक त्यांची कीं त्यांच्या अज्ञ बंधूंची !—विलायतेंत असतांना शिक्षणाप्रीत्यर्थ पाण्यासारखा खर्च केलेला पैसा, देशांत आल्यावर देशहित बाजूला ठेवून स्वार्थबुद्धीनें पाण्यासारखा पैसा मिळविण्याच्या उद्योगाला लागणें ही चूक त्यांची कीं, त्यांच्या दीनदुबळया समाज बांधवांची ?..." कादंबरी बोलण्याच्या भरांत आली होती, ती आणखीहि कितीतरी बोलणार होती, पण बोलली इतक्या प्रकारावरूनच तिचा हेतू न कळण्याइतकें मधुचंद्राचें डोकें—ज्याअर्थीं ते बॅरिस्टरीची परीक्षा उत्तीर्ण झाले होते, त्याअर्थीं—मठ्ठ नव्हतें खचीत ! ते म्हणाले, "अगदीं बरोबर ! अगदीं तुम्हीं म्हणतां तें अक्षरशः बरोबर आहे ! याच चुका बहुतेकांच्या हातून होत असतात. कोणी पोटाच्या पाठीं लागतो, तर कोणी द्रव्यसंचयाच्या आणि कोणी मानमरातबाच्या मागें लागून आपलें कर्तव्य विसरतात. शंकाच नाहीं यांत ! कित्येकांची प्रबल इच्छा असूनहि त्यांनीं मिळविलेल्या ज्ञानाचा उपयोग आपल्या समाजाला कशा रीतीनें रुचेल व पचेल याचा उलगडा नीटपणें न झाल्यामुळें त्यांच्या कर्तव्याची ही चूक होत असेल, नाहीं कोणी म्हणावें ! हो समजा, विलायतेसारख्या ठिकाणीं जाऊन ज्ञानभाण्डार खर्चून लुटून आणून आपल्या समाजाची कुवत ओळखून प्रमाणबद्ध जर त्या ज्ञानाचे प्याले समाजाला पाजले, तरच त्या ज्ञानाचा उपयोग झाला तर व्हायचा एरव्हीं काय होणार आहे ? नाहीं-

तर आपण म्हणतां तसा एकच प्रकार व्हायचा ! " बॅरिस्टर आवेशांत येत चालले होते, त्यांच्या दृष्टीनें कादंबरीच्या विचाराशीं आपल्या विचारांचें बेमालूमपणानें सम्मीलन होत चाललें आहे, तेव्हां अशा वेळीं हयगय मुळींच न करतां आपण बेगुमानपणानें असाच मार मारीत गेलों तर कादंबरीच्या विचारसाम्राज्याला ताब्यांत घेतांना तिच्या हृदयाचा भरभक्कम भव्यच पण बालेकिल्ला आपल्या कबजांत हां हां म्हणतां येईल, असा विचार येतांच त्यांनीं अवकाश असा क्षणाचाहि घेतला नाहीं. आपल्या वाक्प्रहराचा स्रोत अप्रतिहत ठेवण्याचा निश्चय करून ते पुढें बोलूं लागले " खरोखरच कादंबरीबाई, असल्या लहानमोठ्या चुका लक्षांत येऊनहि त्याचा उपयोग करून घेणार नाहीं, तो सांगूनसवरून पढतमूर्ख ठरल्याशिवाय राहणार आहे काय ? तेव्हां निदान आपण आपल्या हातून तशा चुका होऊं देऊन देशांशीं कृतघ्नपणा करतां कामा नये, खरेंना ? देवदयेनें आम्हाला देशांत गेल्यावर घातलेला पैसा काढला पाहिजे, तरच तरणोपाय आहे अशीहि स्थिति नाहीं. बरें, मानमरातबासाठीं हपापलेल्यांची स्थिति अज्ञ समाजहि अखेर कशी करतो, याचीं चित्रें आपल्या डोळ्यापुढें सतत नाचवित ठेवल्यास आपण त्या मोहाला बळी पडूं, अशीहि आपल्याला भीति बाळगण्याचें कारण नाहीं. अडचणीचीं, धोक्याचीं, मोहाचीं ठिकाणें आपल्या दृष्टीपुढें आल्यावर ती चुकविण्याची चतुरता दाखविणें आपल्याला काय कठीण जाणार आहे ?—"

" होय. यांत तर शंकाच नाहीं ! " बॅरिस्टर किंचित् विश्रांतीकरितां थांबले तों त्यांना उत्तेजीत करण्याकरितां एवढें एकच वाक्य कादंबरी मध्येंच बोलली. आपल्याकडून सर्व दृष्टीनें बोलून गेलों आहोंत, अशी कल्पना बॅरिस्टरांची होत चालली असावी, हें त्यांच्या बोलण्यांत पडत चाललेल्या फरकांवरून कोणाच्याहि लक्षांत आल्याशिवाय राहतें ना ? मग कादंबरीच्या तें लक्षांत यायला उशीर कशाला हवा होता ? तिच्या चेहऱ्यावर अत्यंत सूक्ष्म अशी हास्याची चमक चमकत असावी असें दिसलें. त्याचें कारण कळणें त्यावेळीं तरी कांहींसें कठीण होतें. परंतु आपल्याला त्याचें याचक्षणीं तितकेंसें महत्त्व नसल्यामुळें आपण तिकडे दुर्लक्ष करून वहावत चाललेल्या बॅरिस्टरांच्या मनाची क्षणभर मौज पाहूं—

" आतां पहा, कादंबरीबाई, दैवयोगानें योगायोगहि कसा सुंदर जुळून आला आहे. आपण दोघेहि विलायत सोडून आपल्या जन्मभूमीच्या बाहूंत गुरफटण्याकरितां जात आहोंत. आपल्याला आपल्या बहुजन समाजाचे उतराई झाल्याशिवाय गत्यंतर नाहीं. आपल्या पूर्वीच्या लोकांचे बरे वाईट अनुभव आपल्यापुढें आहेतच

आपला हिंदुस्थान हांकेच्या अंतरावर आला आहे. तेव्हां आपण दोघेहि आपल्या हिंदुस्थानांतील कार्याचा क्रम असा आखूं या कीं,—

" म्हणजे ? बॅरिस्टर, आपलें कर्तव्य अजूनपर्यंत आपण कांहींच निश्चित केलं नाहीं म्हणतां ? " कादंबरीनें मुद्दामच थांबवून खोंचून विचारल्यासारखें केलें. ते त्यावर बॅरिस्टर क्षण अर्ध क्षण बिचकलेच ! तरीपण त्यांच्या बोलण्यांतील उत्साह कमी झाला नाहीं. त्यांनीं ठांसूनच आपलें बोलणें पुढें चालू केलें. ते म्हणाले. " नाहीं, अजून मी माझा मार्ग आंखला नाहीं. तरी पण आंखायचाच म्हटलें तर त्याला किती वेळ लागणार आहे ? घरीं गेल्यानंतर शांतपणानेंहि आपणांला आपला मार्ग ठरवितां येणें काय अशक्य आहे ? आतां काय ? सहाजिकच योग आला आहे ! आपला आयुष्यक्रम ठरवितांना आपल्यासारख्या विदूषींचें मला अमोल साह्य होत आहे !—दोघांच्याहि कार्यक्रमाची दिशा एक करण्याचा सुप्रसंग आपल्याला लाभत आहे तेव्हां —"

" तसंच कांहीं नाहीं बॅरिस्टरसाहेब ! कारण माझा आयुष्यक्रम ठरवावयाचा राहिलाच नाहीं. मी तो कधींच—विलायतेला जायच्या अगोदरच ठरविला आहे म्हणाना ? " कादंबरी म्हणाली.

" अस्सं ! " आश्चर्यानें बॅरिस्टरांनीं एकच उद्गार काढला ! पण त्याचवेळीं त्यांच्या हेतूच्या उपोद्घाताची दिशा या ठिकाणीं थोडी खुंटल्यासारखी झाली, असें त्यांना वाटलें म्हणून ते किंचितकाळ विचारांत पडले. पण कांहींसा विचार करून दिशा बदलूनहि आपल्या म्हणण्याप्रमाणें गाडी रुळावर आणावयाचीच असा निश्चय करून पुन्हां त्यांनीं सुरवात केली. " माझं कार्य मी निश्चित केलं नाहीं, तसंच आपणहि आपलं कार्य विलायतेला येण्यापूर्वीच आंखलें आहे, या दोन्ही गोष्टी लक्षांत घेतल्या तरी माझं असं म्हणणं आहे कीं, क्षणभर तें बाजूला ठेवून आपण स्वतंत्रच विचार करूं या. मी म्हणतों आपल्याप्रमाणें विलायतेला जाण्यापूर्वी माझी आयुरेखा मीहि ठरविली होती ! पण त्यांत आणि विलायतेच्या स्वतंत्र वातावरणांत कांहीं वर्षें घालविल्यानंतर आपला पूर्वीचा कार्यक्रम बऱ्याच खालच्या प्रतीचा ठरल्याशिवाय कसा राहील ! आणि आपल्या मनगटांत मोठ्यांत मोठें कार्य करण्याची ताकद आली असतांना मुद्दामहून हलक्या प्रतीचें कार्य करीत राहण्यांत समाधान कोण मानील ? आपण आपला कार्यक्रम आंखला तरी विलायतेंत राहून त्या कार्याची व्यापकता आपण ध्यानांत आणली नसेल असें मी म्हणायला तयार नाहीं, तेव्हां या दृष्टीनें विचार करतांना माझा कार्यक्रम मी यापूर्वीच

आंखला नाहीं, हें भाग्यच समजतों मी ! आतां आपला कार्यक्रम ठरवितांना मला आपल्याला अशी सूचनावजा विनंति करायची आहे कीं, आपल्या कर्तबगारीला जास्तींत जास्ती शोभेल, असें व्यापक कार्य आपण दोघांना मिळून ठरवितां येण्यासारखें आहे. आपण जर शांतपणें विचार केला तर आपल्या असें लक्षांत येईल कीं, आपण आपल्या देशांत गेलों आणि आपल्या कर्तबगारीवर देशसेवेला आरंभ केला, तर त्यांतून आपल्या देशापेक्षां आपल्या प्रांतासंबंधींच कार्य करतां आल्याचें आढळून येईल. पण तसें न करतां आपल्या कार्याची व्यापकता आपल्या प्रांतापुरतीच आडवून न ठेवतां आपल्या दोन देशांचा— आमचा बंगाल व आपला महाराष्ट्र यांचा संयोग आपणा दोघांच्यामुळें करतां आला, तर आमच्या कार्याचा प्रारंभच केवढ्या दांडग्या प्रमाणावर झाल्यासारखा होणार आहे ! नाहीं काय ?–ही माझी विनंति—

यावेळीं कादंबरीनें बराच वेळ मोठ्या माराकुटीनें आपलें हसूं दाबण्याचा प्रयत्न केला असतांहि तो प्रयत्न निष्फळ होऊन तिचें हंसूं मोठ्या जोरानें बाहेर पडलें ! मग तिनेंहि आपल्या हास्यांत प्रतिबंध केला नाहीं. ती त्यावेळेस मनसोक्त हंसली. पण त्यामुळें बॅरिस्टर आश्चर्यचकितच नव्हे, तर अत्यंत खजील झाले. ते तिच्याकडे ओशाळलेल्या नजरेनें पहातच राहिले. नंतर हंसें थांबल्यावर कांहीं वेळानें कादंबरी म्हणाली, " बॅरिस्टर, आपण बरेच आहांत कीं !–आपला बोलण्याचा रोंख मला कळला. पण अशाच रीतीनें जर आपल्याला आपला आयुष्यक्रम ठरवावयाचा होता तर विलायतेहून येतांना आपण एकाद्या आंग्ल युवतीला आपल्या सान्निध्याचा लाभ दिला असता तर आपल्या आयुष्याचा कार्याचा आरंभ आपण आतां कल्पना करतां त्याहूनहि दांडग्या प्रमाणांत होणें शक्य होतें म्हणजे—"

" म्हणजे म्हणजे काय झालें असतें ? " मनुष्य गांगरला म्हणजे अशा स्थितींत विचारायला नको तें विचारीत सुटतो. तसाच प्रकार त्या क्षणाला बॅरिस्टर मधुचंद्राचा झाला. डॉक्टर कादंबरीला असा प्रश्न हवाच होता. तिनें पुन्हा बोलण्याला सुरवात केली, " म्हणजे आंग्ल युवतीच्या सान्निध्यांत आपला जाणारा अखण्ड वेळ, देशाकरितां कांहींहि न करतां आपण अत्यंत मोठी देशसेवा अविश्रांत व अहोरात्र चालविली आहे, असं वाटून आपल्याला समाधान वाटत राहिलें असतें.

" तुम्हीं असें कां म्हणालां ! तसं केलं असतं तर मी फारच चूक केली असती याची जाणीव असल्यामुळेंच माझ्या हातून ती मी खबरदारीनें होऊं दिली नाहीं.

नाहींतर खोटें कशाला सांगूं ! आपण कल्पना केल्याप्रमाणें तशा प्रकारची संधि चारदोन वेळां आलीहि होती. पण जाऊं द्या तें ! ती चूक मी होऊं दिली नाहीं पण मला वाटतें आंग्ल युवतीशीं मी विवाहबद्ध झालों असतों तर ती चूक होती असें म्हणतां येतें, तसें आपण दोघे विवाहबद्ध होऊन बंगाल व महाराष्ट्र जोडण्याचा उद्योग केला तर ती चूक न होतां उलट श्रेष्ठ प्रतीचें तें एक राष्ट्रकार्य केल्यासारखें होणार आहे अशी माझी प्रामाणिक समजूत आहे."

"पण बॅरिस्टरसाहेब या सगळ्या गोष्टी योग्य आहेत असें धरून चालून जरी आपल्या या विचित्र विनंतीचा विचार केला, तरी तें शक्य व योग्य आहे का याची बरोबर कल्पना आपल्याला झाली नाहीं असं मला म्हणावं लागतं. 'मी आपल्याशीं विवाह करावा' असें 'प्रपोझल' माझ्यापुढें मांडावें, हें ज्यावेळीं प्रथम तुम्हीं तुमच्या मनांत आणलें असेल, त्याच्या अगोदर जरी नाहीं तरी नंतर कां होईना, आपला परिचय झाल्यावर माझी हकीकत सांगतांना "मी विवाहित आहे—माझे पति हयात आहेत" हें मी सांगितलं होतं, आपण खास विसरलां नसाल आणि असं असतांहि आपण तसली विचित्र विनंति केलीत म्हणून मला आपला राग यावयाच्या ऐवजीं उलट हंसूच आलें.

"नाहीं पण मी असें म्हणतों—" प्रथमतः चांचपडत पण आपण निरुत्तर झालों आहोंत, ही जाणीव असतांनाहि बॅरिस्टरांनीं म्हटलें, "आपण विवाहित आहांत, ही गोष्ट मी जसा विसरलों नाहीं, तशीच आपणांला अगदीं लहानपणींच आपल्या पतीनीं—आपल्या अडाणी, आपल्या विद्वत्तेची नुसती कल्पनाहि यायलाहि ज्यांनीं कित्येक जन्म घेतले पाहिजेत, अशा शेतकरी पतींनीं—घराबाहेर घालविलें, हीहि गोष्ट माझ्या स्मरणांतून गेली नाहीं, म्हणूनच आपल्या उभयतांच्या विवाहाची मी विनंती केली !"

"पतीनें आपल्या स्त्रीला घराच्या बाहेर घालविणें म्हणजे, तिला दुसऱ्या विवाहाची परवानगी दिली आहे, असें समजतां कीं काय आपण ? असें समजत असाल तर आश्चर्यच म्हणायचें ! बॅरिस्टरसाहेब, आपण पाश्चात्यसंस्कृति आणि पौर्वात्यसंस्कृति यांचा स्वतंत्र रीतीनें विचार केला असेल. पण दोन्ही संस्कृतीचा संयोग घडविण्याचें मनांत आणतांना योग्य काय व अयोग्य काय याचा आपण विचार केला नाहीं, असें मोठ्या कष्टानें मला म्हणावें लागतें. मी विलायतेंत असतांना आपण जसें आज मला विचारण्याचें धाडस केलंत, तशाच प्रकारांनीं आमच्या एका प्रोफेसरानें, दुसऱ्या एका बड्या लार्डाच्या चिरंजीवानेंहि मला विचारलें होतें.

पण त्यावेळीं आतांच्या इतकें आश्चर्य मला वाटलें नाहीं; कारण त्यांच्या दृष्टीनें असें विचारण्यांत विशेष असें कांहींच नसतें, हें मला कळत होतें. पण आपली स्थिति तशी नाहीं. आपण पाश्चात्य देशांत विहार केला असला तरी आपण हाडाचे हिंदु पौर्वात्य आहांत ! नवऱ्यानें घराबाहेर घालविलें म्हणजे 'काडी मोडून दिली' असा अर्थ हिन्दु समजत नाहींत, अशी माझी खात्री आहे. तशी कल्पना कदाचित् पाश्चात्यांची होऊं शकेल. पण आम्हा पौर्वात्यांची होणें शक्य नाहीं. कारण त्यांचीं लग्नें म्हणजे कोर्टाच्या मदतीनें झालेले राजीखुषीचे करारमदार ! त्यांचें फक्त शरीर संबंधालाच महत्त्व असतें. पण आमचा मानसिक संबंध असतो. हा संस्काराचा कायमचा ठसा बसण्याकरितां आमच्याकडील वैदिक रीतीनें विवाह होत असतात, हें आपल्याला माहीत नाहीं काय ! वैदिक विवाहाचें महत्त्व आपल्याला कांहींच वाटत नाहीं काय ? ”

आतांपर्यंत बॅरिस्टर निर्बल होत आलेच होते. पण त्यांच्या हृदयांत आणखी एक कल्पना हेलकावे खात होती ! तिचाहि उपयोग करून घ्यावयाचें त्यानीं निश्चित केलेंच व ते धीर धरून म्हणाले, “ आपल्या विचारसरणीचा विचार करूनहि मला असें म्हणतां येईल कीं पाश्चात्य संस्कृति बाजूला ठेवली, आणि वैदिक विवाहाचें महत्त्व वाढविणारी पौर्वात्य संस्कृति क्षणभर बाजूला सारली, तरी काळ वेळेला साजेल व पचेल असें आपल्या सोयीप्रमाणें त्या संस्कृतींतून समंजस माणसांनीं फेरफार करावयास नकोत काय ?—तुम्हीं हें लक्षांत घ्या कादंबरीबाई, कीं तुमच्या अडाणी पतीशीं याच्यापुढं संसारयात्रा करितांना तुम्ही सुखी व्हाल काय ? तुम्हाला सुख लागेल काय ? तुम्हांला कर्तव्याचेंच प्रेम आज जरी पूर्णपणें वाटत असलें, तरी संसारसुखाच्या कायमच्या समाधानाभावीं तुमचें जिणें तुम्हांला रुक्ष वाटणार नाहीं, अशी तुमची खात्री आहे काय ? आणि म्हणूनच मी म्हणतों, काळ बदलेल त्याप्रमाणें संस्कृतींत फरक करणें अवश्य नाहीं काय ? ”

“ पण वैदिक विवाहाचें बंधन इतकें लेचेपेचें आहे असें मला वाटत नाहीं. आणि तें नाहींहि ! वैदिक विवाहाचें बंधन आम्हांला विकाराला बळी तर कधींच पडूं देत नाहीं. इतकेंच नव्हे तर प्रेमाचेंहि स्तोम माजवीत नाहीं. तर त्यापेक्षां कर्तव्याला महत्त्व देऊन त्याचा प्रकाश सतेज करतें. मी आपल्याला सांगतें, माझे पति शेतकरी—अडाणी असोत, त्यांनीं मला टाकून दिलेली असो, पण आमच्या आयुष्यांत एक दिवस असाहि चमत्कार करून दाखवील, कीं, त्या चमत्कारानें आम्हां दोघांना दोघांपासून पुढील आयुष्यांत सुख लागेलच लागेल !—बॅरिस्टर

देशकार्य करायला अशा प्रकारच्या विवाह बंधनांनीं बांधलें जायलाच पाहिजे असें नाहीं, तर आपण हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर उतरतांना, आपल्या मातृभूमीला, आपण दोघे बंधुभगिनी या नात्यानें भेटलों तर मातृभूमीला केवढी धन्यता वाटेल! पतिपत्नींना सहकारितेनें कार्य करतां येईल, तसें बंधुभगिनींना करतां येणार नाहीं काय ?"

डॉ. कादंबरीच्या या वेळच्या बोलण्याचा बॅरिस्टरांच्या मनावर खाडकन् इतका विलक्षण परिणाम झाला कीं, ते मागील सर्व विसरून जाऊन तिच्या शेवटच्या प्रश्नात्मक विचाराला "होय कादंबरीताई, तूं म्हणतेस तेंच खरें!" असें एकदम उत्तरादाखल म्हणाले!

अशा रीतीनें लहानपणीं आईकडून मिळविलेल्या नीतिमत्तेच्या बळावर खंबीर बनलेल्या कादंबरीनें मधुचंद्रासारख्या बहकलेल्या बॅरिस्टराला आपला बंधु बनविलें!

---

## ३........ मंडळीचें स्वागत

अगदीं ठराविक वेळीं 'कीर्ति' बोट मुंबईच्या धक्कयाला लागली. त्यावेळीं बोटीवरील गडबड पाहून प्रत्येक उतारू धक्कयावर उतरण्याकरितां किती उत्सुक झाला होता, हें सहज लक्षांत येण्यासारखें होतें. तसेंच प्रत्येक उतारूच्या मनः-स्थितीचेंहि वर्णन करावयाचें मोठें कठीण नव्हतें. सासरहून माहेरीं येणाऱ्या मुलीची मनःस्थिति आणि 'कीर्ति' बोटीवरील उतारूंची मनःस्थिति जवळजवळ सारखीच होती, असें म्हटलें असतां अगदीं जुळण्यासारखें आहे. निदान आमच्या कथानायकेची मनःस्थिति तशी होती, यांत शंकाच नाहीं. कारण मुंबईचा धक्का अस्पष्ट दिसूं लागल्यापासून कादंबरीनें आपली दृष्टि तेथें लाविली होती. आई आणि बाबा केव्हां दृष्टीस पडतील असें तिला झालें होतें. बंदरांत आल्यानंतर बोट धक्कयाला लागेपर्यंत बराच वेळ लागला. प्रत्येक उतारू बोटीच्या कठड्याजवळ उभा राहून धक्कयावर आलेल्या आपल्या आप्तेष्टांना हातरुमालानें खुणा करून 'आपण आलों' असें मोठ्या उत्सुकतेनें सुचवित होता. त्या उतारूंच्या गर्दींत कादंबरीहि होती. तिनें धक्कयावरील गर्दींत कितीदां आपली तीव्र दृष्टि फिरविली. परंतु तेथें तिला ओळखीचें कोणीच दिसेना. त्यामुळें तिची चर्या उतरली. आपण ह्या बोटीनें येणार

हें माहित असतां आपणास घेण्याकरितां कोणीच आलें नाहीं, म्हणून तिला अत्यंत वाईट वाटलें. परंतु—!

विलायतेंतून आलेल्या मंडळीचें स्वागत करण्याकरितां धक्क्यावर जमलेल्या मंडळींची धांदल खरोखरच अवर्णनीय होती. एका बाजूला मोटार गाड्यांची सारखी खेचाखेच चालली होती. कित्येक गाड्या पुष्पपल्लवांनीं शृंगारलल्या होत्या. सुवासिक हारतुरे यांनीं भरलेल्या टोपल्या घेऊन कित्येक स्त्रिया आणि पुरुष अगदी उत्सुकतेनें बोट धक्क्याला केव्हां लागते, याची वाट पहात होते. धक्क्यावरील मधल्या पटांगणांत कांहीं खुर्च्या मांडून ठेवल्या होत्या. आणि एका बाजूला व्यास पिठाची व्यवस्था करून त्याच्या बाजूला फराळाकरितां शुभ्र वस्त्रांनीं आच्छादिलेली लांब टेबलें आणि खुर्चा ठेविल्या होत्या. बोटींतून धक्क्यावर पाय ठेवीपर्यंत, आपलें स्वागत करण्याकरितां कोणीहि आलें नाहीं, ह्या विचारानें अत्यंत हिरमुसलेलें कादंबरीचें मन, यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणें, धक्क्यावर पाय ठेवतांच एकदम प्रफुल्लीत झालें.

हिप् हिप् हुर्ये !

धक्क्यावरील जनसमूहांत आमच्या कथानायिकेचें स्वागत करणारी मंडळी इतकी निघाली कीं, त्या सर्वांकडे पाहून कादंबरी आश्चर्यचकितच झाली. मुंबईतील बहुतेक सर्व डॉक्टर हॉस्पिटलमध्यें आणि खाजगी काम करणाऱ्या गोऱ्या आणि काळ्या नार्सिस, मेडीकल कॉलेजमधील विद्यार्थी, निरनिराळ्या संस्थांचे प्रतिनिधी आणि प्रमुख वर्तमान पत्रांचे रिपोर्टर्स, ह्या सर्वांच्या धांदलींत जयरामपंतांना पुढें होतां आलें नाहीं, भोरहून मुद्दाम आपल्या मुलासह सुनेला घेऊन आलेले रावबहादुर, आणि सुमतीबाई ही सर्व मंडळी दूर उभी होती. आपल्या मुलीला डोळे भरून पाहाण्याकरितां आईच्या मनाला किती उत्कंठा लागली असेल, याची कल्पना आईच्याच मनाशिवाय इतरांना होणें कठीण आहे. पण सुमतीबाईला आपली उत्कंठा दाबून ठेवणेंच भाग होतें. कादंबरीचें खरेंखुरें स्वागत तीच करणार होती, ही गोष्ट जरी खरी होती, तरी आज कादंबरीचें स्वागत करण्याचा पहिला मान वर उल्लेख केलेल्या डॉक्टर आदिकरून मंडळींनीं आपणाकडे घेतला होता. कारण विलायतेंतून एम्. डी. ची परीक्षा पास होऊन येणारी पहिली स्त्री आमची कथानायिकाच होती. अर्थात् सार्वजनिकरित्याच तिचें स्वागत होणें योग्य होतें.

कादंबरीनें धक्क्यावर पाय ठेवतांच 'हिप् हिप् हुर्ये !' करून प्रथम सर्वांनीं

तिचें स्वागत करून मंडळी चडाओढीनें तिच्या गळयांत पुष्पमाला घालूं लागले. दोनचार पावलें चालून जाण्यापूर्वीच आमची कथानायिका गळयांतील पुष्पमालांच्या भारानें वांकली, इतके हार तिच्या गळयांत पडले !

नंतर तेथें तयार केलेल्या व्यासपीठावर उभे राहून मुंबईचें प्रसिद्ध नागरिक आणि नामदार डॉक्टरांनीं कादंबरीचा गौरव केला. रीतीप्रमाणें बऱ्याच वक्त्यांचीं गौरवपर भाषणें झालीं. आणि त्या सर्वांना उत्तरादाखल आमची कथानायिका बोलली, तेंहि प्रसंगानुसार योग्यच होतें. 'पाश्चात्य विद्येचें भांडार लुटून येणाऱ्या प्रत्येक विद्याविभूषिताकडे एकाद्या बुभुक्षिताप्रमाणें आमच्या देशाचे डोळे लागतात. कारण आपलें ऋण फेडणारा एक वीर समर्थ होऊन आज आहे आणि ' तो आपलं ऋण खात्रीनें फेडणार आहे, ' असें ह्या आमच्या देशाला वाटत असतें. आणि मी आपल्या ज्ञानाचा लाभ माझ्या इतर बंधूभगिनींना देऊन देशाला ऊर्जितावस्थेला आणीन ' असें त्या वीराकडून आश्वासन मिळतांच आमचा देश स्वतःला धन्य मानून सुख मानतो. परंतु ' बोले तैसा चाले ' अशी समर्थ व्यक्ति एकच होऊन गेल्यामुळें आतांपर्यंत परत आलेल्या पाश्चात्त्य विद्याविभूषित वीरांनीं आपल्या लटक्या शब्दजालांनींआपल्या ह्या गरीब मायदेशाला हरभऱ्याच्या झाडा-वर चढवून शेवटीं कृतीनें फसविलेंच आहे.' इत्यादि स्पष्ट वक्तृत्व झाल्यावर डॉ. कादंबरी म्हणाली, " माझ्या सारख्या स्त्रीनें 'देशाला ऊर्जितावस्थेला ' आण-ण्याची फुशारकी मारून हंसें करून घेण्यापेक्षां 'मला प्राप्त झालेली विद्या परोपकारी आहे. तेव्हां तिचा धनसंचयाकडे उपयोग न करितां परोपकाराकडेच मी करीन,' इतकेंच आश्वासन देऊन मी ह्या माझ्या गौरवाबद्दल सर्वांचे आभार मानते. " इतकें बोलून ती खालीं बसूं लागली. इतक्यांत एक व्यक्ति मागून त्या गर्दीतून पुढें येऊन हळूंच तिला म्हणाली, " मला कृपा करून पांच मिनिटं आपली मुला-खत द्याल काय ? मी टाईम्सचा रिपोर्टर आहें. इतर रिपोर्टरांच्या पूर्वी जर आपण मला मुलाखत द्याल तर—"

" यशवंत दादा !—हें काय ? "

कादंबरीच्या मुखांतून हे आश्चर्याचे उद्गार बाहेर पडतात न पडतात तों यश-वंतराव धाडकन् तिच्या पायांजवळ पडला !

एकाद्या कारखान्यांत 'फिटर'चें काम करणारा मनुष्य आमच्या वाचकांनीं पाहि-लाच असेल. एखादी फाटकी, मळलेली, तेलाचे डाग पडलेली इजार, तिचीच बरोबरी करणारा अंगांत कोट, ठिगळया जोडलेला बूट आणि मळकी टोपी, असा

त्यावेळीं यशवंतरावाच्या अंगांत पोषाख होता. वडिलांच्या कृपाछत्राखालीं असतांना 'कॉलेजी पोषाखांत' नटलेल्या यशवंतरावानें एकदां आमच्या कथानायिकेला—कमूला—पोषाखाबद्दल हिणावलें होतें, तेच यशवंतराव ग्रॅज्युएट झाल्यावर 'अपटुडेट' पोषाखांत वावरत होते, आणि तेच ग्रॅज्युएट यशवंतराव आज ह्या गलिच्छ पोषाखांत पाहण्याचा प्रसंग यावा, याचें कारण दुसरें तिसरें कोणतेंहि नसून फक्त दारू! जगांतील सर्व अपायकारक वस्तूंत अतिशय अपायकारक अशी ही दारू आरोग्याचा, सौख्याचा, लौकिकाचा आणि कुटुंबाचा नाश करते, हें समजणाऱ्या समंजस विद्वानांची वर वर्णन केलेली स्थिति पाहून कींव करावी कीं ज्यांना समजत नाहीं, अशा असमंजस मंडळींची कींव करावी!—व्यसनामुळें गचांडी मिळाल्यावर लाहोराहून भटकत भटकत ठिकठिकाणची हवा खात यशवंतराव चार महिन्यांपूर्वी पुनः मुंबईस आला होता. 'एकच घोट' दारूकरितां वाटेल तें करण्यास तो आतां मागेंपुढें पहात नसे. उत्तम डोकें, लेखणीचा बाका आणि पदवीधर असून आज यशवंतरावाची स्थिति एखाद्या क्षयानें पोखरलेल्या सुदामदेवासारखी होऊन दोनचार आण्यांच्या पैशाकरितां त्याला मुंबई शहरांत वणवण फिरावें लागत होतें. आज डॉ. कादंबरी नांवाची एक दक्षिणी स्त्री 'लंडन एम्. डी.' होऊन परत आली आहे, असें कळतांच तिचा रिपोर्ट प्रथम घेऊन जर आपण एखाद्या वर्तमानपत्राकडे गेलों, तर कांहीं प्राप्ति होईल म्हणून यशवंतराव तेथें आला होता. त्याच्या तोंडाला दारूची घाण येतच होती. 'डॉ. कादंबरी' हें नांव त्याला अपरिचित असल्यामुळें तो फसला. परंतु कादंबरीनें त्याला हांक मारतांच त्याला चटकन् तिची ओळख पटली. त्यांतून आज तीन दिवस त्याच्या पोटांत अन्नाचा लेशहि नव्हता. कांहीं धडपड करून जे आणा दोन आण्यांचे पैसे आधल्या दिवशीं रात्रीं मिळाले होते, त्याची त्यानें दारूच घेतली होती. अन्नापेक्षां त्याला आतां दारूचीच जास्त आवश्यकता वाटत असे. आज सकाळीं तो कामाच्या मागें फिरतां फिरतां त्याची आणि टाईम्सच्या रिपोर्टराची गांठ पडली. 'तूं जर एक रकाना भरून डॉ. कादंबरीचा रिपोर्ट लिहून देशील तर तुला एक रुपया देईन' असें त्यानें सांगतांच यशवंतरावानें तें कबूल केलें व हातापाया पडून 'थोडीशी घेतल्याशिवाय रिपोर्ट घ्यावयास तरतरी येणार नाहीं' असें सांगून त्यानें अगाऊ आठ आणे घेतले आणि त्याचीच दारू पिऊन तो रीपोर्ट घेण्याकरितां आतां आला होता.

यशवंतराव मूर्च्छा येऊन खालीं पडतांच व्यासपिठावर गडबड उडाली. आजू-

तिचें स्वागत करून मंडळी चढाओढीनें तिच्या गळयांत पुष्पमाला घालूं लागले. दोनचार पावलें चालून जाण्यापूर्वींच आमची कथानायिका गळयांतील पुष्पमालांच्या भारानें वांकली, इतके हार तिच्या गळयांत पडले !

नंतर तेथें तयार केलेल्या व्यासपीठावर उभे राहून मुंबईचे प्रसिद्ध नागरिक आणि नामदार डॉक्टरांनीं कादंबरीचा गौरव केला. रीतीप्रमाणें बऱ्याच वक्त्यांचीं गौरवपर भाषणें झालीं. आणि त्या सर्वांना उत्तरादाखल आमची कथानायिका बोलली, तेंहि प्रसंगानुसार योग्यच होतें. 'पाश्चात्य विद्येचें भांडार लुटून येणाऱ्या प्रत्येक विद्याविभूषिताकडे एकाद्या बुभुक्षिताप्रमाणें आमच्या देशाचे डोळे लागतात. कारण आपलें ऋण फेडणारा एक वीर समर्थ होऊन आज आहे आणि 'तो आपलं ऋण खात्रीनें फेडणार आहे,' असें ह्या आमच्या देशाला वाटत असतें. आणि मी आपल्या ज्ञानाचा लाभ माझ्या इतर बंधूभगिनींना देऊन देशाला ऊर्जितावस्थेला आणीन' असें त्या वीराकडून आश्वासन मिळतांच आमचा देश स्वतःला धन्य मानून सुख मानतो. परंतु 'बोले तैसा चाले' अशी समर्थ व्यक्ति एकच होऊन गेल्यामुळें आतांपर्यंत परत आलेल्या पाश्चात्त्य विद्याविभूषित वीरांनीं आपल्या लटक्या शब्दजालांनींआपल्या ह्या गरीब मायदेशाला हरभऱ्याच्या झाडा-वर चढवून शेवटीं कृतीनें फसविलेंच आहे.' इत्यादि स्पष्ट वक्तृत्व झाल्यावर डॉ. कादंबरी म्हणाली, "माझ्या सारख्या स्त्रीनें 'देशाला ऊर्जितावस्थेला' आण-ण्याची फुशारकी मारून हंसें करून घेण्यापेक्षां 'मला प्राप्त झालेली विद्या परोपकारी आहे. तेव्हां तिचा धनसंचयाकडे उपयोग न करितां परोपकाराकडेच मी करीन,' इतकेंच आश्वासन देऊन मी ह्या माझ्या गौरवाबद्दल सर्वांचे आभार मानते." इतकें बोलून ती खालीं बसूं लागली. इतक्यांत एक व्यक्ति मागून त्या गर्दीतून पुढें येऊन हळूंच तिला म्हणाली, "मला कृपा करून पांच मिनिटं आपली मुला-खत द्याल काय ? मी टाईम्सचा रिपोर्टर आहें. इतर रिपोर्टरांच्या पूर्वी जर आपण मला मुलाखत द्याल तर—"

"यशवंत दादा !—हें काय ?"

कादंबरीच्या मुखांतून हे आश्चर्याचे उद्गार बाहेर पडतात न पडतात तों यश-वंतराव धाडकन् तिच्या पायांजवळ पडला !

एकाद्या कारखान्यांत 'फिटर'चें काम करणारा मनुष्य आमच्या वाचकांनीं पाहि-लाच असेल. एखादी फाटकी, मळलेली, तेलाचे डाग पडलेली इजार, तिचीच बरोबरी करणारा अंगांत कोट, ठिगळया जोडलेला बूट आणि मळकी टोपी, असा

त्यावेळीं यशवंतरावाच्या अंगांत पोषाख होता. वडिलांच्या कृपाछत्राखालीं असतांना 'कॉलेजी पोषाखांत' नटलेल्या यशवंतरावानें एकदां आमच्या कथानायिकेला—कमूला—पोषाखाबद्दल हिणावलें होतें, तेच यशवंतराव ग्रॅज्युएट झाल्यावर 'अपटुडेट' पोषाखांत वावरत होते, आणि तेच ग्रॅज्युएट यशवंतराव आज ह्या गलिच्छ पोषाखांत पाहण्याचा प्रसंग यावा, याचें कारण दुसरें तिसरें कोणतेंहि नसून फक्त दारू! जगांतील सर्व अपायकारक वस्तूंत अतिशय अपायकारक अशी ही दारू आरोग्याचा, सौख्याचा, लौकिकाचा आणि कुटुंबाचा नाश करते, हें समजणाऱ्या समंजस विद्वानांची वर वर्णन केलेली स्थिति पाहून कींव करावी कीं ज्यांना समजत नाहीं, अशा असमंजस मंडळींची कींव करावी!—व्यसनामुळें गचांडी मिळाल्यावर लाहोराहून भटकत भटकत ठिकठिकाणची हवा खात यशवंतराव चार महिन्यांपूर्वीं पुनः मुंबईस आला होता. 'एकच घोट' दारूकरितां वाटेल तें करण्यास तो आतां मागेंपुढें पहात नसे. उत्तम डोकें, लेखणीचा बाका आणि पदवीधर असून आज यशवंतरावाची स्थिति एखाद्या क्षयानें पोखरलेल्या सुदामदेवासारखी होऊन दोनचार आण्यांच्या पैशाकरितां त्याला मुंबई शहरांत वणवण फिरावें लागत होतें. आज डॉ. कादंबरी नांवाची एक दक्षिणी स्त्री 'लंडन एम्. डी.' होऊन परत आली आहे, असें कळतांच तिचा रिपोर्ट प्रथम घेऊन जर आपण एखाद्या वर्तमानपत्राकडे गेलों, तर कांहीं प्राप्ति होईल म्हणून यशवंतरांव तेथें आला होता. त्याच्या तोंडाला दारूची घाण येतच होती. 'डॉ. कादंबरी' हें नांव त्याला अपरिचित असल्यामुळें तो फसला. परंतु कादंबरीनें त्याला हांक मारतांच त्याला चटकन् तिची ओळख पटली. त्यांतून आज तीन दिवस त्याच्या पोटांत अन्नाचा लेशहि नव्हता. कांहीं धडपड करून जे आणा दोन आण्यांचे पैसे आधल्या दिवशीं रात्रीं मिळाले होते, त्याची त्यानें दारूच घेतली होती. अन्नापेक्षां त्याला आतां दारूचीच जास्त आवश्यकता वाटत असे. आज सकाळीं तो कामाच्या मागें फिरतां फिरतां त्याची आणि टाईम्सच्या रिपोर्टराची गांठ पडली. 'तूं जर एक रकाना भरून डॉ. कादंबरीचा रिपोर्ट लिहून देशील तर तुला एक रुपया देईन' असें त्यानें सांगतांच यशवंतरावानें तें कबूल केलें व हातापाया पडून 'थोडीशी घेतल्याशिवाय रिपोर्ट घ्यावयास तरतरी येणार नाहीं' असें सांगून त्यानें अगाऊ आठ आणे घेतले आणि त्याचीच दारू पिऊन तो रीपोर्ट घेण्याकरितां आतां आला होता.

यशवंतराव मूर्च्छा येऊन खालीं पडतांच व्यासपिठावर गडबड उडाली. आजू-

बाजूला सर्वत्र डाक्टरच डॉक्टर होते. अशा समयीं डॉक्टरसाठीं धांवाधांव करण्याची आवश्यकता होती काय ?—छे! प्रथम डॉ. कादंबरीच पुढें झाली. तोंच तिच्या बाजूनें दूसरे एक होतकरू डॉक्टर पुढें सरसावले. ' गरीब बिचारा! काय झालं एकाएकीं ह्याला ?' असें म्हणून डॉक्टर साहेब जरा वांकले, तोंच त्यांना दारूची वस्कन् घाण आली. त्याबरोबर झटकन् त्यांनीं आपल्या खिशांतील रुमाल काढून नाकाला लावला, आणि मागें पाय घेत ' ओ, ही इज ए ड्रंकर्ड!' दारुड्या आहे मरूं द्या! बाजूला नेऊन टाका! असें म्हणून ती स्वारी बाजूला झाली. परंतु कादंबरीला बाजूला होतां येईना. ती खालीं वांकून यशवंतरावाकडे एकाग्र दृष्टीनें पहात राहिली. ' हा यशवंतदादाच काय ?' अशी तिला राहून राहून शंकाच येत होती. कदाचित् आपण चुकून भलत्या मनुष्याला यशवंतदादा समजलों—आपणास तसा भास झाला असा विचार तिच्या मनांत आला. परंतु तो भास नाहीं, असें सांगणारा एक ओळखीचा शब्द तिच्या कानीं पडला.

व्यासपिठावरील भाषणें आटोपतांच जयरामपंत, रावबहादुर वसंतराव, शांताबाई आणि सुमतीबाई कादंबरीला भेटण्याकरितां पुढें आले. व्यासपिठावर कांहीं गडबड झाली आहे, ही गोष्ट त्या गडबडींत त्यांना कळलीहि नाहीं. कारण कादंबरीला भेटण्याकरितां—तिच्याबरोबर बोलण्याकरितां प्रत्येकजण उत्सुक झालेला होता. त्या सर्वांच्या पुढें शांताबाई होती. त्यामुळें पुढें येतांच तिला कादंबरी खालीं वांकलेली दिसली. ती खालीं काय पहात आहे, हें जाणण्याकरितां तीहि त्या गर्दीतून वांकून पाहूं लागली. आपला दादा दृष्टीस पडतांच अर्थातच तिच्या मुखांतून ' दादा ' हा भीतियुक्त आश्चर्याचा शब्द बाहेर पडला. क्षणभरानें सर्व व्यवस्था झाली. वसंतरावानें आपल्या कॉलेज मित्राला मेहुण्याला—प्रत्यक्ष त्यांच्या घरांत चोरी करणाऱ्या चोराला—त्या बेशुद्ध असलेल्या यशवंतरावाला इतरांच्या साहाय्यानें उचलून गाडींत नेऊन ठेवलें. थोड्या वेळानें ती गडबड कमी होतांच कादंबरीनें आपल्या प्रियकर पूज्य पित्याला नमस्कार केला. तोंच त्यांच्या मागें तिला आई दिसली. मग काय ? तिनें एकदम पुढें होऊन आपल्या प्रिय मातेच्या गळ्याला घट्ट मिठी मारिली! अहाहा! आज तीन वर्षांनीं मायलेकी भेटल्या आनंदाचा अतिरेक होऊन दोघींच्याहि नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. शांताबाई जवळच उभी होती. आणि ती आश्चर्यातिशयानें कादंबरीच्या मुखाकडे पहात होती. क्षणभरानें आपल्या मातेच्या बाहूंतून मोकळे होतांच कादंबरी पुढें झाली आणि शांताबाईकडे हास्य मुद्रेनें पाहूं लागली. परंतु तिच्याबरोबर बोल-

ण्याचें शांताबाईला धैर्यच होईना. विलायतेच्या हवेनें कादंबरीच्या देहयष्टीवर विलक्षणच फरक केला होता, यांत शंका नाहीं. शांताबाई आणि ती वर्णानें उंचीनें आणि शरीर रचनेनें साधारण सारख्याच होत्या. पण आतां कादंबरी उंच सशक्त आणि तेजःपुंज गौरवर्णाची झाली होती. शिवाय तिच्या चर्येवर सात्विकतेची एक विलक्षण छटा दिसत होती.

उत्कंठेचा भर कमी होऊन सर्वांच्या प्रेमानें भेटी झाल्यावर कादंबरीनें आपल्या नूतन बंधूची—बॅरिस्टर मधुचंद्राची आणि सर्वांची ओळख करून दिली. कादंबरीच्या स्वागताचा तो अपूर्व समारंभ पाहून बॅरिस्टर साहेबांनाहि आनंद झाला. ते म्हणाले कादंबरीताई, ह्या स्वागतानें आपल्या मायदेशानें तुमच्याजवळ किती आस्थेची, कळकळीची आणि आशेची मागणी केली आहे बरं ! "

" मला त्याची पूर्ण जाणीव आहे. आणि ती जाणीव ठेवूनच आपलें बोटींत ठरल्याप्रमाणें मी वागणार आहे, ही खात्री ठेवा. तसेंच आतां तुम्हीं आपल्या बंगालमध्यें गेल्यावर तुमच्या जवळहि अशीच मागणी होईल, हें तुम्हींहि लक्षांत ठेवा ! "

थोड्या वेळानें मंडळीच्या आग्रहावरून कादंबरीला तेथें फलहार आणि चहा पान करावें लागलें. हा फलाहाराचा बेत ग्रॅन्ट मेडिकल कॉलेजांतील विद्यार्थ्यांनीं केलेला होता. आपल्या कॉलेजांतून पास होऊन विलायतेंतहि सर्व प्रकारें यश संपादून आलेली पहिली ' लेडी डॉक्टर ' म्हणून विद्यार्थ्यांनीं तिचा केलेला हा सन्मान होता. असो. चहापान होऊन सर्वांचा प्रेमानें निरोप घेऊन आमची मंडळी निघाली. जयरामपंतांनीं स्वतःच्या दोन गाड्या आणल्या होत्या. परंतु विद्यार्थीवर्गानीं डॉक्टर कादंबरीकरितां मुद्दाम शृंगारलेली मोटार आणली असल्यामुळें तिला त्याच गाडींत बसावें लागलें. इकडे जयरामपंत. रावबहादुर, वसंतराव, शांताबाई आणि सुमतीबाई गाडींत बसण्याकरितां निघाले. वसंतराव आणि शांताबाई प्रथम गाडीजवळ आले. आपल्या दादाला पाहण्याकरितां शांताबाई गाडींत डोकावून पाहूं लागली. परंतु गाडींत यशवंतराव तिला दिसला नाहीं. त्याला थोड्या वेळापूर्वी वसंतरावानें उचलून गाडींत आणून निजविलें होतें आणि गाडीवानाला त्याच्याजवळ उभें राहण्यास सांगितलें होतें. पण आतां यशवंतराव तेथें नव्हता.

" अरे यशवंतराव कुठं गेले ? " वसंतरावानें गाडीवानाला विचारलें.

" ते मघांच उठून गेले. तुम्ही इकडे आणून त्यांना ठेवलं. थोड्या वेळानें ते शुद्धीवर आले. आणि थोडा वेळ विचार करून उठले. मी त्यांना पुष्कळ सांगितलं परंतु त्यांनीं माझें ऐकलें नाहीं.

" पण हा गेला तरी कुठं. "

" त्या गर्दीतच शिरले. "

पुनः वसंतरावांनीं इकडे तिकडे पुष्कळ शोध केला. स्वतःच्या कृतीनें पूर्ण शरमलेला यशवंतराव त्या मंडळींना चूकवून तोंड लपवीत गेला तो थोडाच त्याच्या दृष्टीस पडणार होता ? बराच वेळ शोध करून यशवंतराव कुठेंच दिसत नाहीं, असें पाहून सर्व मंडळी गाडींत बसली. शांताबाई आमच्या कथानायिके- जवळ बसली होती. परंतु तिची चर्या अगदीं निस्तेज दिसत होती. आपल्या बालमैत्रिणीला पाहून जो तिला प्रथम आनंद झाला होता, तो आतां राहिला नव्हता. चार वर्षांनीं तिचा दादा तिला दिसला, आणि तोहि अत्यंत हीनदशेंत दिसला, त्यामुळें तिला कां बरें वाईट वाटूं नये ? आतां यशवंतदादाशिवाय तिला, जगांत दुसरें कोण मायेचें माणूस होतें ! इतक्या वर्षांनीं भेटून आपणांस दादाबरोबर दोन शब्दहि बोलायला मिळाले नाहींत किंवा त्याची आपण चौकशी केली नाहीं, म्हणून तिला अत्यंत वाईट वाटत होतें. कादंबरी तिला मधून मधून कांहीं विचारी होती परंतु ' होय–नाहीं ' ह्या उत्तरापलीकडे ती फारशी बोलली नाहीं. शेवटीं सर्व मंडळी घरीं आली. कादंबरी गाडींतून उतरली, ती थेट घरांत जाऊन तिनें आपल्या वृद्ध आजीच्या पायांवर डोकें ठेवलें. म्हातारीनेंहि आनंदा- तिशयानें तिला तसेंच जवळ ओढून आपल्या पोटाशीं घट्ट धरलें.

" पोरी ! चिरायु हो ! "

" अहो आजी ! पोरी काय म्हणतां ? " मध्येंच वसंतराव पुढें होऊन म्हणाले, " आतां त्या मोठ्या डॉक्टरीणबाई—" लंडन एम्. डी. ' झाल्या आहेत ? त्यांना पोरी म्हणून काय म्हणतां ? "

" एमडी बिमडी मी कांहीं समजत नाहीं ! माझी कमू मला पोरीच आहे ! "

' पोरी ' ह्या शब्दोच्चारानें व्यक्त झालेल्या आजीच्या प्रेमानें सर्वांच्या अंगा- वर प्रेमरोमांच उभे राहिले. ती पुढें म्हणाली, " अशीच आपल्या नवऱ्याकडे यश संपादून सुखी हो म्हणजे झालं ! "

" तुझा आशीर्वाद पाहिजे आजी ! " लडीवाळपणानें कादंबरी म्हणाली.

" माझा पूर्ण आशीर्वाद आहे ! "

---

" मी काय करावं अशी आपली इच्छा आहे ? "

" परवांच्या भेटींत मी आपणास सर्व कांहीं सांगितलंच आहे महाराज ! आतां आणखी काय सांगूं ? "

" तुम्हीं सांगितलं होतं खरं ! आणि मी तुम्हाला दोन तीन दिवसांनीं भेटा म्हणूनहि सांगितलं होतं. परंतु हे दोन दिवस माझे फार गडबडीचे गेले. आज माझी मुलगी विलायतेहून आली आणि त्या गडबडींत मी होतों, त्यामुळें माझ्या कांहींएक लक्षांत राहिलं नाहीं. बरं पण तुमचं नांव काय सांगितलंत ? "

" मला नेने मास्तर म्हणतात. आपण मला दोनतीन दिवसांनीं बोलाविलं होतं; त्याप्रमाणें मी उद्यांच येणार होतों. परंतु आपली मुलगी आज ' लंडन एम्. डी. ' होऊन आली आहे, असं कळतांच मी मुद्दाम त्यांचं, आणि त्याचप्रमाणें आपलंहि अभिनंदन करण्याकरितां आज आलों आहें. आपल्या मुलीवरून आपण स्त्रीशिक्षणाचे किती चहाते आहांत हें स्पष्टच होत आहे. आपणासारख्यांनीं मनावर घेतलं तर माझं कार्य अगदीं सहज होण्यासारखं आहे. "

" माझ्याकडून होण्यासारखं असेल तर मी अवश्य करीन. "

" आपण होय म्हणाल तर सर्व कांहीं होईल. "

" पण तुम्हाला कोणत्या प्रकारची माझी मदत पाहिजे, तें कळल्याशिवाय मी होय कसं म्हणूं ? "

" महाराज, मी आज दहा वर्षें शाळाखात्यांत नोकरी केली. ह्या इतक्या वर्षांच्या अनुभवानें शिक्षणक्रमांत कोणकोणत्या सुधारणा अवश्य आहेत, त्या मी वेळोवेळीं शिक्षणखात्याच्या अधिकाऱ्यांना सुचविल्या परंतु त्याकडे कोणीच लक्ष देत नाहीं. शेवटीं कंटाळून मी नोकरी सोडली. आतां स्वतःची शाळा काढून आपल्या अनुभवाप्रमाणें शिक्षणाची दिशा ठेऊन शाळा चालवावी अशी माझी इच्छा आहे. ही चालू क्रमिक शिक्षण पद्धत बदलून माझ्या शाळेंत येणारी प्रत्येक मुलगी आणि मुलगा खरा नागरिक कसा बनेल अशी मी शिक्षणाची दिशा आंखली असून धार्मिक आणि नैतिक शिक्षणाकडे विशेष लक्ष दिलें जाणार आहे. "

" अशा धर्तीवर शाळा निघाव्या, अशी माझीहि फार दिवसांपासून इच्छा आहे. नैतिक आणि धार्मिक शिक्षणाची जोड मिळाल्याशिवाय आमच्या

भावी पिढीचा तरणोपाय नाहीं, असं माझेंहि ठाम मत आहे. आपण म्हणतां त्याप्रमाणें एखादी शाळा निघत असेल तर मी शक्य ती मदत मोठ्या आनंदानें करीन. "

" इतकं आश्वासन असल्यावर मला अधिक काय पाहिजे महाराज ? आपणासारखे, तसेंच आपल्या शिफारसीवरून सर साहेबांसारखे दोन चार थोर आश्रयदाते माझ्या शाळेला मिळाले, तर मी ही शाळा एक नमुनेदार संस्था करून दाखवीन. माझ्या शाळेंत वे. शा. सं. कृष्णाचार्यशास्त्री हे धार्मिक शिक्षणाचा वर्ग चालविणार असून ट्रेनिंग पास झालेल्या आनंदीबाई नैतिक शिक्षणाचा वर्ग घेणार आहेत. "

इतक्यांत दिवाणखान्याचा किंचित् ओढून घेतलेला दरवाजा उघडला आणि शांताबाई तिच्या मागून कादंबरी आणि वसंतराव दिवाणखान्यांत आले. 'ट्रेनिंग पास झालेल्या आनंदीबाई नैतिक शिक्षणाचा वर्ग घेणार आहेत,' हें नेनेमास्तरांनीं उच्चारलेलें शेवटचें वाक्य शांताबाईनें ऐकलें. परस्परांची दृष्टि एक होतांच शांताबाई दिवाणखान्याच्या मध्यभागीं असलेल्या राऊंड टेबलाजवळ थबकून उभी राहिली. नेनेमास्तर पंताच्या समोर एका खुर्चीवर बसले होते. आणि पंत आरामखुर्चीवर बसले होते. ती संध्याकाळची वेळ होती. आज कादंबरी विलायतेहून आली असल्यामुळें सर्व सकाळची वेळ गडबडींत गेली. त्यानंतर पंतांचे स्नेही व इतर बडे बडे नागरिक आमच्या कथानायिकेचें अभिनंदन करून जाईपर्यंत बरीच दुपार होऊन गेली होती. त्यानंतर जेवण खाण होऊन पंत दिवाणखान्यांत बसतात तों संध्याकाळ झाली. त्यांच्या बरोबर संभाषण करीत बसलेली व्यक्ति आमच्या वाचकांच्या पूर्ण परिचयाचे नेनेमास्तर होते. या सन्माननीय (!) शिक्षकाबद्दल गेल्या भागांत बराच उल्लेख येऊन गेलेला आहे. शांताबाईला दिवाणखान्यांत आलेली पाहतांच आमच्या मास्तर साहेबांना चटकन् कांपरें भरलें. ती आपल्याला ह्या ठिकाणीं दिसेल किंवा तिचा आणि पंतांचा कांहीं सोईरसंबंध असेल अशी मास्तरांना कल्पनाहि नव्हती. परंतु आतां तिला तेथें पहातांच मास्तरांचे सर्व बेत ढासळले. आपण ज्या उद्देशानें पंतांकडे आलों आहोंत, तो आपला उद्देश आतां सफल होणार नाहीं, असा विचार, शांताबाई दृष्टीस पडतांच त्यांच्या मनांत आला. तिच्या समोर उभें राहण्याची त्यांना सोय नव्हती. कारण त्यांनीं तसेच प्रताप गाजविले होते. त्यावेळीं शांताबाई दिवाणखान्यांत आली, ती तशाच तांतडीनें भयभीत झालेली होती. परंतु पंतांच्याजवळ नेनेमास्तरांना पाहून ती आंत येण्याचा मूळ उद्देशच विसरून गेली. ती क्षणभर उभी राहून नेनेमास्तरांकडे रोखून पहात

म्हणाली, " कोण नैतिक वर्ग घेणार आहे ?—तुमच्या आनंदीबाई का ? मग त्या मुलांमुलींना नीतीचे पाठ फार चांगले देतील म्हणायच्या ! " इतकें बोलून ती पंताकडे वळून पुढें म्हणाली, " बाबासाहेब, हे नेनेमास्तर इकडे कशाला आले आहेत ? गृहस्थांनीं आपल्या घराच्या उंबरठ्याजवळ सुद्धां ह्यांना उभं करण्याची ह्यांची लायकी नाहीं.'

" का—का पण त्यांनीं असं काय केलं आहे ? " पंतांनीं विचारलें.

" काय केलं ?—त्यांनाच विचारा ! पण मास्तर तुम्हांला तोंड आहे का सांगायला ?—असहाय्य स्थितींत पोटाकरितां मास्तरणीचा धंदा पत्करणाऱ्या बायकांचे हे काळ आहेत. मी खंबीर मिळालें म्हणून त्यांच्या थोबाडांतले दोन दांत पाडून त्यांच्या हातून निसटलें. पण आनंदीबाईसारख्या आणखी किती गरीब बिचाऱ्या फसल्या असतील त्या असोत ! "

" काय हो मास्तरसाहेब. हा काय प्रकार आहे ? " पंतांनीं किंचित् जोरांत विचारलें.

" हें—हें—ह्या—शांताबाई पांच वर्षांपूर्वी आमच्या शाळेंत होत्या—हा—हा—त्यांचा माझ्यावर उगाच राग आहे महाराज ! " चाचरत नेने मास्तर बोलूं लागले. परंतु त्यांचा शब्द कानीं पडतांच शांताबाईला काय वाटलें असेल तें असो, ती एकदम खेंकसून म्हणाली, " जा—मास्तर, एक शब्द सुद्धां न बोलतां येथून निघून जा—मास्तर. तुमचं तोंड पाहण्याचीहि आमची इच्छा नाहीं. जा—"

अगदीं मुकाट्यानें खालीं मान घालून नेने मास्तर दिवाणखान्यांतून बाहेर पडले. हा सर्व प्रकार बाजूला उभे असलेले वसंतराव मुकाट्यानें ऐकत होते त्यांना हा काय प्रकार आहे, हें कांहींच कळेना. मध्यंतरी स्त्रीस्वातंत्र्याच्या भ्रामक कल्पनेनें आपली पत्नी जेव्हां आपणापासून दूर होती. त्यावेळीं नेने मास्तराबरोबर घडलेला हा प्रकार असावा, असें त्यांनीं फक्त अनुमान केलें.

" शांता, तूं मोठी धीट आहेस ! " पंत तिच्याकडे पाहून किंचित् कालानें म्हणाले. " बिचारा नवीन शाळा काढण्याच्या उद्देशानें मजकडून कांहीं मदत मिळेल म्हणून मोठ्या आशेनें आला होता. पण तूं तर त्याला अगदीं पाण्यापेक्षांहि पातळ करून टाकलास ! "

" बाबासाहेब, त्या नेन्याचं आतां नांव सुद्धां काढूं नका; इतका तो नीच वृत्तीचा मनुष्य आहे. शाळाखात्यांत हे असे शिक्षक कसे नेमतात याचेंच आश्चर्य आहे."

इतक्यांत एक नोकर आंत येऊन म्हणाला, "बाबासाहेब, खालीं आलेला पोलिसचा शिपाई वर येऊं का विचारीत आहे ?"

"पोलिसचा शिपाई ?" पंत आश्चर्यानें म्हणाले.

"होय, बाबासाहेब." शांताबाई म्हणाली "आम्ही तेंच विचारण्याकरितां आलों होतों पण त्या नेन्यामास्तरला पाहतांच मला त्याचं विस्मरण झालं. एक पोलिसचा शिपाई चौकशी करितां आला आहे. बाळा देसाई म्हणून एक दादाचा मित्र होता. त्यानें सहा वर्षांपूर्वी आम्ही पुण्याहून येऊन येथें माधवाश्रमांत उतरलों होतों, तेव्हां माझ्या दागिन्यांची चोरी केली होती. तो मनुष्य आज पोलिसानें पकडला आहे. त्याबद्दल चौकशी करण्याकरितां तो आला आहे."

"पण इकडेच चौकशी करण्याकरितां तो कसा आला ? तूं इकडे आहेस हें त्या पोलिसाला कसें कळलें ?" पंतांनीं विचारलें.

"तें नाहीं मी विचारलें."

"मग बोलवा त्याला वर !" अशी आज्ञा होतांच नोकरानें त्या बिनड्रेसच्या पोलिसाला वर आणलें. त्याला विचारतांच तो सांगूं लागला—"आज सकाळीं धोबीतलाव जवळ दोघांची मारामारी झाली. ती मारामारी रस्त्यांतील लोकांनीं सोडविली. परंतु पुनः ट्रामवर ते दोघे मारामारी करूं लागले. त्या दोघांना गाडीचा धक्का लागला. दोघेहि खालीं पडले. त्यापैकीं एक आमचा कैदी बाळा देसाई याचा हात ट्रामखालीं सांपडला व मोडला. दुसरा इसम त्याच्या मारामुळें बेशुद्ध झाला. त्या दोघांना आम्हीं गोकुळदास हॉस्पिटलमध्यें नेलें. तेथें त्याचा हात कापून काढला. दुपारीं तो दुसरा मनुष्य शुद्धीवर आल्यानंतर आम्ही चौकशी केली. तेव्हां त्यांची नांवं आम्हांला कळलीं. हा बाळा देसाई आमचा आरोपी आहे. आज चार पांच वर्षें आम्ही ह्याच्या शोधांत आहोंत."

"पण तो दुसरा इसम कोण ? त्याचं नांव काय !"

"त्याचं नांव यशवंतराव अमृते आणि त्याच्याच सांगण्यावरून मी येथें चौकशीला आलों."

आपल्या दादाचें नांव ऐकून शांताबाईला काय वाटलें असेल ?—पण तिचा दादा ह्या मारामारींत कसा सांपडला ? गेल्या प्रकरणांत उल्लेख केलेल्या गोष्टी वाचकांना आठवत असतीलच. वसंतरावांनीं त्याला गाडींत नेऊन निजविल्यानंतर थोड्या वेळानें तो शुद्धीवर आला. आणि गाडींतून उतरून जाऊं लागला. गाडी-वानानें त्याला न जाण्याविषयीं पुष्कळ सांगितलें परंतु यशवंतराव तेथून निसट-

लाच! रस्त्यानें जात असतां अनेक विचार त्याच्या डोक्यांत खेळूं लागले. डॉक्टर कादंबरी म्हणजे जिचा आपण रिपोर्ट घेण्याकरितां गेलों तो कमलिनी असें त्याच्या दृष्टीस पडतांच त्याच्या छातींत धस्स झालें! टाईपरायटिंग मशीन चोरल्याबद्दलची त्याच्या मनांत भीति होतीच. त्या भीतीमुळें धस्स होतांच, सकाळींच घेतलेल्या दारूनें गरगर फिरणाऱ्या मस्तकाला एकदम भोंवळ आली आणि तो खालीं पडला. आपण अशा फाटक्या कपड्यांत कमलिनीच्या दृष्टीस पडलों म्हणून आतां कसें-सेंच वाटूं लागलें. त्यांतून आपण तिच्या अगदीं जवळ जाऊन बोललों त्यावेळीं आपल्या तोंडाची दारूची घाण तिला आली असेल हा विचार त्याच्या डोक्यांत येतांच त्याला स्वतःबद्दल अतिशयच शरम वाटली. आपली अशी स्थिति कशा-मुळें झाली, हाहि विचार हळुहळू त्याच्या डोक्यांत आला. आणि त्याच गोष्टीवर विचार करतां करतां आपल्या सर्व नाशाला आपणास प्रथम हें दारूचें आणि चोरीचें व्यसन लावण्याला मूळ, आपण ज्याला जिवाचा दोस्त समजत होतों, तो बाळा देसाई कारण झाला, असा विचार त्याच्या डोक्यांत यावयाला आणि समो-रून तोंड चुकवून जाणारा बाळा देसाई त्याच्या दृष्टीस पडायला एकच गांठ पडली त्याबरोबर यशवंतरावाचें डोकें भणाणलें. आतांच्या आतां त्या चांडाळाच्या नर-डीचा घोट घ्यावा, इतका त्याला एकाएकीं त्वेष चढला. आपल्या सबंध जन्माचें मातेरें करणारा आपला दुष्मन दृष्टीस पडतांच त्यांची मारामारी झाली यांत विशेष आश्चर्य नाहीं, बाळा देसाईहि नुकताच पोटाची कांहीतरी व्यवस्था लागावी म्हणून मुंबईत आला होता. आजपर्यंत चोऱ्यामाऱ्या करून त्यानें कसाबसा आपला निर्वाह केला, बहुतेक गांवीं आणि शहरीं त्याला उघड रीतीनें फिरण्याची चोरी झाली होती. शेवटीं अशा रीतीनें लपूनछपून वागण्याला कंटाळून त्यानें मुंबईचा रस्ता धरला. नांव गांव बदलून आणि चेहरेपट्टी बदलून तो दोन दिवस झाले मुंबईत फिरूं लागला होता. आपणास आतां कोणीहि ओळखणार नाहीं, असें त्याला वाटलें होतें परंतु यशवंतरावानें त्याचा भ्रम दूर केला. त्यानें जवळ येतांच चांडाळ बाळ्या, अगदीं वेळेवर माझ्या हातीं सांपडलास!' असें म्हणून देसाईची एक-दम गचांडी धरली. तेव्हां 'अहो महाराज आपण चुकतां! तुमची माझी ओळख नाहीं आणि हा असा अतिप्रसंग काय करतां?' असें त्यानें स्वर बदलून शांत-पणानें सांगण्याचा प्रयत्न केला. परंतु रागानें बेहोष झालेल्या यशवंतरावानें त्याची मान धरली होती ती सोडलीच नाहीं. शेवटीं सामोपचारानें कांहीं वळत नाहीं असें पाहून त्या दोघांची मारामारी जुंपलीच! रस्त्यानें जाणाऱ्या येणाऱ्यांनीं मध्यें पडून

ती झटापट मिटविली. तेव्हां पोक्तपणाचा आव घालून बाळा देसाई म्हणाला, "अहो, माझी ओळख ना देख! हा दारू प्यालेला मनुष्य एकदम माझ्या अंगावर धावून आला. पहा त्याच्या तोंडाला दारूची कशी घाण येते आहे ती!"

"ओळख ना देख काय बाळ्या चोरा! हीं नाटकीं सोंगं मला दाखवितोस काय? पण तुझी मी हड्डी नरम केल्याशिवाय रहात नाहीं—" असें म्हणून बाळा-देसाईच्या मागें तोहि ट्राममध्यें चढला. यशवंतरावानें आपणांस ओळखलें, हें तो समजून चुकला. आणि त्याला चुकविण्याकरितांच तो ट्राममध्यें चढला होता. पण ईर्षेला पेटलेला यशवंतराव त्याला तसा थोडाच जाऊं देणार? पुनः ट्राममध्यें त्यांची झटापट सुरू झाली. कंडक्टरानें ट्राममधून त्यांना उतरण्यास सांगितलें. आतां काय करावें, हा देसाईला मोठा प्रश्न पडला. उगाच हट्टाला पेटून जास्त भानगड केली तर आयतेंच पोलिसाच्या हातांत जाऊन पडूं. त्यापेक्षां यशवंतरा-वालाच समजावें म्हणून सामोपचारानें तो म्हणाला, "अरे यशवंत, तूं हा काय गोंधळ मांडला आहेस? अरे वेड्या, मी मुद्दाम तुझी थट्टा केली!"

"×× चोरा! माझी थट्टा केलीस कीं माझ्या जन्माचा खेळखंडोबा केलास तुझा खून केला तरी मला पाप लागणार नाहीं, समजलास?"

हा असा सामोपचारानें ऐकणार नाहीं, असें वाटून देसाईनें त्याला जोरानें ढक-ललें आणि ट्रामखालीं उडी टाकली. यशवंतरावानें चलाखी करून त्याच्या मागो-मग उडी टाकली. त्यामुळें परस्परांना धक्की लागून ते दोघेहि एकदम खालीं पडले. देसाईचा हात ट्रामच्या चाकाखालीं गेला. इकडे यशवंतराव जोरानें आद-ळल्यामुळें तोहि बेशुद्ध झाला. तात्काळ रस्त्यांत गर्दी जमली. पोलीसानें त्या दोघानाही गाडींत घालून हॉस्पिटलमध्यें नेलें. तेथें देसाईचा हात कापून काढला. दोनप्रहरीं यशवंतराव शुद्धिवर आल्यानंतर पोलीसच्या चौकशीला सुरवात झाली. आणि त्या चौकशीवरूनच आतां पंताच्या घरीं पोलीस आला होता. त्यानें सर्व हकीकत पंतांना सांगितल्यावर सर्व मंडळी हॉस्पिटलमध्यें जाण्याकरितां निघाली.

देसाईचा हात कापून काढल्यामुळें तो जवळ जवळ मृत्यूच्या द्वारींच पडला होता. अद्यापि तो शुद्धिवर आलेला नव्हता. त्याच्या जिविताविषयीं जशी डॉक्ट-राला खात्री देतां येत नव्हती, तशीच यशवंतरावाच्या जिविताविषयींहि खात्री देतां येत नव्हती. तो आतां शुद्धिवर आला होता. तरी त्या धक्क्यामुळें दारूच्या अतिरेकानें लाहोरला एकदां ऑपरेशन केलेला त्याचा लिव्हरचा रोग पुनः उद्भवला. त्याला आतां बसतांसुद्धां येत नव्हतें, इतक्या त्याला आंतून कळा

लागल्या होत्या. शांताबाई, कादंबरी, वसंतराव आणि पंत ही सर्व मंडळी हॉस्पिटलांत आल्यावर पंतांनीं हॉस्पिटलच्या डॉक्टराचा आणि आपल्या मुलीची ओळख करून दिली. त्या दोघांनीं मिळून पुनः त्या दोन्हीं रोग्यांना तपासलें. त्या वेळीं देसाईला वायू होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. डॉक्टरनें आणि डॉ. कादंबरीनें शक्य तितके प्रयत्न केले परंतु कांहीं इलाज झाला नाहीं तो बरा होऊन हॉस्पिटलच्या बाहेर पडल्यावर त्याला पापाचा झाडा देण्याकरितां पोलिसकचेरींत नेण्यासाठीं पोलिसाचे शिपाई हॉस्पिटलच्या दरवाजाजवळ पहारा करीत बसले होते. परंतु मध्यरात्रीच्या सुमारास त्यांना धक्का देऊन यमराजाच्या दूतांनीं बाळा देसाईला पळविलेंच !!!

× × × ×

"शांता, तूं अशी कशी ग अगदीं कच्चा मनाची ! वास्तविक तूं नर्सचं काम केलेलं आहेस ! असे प्रसंग अनुभविले आहेस. मग आतां असं कां ? त्यांतून काल त्या नेने मास्तराबरोबर तुझं वर्तन पाहून बाबांनीं तुझ्या धैर्याबद्दल गौरव केला होता, तो सर्वच व्यर्थ का ?

"नाहीं पण कमू. अगदीं खरं सांग ! तुला माझ्या गळ्याची शपथ आहे. माझ्या दादाची कांहीं जगण्याची आशा आहे का ? खरं सांग, तुला काय वाटतं तें सांग ?"

"हें पहा, असं भलतंच मला तूं विचारूं नकोस ! डॉक्टर लोक कधींहि निराश होत नाहींत. अखेरपर्यंत प्रयत्न करीत राहणें हें त्यांचें काम आहे. आतां यशवंतदादाबद्दल म्हणशील तर मी तुला इतकेंच सांगूं शकेन कीं, हें त्याचें लिव्हरचें दुसरें ऑपरेशन आहे. हें ऑपरेशन यशस्वी रीतीनें पार पडलं तर कांहींच भीति नाहीं."

"पण माझ्या दादाचं हें ऑपरेशन यशस्वी रीतीनें पार पडेल ना ? तुला कसं वाटतं ?" अत्यंत काकुळतीला येऊन शांताबाई विचारीत होती, "त्या मेल्या देसाईनें माझ्या दादाचा हा घात केला. माझ्या दादाच्या नाशाला तो चांडाळ कारण आहे. आतां मी तिकडच्या विचारानें किती तरी गोष्टी करण्याचं ठरविलं होतं. दादाचा शोध करून त्याला आपल्याजवळ ठेवायचं आणि हळु हळूं आम्हीं दोघांनीं प्रयत्न करून त्याला सुधारावयाचें ! माझा दादा मुळांत खरोखरीच फार चांगला माणूस होता. पण ह्या चांडाळाची संगत लागून तो असा बिघडला. त्याचं एकदां लग्न झालं असतं म्हणजे तो खात्रीनं सुधारला असता."

" होय शांता, तें सर्व कांहीं झालं असतं पण आतां त्याचा उपयोग काय ? ह्या पूर्वीच तूं म्हणतेस त्या सर्व गोष्टी व्हावयास पाहिजे होत्या. आतां तो जरी ह्या मोठ्या ऑपरेशनमधून वाचला, तरी हा रोग पुढें केव्हां दगा देईल हें सांगतां येत नाहीं.

" मग माझ्या दादाची आशा नाहींच ना ? "

कादंबरीनें तिला कोणत्या आधारावर आशा दाखवावी ? कारण पुढें काय होणार, हें तिला आतांच स्पष्ट दिसत होतें. परंतु शांताबाईचा धीर एकदम खचूं नये म्हणून उत्तराची टाळाटाळ करीत होती. वास्तविक शांताबाईलाहि ही गोष्ट कळत नव्हती असें नाहीं. परंतु तिचें बंधुप्रेम तिला आशा दाखवीत होतें. ती आतां कादंबरीबरोबर हॉस्पिटलमध्येंच जाण्याकरितां निघाली होती. कारण आज यशवंतरावाचें ऑपरेशन करण्याचें ठरलें होतें.

शेवटीं ठरल्यावेळीं यशवंतरावाचें ऑपरेशन झालें. त्यावेळीं सर्व मंडळी त्याच्या जवळच होती. कादंबरी स्वतः त्याचें नर्सींग करीत होती. ऑपरेशन यशस्वी रीतीनें पार पडलें. परंतु एका तासानें यशवंतरावाची शक्ति क्षीण होत चालली. डॉक्टरांनीं आपणाकडून कमालीची शिकस्त करून पाहिली. दंडांत औषधी पिचकाऱ्या मारल्या, कृत्रिम उपायांनी त्याचा श्वासोच्छ्वास चालू ठेवला; सर्व कांहीं केलें परंतु अखेर त्यांच्या वाट्यास अपयशच आलें ! ! !

शांताबाईच्या दुःखाला आतां पारावारच नव्हता. ती मुंबईत येतांना किती उल्हासानें आली होती. आपली बालमैत्रीण एम्. डी. होऊन आली आहे आतां तिला आपण चार दिवस आपल्याबरोबर भोर मुक्कामीं नेऊन आपला सुखाचा संसार दाखवूं आणि मध्यंतरी आपण वेड्या विचारांनीं बहकून केलेल्या गोष्टींची आठवण करून हास्यविनोदांत दिवस घालवूं असें तिनें कितीतरी बेत रचले होते. ते सर्व जागच्या जागीं राहून हा भलताच प्रकार उपस्थित झाला, त्यामुळें तिला कल्पनातीत दुःख झालें. त्यांत तिच्या अंतःकरणाला पीळ पाडणारी गोष्ट म्हणजे इतक्या वर्षांनीं दादाची गांठ पडूनहि, शेवटपर्यंत त्याच्याबरोबर तिला दोन शब्दहि बोलतां आले नाहींत. यशवंतरावाच्या निधनामुळें तिला सर्व बाजूंनीं शून्य वाटूं लागलें. आतां आपल्या मायेचें कोणी नाहीं, एक दादा होता तोहि गेला ह्या विचारानें तिला अगदीं पोरकेपणा आला.

---

# पित्याचा आशीर्वाद

गेल्या प्रकरणांत घडलेल्या गोष्टींना जवळ जवळ एक महिना लोटला. शांताबाई आपल्या पतीसह केव्हांच घरीं गेली होती. मधुचंद्र बॅरिस्टरहि कांहीं दिवस मुंबईस राहून आपल्या स्वदेशीं गेला होता. आतां कादंबरी घरीं एकटीच होती. आपण मुंबईंत येतांच हे असे चमत्कारिक प्रसंग उद्भवले, याबद्दल ती आज एकटीच विचार करीत बसली होती. यशवंतरावाच्या अकालीं मृत्युबद्दल तिला वाईट वाटत होतें, परंतु त्यांतल्या त्यांत शांताबाई आणि वसंतराव यांचें प्रेमाचें पुन्हा झालेलें मीलन पाहून तिला एक प्रकारचा आनंदहि होत होता. वसंतरावाबद्दल अगदीं प्रथमपासून तिच्या मनांत आदर होता. शांताबाईच्या मध्यंतरी बहकलेल्या विचारामुळें तिनें पतीशीं केलेल्या वर्तनाबद्दल ती विचार करीत असतां अनेक गोष्टी तिच्या मनांत येऊं लागल्या. आज आपण जी स्थिति अनुभवित आहोंत, ती स्थिति एका काळीं वसंतरावांनीं पूर्णपणें अनुभविली परंतु आज वसंतराव जी स्थिति अनुभवित आहोंत, ती स्थिति ह्यापुढें आपणांस कधीं तरी अनुभवितां येईल काय ? हा विचार तिच्या मनांत येतांच स्वपतीची मूर्ति तिच्या डोळयापुढें तात्काळ उभी राहिली. ह्यापूर्वी तिनें स्वपतीचें चिंतन केकवेळां केलें होतें. प्रत्येक वेळीं तिच्या डोळयापुढें एकच देखावा येत असे. आपण पतिगृहीं खोलींत समईजवळ बसून नलदमयंती आख्यानांतील एक हृदयद्रावक प्रसंग वाचीत आहोंत. इतक्यांत दरवाजा वाजला आणि आपण ' कोण आहे ? ' म्हणून विचारलें परंतु बाहेरून जबाब आला नाहीं. थोड्या वेळानें पुनः दरवाजा वाजला. आपण ' कोण ' म्हणून विचारणार तोंच दरवाजा उघडून पतीची स्वारी आंत आली आणि आपणाबरोबर एक शब्दहि न बोलतां, इतकेंच नव्हे तर आपणाकडे वर मान करून सुद्धां न पहातां तडक बिछान्यावर जाऊन निजली. हें चित्र तिच्या डोळयापुढें आल्यावर तिच्या विचारांना प्रत्येक वेळीं गति मिळत असे. पती दरवाजांतून आंत येतांच आपल्या छातींत धस्स झाल्यासारखें होऊन आपल्या सर्वांगाला कंप सुटला. त्यावेळीं आपण कोणती भावना अनुभवली ! त्या गोष्टीची ती सारखी आठवण करीत असे. परंतु अद्यापपर्यंत तिला त्या भावनेची कल्पनाच करतां आली नाहीं. अशा रितीनें आजहि विचार करकरून पतिसान्निध्याचें पुढलें चित्र तिच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें. आपले पति सर्वांगावरून पांघरूण घेऊन स्वस्थ निजले आहेत आणि आपण त्यांच्या

पायांजवळ कांहींएक हालचाल न करितां मुकाट्यानें बसून आहेत हा देखावा तिला दिसूं लागला. तो देखावा पाहण्यांतच ती तल्लिन झाली. पतीनें आपला त्याग कां केला याचें कारण तिला अद्यापि कळलें नव्हतें. आपल्या शिक्षणामुळें आपण डोईजड ही भीति वाटून आपल्या पतीनें आपला त्याग केला आहे असें अनुमान तिनें इतर मंडळीच्या बोलण्यावरून काढलें होतें परंतु त्या गोष्टीलाहीं महत्त्वच देत नव्हती. आपण इतकी विद्या संपादन केली आहे, याबद्दल चुकून सुद्धां तिच्या मनांत अभिमानाचा विचार कधींहि आला नव्हता. पति हें स्त्रीचें परम दैवत आहे ही जाणीव तिच्या अतःकरणांत पूर्णपणें खिळली होती, त्याच दृष्टीनें ती अद्यापिहि पतिविषयक गोष्टीचा विचार करीत असे. अलीकडे वसंतराव आणि शांताबाई ह्यांच्या सान्निध्यांत त्यांचें पतिपत्नी प्रेम पाहून तिच्याहि मनांत एक प्रकारचे अमूर्त विचार येऊं लागले होते. कालांतरानें वसंतराव जसे सुखी झाले, त्याचप्रमाणें आपणहि सुखी होऊं असेंही तिला वाटूं लागलें होतें. ह्या तिच्या विचाराला इतकें प्रोत्साहन मिळायला तिच्या आजोनें दिलेला आशीर्वादच कारण होता. बंदरावरून घरीं आल्यावर " अशीच पतीच्या घरीं यशस्वी होऊन सुखी होशील. " हा आजीचा आशीर्वाद तिच्या विचाराला हरघडीला उत्तेजित करीत होता. कारण आपल्या आजीचा आशीर्वाद केव्हांहि अन्यथा होणार नाहीं अशी तिची पूर्ण खात्री होती. अशाप्रकारचे विचार तिच्या मनांत येऊन गेल्या-वर योगायोगानें घडलेल्या एका गोष्टीवर तिचे विचार स्थिर होत असत. पतीची भेट होण्यापूर्वी आपण नलोपाख्यानांतील नलराजानें दमयंतीला टाकून दिल्याचा प्रसंग वाचत होतों आणि त्यापासून त्या प्रसंगाच्या वर्णनांत आपलें मन तन्मय झालें होतें. त्या गोष्टीचें तिला चांगलें स्मरण होतें. जो प्रसंग राणी दमयंतीवर आला तोच प्रसंग आपणावर यावयाचा होता म्हणूनच कीं काय आपण सहज पुस्तक उघडलें असतांना तेंच आख्यान आपल्यापुढें आलें ह्या योगायोगानें घडून आलेल्या गोष्टींचा जेव्हां जेव्हां ती विचार करी तेव्हां तेव्हां तिला अत्यंत आश्चर्य वाटे. आज देखील ती इतका वेळ इतर गोष्टींचा विचार करून नलविरहानें विव्हल होऊन पडलेल्या दमयंतीचा विचार करीत होती. आपणासहि तसाच पतिवियोग होणार आहे, हें सुचविण्याकरितांच कीं काय, आपण सहज पुस्तक उघडतांच तो प्रसंग आपल्या डोळ्यापुढें आला आणि तोच वाचण्यांत आपण तल्लिन होऊन गेलें होतें ! असें तिला वाटूं लागलें. भवितव्यतेच्या गोष्टी अशाच मार्गांनीं ईश्वर सुच-वीत असला पाहिजे, असें वाटून ती परमेश्वराच्या अतर्क्य लीलेचें कौतुक करीत

राहिली. मुंबईंत आल्यापासून आजच ती ह्या गोष्टीवर इतका वेळ विचार करीत एकटीच बसली होती. नाहींतर आई आणि आजी यांच्याजवळ बसून आपण विलायतेंत काय काय पाहिलें, तेथें कसें वागत होतों, तेथील मंडळी आपणाबरोबर कशी वागत होती, त्यांचे आचार विचार कसे आहेत, इत्यादि गोष्टी मोठ्या प्रेमानें आणि उल्हासानें सांगण्यांत तिचा वेळ जात असे. ती एम्. डी. होऊन आलेली कळतांच एक दोन संस्थानांतून तिला मोठ्या पगारावर बोलाविलें होतें. परंतु आतां आपल्या मुलीनें [illegible] दूर होऊं नये, अशी सुमतीबाईंची इच्छा होती. इतर डॉक्टरांप्रमाणें आपल्या मुलीनें घरींच दवाखाना उघडावा अशी तिची इच्छा होती, परंतु पंतांना ती गोष्ट पसंत नव्हती. एखादा दवाखाना उघडून त्या धंद्यावर आपल्या मुलीनें पैसा मिळवावा, ही गोष्ट मुळांतच त्यांना पटेना. त्यांना मोठा पगार होता. आणि त्या मानानें आतांपर्यंत त्यांच्याजवळ मायाहि बरीच झाली होती. आतां त्यांना कादंबरीच मुलाच्या ठिकाणीं होती' आणि ती त्यांच्या सर्व इस्टेटीला मालक होती. तेव्हां तिनें आपल्या पश्चात् कितीहि सढळ हातानें खर्च केला, तरी तिला पुरून उरेल, इतकें आपल्या संग्रहीं आहे, तेव्हां पैसा कमवावा ह्याच उद्देशानें डॉक्टरीचा धंदा करावा, हीं गोष्ट त्यांना रुचेना. ह्या गोष्टीबद्दल त्यांनीं आपल्या बऱ्याच मित्रमंडळींची सल्ला विचारली. आपल्या दक्षिणी स्त्रियांकरितां हॉस्पिटलची स्वतंत्र व्यवस्था नसल्यामुळें फार उणीव भासत आहे, करितां आपणच पुढें होऊन जर कांहीं खटपट केली, तर खात्रीनें सर्व गोष्टी जुळून येतील, असें वाटून त्यांनीं आपल्या इतर धनिक मित्रांजवळ त्याबद्दल गोष्ट काढली. तात्काळ ही त्यांची योजना सर्वांना मान्य झाली. इतकेंच नव्हे तर लाख दोन लाख रुपयापर्यंत मदत करण्यास कित्येक परोपकारी धनिक पुढें झाले. पुढें हीच गोष्ट त्यांनीं वसंतरावाजवळ काढून त्यांचें मत घेतलें. त्यांना तर ही गोष्ट फारच मानवली. ते म्हणाले, " बाबासाहेब आपण ही गोष्ट मनावर घ्याल तर सर्व गोष्टी अगदीं सहज जुळून येतील. कादंबरी एम्. डी. झालेली आहे. तिला मदतगार म्हणून आणखी दोन तीन लेडी डॉक्टर्स ठेवल्या तर हेंच हॉस्पिटल मोठ्या यशस्वी रीतीनें चालेल. मींहि वाटेल ती मदत करण्यास तयार आहें. आतां उगाच भोरला किंवा पुण्या मुंबईस राहून आळसांत दिवस घालविण्यापेक्षां अशा· परोपकारी संस्थेंत माझा जर कांहीं उपयोग झाला तर माझं आयुष्य सत्कर्मी लागलं असं होईल. शिवाय शांताहि नर्स पास आहे. तीहि मोठ्या आनंदानें कादंबरीला मदत करील इतकेंच नव्हे तर अशा कित्येक अना-

श्रित स्त्रियांना त्या हॉस्पिटलमध्यें त्यांचीहि उत्तम प्रकारें सोय होईल. अशी एखादी परोपकारी संस्था आपल्या दक्षिणीमंडळींत अवश्य पाहिजे. तेंच पहा, ही पारश्यांची लहानशी संस्था येथें असून स्वज्ञातीच्या कल्याणार्थ अशी कितीतरी निरनिराळ्या संस्था त्यांच्यांत आहेत. उगाच नाहीं ती जात इतक्या थोड्या काळांत पुढं आली. 'परोपकार' हेंच त्यांचें ब्रिदवाक्य असलं पाहिजे. नाहींतर आम्हीं ! माधुकरी मागायला एखादा विद्यार्थी आला तरी आमचे दरवाजे बंद करून घेतों. पण तेंच पारशांत पहा—एखादा तरी पारशी याचना करतांना दृष्टीस पडतो काय ? "

" खरं आहे ! त्यांनीं आपल्या जातीकरितां काय केलं नाहीं ? त्यांच्यांत धर्मशाळा आहेत, हॉस्पिटलें आहेत, शाळा आहेत; वाचनालयें आहेत, मोठमोठं स्वतंत्र फंड आहेत. सर्व कांहीं आहे. पण आमच्यांत एक तरी अशी परोपकाराची संस्था आहे काय ? जो तो स्वतःपुरतं पाहतो."

" आणि माझी खात्री आहे कीं, ह्या मुंबईत असेहि डॉक्टर मिळतील कीं, ते स्वखुशीनें असें एखादें हॉस्पिटल निघालें तर मोठ्या आनंदानें मदत करतील. "

" एकंदर माझा विचार तुम्हालाही पसंत पडला तर !"

" पसंत म्हणून काय विचारतां ? मी आणि शांता अशा संस्थेला आजन्म मदत करण्यास तयार आहोंत."

" ठीक आहे तर ! मी आतां ह्याच उद्योगाला लागतों."

पंतांनीं पुनः आपल्या सर्व धनिक मित्रांना विचारून त्यांचें मदतीबद्दल आश्वासन घेतलें. आणि सर्व तयारी झाल्यावर आपली योजना मुलीपुढें मांडण्याचा त्यांनीं विचार केला. आज ते घरीं आल्यावर कादंबरी एकटीच बसली आहे, असं पाहून त्यांनीं प्रथम इकडच्या तिकडच्या गोष्टी करून विचारलें—

" कमू तुला मी एकदोन गोष्टी विचारणार आहें. तूं विलायतेस असतांना कधीं रघुनाथाला पत्र लिहिलं होतंस काय ? " ह्या पंतांच्या प्रश्नाला कादंबरीनें मानेनें नकारार्थी उत्तर दिलें. तेव्हां पंत पुढें म्हणाले, " मी त्याला अद्यापि पत्र लिहिलें नाहीं, परंतु तूं आतां आली आहेस, तेव्हां ही गोष्ट त्याला कळावी म्हणून तूं एक पत्र ल्याहावेंस अशी माझी इच्छा आहे. वास्तविक पत्र लिहून त्याचा पुढें काय परीणाम होणार आहे, हें जरी आज ठरल्यासारखें आहे, तरी पत्र लिहिणं, हें आपलें कर्तव्य आहे. आतां ह्या गोष्टीचा तूं विचार कर आणि तुला जें योग्य

दिसेल त्याप्रमाणें वाग. आणि दुसरं असं कीं, पुष्कळ लोकांकडून मला सूचना आल्या आहेत, त्याप्रमाणें मलाहि असं वाटतं कीं, तूं फक्त स्त्रियांकरितांच येथें दवाखाना उघडावास. माझ्या कांहीं धनिक मित्रांनीं तूं एम्. डी. होऊन आलेली ऐकतांच दक्षिणी स्त्रियांकरितां एक हॉस्पिटल बांधावें अशी सूचना करून त्या कामीं वाटेल ती पैशांची मदत करण्यास आपण एका पायावर तयार आहोंत असेंहि आश्वासन दिलें आहे. मुंबईत खास दक्षिणी स्त्रियांकरितां अशी कोणतीहि सोय नाहीं, तेव्हां दवाखाना काढण्यापेक्षां ही माझ्या मित्रांची सूचना मला अधिक पसंत आहे. आज पांच पन्नास हजार रुपये खर्च करण्याइतकें माझें सामर्थ्य आहे. त्यांत माझ्या मित्रांचें साह्य होऊन हॉस्पिटलासारखी एखादी संस्था आपण काढली, तर तुझं नांव अजरामर होईल. एखादा दवाखाना उघडून त्यावर चरितार्थ चालवावा अशांतली तुझी गोष्ट नाहीं. मी हें सर्व मिळविलं आहे हें तुझंच आहे तेव्हां याहि गोष्टीचा तूं विचार करावास—अशी माझी इच्छा आहे. "

" बाबा, तुम्हीं सूचविलेल्या दोन्ही गोष्टींचा मी ह्या पूर्वीच विचार करून ठेविला आहे. परंतु आपल्या दोन्ही प्रश्नांचीं उत्तरें आपणापुढें कशीं मांडावीं हेंच मला कळत नाहीं. "

" कां बरं ! मी विचारलेल्या गोष्टी कांहीं भानगडीच्या किंवा गुंतागुंतीच्या आहेत असें नाहीं. दोन्ही गोष्टी अगदीं सरळ सरळ आहेत. "

" मग बाबा मीहि त्यांचीं सरळच उत्तरें देतें. तिकडे पत्र लिहिण्याची माझी इच्छा नाहीं आणि तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें इकडे एखादा दवाखाना किंवा हॉस्पिटलसारखी संस्था काढण्याचीहि माझी इच्छा नाहीं. "

हें कादंबरीचें उत्तर ऐकून पंत क्षणभर तिच्याकडे पाहातच राहिले. आपल्या दोन्ही प्रश्नाला नाहीं म्हणण्याचें मुलीचें धाडस पाहून ते प्रथम आश्चर्यचकित झाले. तिचें उत्तर अगदीं उद्धटपणाचें आहे, असेंच त्यांना वाटलें. आपली कमू आपल्या शब्दाबाहेर नाहीं अशी त्यांची पूर्ण खात्री पण हें उत्तर ऐकून पाश्चात्य शिक्षणाचा म्हणा किंवा त्या हवेचा तिच्यावर परिणाम झाला आहे, अशीहि त्यांच्या मनांत शंका आली. वास्तविक कमूला हॉस्पिटल काढण्याची आपली कल्पना ऐकून अत्यानंद होईल असेंच त्यांना प्रश्न विचारण्यापूर्वीं वाटलें होतें. परंतु तिनें शांतपणें ' इच्छा नाहीं, ' असें सरळ उत्तर दिलेलें ऐकून ' पोरी पाश्चात्य शिक्षणानें डोईजड झाली ' असें वाटलें, यांत आश्चर्य नाहीं.

" कमू, हें तुझं उत्तर ऐकून मला मोठें आश्चर्य वाटतं ! तूं हें उत्तर विचार केल्याशिवाय दिलें आहेस—"

" नाहीं बाबा. मी दिलेलं उत्तर पूर्ण विचार करूनच दिलं आहे."

" असशील! नवऱ्याला पत्र न लिहिण्याचं उत्तर कदाचित् पूर्ण विचार करून दिलं असशील. पण हॉस्पिटल काढण्याच्या प्रश्नाचं उत्तर खास विचार करून दिलेलं नाहींस. लाख पाऊण लाखाची इमारत आणि लाखाचं इतर साहित्य इतकी मदत स्वखुषीनें चालत येत असतां तूं ' नाहीं ' म्हणून उत्तर देतेस तेव्हां—"

" पण बाबा माझ्या इच्छा ' नाहीं ' ह्या उत्तरांत ' होय ' असा स्पष्ट अर्थ आहे. दवाखाना किंवा हॉस्पिटल उघडणें झालें तर तें इकडे उघडावें अशी माझी इच्छा नाहीं. आणि तें मी इकडे—ह्या मुंबईत कां उघडावं! ह्या मुंबईशीं माझा काय संबंध आहे? माझं घर हरिपुरास आहे. दवाखाना किंवा हॉस्पिटल उघडून मला द्रव्यसंचय कर्तव्य असेल, तर मात्र मुंबई हें एकच स्थान त्याला योग्य आहे. पण मला द्रव्यसंचय करणें नाहीं. मला तुम्ही इतका पाण्यासारखा पैसा खर्च करून जी विद्या दिली, तिचा उपयोग मी परोपकाराकडे करणार आहे. आणि तो परोपकार मी इकडे करण्यापेक्षां ज्या ठिकाणीं माझें घर आहे, ज्या घरीं माझा सर्व जन्म जाणार त्या गांवींच करणें माझें कर्तव्य नाहीं काय? माझ्या परोपकाराचा लाभ घेण्याचा हक्क जितका माझ्या सासरच्या गांवांतील मंडळींचा आहे तितका ह्या मुंबईचा नाहीं. शिवाय ह्या अफाट शहरांत असे परोपकारी महात्मे पुष्कळ आहेत."

कादंबरीनें आपलें सरळ मत अशा तऱ्हेनें पुढें मांडतांच पंत अगदीं निरुत्तर झाले.

ते कौतुकानं मुलीच्या मुखाकडे पहातच राहिले. त्यांना मुलीच्या ह्या उदात्त पोक्त आणि सात्त्विक विचारसरणीनें अगदीं शरमल्यासारखें झालें. आपण विचार-लेल्या प्रश्नांचें, वास्तविक आपल्या मुलीनें दिलेलें उत्तर पूर्ण विचारानेंच दिलेलें असतां आपणच उतावीळपणानें त्या उत्तराचा विचार न करतां भलतेच विचार मनांत आणले, असें आतां त्यांच्या लक्षांत आलें आणि त्यामुळेंच त्यांना खजील झाल्यासारखें झालें. पतीनें टाकल्यामुळें आपल्या मुलीच्या मनांत पतीविषयीं पूर्ण तिटकारा उत्पन्न झाला असेल, असेंच आतांपर्यंत त्यांना वाटत होतें. त्यांतून ती विलायतेंत स्त्री-स्वातंत्र्याच्या वातावरणांत राहून आलेली! परंतु पतिविषयींच नव्हे तर पति ज्या गांवीं राहतो, त्याच्या गांवकरी बंधूविषयींहि आपल्या मुलीच्या अंतःकरणांत इतका आदर आणि प्रेम वास करीत आहे, हें पाहून ते अगदीं

थक्क झाले ! वाचक हो ! गृह शिक्षणानें पतिव्रतेचें खरें कर्तव्य मनांत बिंबलेल्या आमच्या आर्यांगनांचे विचार किती सोज्वल असतात, याची कल्पना काडी मोड- ण्याचा कायदा पास करून घेण्याचा अट्टाहास करणाऱ्या आमच्या आधुनिक विद्वानांना कधीं होईल बरें !

" कमू धन्य-धन्य आहे तुझ्या पतीनिष्ठेची ! " असें म्हणून पंत एकदम उठले आणि त्यांनीं पितृवात्सल्यानें कादंबरीला आपल्या हृदयाशीं धरलें. रघूनें-तुझ्या पतीनें तुझें नांव टाकलें आहे. म्हणून तुझ्या मनांत त्याच्याविषयीं पूर्ण तिटकारा असेल, अशी माझी आतांपर्यंत समजूत होती. "

" असं कसं होईल बाबा ? त्यांनीं मला टाकलं-माझा तिरस्कार केला, तरी ते माझे पति आहेत हें मीं कसं विसरेन ? "

" शाबास ! कमू, हा तुझा दृढविश्वास-ही तुझी पतिभक्ति तुला सुखी करील, ही खात्री ठेव ! "

" माझी खात्री आहेच ! आणि आईचाहि मला तसा पूर्ण आशीर्वाद आहेच !"

" आणि माझाहि आहे. "

" मलाहि तोच पाहिजे. तुमचा इतका आशीर्वाद असल्यावर मला आणखी काय पाहिजे ? "

" आतां तुझी जशी इच्छा असेल तसं तूं कर ! तूं जें करशील तें चांगलेंच करशील यांत शंकाच नाहीं. तुला वाटेल तिकडे दवाखाना काढ किंवा हॉस्पिटल काढ; मी माझ्याकडून होईल तें करून तुझी इच्छा पूर्ण करीन. "

---

## ६........ सत्पात्रीं दान

डॉक्टर मंडळींत चर्चा सुरू झाली. आमची कथानायिका शहरांतील डॉक्ट- रांच्या चर्चेचा विषय बनली. कारण तिनें एका महिन्याच्या आंतच बऱ्याच डॉक्टरांना दहशत बसविली, त्यांच्या उत्पन्नावर गदा आणिली आणि त्यांची ' प्रॅक्टिस ' हि कमी केली. एका महिन्यांत कादंबरीची ' प्रॅक्टिस ' इतकी वाढली कीं, तिला दिवसाच्या सबंध चोवीस तासांत विश्रांति मिळेनाशीच झाली. सकाळीं अंगावर चढविलेले कपडे रात्रीं बारा वाजेपर्यंत देखील उतरविण्यास तिला फुरसत मिळेना. दरवाजावर गाड्या आणि मोटारी उभ्या नाहींत, असा एक क्षणहि जाईनासा झाला. हळुहळू गाड्यांची खेंचाखेंच जास्त

जास्त वाढूं लागली. ' व्हिजिटस ' करतां करतां कादंबरी अगदीं टेंकीस आली, इतक्या लवकर आपली इतकी प्रसिद्धि होईल. अशी तिला स्वप्नांतहि कल्पना झाली नव्हती. इतक्या थोड्या अवधींत तिची इतकी ' न भूतो न भविष्यति बोलबाला होण्याचें मुख्य कारण ती व्हिजिटबद्दल फी घेत नसे हेंच होय. परंतु त्याचा परिणाम भलताच झाला वास्तविक आपल्या विद्येचा लाभ गरीबांना व्हावा, हीच तिची मूळ इच्छा होती. परंतु गरिबांच्या ऐवजीं श्रीमंत लोकच त्याचा फायदा घेऊं लागले. आणि त्यामुळें भलतेंच काहूर उत्पन्न झालें. ' लंडन एम्. डी. झालेल्या डॉक्टर कादंबरीबाई व्हिजिटचे पैसे न घेतां रोग्यांना तपासतात,' जाहीर होतांच इतर डॉक्टरांची कूरकूर सुरू झाली. शेवटीं त्यांच्या धंद्यावर जेव्हां परिणाम होऊं लागला; तेव्हां कांहीं निवडक डॉक्टरांनीं एकमत करून पंतांची भेट घेतली. आणि आपलें गाऱ्हाणें केलें. पुष्कळच भवति न भवति होऊन ' आपल्या सारख्या लंडन ' एम्. डी. ' नीं जर फी घेतली नाहीं, तर मग आमच्या सारख्या ' एल्. एम्. ॲण्ड एस्. ' पास झालेल्या डॉक्टरांना कोण विचारणार ? आणि आम्हांला जर फीची कमाई होणार नाहीं, तर आमचं चालावं कसं ? आम्हांला फी शिवाय ह्या धंद्यांत दुसरी कोणती कमाई आहे ? आम्ही फी न घेतां जर रोग्यांना तपासून फक्त औषधच देऊं लागलों, तर मग आमच्यांत आणि औषधें विकणाऱ्या दुकानदारांत काय फरक राहिला ?' वगैरे बरीच माथा-फोड केल्यावर कादंबरीनें रोग्यांकडून फी घेण्याचें कबूल केलें. ' तुम्ही फी घेत जा. तुम्हाला स्वतःकरितां त्या फीच्या पैशाचा उपयोग करणें नसेल, तर कोणत्याहि सत्कार्याला त्या पैशाचा उपयोग करा. ' हा डॉक्टरांनीं सुचविलेला युक्तिवाद कादंबरीला पटला. इतकेंच नव्हे, तर ह्या युक्तिवादामुळें तिला जगाची खरी बाजूहि दिसूं लागली.

' जग कसें आहे ? हें जगांत मिसळल्याशिवाय कळत नाहीं,' असें म्हणतात. त्याचा अनुभव कादंबरीला येऊं लागला. साधुवृत्तीनें जगांत वागून निभाव लागत नाहीं, हेंहि तिच्या प्रत्ययास आलें. ती फी घेत नाहीं अशा समजुतीनें आज देखील तिला बोलविण्याकरितां बरीच मंडळी येऊन बसली होती. पंत दिवाणखान्यांत होते. त्यांनीं सहजिक बोलतां बोलतां आघल्या दिवशीं कांहीं डॉक्टरांनीं कादंबरीनें फी घेण्याविषयीं प्रकट केलेलें मत त्या मंडळींना सांगितलें. आणि आजपासून डॉक्टर कादंबरीनें व्हिजिटबद्दल फी घेण्याचें ठरविलें आहे, असें त्यांच्या कानावर घातलें, तेव्हां हळुहळू अर्ध्या तासाच्या आंतच दिवाणखान्यांत जमलेल्या मंडळी

पैकीं एकएकजण कांहीं निमित्त काढून जाऊं लागला, ' प्रथम आमच्याकडे चला, केस फारच ' सिरिअस ' आहे ' असें म्हणून कादंबरीला अगदीं सळो कीं पळो करून टाकणारी मंडळी बहुतेक सर्व कमी झाली. कादंबरी व्हिजिटकरितां जाण्यासाठीं तयार होऊन दिवाणखान्यांत आली, त्यावेळीं चारपांच मंडळी तेथें बसलेली होती. रोज तिला आपल्या घरीं नेण्याबद्दल मंडळींची सारखी चढाओढ लागत असे. पण आज तिला तसा कांहींच प्रकार दिसला नाहीं. आज आपणांस नेण्याकरितां इतकी कमी मंडळी कां याचें तिला आश्चर्य वाटलें. तिच्या मनाची स्थिति ओळखून पंत म्हणाले, ' मघां बरीच मंडळी आली होती. पण आजपासून रोग्यांना तपासण्याबद्दल तूं फी घेण्याचें ठरविलें आहेस असें मी मंडळींना कळवितांच बरीच मंडळी परत गेली—हें पाहिलंस ना ? हें असं आहे ! होईल तितकं फुकटांत काम करून घेण्याकडे मंडळींच्या मनाची कशी प्रवृत्ति असते ती ! ”

कादंबरीनें आपल्या वडिलांना उत्तर दिलें नाहीं. ती आलेल्या मंडळींबरोबर रोगी पाहण्यासाठीं निघाली. एका तासांत तिनें पांच रोगी तपासून फीचे शंभर रुपये खिशांत टाकले. परंतु तिच्या मनाला आनंद झाला नाहीं, आपण एका ' व्हिजिट ' बद्दल वीस रुपये घेतले, हा आपण जुलूम केला असेंच तिचें मन तिला सांगूं लागलें. आपण रोग्यांकडे गेलों, त्याला तपासलें, आणि रोगाची योग्य परीक्षा करून फक्त त्यावर औषध योजना केली. ह्या आपल्या मेहनतीबद्दल सर्वसाधारण जनतेच्या स्थितिकडे लक्ष देऊन आपण एम्. डी. म्हणून पांच रुपये फी घेणें योग्य होतें, असें तिला वाटूं लागलें. श्रीमंत आहेत, ते एकदम वीस रुपये देतात, पण ज्यांची महिना प्राप्ति तीस चाळीस रुपये असून घरांत कुटुंबाला दोनचार माणसें आहेत, अशा मनुष्यानें काय करावें, असाहि विचार तिच्या मनांत आला. आपण वीस रुपये घेतले, ते कशाबद्दल घेतले ? असा विचार पुनः पुनः तिच्या मनांत घोळूं लागला. ह्या पुनः पुनः उद्भवणाऱ्या विचारानें तिला समाधानकारक उत्तर मिळेना. आपण रोगी एकदम बरा केला असता तर एक गोष्ट निराळी ! पण तसें नाहीं. फक्त रोगपरीक्षा करून औषध योजना केली, इतकेंच ! ह्या रोगपरिक्षेकरितां वीस रुपये घेतले कीं, इंग्रजी औषधांची शिफारस करून दलाली म्हणून वीस रुपये घेतले, हें कोडें तिला सुटेना, ह्या विचारांत तिची गाडी घराजवळ येऊन उभी राहिली, तों पलीकडे दुसरी उभी होतीच !

रोग्याला तपासल्याबद्दल फी घेण्याची सुरवात करून आज पहिला दिवस ! ह्या एका दिवसांतील आमच्या कथानायिकेला मिळालेला जगाचा अनुभव आणि त्यावर तिचे विचार वाचकांच्या पुढें ठेऊन आपण पुढें चालूं !

पुनः रोग्याला पाहण्याकरितां कादंबरीला नेण्याकरितां आलेली ती गाडी नवीच असून घोडाहि मोठा उमदा होता. गाडीवानाचा आणि घोड्याबरोबर धांवणाऱ्या साईसचा पोषाख एकसारखा आणि ठाकठिकीचा होता. त्यावरून आपण कोणातरी श्रीमंत रोग्याकडे जात आहोंत अशी कादंबरीनें कल्पना केली. आणि ती तिची कल्पना खरी होती. गर्भश्रीमंताचें तें घर होतें. बागेच्या दरवाजाजवळ गाडी उभी राहतांच झटकन् एक शिपाई पुढें येऊन त्यानें गाडीचा दरवाजा उघडला. कादंबरी खालीं उतरून इमारतीचा गोल जिना चढूं लागली. पायऱ्यांवरून सुंभाच्या विणलेल्या पट्ट्या ठोकल्या होत्या. त्यामुळें जिना चढत असतांना बिलकूल आवाज होत नव्हता. कादंबरी वर गेली त्यावेळीं दरवाजांत एक बाई उभी होती. आणि आंतून तिच्या बरोबर कोणी रागानें बोलत असलेले शब्द कादंबरीला स्पष्ट ऐकूं आले.

" मदत घ्यावयाची मग दोन धक्के पडले म्हणून कुरकुरूं नये. जा—आतां कांहीं मिळायचं नाहीं. आम्ही गडबडींत आहोंत. जा—"

ती बाई त्यावर कांहीं उत्तर देणार इतक्यांत वर चढून आलेली कादंबरी तिच्या दृष्टीस पडली. त्याबरोबर चटकन् ती बाई कोपऱ्यांत झाली. कादंबरीनें तिच्याकडे पाहिलें. तिनें एका दृष्टीक्षेपांत त्या बाईच्या चर्येवरून सर्व गोष्टी जाणल्या आणि आंत जातां जातां ती त्या बाईकडे वळून म्हणाली, " बाई, थोडा वेळ थांबा. मी आंतून येतें. मग आपण बोलूं. मला तुमच्या बरोबर बोलायचं आहे. "

कादंबरीनें दिवाणखान्यांत पाय ठेवतांच तेथील ऐश्वर्य तिच्या दृष्टीस पडलें. जमिनीवर सुंदर गालीचा पसरला असून प्रत्येक कोपऱ्यांत स्फटिकाचे 'कॉर्नर्स' असून त्यावर चिनी कोंड्या ठेवल्या होत्या. मध्यभागीं मोठें टेबल असून सभोंवतीं स्प्रिंगच्या कोचा ठेवलेल्या होत्या. विजेचे चित्रविचित्र दिवे आणि पंखे यांनीं वरील छत सुशोभित केलें होतें. कादंबरी आंत येतांच दिवाणखान्यांतील मंडळी गडबडीनें उठली. त्यांची एकच धांदल झाल्यासारखी दिसली. कादंबरीनें रोगी कुठें आहे म्हणून विचारलें. तेव्हां तिला काय उत्तर द्यावें, हेंच त्यांना कळेना. शेवटीं आंत आहे—आपण कृपा करून जरा वेळ बसा—' असें गोंधळलेलें उत्तर तिला मिळालें. ज्या गृहस्थानें तिला उत्तर दिलें, तोच गृहस्थ थोड्या वेळानें पुढें झाला आणि दरवाजाजवळ उभी असलेल्या बाईला हलकेंच पण रागांत म्हणाला, " का—अद्यापि का तुम्ही थांबला आहांत ? एकदां सांगितलं तुम्हाला कीं आतां आमच्या घरांत गडबड आहे. तुम्हाला धर्म करतों म्हणून ही सक्ति

वाटतं ?—जा—आजपासून तुमची मदत बंद केली ! तुमच्यासारख्यांना धर्म करूनच हें कर्म लागलं आमच्या मागं !—जा—"

हें सर्व भाषण कादंबरीला स्पष्ट ऐकूं आलें. तिनें पुनः एकदां त्या बाईकडे पाहिलें तेव्हां ती कादंबरीकडे पहात केविलवाण्या स्वरांत म्हणाली, "मला त्यांनीं थांबायला सांगितलं आहे; म्हणून मी उभी आहें."

"आपलं कांहीं काम आहे का ह्या बाईबरोबर ?" असा प्रश्न त्या गृहस्थानें विचारला, इतक्यांत आंतून एक ब्राह्मण बाहेर आला. आणि जमिनीवर अंथरलेल्या गालिच्याजवळ उभा राहून म्हणाला. "महाराज, हा गालिचा जरा बाजूला ओढून घ्या. मला त्या दरवाजाजवळ जावयाचें आहे."

त्या गृहस्थानें चटकन् पुढें होऊन गालिचा एका बाजूला सारला. आणि ब्राह्मणाला जाण्याकरितां वाट तयार केली. त्या ब्राह्मणानें तोंडावर आणि अंगावर भस्माचे पट्टे ओढले असून त्याच्या हातांत एक तांब्या होता. त्या तांब्यासभोंवतीं कुंकूं लावलेलें कच्चें सूत गुंडाळलेलें होतें. दरवाजाजवळ येतांच त्यानें हातांतील तांब्या खालीं ठेवला. आणि तोंडानें कांहीं पुटपुटत त्या तांब्यासभोंवतीं गुंडाळलेलें सूत सोडून तें दरवाजांत आडवें बांधलें. कादंबरी हा सर्व प्रकार पहात होती. ब्राह्मणांनें हें काय केलें, याचा तिला कांहींच बोध होईना. ती त्या ब्राह्मणाकडे पहातच राहिली. तिच्या मनांतून ह्या गोष्टीचा उलगडा व्हावा, असें होतें. म्हणूनच कीं काय तो ब्राह्मण त्या गृहस्थाला म्हणाला, "महाराज, मी ह्या दरवाजाचें बंधन करून टाकलें आहे. आतां मृत्यूला आंत येणें शक्य नाहीं."

ब्राह्मणानें आत्मप्रौढीनें काढलेल्या ह्या उद्गाराचा कादंबरीला खरोखरीच कांहीं बोध झाला नाहीं. ती त्या गृहस्थाकडे पाहूं लागली, तेव्हां तो गृहस्थ म्हणाला, हीं—हीं—आज समाप्ति झाली. हा घरांत आजार चालला आहे म्हणून मृत्युंजय होमाचा सप्ता केला होता. तो आज पूर्ण झाला. आहे आपला जुना समज तो—"

इतक्यांत डॉक्टर कादंबरीला रोग्याजवळ नेण्याकरितां आंतून दूसरा एक गृहस्थ बाहेर आला. त्याच्याबरोबर कादंबरी आंत जाऊं लागली. परंतु त्या ब्राह्मणानें दरवाजाला बांधलेल्या दोऱ्यावर तिच्या डोक्यांत विचार चालला होता. 'मृत्यु वाटेनें चालत आपल्या घरीं येत आहे, हें कळल्यावरून त्या मृत्युनें आंत येऊं नये म्हणून ह्या मंडळींनीं होम केला आणि त्याचें बंधन केलें,' हें त्या पाहिलेल्या प्रकारावर विचार करतांच तिच्या डोक्यानें स्पष्टीकरण केलें. मंडळीच्या ह्या अंध विश्वासाच्या भोळ्या कल्पनेबद्दल तिला कौतुक वाटलें. आणि क्षणभर ती स्वतः-

शींच हांसली. इतक्यांत तिच्या मनांत दुसरा विचार येऊन ती बाजूला वळून त्या गृहस्थाला म्हणाली, " तुम्ही घरांत होम केला, त्याला फार खर्च झाला असेल बरं?"

" आतांपर्यंत ह्या सात दिवसांत अडिचशेंपासून तिनशेंपर्यंत खर्च झाला. आज समाप्ति झाली, आतां ब्राह्मणभोजन घातलें म्हणजे झालं ! "

कादंबरी रोग्याच्या खोलींत आली. तेथें चोहोंकडे दृष्टि फिरवितांच त्या खोलींतहि नुकताच कांहीं तरी धार्मिक विधि झाला असावा असें तिला वाटलें. परंतु त्याकडे दुर्लक्ष करून कादंबरी रोग्याच्या जवळ एका खुर्चीवर बसली. रोगी अठ्ठावीस तीस वर्षांची स्त्री होती. बाळंत होऊन तिला एकच महिना झाला होता. आणि आज चार दिवस तिला वायु होऊन ती बेभाम स्थितींत होती. आधल्या दिवसापर्यंत आठ दहा लहान मोठे डॉक्टर येऊन गेले. आज डॉक्टर कादंबरीला बोलाविलें होतें. ह्या डॉक्टरी उपायाशिवाय मंत्रतंत्र याचेहि उपचार चालू होते. शिवाय यज्ञसत्र सुरू होता. परंतु कोणत्याहि उपायांनीं रोग्याला आराम न पडतां दिवसेंदिवस रोग अधिक बळावत चालला होता. कादंबरी रोग्याजवळ बसल्यानंतर तिनें क्षणभर रोग्याच्या बाह्य स्थितीकडे लक्ष्यपूर्वक अवलोकन केलें आणि विचारलें, " माझ्यापूर्वी येऊन गेलेल्या डॉक्टरांनीं ट्रीटमेंटबद्दल कांहीं विशेष गोष्ट आपल्याला सांगितली होती काय ? "

" कांहीं विशेष सांगितलं नव्हतं. फक्त हालचाल देऊं होऊं नका, उठवूं नका, वेळच्यावेळीं औषध द्या वगैरे मामुली गोष्टी सांगितल्या होत्या . "

" त्याप्रमाणें तुम्ही करीत आलेले दिसत नाहीं. रोग्याला हलवूं नको असें सांगितलें असतांना तुम्ही आज रोग्याला विशेष श्रम दिलेले स्पष्ट दिसत आहे. आणि ह्या श्रमाचा परिणाम आतां काय होईल हें सांगणें मला कठीण आहे. "

" आम्ही तसे विशेष श्रम पडूं दिले नाहींत. आज आतां तें तीर्थ द्यायचं होतं म्हणून अगदीं सांभाळून खालीं पाटावर बसविलं आणि पुन्हां तसंच बिछान्यावर बसविलें. "

" ते तितके श्रम रोग्याला जास्त झाले ! " असें अर्धवट बोलत कादंबरीनें रोग्याला तपासण्यास सुरवात केली. पंधरा वीस मिनिटें तिनें रोग्याला मननपूर्वक तपासलें आणि कांहींएक न बोलतां ती उठून बाहेरच्या दिवाणखान्यांत गेली. तिच्या मागून मंडळीहि दिवाणखान्यांत गेली. कादंबरी आतां काय सांगते आणि कोणतें औषध लिहून देते, याकडे त्यांचें लक्ष लागलें. परंतु रोग्याबद्दल तिलाच निराशा वाटत असल्यामुळें ती मंडळींना काय सांगणार ? बऱ्याच वेळानें तिनें कागदावर कांहीं औषधें लिहून दिलीं. आणि उठतां उठतां ती म्हणाली, " हें

दिलेलें औषध आतां आणवून द्या. रोग्याची ‘ कंडिशन ’ फार वाईट आहे. ”

“ पण आपणास काय दिसतं ? ”

“ केस ‘ होपलेस ’ आहे ! ” कादंबरीनें अगदीं स्पष्ट मत दिलें आणि ती उठली. दरवाजाजवळ येतांना ती पुनः क्षणभर थांबली. जातां जातांना आपली फी आपल्या हातांत पडेल असें तिला वाटलें. परंतु तिनें फी घेण्याचा कायदा पास केला आहे, हें त्या मंडळींना अद्यापि कळलें नव्हतें. आपण ह्या पेशन्टला पाहिल्याबद्दल फी घेऊं नये असा विचार, रोग्याची ती शोचनीय अवस्था पाहून तिच्या मनांत आला. परंतु जातांना उभी असलेली ती बाई दृष्टीस पडतांच पुनः तिचा विचार बदलला. ती बाई मदतीकरितां आली असतां तिच्या बरोबर ह्या मंडळींनीं किती कठोर वर्तन केलें, हें तिनें पाहिलेंच होतें. अशा निर्दय माणसांवर दया करणें म्हणजे दयेचा गुन्हा करणें होय. त्यांतून ते गरीब असते तर कदाचित् विचार करण्यास जागा तरी होती. तरी तसेंहि नाहीं ! चांगले श्रीमंत ! अशा मंडळीकडून पैसे घेणेंच योग्य असें ठरवून तिनें आपल्या फीच्या रुपयांची मागणी केली. मंडळींना थोडें आश्चर्य वाटलें. परंतु उघड बोलतां येईना. आपण फी घेत नाहीं या समजुतीवरच ही मंडळी आहेत, हें कादंबरीच्या लक्षांत आलें परंतु ती कांहींच बोलली नाहीं. ती दरवाजाजवळ तशीच गप्प उभी राहिली. थोड्या वेळानें आंतून एकानें फीचे रुपये आणून तिच्या स्वाधीन केले. ते रुपये तसेच कादंबरीनें हात पुढें करून इतका वेळ दरवाजांत उभी असलेल्या बाईपुढें केले.

“ घ्या बाई. हे रुपये मदत म्हणून तुम्हाला देतें, हे घ्या. आजपासून ह्या घरांतून तुमची मदत बंद झाली म्हणून मी ही मदत करीत आहें ” इतकें बोलून कादंबरी मागें वळून त्या मंडळींना म्हणाली, “ अशा सत्पात्रीं दानाची किंमत आपणांस माहित नाहीं, ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. धर्म करून कर्म मागें लागत नाहीं. तर उलट कर्म सरतं ! आपण मृत्यूला बंधन करण्याकरितां दोन तीनशें रुपये खर्च करून दरवाजाला हें सूत बांधून डॉक्टराची सक्त ताकित असतांहि रोग्याला श्रम देऊन जो अव्यापारेषु व्यापार केलांत त्यापेक्षां ह्या बाईला मदत करून तिच्या प्रसन्न झालेल्या आत्म्याचा आशीर्वाद मिळविला असता तर तेंच मृत्यूला खरें खरें बंधन झालें असतें ! ” इतकें बोलून कादंबरीनें त्या बाईला आपणाबरोबर येण्यास सांगितलें. आपल्या बोलण्याचा त्या मंडळीवर काय परिणाम झाला हें तिला कळलें नाहीं आणि कळून घेण्याची तिची इच्छाहि नव्हती.

" आपण बिलकुल वाईट वाटून घेऊं नका. आपली मदत बंद झाली ही गोष्ट वाईट झाली, हें मी कबूल करते, पण अशा ठिकाणाहून जी मदत आपणास मिळत असे, त्यापेक्षां कमी मदत कोणी संतोषानें आपणास केली तर ती माझ्या मतें अधिक चांगली ! आपणास ह्या मंडळीकडून काय मदत मिळत असे ? "

" दरमहा पांच रुपये ! आणि ते देखील चारपांच हेलपाटे घातल्यावर मिळत असत. "

" म्हणजे एका धक्याला एक रुपया असा हिशोब आला !—वाहारे भूतदया !— बरं मला आपली हकीकत सांगाल का ? "

" माझी हकीकत ती काय असणार ?—आज तीन वर्षें झालीं, मी ही अशी निराश्रित झालेली आहें. पदरीं लहान लहान तीन मुलं आहेत. माहेरच्या बाजूनं मला माझं म्हणायला कोणी नाहीं. सासरच्या बाजूनें एक दूरचा दीर आहे पण तो कांहीं थारा देत नाहीं. "

कादंबरीचा आणि त्या बाईचा इतका संवाद होईपर्यंत गाडी घराजवळ येऊन उभी राहिली. तो रजेचा दिवस असल्यामुळें पंत आज घरींच होते. आपल्या मुलीला आज इतक्या लवकर आलेलें पाहून ते म्हणाले, फीचा प्रश्न उपस्थित केला त्यामुळें आज लवकर सुटका झालेली दिसते. निदान वेळेवर जेवण तरी मिळेल. नाहींतर तूं केव्हां येशील अशी मला काळजी पडली होती. "

" बाबा , आज मी फी घेण्याचं ठरविलं, हें अतिशय उत्तम केलं, असं मला आतां वाटूं लागलं आहे. जग हें स्वार्थानें कसं ओतप्रोत भरलं आहे. आणि फुकाच्या मोठेपणाला कसं हपापलेलं आहे हें मला आज कळलं. फी न घेतां परोपकार होतो, हें माझं मन आज चुकीचं ठरून फी घेऊनच परोपकार होतो हें माझ्या आज लक्षांत आलं ! " इतकें बोलून कादंबरीनें आपल्याबरोबर आलेल्या बाईची हकीकत आपल्या पूज्य वडिलांना सांगितली. त्यावर पंतांनीं थोडी चौकशी करून म्हटलें, " आपणाला जी कांहीं योग्य मदत लागेल ती आपण मजकडून घेऊन जात जा. आणि पुढें मुलांच्या शिक्षणाबद्दलहि मी योग्य ती सोय करून देईन. राहण्याबद्दल जर कांहीं अडचण असेल तर आमच्या घरीं येऊन रहा. घर मोठें आहे, कुठेंहि तुमची व्यवस्था सहज होईल. तुमच्या मुलांचीं वयें काय आहेत ! "

" मोठा मुलगा तेरा वर्षांचा आहे. दुसरा नऊ आणि तिसरा आहे पांच वर्षांचा. मोठ्याला ठेवला आहे चहाच्या दुकानांत. "

" ह्या चहाच्या हॉटेलांनीं आमचा सर्वस्वी घात केला. "

" होय. तुमचा म्हणजे तुमच्या देशाचा घात केला असला, तरी आज ह्या बाईंना तो आधार आहे. बाई तुमच्या मुलाला त्या दुकानांत काय मिळतं ? " कादंबरीनें विचारलें.

" जेवून पांच रुपये मिळतात' त्यामुळें त्यांचें पोट सुटून त्या पांच रुपयांत आणि मला मिळणाऱ्या पांच सात रुपयांत मी कसातरी गुजारा करतें. "

आज आपणास कादंबरीच्या रूपांत प्रत्यक्ष जगन्माता भेटली असें त्या बाईला वाटलें. तिनें मुलांना घेऊन येण्याचें कबूल केलें. असो. त्या दिवशीं सायंकाळीं आमच्या कथानायिकेला एकदांच व्हिजिटला जावें लागलें. रात्रीं पुनः नित्यनियमाप्रमाणें सर्व मंडळी दिवाणखान्यांत गप्पागोष्टी करीत असतां कादंबरी म्हणाली, " बाबा थोड्या दिवसांपूर्वीं तुम्ही हॉस्पिटलची एक कल्पना काढली होती, तशीच दुसरी एक कल्पना आज सकाळपासून माझ्या मनांत घोळंत आहे. ह्या मुंबईंत कितीतरी लक्षाधीश आहेत. त्यांनीं ह्या गोरगरिबांच्या औषध पाण्याची कांहींतरी व्यवस्था करणें अवश्य आहे. "

" तशी व्यवस्था आहे. ठिकठिकाणीं धर्मार्थ दवाखाने आहेत. म्युनिसिपालिटीचे दवाखाने आहेत. शाळा आहेत. तसेंच प्रत्येक गिरणींतूनहि दवाखाने आहेत."

" ते आहेत, त्याबद्दल मी नाहीं म्हणत ! मी निराळ्याच प्रकारानें विचार करीत आहें. आज आपल्या हिंदुस्थानांत लहान मोठे संस्थानिक शंभर अधिक असतील. सर्वांत मोठीं संस्थानें म्हणजे बडोदा, म्हैसूर, ग्वाल्हेर अशीं आहेत. आणि लहान संस्थानें म्हणजे पंतसचीव, पटवर्धन, घोरपडे अशीं वार्षिक लाख दिड लाखाच्या उत्पन्नाचीं बरींच आहेत. ह्या संस्थानिकांनीं आपल्या प्रजेच्या सुखसोई केल्या आहेत, तशा येथील धनिकांना कां करतां येऊं नयेत ? एखाद्या लहानशा संस्थानांतील सर्व लोकसंख्या ह्या मुंबईंतील चार चाळींतील लोकसंख्ये बरोबर होईल. ह्या टोपीवाल्याच्याच चाळी घ्या. सर्व चाळी मिळून तें एक लहानसें संस्थानच आहे. उत्पन्नाच्या दृष्टीनें कदाचित संस्थानिकापेक्षांहि ह्यांचें उत्पन्न अधिक असेल. हे चाळवाले म्हणजे त्या दृष्टीनें पाहतां त्या चाळीरूपी संस्थानांचे संस्थानाधिपति नव्हत काय ? त्यांना हे भाडेकरी आपल्या प्रजेप्रमाणें का वाटत नाहींत ? भाडं उकलण्यापलीकडे यांना कांहीं दिसूंच नये काय ? "

" खरं आहे. कमू, तूं म्हणतेस तें खरं आहे! तुझ्या दृष्टीनें विचार केला तर आमच्या मुंबईतील प्रत्येक चाळीच्या मालकाला पुष्कळ गोष्टी अधिकारानें करतां येण्यासारख्या आहेत. ह्या लहान छोटेखानी संस्थानिकांचें मासिक उत्पन्न आणि मुंबईतील चाळवाल्यांचें मासिक उत्पन्न सारखेंच किंबहुना जास्तच असेल. त्यांनीं आपल्या चाळींतील बिऱ्हाडकरूंच्या सुखसोयी का पाहूं नयेत? उलट भाडेकऱ्यांना सरसहा त्रासच सोसावा लागतो. वास्तविक विचार केला तर प्रत्येक मालकानें आपल्या बिऱ्हाडकरूंकरितां एक दवाखाना ठेवला पाहिजे. रोज सकाळीं डॉक्टरानें सर्व चाळींतून एक फेरी मारावी. त्याबद्दल त्याला मालकानें मासिक वेतन ठरविलेलें असावें आणि औषधाकरितां फक्त दवाखान्याचा खर्च भागवितां येईल इतकीच किंमत घ्यावी. तसेंच किराणा मालाचें दुकान, तसेंच धान्याचें दुकान, अशीं दुकानें ठेवून आपल्या चाळींत राहणाऱ्या गरीब बिऱ्हाडकरूंच्या सुखसोयी जर मालक पाहूं लागतील, तर त्यांना सर्वजण किती मानूं लागेल. त्यांच्या एका शब्दाकरितां चाळींतील सर्व लोक एकजुटीनें आणि प्रेमानें वाटेल तें करण्यास कंबर बांधतील. परंतु कमू, तसं कोठून होणार! ह्या मुंबईत बिऱ्हाडकरूंना किती त्रास आणि दुःख काढावं लागत असेल, याची कल्पना आपणास होणें कठीण आहे. स्मालकाजकोर्टांत भाड्याबद्दल रोज दहापांच खटले नाहींत, असें नाहीं."

" पण, बाबा, एखादी स्वतंत्र संस्था स्थापन होऊन ह्या मुंबईत जितके म्हणून घरधनि आहेत, त्यांना एकत्र करून ह्या प्रश्नांचा आस्थेनें आणि खऱ्याकळकळीनें विचार केला तर कांहीं होणार नाहीं काय? देशावर काय किं कोंकणांत काय, एखादा जमिनदार आपल्या कुळाच्या कल्याणाचा विचार करतो. कुळं आहेत म्हणूनच आम्ही जमिनदार आहोंत, अशी त्यांची कल्पना झालेली असते, तसेंच बिऱ्हाडकरू आहेत म्हणूनच आम्ही घरधनी आहोत अशी ह्या मुंबईच्या धनिकांना का कल्पना होऊं नये?"

इतक्यांत आंतून सुमतीबाई आली. आजपासून आपल्या मुलीनें फीचे पैसे घेण्याचें ठरविलें आहे, हें कळल्यापासून तिला बरें वाटलें नाहीं. साहजिकच आहे. सुमतीबाईचें मन म्हणजे पवित्रतेची खाण! आपल्या मुलीचें मन तयार करण्याकरितां तिनें किती श्रम घेतले होते, हें वाचकांना अवगत आहेच. कादंबरीबद्दल तिला किती विश्वास वाटत असे याबद्दल दुसऱ्या भागांत उल्लेख केलाच आहे. असा तिला विश्वास वाटत असल्यामुळें आजपासून आपली मुलगी रोग्यांना

तपासण्याकरितां फी घेणार, असें ऐकल्यापासून तिला घरांतील कामधंदा देखील सुचला नाहीं. मुलीला स्वस्थपणें विचारून एकदां स्पष्ट खुलासा करून घ्यावा, आणि आपल्या मनाला लागलेली तळमळ सांगून पुनः रोगी तपासण्याबद्दल फीचे पैसे न घेण्याविषयीं तिच्याकडून कबूल करून घ्यावें, असें तिच्या मनांत होतें. ती दिवाणखान्यांत आली, त्यावेळीं वर लिहिलेल्या गोष्टी चाललेल्या ऐकून आपणास विषय काढण्यास योग्य समय आहे असें वाटून ती म्हणाली " आज सकाळपासून मला कांहीं सुचेनासें झालें आहे. असं का झालं, हें कळतच नाहीं. पण कमू, आजपासून तूं हें काय आरंभलं आहेस ? मी केव्हांपासून विचार करतें—"

" कां—कसला विचार करतां ? " विनोदानें पंतांनीं मध्येंच विचारलें.

" आणि मी काय ग आरंभलं आहे आई ? "

" तुला इथं पैशाची वाण कां भासूं लागली ? "

" मला पैशाची वाण ?—कोण सांगतं ? "

" मग आज फीचे पैसे घेण्याचं कां आरंभलंस ? "

" मी स्वखुशीनें का आई आज फी घेतली ?—काल ती डॉक्टरमंडळी आली होती, ती तूं पाहिलीस ना ? त्यांच्याकरितां ही फी घेणं भाग पडलं. नाहींतर खरं म्हणशील तर मला खरोखरीच हे फीचे पैसे नकोत ! "

" मग बाई हे फीचे रुपये आपणाला खरोखरीच नकोत ! "

" नकोत, तर मी तरी कुठें घेणार आहे ? उलट आई, ही फी घेऊं लागलें पण मला एका दिवसांत कितीतरी गोष्टी कळल्या. आणि त्यावरून मला आतां असं वाटूं लागलं आहे कीं फी घेणं हेंच चांगलं ! "

" काय ?—फी घेणं चांगलं ! कमू, काय म्हणतेस तूं ? "

" आई, तुला आश्चर्य वाटूं देऊं नकोस !—हें चांगलं कसं तें सांगतें ! " असें म्हणून कादंबरीनें आपला एका दिवसांत जगाचा मिळालेला अनुभव आपल्य आईला नीट समजावून सांगितला. तेव्हां तिलाहि आपल्या मुलीचें म्हणणें मान्य करणें भाग पडलें. आपली मुलगी सरसहा फीचे पैसे न घेतां रोग्यांना तपासते, हा ती यथायोग्य परोपकार करते, असें जें सुमतीबाईला इतके दिवस वाटत होतें, ते तिचे विचार आतां बदलले. इतकेंच नव्हे तर आज मिळालेल्या फींत आपल्या मुलीनें एका बाईला पैसे देऊन जो परोपकार केला, तो खराच परोपकार अशी तिची खात्री झाली. आणि त्या आनंदांत तिनें आपल्या लाडक्या कमूला प्रेमानें

पोटाशीं धरून अंतःकरणापासून धन्यवाद दिले. इतक्यांत तिला कांहीं आठवण होऊन ती एकदम म्हणाली, " कमू, तें पत्र कुणाचं आलं आहे ?—वाचलंस का ?"

" कोणतं पत्र आई ? मी बाहेर गेलें असतां कां आलं ?" असें म्हणून कादंबरी झटकन उठून आपल्या खोलींत गेली. सकाळीं जेव्हां तें पत्र आलें, त्यावेळीं बाहेरच्या ओटीवर सुमतीबाई होती. तें पत्र कुणाचें असावें, म्हणून तिनें बराच वेळ विचार केला. परंतु तिचा विचार तिला काय सांगणार ? शेवटीं एकाएकीं तिच्या मनांत एक कल्पना आली. आणि त्या कल्पनेंत खरोखरीच स्त्रीच्या मनोराज्याचा एक नमुनेदार मासला होता. पत्र कुणाचें असेल, असा विचार करतां करतां तें पत्र आपल्या जांवईबुवाकडूनच आलें असावें, अशी शेवटीं तिनें स्वतःची कल्पना केली. आपली बायको विलायतेंत जाऊन मोठी परीक्षा देऊन आली आहे असें कळलें असल्यावरूनच त्यांनीं हें पत्र लिहिलें असावें अथवा तिची क्षमा मागण्याकरितां हें पत्र लिहिलें असावें, अशा एकामागून एक कल्पना येऊन त्यांचें एक काहूर माजलें. त्या विचारांत फीच्या विचारानें बराच गोंधळ उडविला होता. पण आतां त्या विचाराचा फैसला होतांच दुसरा विचार पुढें आला. कादंबरी पत्र आणून वाचूं लागली. आणि सुमतीबाई तिच्या चर्येकडे कितीतरी आतुरतेनें पहात होती. क्षणभरानें पत्र वाचतां वाचतां कादंबरीच्या चर्येवर हास्य विलसूं लागलें. तेव्हां तिला राहवेना. तिनें एकदम विचारलें, " कोणाचं पत्र कमूं ?"

" वसंतरावाचं !"

" अस्सं—का—!"

" कां बरं ?—आई, वसंतरावाचं पत्र आलं म्हणून तुला इतकं निराश का वाटलं ?"

" नाहीं म्हटलं—!"—असें अडखळतच सुमतीबाईनें उत्तर दिलें.

" नाहीं पण तुला वाईट वाटलं इतकी गोष्ट खरी ! तूं ' अस्सं का !' हे शब्द कसे अगदीं हताश होऊन उच्चारलेस !" पंत म्हणाले.

" हताश होऊन नाहींत. पण मला वाटलं कीं, हें पत्र हरिपुराहून जांवईबुवाकडून आलं आहे."

" ओ—हो—! जांवईबुवाकडून पत्र ! तुझी अशी कल्पना झाली होती का !—मग अद्यापि तूं रघुनाथाला ओळखलं नाहींस हेंच खरं !" पंतांनीं उत्तर दिलें.

आपल्या वडिलांच्या उद्गारावर कादंबरीनें फक्त एक निश्वास सोडला. कारण पंतांचा प्रत्येक शब्द अगदीं खरा होता. आपल्या पतीकडून आपणांस पत्र येईल, अशी तिनें केव्हांहि अपेक्षा केली नव्हती. विलायतेस जातांना तिनें स्वमतानें पण वडिलांच्या इच्छेनुरूप एक दोन पत्रें लिहिलीं होतीं. तीं पत्रें तशींच रघुनाथाकडून परत आलीं. त्यानंतर आजपर्यंत तिनें किंवा पंतांनीं रघुनाथाला पत्र लिहिलें नाहीं. किंवा आपल्या जांवयाबद्दल अगर आपल्या बहिणीबद्दल त्यांनीं चुकूनहि चौकशी केली नाहीं. ह्या जन्मांत आपल्या मुलीला पतिसुख नाहीं, अशी त्यांची खात्री झाली होती. पण प्रत्यक्ष कादंबरीला काय वाटत होतें ? आपणांस ह्या जन्मीं पतिसुख मिळणार नाहीं, अशी तिनेंहि आपल्या मनाची कल्पना करून घेतली होती काय ? आणि अशी जर तिनें कल्पना करून घेतली असेल तर मग म्हाताऱ्या आजीनें दिलेल्या आशीर्वादाची काय वाट ?

" नसेल ओळखलं !—सुमतीबाई पुढें म्हणाली, " ते तुमचे भाचे आहेत, तेव्हां तुम्हालाच जास्त ओळखतां येईल !—पण कमू, त्या पत्रांत वसंतराव काय म्हणतात ? "

" शांतीचं बाळंतपण जवळ आलं आहे; करितां वसंतरावांनीं मला बोलाविलं आहे. "

" असं का ?—शांता इथं आली होती, त्यावेळीं मला वाटलंच तसं ! होवो—पोरीची हातीपायी नीट सुटका होवो म्हणजे झालं ! "

" म्हणूनच डॉक्टर या नात्यानं त्यांनीं मला भोरला बोलाविलं आहे. आणि येण्याजाण्याचा खर्च, शिवाय फीहि देणार आहेत." असें म्हणून कादंबरी आपल्या वडिलांकडे वळून म्हणाली " मग बाबा, मी जाऊं का शांतीच्या बाळंतपणाकरितां भोरला ? "

" अवश्य ! "

" आणि तेथून मी पुढें सासरीं जाईन."

" काय !–सासरीं ? "

" होय आई. मी सासरीं जाण्याचा निश्चय ठरविला आहे, आणखी किती दिवस मी माहेरीं राहायचं ? "

" राहायचं नाहीं खरं, पण–पण—! "

" पण कांहीं आई. मी सासरीं जाणार. तुमचा मला आशीर्वाद आहे, आतां मला कसलीच काळजी वाटत नाहीं. मी सासरीं जाणार ! "

कादंबरीकडे दोघेंहि आश्चर्यचकित मुद्रेनें पहात राहिलीं. ‘ मी सासरीं जाणार ’ ह्या तिच्या वाक्यांत पूर्ण निश्चय दिसत होता. परंतु ती जाऊन करणार काय ? तिच्या पतीनें—रघुनाथानें तिला घरांत घेतलें पाहिजे ना ? तो हट्टी, मूर्ख आणि एककली आहे, याचा त्यांना चांगला अनुभव आला होता. तो आतां ह्यापुढें आपणाला वळेल अशी त्यांना आशाच नव्हती. आपली मुलगी गेली आणि त्यानें पुनः डोकें फिरवून तिला घरांत थारा न देतां घालवून दिलें तर आपला आणि मुलीचा होणारा अपमान आपणाला सहन होणार नाहीं, हा विचार त्यांच्या डोक्यांत येऊन ते म्हणाले, “ तूं जाणार म्हणतेस पण पुढल्या गोष्टींचा नीट विचार केला आहेसना ? आज चार वर्षांत तिकडची कांहींच खबर कळलेली नाहीं. हल्लीं तेथील वातावरण कसं आहे, रघूचा स्वभाव कांहीं बदलला आहे काय, तो तुला अगांतुक गेलं असतां घरांत घेईल, किंवा पूर्वीप्रमाणेंच मूर्खासारखें वर्तन करील वगैरे कोणत्याहि गोष्टींचा आपणास अंदाज करतां येणार नाहीं. म्हणून म्हणतों, कीं तूं जाण्याबद्दल म्हणत आहेस, पण नीट विचार कर. ”

“ बाबा, मी त्या सर्व गोष्टींचा पूर्ण विचार केला आहे. मी पुढें काय काय गोष्टी करावयाच्या ठरविल्या आहेत त्या सांगतें—”

“ पण तसं करण्यापूर्वी एकदां जांवईबुवांना पत्र लिहा. आणि त्यांचं उत्तर आलं कीं मग जाण्याचं ठरवा.” सुमतीबाई म्हणाली.

“ पत्र लिहून तो थोडंच उत्तर देणार ? ”

“ तें कांहीं नाहीं आई ! मी सासरीं जाणार ! माझा निश्चय झाला आहे. मी सासरीं जाणार ! ”

---

## ८........ भोरचा वृत्तांत

“ कमू ! ” म्हणून आजीनें हांक मारलेली ऐकूं आली. त्याबरोबर कादंबरी उठून बाहेर गेली तेव्हां सुमतीबाई आपल्या पतीला म्हणाली, “ अलीकडे आठ दिवस झाले, कमू सासरीं जाण्याबद्दल बोलत आहे. सासूबाईहि तसंच म्हणतात. त्या म्हणतात कीं मीच कमूला घेऊन सांगलीस जातें आणि मग त्या रघ्याचा तमाशा पहातें.”

“ ह्या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आई गेली तरी तो ऐकेल असं नाहीं मला वाटत.”

" मग कमूला एकटंच कसं पाठवायचं बाई ? "

" कां ?—एकटं पाठवायला तुला भिति कां वाटूं लागली ? आणि विलायतेला ती एकटी गेली तेव्हां नाहीं वाटली भीती ? जाऊं दे, तिचा निश्चय झाला आहे, तर तिला जाऊं दे. सासरीं जाण्याबद्दल तिनें कांहीं तरी विचार योजला असे-लच ! " इतक्यांत कादंबरी आणि आजी आंत येतांना पाहून पंत पुढें म्हणाले, " आई, तूं जाणार का ? "

" कुठं जाऊं बाबा मी ! " आजीनें हेल काढून विचारलें.

" कुठें म्हणजे ? अग, तूं नातीबरोबर जाणार म्हणून ही सांगते. "

" जाऊं नको तर काय करूं ? तुम्ही सर्व स्वस्थ बसलां आहांत. तुम्हाला पोरीच्या सुखाची कांहीं काळजी आहे का ?—मग मी नको जाऊं तर काय करूं ? तिनें संसारसुख केव्हां पाहायचं ?—"

" पण आजी त्याची नको तुला काळजी ! मी एकटीच जाणार आहे. आज वसंतरावांचं पत्र आलं आहे. तेव्हां शांतीच्या बाळंतपणाकरितां प्रथम भोरला जाऊन मग मी पुढें जाण्याचं ठरविलं आहे. "

" छे ग बाई ! एकटी कुठं जाणार तूं ? "

" कां बरं ? मग मला एकटीला विलायतेला कसं जाऊं दिलंस आजी ? "

" विलायतेची गोष्ट निराळी ! "

" खरं खरं ? अगदीं खरं आई ! " हांसत हांसत पंत म्हणाले. " विलायतची गोष्ट विलायती असंच ना आई ? "

ह्या विनोदावर पंत आणि कादंबरी हांसत असतां राधाबाई आपल्या तीन मुलांना घेऊन आली. सकाळीं तिला कादंबरीनें आपल्या फीच्या आलेल्या रुप-यांची मदत करून जिला उपकारबद्ध केलें होतें; तीच ही राधाबाई पंतांच्या सांगण्याप्रमाणें आपल्या मुलांसह त्यांच्या घरीं आश्रयाला आली होती. वाचक हो येथें आपण राधाबाईची ओळख करून घेऊं या. तिचा मोठा मुलगा हरि एका चहाच्या हॉटेलांत नोकरीला होता. आणि राधाबाई आपल्या धाकट्या दोन मुलांसह एका गृहस्थाकडे स्वयंपाकाला होती, त्या घरांतहि दोन मुलें होतीं, त्या मुलांचें आणि राधाबाईच्या मुलांचें एक घटकाभरहि पटत नसे. बोलून चालून मुलेंच तीं ! पण त्यांतल्या त्यांत मालकाचीं मुलें लाडामुळें शेफारलेलीं व हट्टी होतीं. हर घडीला तीं मुलें राधाबाईचा धाकटा मुलगा कृष्णा याची कुचाळी काढून त्याला रडवीत किंवा मारीत असत. मधला मुलगा नारायण नऊ वर्षांचा

होता. परंतु त्याला घरांत एखाद्या नोकराप्रमाणें सर्व दिवस राबावें लागे. अशा ह्या दुःखाला बिचारी राधाबाई कंटाळली होती. परंतु काय करणार ? मुलांसह रात्रंदिवस काबाडकष्ट करूनहि तिला मालकाकडून किंवा मालकिणीकडून कधीं सुखाचा शब्द मिळत नसे. परंतु आज तिला ईश्वर सहाय्यकारी झाला. पंतांनीं आपल्या घरीं तिला आश्रयाला बोलविलें, इतकेंच नव्हे तर मुलांच्या शिक्षणाबद्दलहि तिला आश्वासन दिलें. तिला आज कितीं आनंद झाला होता. तिनें लगेच आपल्या मालकिणीला सांगितलें. परंतु ' घरांतील सर्व काम आणि रात्रीचा स्वयंपाक झाल्याशिवाय तुम्हांला जातां येणार नाहीं. असें आयत्या वेळीं तुम्हीं नोकरी सोडून कसें चालेल ? ' वगैरे बरीच धुसपुस झाली ! शेवटीं रात्रीं नऊ वाजतां राधाबाई आपल्या मुलांना घेऊन बाहेर पडली. तिचा मोठा मुलगा गिरगांवांत ज्या चहाच्या दुकानीं होता, तेथेंच तो रहात असे. त्याला बरोबर घेण्याकरितां ती त्या दुकानाजवळ आली परंतु हरि त्यावेळीं दुकानांत नव्हता. त्या चहाच्या हॉटेलजवळ आर्य समाज होता. हरीचा मराठी चार इयत्तेपर्यंत अभ्यास झालेला होता. आणि त्याला पुढें शिकण्याची फार इच्छा होती. परंतु गृहस्थितीमुळें त्याला ही नोकरी धरणं भाग पडलें. एके दिवशीं आर्यसमाजांत कांहीं समारंभ होता. आणि त्याकरितां कॉफि पुरविण्याचें काम त्या हॉटेलकडे आलें. समारंभ चालू असतां हरि आणि हॉटेलांतील दुसरे दोन नोकर कपबशा आणि कॉफीचें भांडें घेऊन तेथें गेले. त्यावेळीं व्यासपिठावर उभा राहून एक वक्ता हिंदी भाषेमध्यें भाषण करीत होता. हरि दरवाजांत उभा राहून तें भाषण ऐकत राहिला. हळुंहळूं वक्त्याचे हातवारे, भाषेचा जोरदारपणा आणि विषयांतील गोडी ह्या तिन्ही गोष्टींचा हरीच्या मनावर परिणाम झाला. आणि त्या दिवसापासून हरीला आर्यसमाजांत जाण्याची गोडी लागली. तो प्रत्येक रविवारीं नियमानें आपल्या मालकाकडून दोन तासांची रजा काढून आर्यसमाजांत जावूं लागला. त्याप्रमाणें आजहि तो तेथें गेला होता. आपला मुलगा दर रविवारीं आर्यसमाजांत जात असतो, ही गोष्ट राधाबाईला माहीत नव्हती. ती दुकानाच्या बाहेर मुलाची वाट पहात रस्त्यांतच उभी होती. तेथें बाजूला उभें राहून तिला हॉटेलांत जाणाऱ्या येणाऱ्यांची गर्दी अगदीं स्पष्ट दिसत होती. ती अशी रस्त्यावर उभी असलेली पाहून कित्येकजण तिला खेटूनसुद्धां गेले, तर कित्येक जातां जातां तिच्याकडे पाहून घोड्यासारखें खिंकाळलेहि परंतु राधाबाईचें लक्ष त्यावेळीं दुसरीकडे वेधलें होतें. अशा नीच वृत्तीच्या माणसांकडे तिनें वर डोळा करून पाहिलें देखील नाहीं. आजपासून आपली गृहदशा

बदलली, आपल्या मुलांचा सासुरवास चुकला, आणि आपणांस चांगला आश्रय मिळाला ह्या आनंदाच्या विचारांत ती दंग होती. आपला मुलगा केव्हां दृष्टीस पडतो आणि आपण त्याला ही आनंदाची बातमी केव्हां सांगतों असें तिला झालें होतें. बराच वेळ झाला. दुकानांत तिला हरि दिसेना. कदाचित् तो आंत कांहीं कामामध्यें गुंतलेला असेल असें तिला वाटलें. व ती दुकानाकडे सारखें लक्ष देऊन पहात राहिली. हॉटेलांत चहापान करण्याकरितां जाणाऱ्या मंडळी आणि आंतून बाहेर पडणाऱ्या लोकांची दाटी सारखी सुरू होती. बऱ्याच वेळानें त्या लोकांकडे तिचें लक्ष वेधलें. ती वेळ म्हणजे रात्रीच्या जेवणाची ! कित्येक घरचीं जेवणें झालेलीं व कित्येक घरचीं जेवणें होण्याची ती वेळ ! अशा वेळीं हॉटेलांत जाणाऱ्या त्या मंडळीकडे पाहून तिला स्वाभाविकच आश्चर्य वाटलें. हॉटेलांत चहा, चिवडा आणि भज्यांचा फराळ केल्यावर ही मंडळी घरीं काय जेवीत असतील, असा प्रश्न तिच्या मनांत उद्भवला. आणि त्या प्रश्नावर ती विचार करूं लागली. घरच्या सुग्रास अन्नाला मंडळी नांवें कां ठेवतात, याचें कारण आतां तिच्या लक्षांत आलें. बाहेर अद्वातद्वा खाऊन पोट भरल्यावर घरीं नांवाला पानावर बसायचें आणि घरच्या बायकांनीं मन लावून केलेल्या अन्नाला, ' आमटी पाण्यासारखी झाली ' ' भाजीला चवच नाहीं, ' अशीं व्यर्थ नांवें ठेऊन रागानें पानावरून उठायचें, हा प्रकार बहुतेक घरोघरीं कां घडतो, ह्या प्रश्नांचा आतां तिला उलगडा झाला. वास्तविक घरच्या जेवणाची वेळ असतांना असें बाहेर हॉटेलांत खाण्याची काय आवश्यकता आहे ?

आवश्यकता नाहीं, ही गोष्ट कोणीहि कबूल करील. पण चटावलेली जीभ थोडीच ऐकत आहे ! गरम गरम भज्यावर चहाचा एक घुटका घेण्याकरितां ती सारखी वळवळत असते. परंतु त्या ' टेस्ट ' दार लागणाऱ्या भज्याबरोबर पोटांत काय जातें, याचा कोण विचार करतो ? आमच्या दोन अट्टल चहाबाज मित्रांनीं अलीकडे हॉटेलांत न जाण्याची शपथ घेतली आहे, असें आम्हाला कळल्यावरून आम्ही मुद्दाम त्यांना बोलावून विचारलें. त्यांनीं जो स्वतःचा अनुभव सांगितला तो येथें नमूद केल्यास अप्रासंगिक होणार नाहीं, अशी आमची खात्री आहे. आमचे दोन्ही मित्र म्हणजे पट्टीचे चहाबाज ! सबंध दिवसांत पांच पंचवीस कप म्हणजे त्यांना कांहींच वाटत नसे. सकाळीं जेवून कचेरींत जातां जातां वाटेंत भेटणाऱ्या एक दोन हॉटेलांना एक ' सिंगल कपा ' करितां तरी त्यांची भेट व्हायचीच ! परन्तु आतां मात्र त्यांनीं हॉटेलांत न जाण्याची अगदीं शपथ घेतली

आहे. आणि ती शपथ ते आजन्म पाळतील अशी आम्हाला खात्री आहे. कारण त्या शपथेला कारण तसें घडलें. आमचे चहाबाज मित्र चहाबरोबर कधीं चिवडा, तर कधीं भजीं किंवा उसळ घेत असत. एकदां उसळ खातांना कांहीं चमत्कारिक चव लागूं लागली. बशींत नीट निरखून पाहूं लागतां जिन्यासारखे कांहीं काळे तुकडे दिसले. प्रथम तें जिरेंच आहे, असें वाटून त्यांनीं थोडी उसळ चावलीच! पण जिभेला उसळीची चव लागेना म्हणून पुनः लक्षपूर्वक पाहिलें तों बशींत उंदराच्या लेंड्या!—अरेरे! थूं थूं करीत आणि हॉटेलच्या मालकाच्या तीन पिढ्यांचा उद्धार करीत स्वारी बाहेर पडली! तीच स्थिति दुसऱ्या मित्राची झाली. कढईत तळत असलेलीं भजीं पाहून स्वारीनें दोन पैशांचीं भजीं मागविलीं. त्यांपैकीं एक गरम गरम भजें त्यांनीं तोंडांत टाकलें. चावतांना तर अगदीं लज्जतदार खुस-खुशींत लागलें, पण लगेंच जिभेला निराळीच चव लागली म्हणून त्यांनीं अर्धे चावलेलें भजें तोंडांतून बाहेर काढलें आणि पाहिलें तों काय? चण्याच्या पिठांत कालविलेलें व तळून निघालेलें झुरळ! आपण झुरळ खाल्लें असें कळतांच स्वारीच्या पोटांत वादळ सुरू होऊन ओकतां ओकतां पोटांतील आंतडीं बाहेर येतात कीं काय अशी इतरांना भीति पडली! असा प्रकार हॉटेलांत अनुभविल्यावर घेतलेली शपथ ते कधीं तरी मोडतील काय?

अशा रीतीनें रोज हॉटेलांत जाऊन व्यर्थ आठ चार आण्यांचा खर्च करून प्रकृति बिघडवून घेण्यापेक्षां तेच पैसे घरांत खर्च करून एखादा सुंदर पदार्थ घरींच तयार केला तर तो आपल्या मुलांबाळांसह सर्वांना मिळून घरांतील आनंद अनु-भवितां नाहीं का येणार? पण हॉटेलच्या चहा चिवड्याला चटावलेल्या आमच्या मंडळींच्या डोक्यांत हा विचार येईल तेव्हां ना? घरांत दोन पैशांची एखादी भाजी जास्त आणावयास सांगितली तर 'खर्च जास्त होतो' म्हणून ओरड करणारी मंडळी सहज हॉटेलांत गेली तर एका बैठकीलाच आठ बारा आणे फस्त करतात! अशा मंडळींच्या तोंडांत वर वर्णन केल्याप्रमाणें एखादें झुरळ जाईल, तर त्यांचा हॉटेलप्रित्यर्थ महिना दहा बारा रुपयांचा होणारा खर्च वांचेल अशी आमची खात्री आहे. ह्या दहाबारा रुपयांत घरांत कितीतरी पक्कान्नें करतां येतील, याचा चहाबाज मंडळी कधींतरी विचार करतात कां? असो.

इतका वेळ वाट पाहून हरि दिसेना तेव्हां पुढें होऊन त्याची चौकशी करावी असा विचार राधाबाईच्या मनांत आला. आज हरीला नेहमीं पेक्षां जरा जास्त उशीर झाला होता. कारण आज आर्य समाजांत झालेलें व्याख्यान तसेंच परिणाम-

कारक होतें. आर्य समाजाचे हिंदुस्थानांत फिरणारे प्रचारक दयानंद स्वामी यांचें आज व्याख्यान झालें. त्यांचा विषय फार मोठा गहन होता असें नाहीं, परमेश्वर दयाळू आहे ' ह्या एका वाक्यावर त्यांनीं दोन तास भाषण करून श्रोत्याचीं मनें हलविलीं होतीं. आर्य समाजांत येणारे कित्येक नास्तिक होते परंतु त्यांनींहि माना डोलाविल्या मग आमचा हरि तर कोवळया मनांचा ! त्याच्या मनावर स्वामीजींच्या भाषणाचा किती तरी परिणाम झाला असेल ? ' संकटपरंपरा ही कृतकर्मानुसार आहे. तरी देखील त्यांत परमेश्वराची कसोटी असते. अशा संकटपरंपरेंत परमेश्वरावरील दृढ विश्वासच कृतकर्माचा क्षय करतो ' हें एकच वाक्य हरीच्या मनावर पूर्णपणें बिंबलें आणि त्याच विचारांत तो परत दुकानांत येत होता. आपला परमेश्वरावर पूर्ण विश्वास आहे; असें त्याचें मन त्याला सांगत होतें. अर्थात आपला विश्वास आपल्या कृतकर्माचा क्षय करून लवकरच आपणास सुखाचे दिवस दाखवील ह्या विचारांत तो येत असतां रस्त्याच्या कडेला उभी असलेली त्याची आई त्याला दिसली. त्याबरोबर तो झटकन् तिच्या बाजूला झाला आणि म्हणाला, " काय आई, तूं का इकडे आलीस ? "

" हरि, बाळा असा घाबरूं नकोस ! मी कधीं न येणारी पण आज अशा वेळीं इकडे आलें, म्हणून तुला चमत्कारिक वाटलं आहे. पण बाळ, मी तुला फार मोठी आनंदाची गोष्ट सांगण्याकरितां आलें आहे. वास्तविक मी दुपारींच यावयाची पण आज घरांत इतकं काम निघालं कीं, आज सबंध दिवसांत मला पळभरहि विश्रांति मिळाली नाहीं. आजपासून मी नोकरी सोडणार असं घरांत सांगतांच काकूंनीं ह्या वेळपर्यंत माझ्याकडून सर्व काम करून घेतलं आणि आतां मला सोडलं. "

" आई, नोकरी कां सोडणार ? "

राधाबाईनें सकाळीं घडलेला सर्व प्रकार आपल्या मुलाला थोडक्यांत सांगितला. डॉक्टर कादंबरीनें आपल्या आईला अशी मदत केली, तिच्या वडिलांनीं आपणांस आश्रय दिला वगैरे गोष्टी ऐकल्यावर हरि म्हणाला, " आई, आतां मी आर्य समाजांत व्याख्यानाकरितां गेलों होतों, तेथें दयानंद स्वामींचें भाषण झालें. त्यांनींहि असेंच सांगितलें. परमेश्वर हा अत्यंत दयाळु आहे तो जें कांहीं करतो, तें आपल्या बऱ्याकरितां करितो; मात्र आपण त्या दयाळु परमेश्वरावर अढळ विश्वास ठेवला पाहिजे. "

" अगदीं खरी गोष्ट आहे हरि ! " राधाबाई म्हणाली. " परमेश्वर खरोख-

रीच न्यायी आणि दयाळु आहे. आपणावर संकटें येऊं लागलीं म्हणजे आपल्या नबळ्या मनांत त्या जगच्चालकाविषयीं गैरविश्वास उत्पन्न होऊं लागतो. परंतु आपण चुकतों तें इथंच! आपणावर येणारीं संकटें किंवा दुःखें हीं ईश्वर पाठवीत नसून तीं आपल्या कर्मांचीं फळें असतात. पण आपल्या अज्ञानामुळं हं गूढ आपणांस कळत नाहीं, आणि आपण ईश्वराला दोष देऊं लागतों. मी आज इतकीं वर्षें कष्ट काढीत आहे. पण चुकून सुद्धां माझ्या मनांत ईश्वराविषयीं गैरविचार आला नाहीं. आज आपणांस हा जो सोन्याचा दिवस उगवला आहे, याचें जर कांहीं कारण असेल, तर तें ईश्वरावरील माझा दृढ विश्वास हेंच होय."

"आई, माझाहि त्या दयाळु ईश्वरावर दृढ विश्वास आहे." हरीनें उल्हासानें उत्तर दिलें.

"बाळा, असाच विश्वास ठेव म्हणजे तूं सुखी होशील. बरं पण चल आतां. डॉक्टरीणबाईंचे वडील आपली वाट पहात असतील. चल लवकर. आपल्या मालकाची रजा घेऊन आतां लवकर चल. तोंपर्यंत मी धाकट्या दोघांना घेऊन येतें."

"आई, थांब मी मालकाची रजा घेतों पण ते मला अशा अगांतुक रीतीनं रजा देतील काय? मी त्यांना इथं घेऊन येतों. तूंच सांग?"

"पण माझा त्यांच्याबरोबर बोलण्याचा कधींहि प्रसंग नाहीं."

"मग थांब तर! मी जाऊन विचारून येतों." असें म्हणून हरि आपल्या दुकानांत गेला. आणि मालकाला त्यानें सर्व हकीकत सांगितली. आपल्या दुकानांत दोन वर्षें अत्यंत सचोटीनें घालविलेल्या मुलाचें कल्याण होत आहे हें ऐकून मालकाला आनंद झाला. त्यानें मोठ्या आनंदानें त्याचा पगार देऊन त्याला रजा दिली आणि 'केव्हांहि काम लागल्यास प्रथम माझ्याकडे ये' असेंहि त्याला बजावलें. मालकाचा हा प्रेमळ आणि उदार स्वभाव पाहून राधाबाईला खरोखरच आनंद झाला. ती म्हणाली "हरि, जगांत तुझ्या मालकासारखीं कांहीं दयाळु माणसं आहेत, म्हणूनच ह्या जगाचा क्षेम चालला आहे. आपण आतां रहात होतों त्या काकूसारखींच जर सर्व माणसं असतीं तर मात्र ह्या जगाचा तरणोपाय नव्हता. पण ईश्वराला जगाची काळजी आहेना? म्हणूनच त्याला दयाळु म्हणतात."

राधाबाई आपल्या मुलांसह डॉ. कादंबरीकडे आली त्यावेळीं त्यांचा विनोद चालू होता. आपल्या नातीनें एकटें भोरला जाऊं नये म्हणून आजीनें शंका

घेतली होती. आणि त्या शंकेवर पंत विनोद करीत होते. इतक्यांत राधाबाई दिवाणखान्यांत आली. हरि पुढें झाला आणि त्यानें पंतांच्या पायावर डोकें ठेवलें. त्याच्या मागून धाकट्या दोघांनींहि त्यांचेंच अनुकरण केलें. मुलांच्या ह्या वर्तणुकीचा दिवाणखान्यांत बसलेल्या सर्वांच्या मनावर फार परिणाम झाला. पंतांनीं त्या तिघांना आपल्याजवळ बसविलें. आणि त्यांचीं नांवें विचारलीं. थोड्या वेळानें राधाबाई येण्यास इतकी रात्र कां झाली म्हणून सुमतीबाईनें विचारलें. तेव्हां आज विशेष काम पडलें, त्याबद्दल सांगून हरीकरितां आपणांस फार वेळ तिष्ठत रहावें लागलें, असें राधाबाईनें सांगितलें तेव्हां पंत विचारूं लागले, "कां रे हरी तुला यायला कां वेळ झाला असा ? तुझा मालक रजा देत नव्हता का ?"

" नाहीं, तसें नाहीं महाराज. माझ्या मालकांनीं मला ताबडतोब रजा दिली, पण आई आली तेव्हां मी दुकानांत नव्हतों. मी आर्यसमाजांत गेलों होतों. "

"कां बरं ?"

"सहज ! तेथें दर रविवारीं व्याख्यान होत असतं, तें ऐकण्याकरितां."

"तेथें तूं नेहमीं जातोस का ?"

" होय. "

" मग आज काय भाषण ऐकलंस ?" मला थोडक्यांत सांगूं शकशील काय ?"

हरीनें थोडक्यांत सर्व भाषणाचा सार पंतांना सांगितला. तेव्हां त्यांनीं हरीला बरेच प्रश्न केले. हरीला आर्य समाजांत जाण्याची कशी गोडी लागली; तेथें तो नियमानें जाऊन जे दोन शब्द ऐकत असे, त्याचा तो विचार करतो, वगैरे गोष्टी ऐकल्यावर पंत म्हणाले, " राधाबाई, ह्या आर्यसमाजानें तुमच्या मुलावर फार मोठे उपकार केले आहेत. आतां तुमचा हा हरि मुळांतच चांगला आहे, हा प्रश्न सोडून द्या. तरीदेखील ह्या आर्यसमाजानें त्याचें पुष्कळ कल्याण केलें यांत शंका नाहीं. हॉटेलांत राहणारीं मुलं सहसा व्यसनी आणि दुर्गुणी असतात. कारण त्यांना खाण्याची चटक लागते, दुसरें रात्रीं बाहेर भटकण्यास मिळतं. मालक बहुधा ह्या गोष्टीकडे लक्ष्य देत नाहींत, त्यामुळें नोकरांना फावतं ! हेंच जर आर्यसमाजाऐवजीं हरीच्या दुकानाशेजारीं किंवा जवळपास एखाद्या नाटक कंपनीचें बिऱ्हाड असतें, तर त्यांनीं तुमच्या हरीला केव्हांच आपणाकडे ओढलें असतें. कारण नाटकी मंडळींना ह्या हरीसारखीं लहान गोरीगोमटीं मुलं पाहिजे असतात. त्याला नेऊन, त्याला निरनिराळीं आमिषें दाखवून, वेळीं पांच पन्नास रुपये देऊन सुद्धां त्यांनीं मुलाला लांबविलें असतें. आणि अशा मुलांचीं मनंहि नाटक्याकडे

सहजच वळतात. तुमच्या हरीला प्रथम ह्या आर्यसमाजांत जाण्याची गोडी लागली ही गोष्ट सर्वांत उत्कृष्ट झाली !"

खरोखरीच आपलें भाग्य थोर म्हणून अशा थोर घराण्यांत आपणाला आश्रय मिळाला असें राधाबाईला वाटलें. ती आपल्या मुलांच्या कल्याणाकरितां स्वतः वाटेल तें दुःख आणि कष्ट सहन करण्यास तयार होती. आणि त्याप्रमाणें आतां-पर्यंत तिनें कष्ट सहनहि केले. पण आतां तिला पंतांच्या घरीं आश्रय मिळतांच तिच्या सर्व दुःखाचा आणि कष्टाचा शेवट झाला. तिच्या मुलांबद्दल काय करा-वयाचें हें पंतांनीं त्याच दिवशीं ठरविलें. मोठ्या मुलानें म्हणजे हरीनें कादंबरी-बरोबर भोरला जावें, अशी त्यांनीं राधाबाईजवळ इच्छा दर्शविली. त्या वेळीं 'मुलें आपल्या चरणावर टाकलीं आहेत; आतां आपण त्यांचें वाटेल तें करा,' असें राधाबाईनें सांगितलें. तिला आतां मुलांच्या कल्याणाविषयीं काळजी कर-ण्याचें काय कारण होतें ? पदरीं बराच पुण्यसंचय असल्याशिवाय पंतांसारख्या थोर माणसांचा आश्रय मिळत नाहीं, हें राधाबाईला कळत होतें.

दुसऱ्या दिवशीं कादंबरीनें भोरला जाण्याची तयारी चालविली. आपणांस कोण-कोणत्या औषधांचा संग्रह केला पाहिजे,त्या सर्व औषधांची आणि इतर हत्यारें वगैरे साहित्याची यादी करून दिल्यावर पंतांनीं तीं सर्व खरेदी केली. हरीकरितां नवीन पोषाख तयार केला. त्याला कंपौंडरचें काम शिकवून फावल्या वेळीं त्याचें इंग्रजी शिक्षण वाढविण्याचें कादंबरीनें कबूल केलें. एका दिवसांत आपणाबरोबर आपल्या मुलांच्या आयुष्यक्रमांत हें असें स्थित्यंतर झालेलें पाहून राधाबाईला आपण हा सर्व प्रकार स्वप्नांत अनुभवीत आहोंत कीं काय असें हरघडीला वाटे. तिला कामाचा कंटाळा नव्हता. काकूंच्या घरीं असतांना तिला अष्टौप्रहर काम करावें लागत होतें. पण आतां पंतांच्या घरीं तिला कामच नव्हतें. सुमतीबाईच्या हाताखालीं डाळ,तांदुळ निवडण्याचें किंवा भाजी चिरून देण्याचें काम पडे तितकेंच ! सुमतीबाई तिला बहिणीप्रमाणें आणि म्हातारी आई तिला आपल्या मुलीप्रमाणें वागवूं लागली. दोन चार दिवसांत तिच्या धाकट्या दोन मुलांची शाळाहि सुरू झाली. आतां आपण खास सुखी झालों असें तिला वाटूं लागलें. इतकेंच नव्हे तर भूलोकांतील स्वर्ग म्हणतात, तो हाच कीं काय अशीहि तिला वेळोवेळीं भ्रान्त पडे. वाचक हो ! हें फळ कशाचें असेल बरें ? राधाबाईवर वैधव्याची कुऱ्हाड कोसळल्यावर आपल्या लहान तीन अर्भकांसह तिनें आपल्या शिलाचें रक्षण केलें होतें. तिची परमेश्वरावर अढळ निष्ठा होती; संकटांची परंपरा कोसळली तरी तिनें ईश्वरभक्तींत

कधींहि अंतर केलें नाहीं; दुःखांत असतांही तिनें आपल्या मुलांना ईश्वरावर प्रेम करावयास शिकविलें. आणि आपल्या हातून होणाऱ्या प्रत्येक लहानमोठ्या बऱ्यावाईट कृत्याला परमेश्वर साक्षी असतो, ही भीति तिच्या मनांत अहोरात्र जागृत होती. त्याचेंच हें फळ होतें! ज्याच्या मनांत त्या जगच्चालकाविषयीं प्रीति असते, ज्याची त्यावर पूर्ण भक्ति असते आणि जे त्याला भिऊन वागतात, त्यांच्या शिलाला केव्हांहि धक्का बसत नाहीं. आणि तींच माणसें अखेरीस सुखी होतात.

असो. वसंतरावाच्या विनंतिप्रमाणें कादंबरीनें भोरला निघण्याची तयारी केली. तिनें आपणाबरोबर औषधांचा सांठा बराच घेतला होता, औषधींसामान आणि साहित्यांनीं दोन ट्रंका भरलेल्या पाहून 'इतकं सामान नेऊन तूं काय करणार?' असें सुमतीबाईनें विचारलें. कादंबरीनें उडवाउडवीचें उत्तर देऊन वेळ मारून नेली. आपण पुढें काय करण्याचें योजलें आहे, त्याबद्दल तिनें अद्यापि कुणाजवळहि उल्लेख केला नव्हता. आणि पंतांनींहि तिला एका शब्दानेंहि विचारलें नव्हतें. 'तुझी कोणती इच्छा असेल, ती मला सांग. मी माझ्याकडून होईल तें करून तुझी इच्छा पूर्ण करीन' असें त्यांनीं आपल्या मुलीला पूर्वींच आश्वासन देऊन ठेवलें होतें. ती कांहीं करीत आहे, तें चांगलेंच आहे, अशी त्यांची खात्री होती. परन्तु गाडींत बसल्यानंतर प्रथम थोड्या गोष्टी झाल्यावर गाडी सुटण्याची वेळ भरत आलेली पाहून ती आपल्या वडिलांना म्हणाली "बाबा, मी आतां ठरल्या प्रमाणें प्रथम भोरला जाणार आणि तेथून पुढें सासरीं जाण्याचं ठरविलं आहे, तेथें गेल्यानंतर काय करायचं आणि कसं वागायचं हें जरी मीं अजून निश्चित केलें नाहीं; तरी जसा प्रसंग येईल तसं वर्तन करायचं आणि त्यांतच यश मिळवायचं मी ठरविलं आहे. आपण माझ्याबद्दल काळजी करूं नका. मी वेळोवेळीं पत्रानें सर्व कांहीं कळवीत जाईन."

"जा,यशस्वी हो!"असा पंतांनीं तिला प्रेमाचा अंतःकरणपूर्वक आशीर्वाद दिला.

कादंबरी हरीला बरोबर घेऊन भोरला आली. त्यावेळीं शांताबाईची स्थिति फार नाजुक झालेली होती. वसंतरावानें पत्र लिहिल्यापासून ती आपल्या मैत्रीणीची सारखी मार्गप्रतिक्षा करीत होती. दोन दिवसांपासून तिच्या पोटांत एकसारखें दुखत होतें. ती स्वतः नर्सचें काम करीत असतांना तिनें अशाच स्थितींत असलेल्या इतर स्त्रियांना किती तरी धीर दिला होता. परंतु सांप्रत ती स्वतः त्या स्थितींत येतांच तिचा धीर सुटल्यासारखा झाला होता. कादंबरी अगदीं वेळेवर आली. ती

भोरला आली त्याच दिवशीं सायंकाळीं शांताबाईची सुटका होऊन तिला पुत्ररत्न झालें. घरांत सर्वत्र आनंदी आनंद झाला. आपणांस नातु झाला म्हणून रावबहादुरांनीं पेढे वांटले. आणि आनंदाची बातमी तारेनें पंतांना कळविली.

---

## ५....... तेंच तर गूढ

भोरला येऊन डॉ. कादंबरीला तिन महिने झाले. इतके दिवस कसे भराभर निघून गेले हें तिला कळलें देखील नाहीं. शांताबाईचा मुलगाहि तीन महिन्यांचा झाला होता. त्याचें नांव काय ठेवावें, असें रावबहादुरांनीं शांताबाईला विचारलें त्यावेळीं आमच्या कथानायिकेकडे तिनें बोट दाखविलें. 'मुलाची मावशी जें नांव ठेवील तें आम्हां सर्वांना पसंत आहे' असा जेव्हां सर्वांचा आग्रह दिसला 'तेव्हां कादंबरीनें आपल्या मांडीवर स्वस्थ निजलेल्या बालकाचें प्रेमभरानें चुंबन घेऊन बाजूला बसलेल्या वसंतराव आणि शांताबाई यांच्याकडे सस्मित पहात रावबहादुरांना विचारलें, "बाबासाहेब हा कुमार कुणाचा ?—तुमच्या वसंतरावाचा ना ?—मग त्याचं नांव काय ठेवावं, म्हणून शोधाशोध करण्याची काय जरूरी आहे ? वसंतरावांचा हा कुमार तेव्हां त्याचं नांव "वसंतकुमार" ठेवा, काय वाईट नांव आहे हें ? शांता, तुला आवडलं का ?—हो कां आवडणार नाहीं ? मी ठेवलेलं नांव तुम्हां सर्वांना आवडणार हें तर ठरलंच होतं. त्यांतून विशेषंकरून तुला फारच आवडलं पाहिजे. कारण तुमची प्रेमग्रंथी दृढ करणाऱ्या ह्या कुमाराला हांक मारतांना प्रत्येक वेळी वसंतरावाचें नांव येणार !"

खरोखरीच कादंबरीनें सुचविलेल्या ह्या नांवांत मोठें प्रेम-रहस्य आहे, असें शांताबाईलाहि वाटलें. 'वसंतकुमार' हें नांव सर्वांना पसंत पडलें. शांताबाई मात्र मुलाला हांक मारतांना फक्त 'कुमार' म्हणूनच हांक मारी. कुमारचें नांव कादंबरीच्या थट्टेचा एक विषयच झाला. ती आणि शांताबाई कधीं एकत्र बसली असतां वसंतराव जर तेथें आले तर कादंबरी त्यांना बाहेर जाण्यास लावी. 'कुमाराला' 'वसंतकुमार' अशा संपूर्ण नांवानें हांक मारल्याशिवाय आपण शांताबाईबरोबर बोलूं नये, असा कादंबरीनें हट्ट घेतल्यामुळें शांताबाईला आपल्या मुलाला 'वसंतकुमार' अशाच नांवानें हांक मारावी लागे. असे तीन महिने मोठ्या आनंदांत गेल्यावर एके दिवशीं शांताबाई म्हणाली, "कमू, हें आतां चाललं आहे, हें सर्व ठीक आहे. मी पूर्वी कशी होत्यें आणि आतां कशी

आहे, हें सर्व तुला ठाऊक आहे. पण आतां तुझ्याबद्दल जेव्हां जेव्हां आम्ही विचार करतों, तेव्हां तेव्हां आमची मतीच चालेनाशी होते. तुझ्याविषयीं रघुनाथरावांनीं अशी कां अढी धरावी, हें आम्हाला कळत नाहीं. वास्तविक तुझ्याबद्दल त्यांना किती तरी अभिमान वाटावयास पाहिजे होता. मी म्हणतें कीं, तुझ्यासारखी बायको मिळायला पदरीं कित्येक जन्मींचें पुण्य पाहिजे. त्यांनीं तुला कां वागवूं नये, याचें कारण तुझ्या तरी लक्षांत आलें आहे काय ? परवां आमच्या गोष्टी निघाल्या होत्या. त्यावेळीं म्हणणं झालं कीं, मीं जाऊन रघुनाथरावांची भेट घेतों, आणि त्यांची समजूत घालतों. मलाहि ह्या तिकडचा विचार पसंत आहे. फक्त तुझी संमति घ्यावी, आणि तुझं काय म्हणणं पडतं, त्याप्रमाणें करायचं असं ठरलं आहे."

"वाः शांता ! तुम्ही दोघांनीं बरीच आघाडी मारली आहे." कादंबरी हांसत हांसत म्हणाली. "पण माझी संमति जर पाहिजे असेल तर ती केव्हांहि मिळणार नाहीं."

"कां बरं ?—कमू, पतीजवळ राहण्याची तुझी इच्छा नाहीं काय ?"

"पतीबरोबर फटकून वागावें, असें कुणाहि स्त्रीला कधीं तरी वाटेल काय ?"

"मग तिकडच्या इच्छेला तुझी कां संमति नाहीं ?"

"याचं कारण वसंतरावांना कधींहि यश येणार नाहीं, हेंच होय ! त्यांनीं प्रयत्न केल्यावर जर त्यांना यश येणार असतं तर गोष्ट निराळी ! पण माझी तर खात्री आहे कीं, वसंतरावांना ह्या कामांत कधींहि यश येणार नाहीं. प्रयत्न करून यश आलं नाहीं, म्हणजे त्यांना वाईट वाटेल, इतक्याच करितां माझी संमति नाहीं."

"इतकी तुझी खात्री आहे काय ?"

"हो. कारण आजपर्यंत बाबांनीं थोडे का प्रयत्न केले ? ज्या ठिकाणीं त्यांच्या प्रयत्नांना यश आलें नाहीं, त्या ठिकाणीं वसंतरावांना यश येईल, असें नाहीं मला वाटत ! तिकडचा स्वभाव किती हट्टी आहे, याची कल्पना तुला किंवा वसंतरावांना होणें शक्य नाहीं."

"मग कमू, तुझं पुढें कसं होणार ! तुझ्या नशिबांत पतिसुख नाहींच का ? मला जोंपर्यंत या सुखाची कल्पना नव्हती, आणि माझ्या वेड्या कल्पना जेव्हां स्त्रीस्वातंत्र्याच्या विचारांत भराऱ्या मारीत होत्या, त्यावेळीं मी स्वतःला सुखी म्हणून समजत होतें. पण नाहीं ! माझे लवकरच डोळे उघडले. काय सांगूं तुला कमू ? ज्याचं मनुष्य त्याला असल्याशिवाय ह्या बायकांच्या जिण्याला किंमत

नाहीं.—ह्या माझ्या चिमड्या कुमाराकडे पहा! मी आतां किती सुखी आहे म्हणून सांगूं? ही तिकडची प्रतिमा आहे, असा विचार जेव्हां माझ्या मनांत येतो, त्यावेळीं मी सुखाच्या अनुभूत उच्च शिखरावर बसलें आहें असेंच मला आतां वाटतें. माझ्या बाळाच्या हांसण्यांत, खेळण्यांत आणि रडण्यांतसुद्धां मला स्वर्गसुख दिसतं. हा आनंद, हें सुख तुला केव्हां मिळणार कमू?—पूर्वी इतर स्त्रियांच्या मांडीवर अष्टौ प्रहर मुलांना पाहून त्यांच्या गुलामगिरीबद्दल मला त्यांची कींव येत असे. ह्या सर्वच बायका अशा स्वाभिमानशून्य कशा झाल्या म्हणून मी स्वतःशीं दिवस आणि रात्र सारखा विचार करीत असे. परंतु मला त्यावेळीं त्याची कल्पना होत नसे. आणि म्हणून मी अशा बायकांचा तिरस्कार करीत होतें. पण आतां जर मला कुणी विचारलं तर मी त्यांना असं उत्तर देईन कीं, हें काय सुख आहे, हें स्वतः अनुभविल्याशिवाय कळणं शक्य नाहीं."

"मग शांता, मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाहीं,' ही आपल्या मराठींतील म्हण अगदीं खरी आहे तर!"

"आहे म्हणजे? तुला शंका आहे कीं काय? स्त्री ही पुरुषाची सांवली आहे. तिला स्वतंत्र मत आहे, स्वतंत्र विचार आहे, इतकें नव्हे तर ती स्वतः स्वतंत्रच आहे. पण हें स्वातंत्र्य कोणतं ही गोष्ट मात्र त्यांना कळली पाहिजे. मी स्वैर वर्तनाला—'स्वातंत्र्य' म्हणून भलतेंच वेड डोक्यांत घेतलं होतं आणि खऱ्या सुखाच्या ऐवजीं दुःखांत आणि संकटांत दिवस घालवीत होतें. आतां मला त्या दिवसांची आठवण झाली, म्हणजे हंसूं येतं. आणि तिकडची स्वारी जर जवळ असली तर त्यांच्याकडे पाहण्यांतसुद्धां शरम वाटते. आतां 'स्त्रीस्वातंत्र्य' प्रस्थापित करण्याकरितां कित्येकजणीं अविवाहित राहिल्या आहेत. पण त्यांच्या हातांत कोणता स्वर्ग येणार आहे, तो त्यांचा त्यांनाच ठाऊक! त्यांनीं एकटं राहण्याकरितां त्यांना ईश्वरानें जन्मच दिला नाहीं. एखादा पुरुष एकटा राहून स्वैर वर्तन करूं लागला, म्हणजे आपण त्याला 'सोटभैरव' 'घटिंगण' अशींच कांहींतरी नांवं देतों, तशींच नांवं ह्या स्त्रियांना दिलीं तर शोभण्यासारखीं आहेत. मी स्वतःलाच असा प्रश्न केव्हां विचारतें, कीं, स्त्रीस्वातंत्र्य म्हणजे काय? स्वतंत्र राहून एखादा उद्योग करणं, फार झालं तर शिकून एखादी परीक्षा देणें आणि शेवटीं पोटाकरितां कांहीं नोकरी करणं हेंच ना? असं करून तरी आम्हीं स्वातंत्र्यसुख काय अनुभवितों? म्युनिसिपालिटींत जागा मिळविली, किंवा वकिलीची सनद घेतली, तर त्यांत काय केलं? पुरुषांच्या कामाची वांटणी केली असंच ना? शरिरापैकीं

एकादं अवयव कामाला नालायक झालं, तर त्याचं काम दुसरं अवयव करतं, तसाच हा प्रकार आहे. पण पुरुष कांहीं अद्यापि आपल्या कामाला नालायक झालेले नाहींत. ते आपापलीं कामें आजपर्यंत करीत आले, आतां करतात आणि पुढेंहि करतील. असं असतांना स्त्रियांनीं स्त्रिस्वातंत्र्याच्या नांवाखालीं त्यांच्या कामांत अशी ढवळाढवळ करण्यांत काय अर्थ आहे ? त्यांच्या प्रकृतीला झेपतील तीं कामें त्यांनीं खुशाल करावींत, पण स्त्रीस्वातंत्र्याचं अवडंबर मात्र त्यांनीं माजवूं नये. "

" शांता, आतां तुला स्त्रीस्वातंत्र्याची खरीखुरी कल्पना झाली तर ! हे पाहि-लंस, हें असंच आहे. अनुभवाशिवाय मनुष्य शहाणा होत नाहीं. मी आतां डॉक्टरीण झालें म्हणून मोठं कार्य केलं किंवा स्त्रीस्वातंत्र्याची पताका फडकविली असें नाहीं. माझ्यापूर्वी स्त्रीरोगी अगदीं अडूनच राहिलें होतें, असें नाहीं. त्यांना डॉक्टर पहात होते, त्यांचे रोगहि बरे होत होते. पण आतां इतकंच कीं, मी डॉक्टरीण झाल्यामुळें स्त्रीरोग्यांना थोडं मोकळेपणानें वागतां येईल. स्त्रियांना स्वातंत्र्य नाहीं अशी आपण मुळांतच चुकीची कल्पना करून घेतली आहे. मी म्हणतें कीं, पुरुषांप्रमाणें स्त्रियांनाही त्यांच्या क्षेत्रांत पूर्ण स्वातंत्र्य आहे. मात्र त्यांना त्यांच्या अशिक्षितपणामुळें त्या स्वातंत्र्याचा उपभोग घेतां येत नाहीं. आणि एवढ्याचकरितां त्यांना शिक्षण पाहिजे. आई म्हणते कीं, मुलींना त्याचं शिल ओळखतां येण्याइतकं शिक्षण दिलं कीं बस्स आहे मला हें आईचं मत पूर्णपणें पटतें. स्त्रीस्वातंत्र्याच्या भ्रामक कल्पनांनीं आपलं डोकं वेडावून घेऊन तूं जेव्हां एकटीच रहात होतीस, त्याचवेळीं तुझ्याबद्दल आई किती काळजी करीत असे. त्यावेळीं जर एखादा भलताच प्रकार तुझ्या हातून घडला असता तर आज जें तूं ' सुख—सुख ' म्हणून सुखाचे पोवाडे गात आहेस, ते तुला गातां आले असते काय ? "

" खरंच कमू, तसं जर कांहीं—पण छे ! ती कल्पनाच करवत नाहीं. नाहीं-तरी माझ्यावर थोडे का प्रसंग आले होते ? पण ईश्वरानेंच मला वांचविलं ! "

" ईश्वरानें नाहीं बरं शांता ! तुला तुझ्या पतिप्रेमानं वांचविलं असं म्हण ! "

" कांहींही म्हण कमू, पण तुझं पुढं काय होणार ? तुला हें सुख नाहींच ? "

नाहीं असं कोण म्हणतं ? "

" मग असं स्वस्थ बसून काय होणार ? कांहीं प्रयत्न नको का करायला ? तिकडून मनांत आलं आहे, मग तूं कां आड येतेस ? "

“ वसंतरावांनीं प्रयत्न करून कांहीं होणार नाहीं, हें मी तुला सांगितलंच !

“ मग प्रयत्न कुणी करायचा ? ”

“ कुणी करायचा म्हणजे ?—आतां तूंच स्वतःचा अनुभव सांगितलास ना ? ‘ स्वतः मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाहीं ’ हें खरं ना ? हा प्रयत्न मी स्वतःच केला पाहिजे. ”

“ पण तूं काय करणार ? ”

“ काय करणार तें सांगून कळणार नाहीं. परंतु ह्यापुढें कोणते प्रयत्न करायचे ते मी ठरवून ठेवलं आहे. आतां दोन चार दिवसांनीं मी इथून जाणार. ”

“ इतक्या लवकर ? ”

“ मग मी सासरीं जाऊं नये वाटतं ? मी सुखी व्हावं असं तर तूं म्हणतेस आणि सुखी होण्याकरितां जाऊं लागलें तर नको म्हणतेस, म्हणजे काय ? मी आतां सासरीं जाणार आणि तूं म्हणतेस तशीच सुखी होणार ! ”

“ पण रघुनाथरावांनीं तुला घरांत घतलं नाहीं तर . ”

“ तर नाहीं जाणार ! ”

“ मग तूं सुखी कशी होणार ? ”

“ तेंच तर गूढ आहे. ”

---

## १०........ भूमिकेची तयारी

आमच्या रघुनाथरावांना सोडून आतां फार काळ लोटला. गेल्या दीड भागांत त्याच्याविषयीं उल्लेख केलेला नाहीं. वास्तविक रघुनाथ म्हणजे आमच्या कादंबरीचे कथानायक ! एक तर स्वारी हट्टी आणि दुराग्रही आहे. त्यांतून आम्ही जर त्यांना असें मागें टाकलें तर तें ठीक नाहीं. करितां ह्यापुढें प्रत्येक प्रकरणांत ह्या कादंबरीचा शेवट होऊन ‘ कादंबरी ’ सुखी होईपर्यंत आम्ही त्यांचा उल्लेख करण्याचा निश्चय केला आहे.

आतां रघुनाथाचा व्याप बराच वाढला होता. त्याचा स्वभाव कसा होता त्यानें काय काय केलें, वगैरे गोष्टी वाचकांना पूर्णपणें माहीत आहेत. घरांत बायकोबद्दल गोष्ट निघाली, कीं स्वारीचें पित्त भडकत असे. अशी स्वतःच्या बायकोविषयीं त्याच्या मनांत कोणती अढी बसली होती, ती त्याची त्यालाच माहीत ! एरव्ही तो अगदीं सरळ होता. केव्हांहि कोणत्याही बाबतींत त्याला नांवें ठेवा-

यला जागाच नव्हती. सर्व दिवस एखाद्या यंत्राप्रमाणें त्याचे सर्व कारभार होत असत. घरचा व्याजबट्ट्याचा धंदाहि आतां पुष्कळ वाढला होता. त्याबरोबरच त्यानें वडिलार्जित शेतजमीनदेखील पुष्कळ वाढविली होती. शेतजमीनीची सर्व देखरेख स्वतः करीत असल्यामुळें उत्पन्नहि फार वाढलें होतें. शिवाय दिवसेंदिवस तो त्यांत कांहीं तरी सुधारणाच करित असे. मनुताई मात्र खरोखरीच दुःखी कष्टी होती. आपण मुलाच्या सुखाकरितां त्याचें लग्न मोठ्या हौसेनें केलें आणि नात्यांत नातें दृढ केलें. पण तें सुखाला कारण होण्याऐवजीं सर्व घराच्या दुःखाला कारण झालें. आपल्या नशिबांत सुनमुख पाहण्याचें सुख नाहीं, अशी आतां तिची खात्री झाली होती. कारण आज इतकीं वर्षें तिला जयरामपंतांकडून कांहींच कळलें नव्हतें. मुलाला विचारण्याची तर सोयच नव्हती. आपली सून कशी आहे, भाऊ कसा आहे, आई कशी आहे, वगैरे हकीकत कळावी म्हणून तिला तळमळ लागे. पण उपयोग काय ? रघुनाथ तर त्या मंडळीचें नांव सुद्धां काढूं देत नसे. शेवटीं. ' ती बायको नको तर दुसरें लग्न कर, ' असाहि तिनें मुलाजवळ हट्ट घेऊन पाहिला परंतु त्याचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं. ' लग्न ' किंवा ' बायको ' हीं दोन नांवें काढलीं असतां रघुनाथाच्या अंगांत एकदम कलीचा संचार होत असे. त्याचे बाळमित्र गण्या बापू आणि श्रीधर मन्या आतां गणपतराव कॉन्ट्राक्टर आणि श्रीधरपंत हेडमास्तर झाले होते, ते देखील जेव्हां जेव्हां रघुनाथाला भेटण्याकरितां येत तेव्हां हाच विषय काढीत. ' ती बायको तुला पसंत नाहीं तर सोडून दे. पण असा लग्नाशिवाय काय राहतोस ? खुशाल दुसरी एकादी चांगली मनपसंत मुलगी पाहून लग्न करून संसार कर. आतां आईनें तरी हा संसारगाडा किती आवरावा ?' असें नानाप्रकारें समजावून कांहीं उपवर मुली मुद्दाम त्याच्या नजरेखालीं घालाव्या. परंतु रघुनाथ ह्या बाबतींत कुणाचेंच ऐकत नव्हता. ' आतां पुनः म्हणून आपणास लग्न कर्तव्य नाहीं, ' हा एकच त्याचा ठराविक जबाब असे. किती मुली त्याला सांगून आल्या, चांगल्या मंडळींनीं मध्यस्थी पत्करली परंतु रघुनाथाचा नकार कायम होता ! तरी देखील आईची मायाच ती ! एकादें सुंदर स्थळ आलें कीं तिचा जीव तीळ तीळ तुटे. ती गणपतरावाला किंवा श्रीधरपंताना बोलावून आणी, आणि त्यांच्याकडून पुन्हां मुलाजवळ लग्नाची गोष्ट काढी. पण छे ! रघुनाथाचा नन्ना कायम तो कायम ! शेवटीं आईहि बिचारी कंटाळली.

मनुताईला केव्हां केव्हां आपल्या म्हाताऱ्या आईची त्याचप्रमाणें भावाची आणि भावजईची आठवण होई. पण मुलापुढें त्यांची नांवें काढण्याचीहि चोरी

होती. एकदां कांहीं कॉन्ट्रॅक्ट जुळविण्याकरितां गणपतरावाला मुंबईत जावयाचें होतें. मनुताईला ही गोष्ट कळतांच तिनें मुद्दाम गणपतरावाला बोलावून आणून हळूंच जयरामपंतांची भेट घेण्यास सांगितलें. गणपतरावानें तें कबूल केलें. आणि मुंबईत आल्यावर त्यानें जयरामपंतांचा शोधहि केला. परंतु मुंबईत येण्याचा त्याचा तो पहिलाच प्रसंग असल्यामुळें सर्वच गोष्टी त्याला नवीन होत्या. त्यांतून दोन दिवसाच्या मुक्कामांत त्यानें स्वतःचें काम काय करावें, मुंबई काय पहावी, आणि जयरामपंतांचा कुठें शोध करावा ? त्यानंतर पुनः एकदां तो मुंबईस आला होता. त्यावेळीं मात्र त्यानें कसून शोध केला आणि जयरामपंतांच्या घराचा पत्ता काढला परंतु त्यांची भेट मात्र झाली नाहीं. कारण त्यावेळीं पंत आजारी होते आणि हवा बदलण्याकरितां बाहेर गेले होते. त्यानंतर तो मुंबईत आला नाहीं.

अर्थात् मनुताईला आपल्या आईची किंवा बंधूची हकीकत कोठून कळणार ? बिचारी आपल्या दैवाला बोल देत स्वस्थ राहिली. प्रथम पंतांनीं पत्र पाठविण्याचा क्रम ठेवला होता. परंतु ती पत्रें रघुनाथ जशींच्या तशींच परत पाठवीत होता. शेवटीं कादंबरी विद्याभ्यासाकरितां जाण्यासाठीं निघाली, त्यावेळींहि पंतांनीं रघुनाथाला पत्र पाठविलें परंतु त्या पत्राला रघुनाथानें कसें चमत्कारिक उत्तर दिलें, तें वाचकांच्या स्मरणांत असेलच ! त्यानंतर रघुनाथाला पत्र न लिहिण्याचा पंतांनीं निश्चय केला आणि तो निश्चय आजपर्यंत त्यांनीं पाळला. गेल्या तीन वर्षांत पंतांकडून पत्र किंवा कांहीं वर्तमान कळलें नाहीं. म्हणून रघुनाथानेंहि त्यांची चौकशी केली नाहीं. तो आपल्या मातुलगृहाविषयीं इतका निष्ठूर बनला होता. हा एवढा दोष जर त्याच्यांत नसता तर रघुनाथ त्या प्रांताला एक उदाहरण घेण्यासारखा लौकिकवान पुरुष होता यांत शंका नाहीं. त्याच्या मित्रमंडळींनीं त्याच्या मनाची परीक्षा करण्याकरितां हर प्रयत्न करून पाहिले होते. कामानिमित्त कधीं सांगली, सातारा, मिरज किंवा कोल्हापूर ह्या ठिकाणीं त्याचें जाणें झालें म्हणजे मुद्दाम योगायोग जुळवून आणून त्यांनीं रघुनाथला एखाद्या बैठकीच्या ठिकाणीं किंवा एखाद्या जलशाला न्यावें. परंतु रघुनाथ पक्का पापभिरु आणि सच्छिल वर्तनाचा होता. आपणास पैसा अनुकूल आहे. म्हणून इतर खुशालचेंडू धनिकाप्रमाणें एखादि वेषा जवळ ठेवावी किंवा नाचरंगांत दंग व्हावें, असा विचारहि त्याच्या मनांत कधीं आला नाहीं. कुळें सांभाळावीं, धंदा चालवावा, शेत मळ्यांत जातीनें खपावें आणि वाटेल तेव्हां मनसोक्त कृष्णेंत डुंबावें, यांतच त्याला आनंद होता.

" रघुनाथ तूं जो इतका व्याप करतोस त्याचा अर्थ काय ? नाहीं संसार,

नाहीं मुलबाळ ! मग ही दगदग करतोस तरी कशाला ? " एके दिवशीं ते तिघे मित्र एकत्र बसले असतां गणपतरावानें त्याला विचारलें.

" कां बरं ! कां करूं नये ? लोक उद्योग करतात ते सर्व मूर्खच आहेत वाटतं ? "

" पण लोकांच्या मागें संसार आहे. तुझ्या मागें काय आहे ? "

" माझ्या मार्गे पोट आहे. मी हा उद्योग करतों तो पोटाकरितां करितों. "

" त्याच्याकरितां हा इतका व्याप वाढविण्याची काय जरूरी ? आज हा मळा घे, उद्यां तें शेत खरेदी कर, परवां त्या कुळावर हुकूमनामा काढ, हा इतका जंजाळ तुझ्या आणि त्या म्हातारीच्या पोटाला काय करायचा ? जन्माला आल्यासारखं कांहीं सुख भोग ! उद्यां मरून गेलास म्हणजे हें आहे हें सर्व जागच्या जागीं राहील आणि. व्यर्थ दुसऱ्यांची मात्र पोळी पिकेल. "

" कांहीं पोळी पिकत नाहीं. मी ती सर्व व्यवस्था अगदीं बिनचूक करून ठेवणार आहे, मी आतां कितीहि व्याप वाढविला, तरी पुढें त्याचा सत्कार्यींच उपयोग होईल, ही खात्री ठेवा. "

" पण आम्ही असं म्हणतों कीं, ही इतकी यातायात करण्यापेक्षां लग्न कां करीत नाहींस ? एक बायको तुला पसंत नाहीं. तर आतां स्वतःच्या पसंतीप्रमाणें एखादी मुलगी पाहून कर. जगांत येऊन जर जगांतील सुखं भोगलीं नाहींत तर मग ह्या मनुष्यजन्माचें रहस्य तें काय ? "

" अविवाहित राहून ब्रह्मचर्यांत आयुष्य काढलं तर मनुष्यजन्माचं रहस्य कळत नाहीं कीं काय ? मी म्हणतों कीं विवाहित होऊन दुःखं भोगण्यापेक्षां यांतच अधिक सुख आहे. आणि यांतच खरी शांति मिळणार आहे. "

" ह्या तुझ्या ब्रह्मज्ञानांत कांहीं अर्थ नाहीं. ब्रह्मचर्येंत सुख आणि अखेर शांति मिळत असली तरी तुला मात्र त्याचा काय लाभ होणार नाहीं तूं अविवाहित असतास तर मात्र गोष्ट निराळी होती. परंतु तुझें लग्न झालें असून तूं एका निर-पराधी स्त्रीला टाकून दिलें आहेस. "

" होय टाकून दिलें आहे. मग तिनें देखील ब्रह्मचर्येंत सुख आणि शांति मिळवावी. "

" गोष्टी तोंडानें बोलण्याच्या नव्हत ! तूं एक ब्रह्मचर्येंत दिवस घालवितोस पण सर्वांचीं मनें ताब्यांत नसतात. कशावरून तुझी बायको दुःखांत पिचत नसेल ? मी तर असं म्हणतों कीं, ती तुला रात्रंदिवस शिव्याशाप देत असेल. आणि ते तिचे

शिव्याशाप तुला अखेरीला भोगावे लागणार हें लक्षांत ठेव. बिचारीनें तुझ्याबरोबर लग्न न करतां दुसऱ्या कुणाबरोबर केलें असतें तर आज तिचा सुखाचा संसार चालला असता. त्यांतून हा प्रकार एखाद्या मराठ्यांत किंवा कुणब्यांत झाला असता तर गोष्ट निराळी होती. तिनें दुसरा नवरा करून संसार थाटला असता. पण आपण पडलों ब्राह्मण ! बिचारीचा हा दिवटा नवरा असून तिला वैधव्य भोगावं लागत आहे. "

" मग मीं मेलोंच असतों तर मग तिनें काय केलं असतं ? वैधव्यांतच तिला दिवस काढावे लागले असते ना ? "

" तसं झालं असतं तर फार बरं झालं असतं ! कारण खऱ्या वैधव्यांत सुखाची आशा तरी नसते. बाकी कांहीं म्हण तूं रघुनाथ, ही तुझ्याकडून अगदीं अक्षम्य अशी चुकी झाली आहे. बायको शिकलेली सवरलेली असणं यांत काय तुला बाऊ वाटला ? उलट त्यांत तूं भूषणच मानावयास पाहिजे. अरे, अशा शिकलेल्या कुलवंत मुली मिळतात कुठं ? बरं, ती शिकली शिकली तरी किती ?— दोन-चार इंग्रजी पुस्तकं इतकंच ना ? आणि फार झालं असतं तर ती पुण्याच्या फ्याशन-प्रमाणें वागली असती इतकंच ना ? पण तिची फ्याशन चालविणें किंवा न चालविणं तुझ्याच हातांत होतं ना ? "

" पण आतां या गोष्टीचा वितंडवाद पाहिजे कशाला ? झाली गोष्ट होऊन गेली ? आतां थुंकलेल्या थुंकीवर विचार कशाला ? "

" परंतु ही झालेली गोष्ट होऊन गेली असली तरी ती पुनः सुधारतां येण्या-सारखी आहे. "

" तें आतां होणं शक्य नाहीं ! ह्या जन्मांत तरी तें शक्य नाहीं ! "

" हा तुझा भ्याड दुराग्रह आहे. तूं आपल्या बायकोला टाकलीस, परंतु तिला टाकायला काय कारणं झालीं. तीं तुझी तुला तरी कळलीं आहेत किंवा नाहींत, याचीच आम्हाला शंका आहे—सांग पाहूं रघुनाथ. तूं अशा कोणत्या कारणा-स्तव बायकोला टाकलीस ? "

" तुम्हाला त्या गोष्टीशीं काय कर्तव्य आहे ? "

" पुष्कळ कर्तव्य आहे ! ह्या बाबतींत तुला कोणी अधिकारानें विचारता राहिला नाहीं म्हणून ! नाहीं तर केव्हांच तुझी थोबडी वळली असती, हें लक्षांत ठेव. बिचारी ती गरीब गाय तुझ्या हट्टी स्वभावाला व्यर्थ बळी पडली ! त्यांतून तुझे मामाहि पडले गरीब हाडाचे ! त्रेतायुगांत आपल्या बहिणीला दिलेलं वचन खरं

करण्याकरितां तुझ्यासारख्या गांवढळ भाच्याला त्यांनीं जांवई केलं! नाहीं तर आज त्यांची मुलगी योग्य आणि लायक पतीबरोबर आनंदाचा संसार करीत असती."

" असं असतं तर तसं झालं असतं, असं आतां म्हणण्यांत काय अर्थ आहे ?"

" अर्थ पुष्कळ आहे ! एक स्त्री जन्माची दुःखी झाली आहे. आणि असं खडतर दुःख ती निरपराधी असून भोगीत आहे."

" त्याला मी काय करणार ? तिचं नशीब !"

त्या तिघां मित्रांत हा चाललेला संवाद ऐकून वाचकांना आश्चर्य वाटेल. मण्या-बापू आणि श्रीधर मन्या पोरपणांत असतांना त्यांचे विचार कसे होते आणि आतां त्यांचे पोक्तपणाचे विचार कसे आहेत, याचा विचार करण्यासारखा आहे. 'शिक-लेली बायको मिळाली म्हणून तूं भूषण मानलें पाहिजे' असें आतां पोक्तपणानें सांगणाऱ्या मित्रांनींच पोरपणांत 'शिकलेली बायको तुझ्या डोक्यावर मिऱ्या वाटील' असें सांगून रघुनाथाच्या संसाराची माती केली, ते हेच मित्र! पण आतां त्यांचे विचार पोक्त बनले होते. जगाचा त्यांना अनुभव आला होता. पण दहावर्षांपूर्वी आपण रघुनाथाला ज्या विचारांच्या वातावरणांत पाहिलें होतें, त्याच वातावरणांत तो अझून वावरत होता. त्याच्या स्वभावांत किंचितहि फेरबदल झालेला नव्हता. मात्र वयपरत्वें त्याच्या वर्तनांतील हूडपणा जाऊन तो आतां बराच गंभीर झाला होता. शरिरानें त्याची कान्ति तेजस्वी, दिसण्यांत तो सशक्त आणि भव्य पुरुष दिसत होता. त्याच्या पोषाखांतील साधेपणा पूर्वी होता, तोच अद्यापि कायम होता. नाहीं म्हणायला पूर्वी तो टोपी घालीत असे पण आतां साधा-रेशमी रुमाल बांधूं लागला होता. इतरांबरोबर त्याचें वर्तन फार प्रेमळ पण व्यव-हारापुरतेंच असे. उगाच चकाट्या पिटण्यांत वेळ घालविण्याची त्याला फार चीड असे. शेतांत, मळयांत किंवा विहिरीच्या मोठ्या मोटेवर तो कांहीं तरी उद्योग करण्यांत गर्क असे. त्याच्या प्रत्येक कुळाचें त्याच्यावर फार प्रेम होतें. देवघेवीच्या व्यवहारांतसुद्धां तो फार सरळ आणि सचोटीनें वागे. घरांत आईबरोबरहि त्याचें वर्तन अत्यंत नम्रपणाचें होतें. तिचा प्रत्येक शब्द तो आज्ञेप्रमाणें मानीत असे. पण बायकोच्या बाबतींत मात्र त्याची वृत्ति अगदीं पिसाटासारखी होती. क्वचित् प्रसंगीं त्याला आपल्या बायकोची आठवण होई. परंतु त्या आठवणीवर तो सहसा विचार करीत नसे. केव्हां केव्हां तसेंच कांहीं कारण असलें तर आई किंवा त्याची मित्रमंडळी त्याला बायको टाकल्याबद्दल टोंचून बोलत असत, त्यावेळीं मात्र

स्वतःच्या इच्छेविरुद्ध तो विचार त्याच्या मनांत घोळत राही. बायकोच्या शिक्षणा-बद्दल आपण मनाची भलतीच समजूत करून जो मूर्खपणा केला, त्याची त्याला जाणीव झाली नव्हती, असें नाहीं. आपल्या हातून झालेल्या एका अक्षम्य चुकीच्या भरांत आपण मामाबरोबर अत्यंत कठोर वर्तन केलें आणि त्याचा परिणाम आप-णास आपलें आजोळ तुटलें, इतकेंच नव्हे तर आपल्या वडिलांच्या मृत्युलाहि आपली चुकीच कारण झाली हें तो जाणत होता. ही चुकी सुधारणें फार कठीण होतें असें नाहीं. पण त्याचा हट्टी स्वभाव त्याला नडत होता. 'आपली बायको शिकलेली आहे, ती आपणास डोईजड होईल वगैरे गोष्टी मित्रमंडळींत थट्टेथट्टेनें झाल्या; आणि त्याचा परिणाम आपल्या मनावर होऊन लग्नांत पुण्यास गेलों असतां तेथील तो सुधारकी थाट पाहून मनावर झालेला परिणाम दृढ झाला,' इत्यादि विचार त्याच्या डोक्यांत येऊन 'राईचा डोंगर' कसा झाला आणि त्याचा परिणाम स्वतःबरोबर इतरांना कसा भोंवला हे विचार त्याच्या डोक्यांत आले म्हणजे तो वेड्यासारखा होई.

कित्येक वेळीं मनुष्याचा हट्टी स्वभाव त्याला कसे सारखे गोते देत असतो पहा! तरुण जोडप्यांतील प्रेमकलह सुद्धां केव्हां केव्हां अशीच कांहीं मजा उडवितो. मग तिला किंवा त्याला मुठींत नाक धरून शेवटीं शरणचिठी लिहून द्यावी लागते. परंतु त्या दोघांत जर कां एकादी व्यक्ति हट्टाला पोंचली कीं, त्याचा परि-णाम आमच्या कथानायिका सारखाच व्हावयाचा! रघुनाथाच्या भ्रामक समजुती-प्रमाणें कादंबरी खरोखरीच जरी मिजासखोर, चढेल आणि थोड्याशा शिक्षणामुळें आपल्या तोऱ्यांत वागणारी असती असें गृहित धरलें तरी तिला सुतासारखी सरळ करणें रघुनाथाला अवघड होतें, असें नाहीं. वडिलांच्या मागें तो जेव्हां घरचा व्यवहार पाहूं लागला त्यावेळीं कांहीं कुळें बरींच खट्याळ होतीं परंतु त्यानें आपल्या अमदानींत त्यांना सरळ रस्त्यावर आणलें होतें. आज नाहींतरी पांच पन्नास भिन्न भिन्न स्वभावामुळें, त्याचप्रमाणें शेतांत, वाडींत किंवा बागेंत काम करणारीं निरनिराळ्या वृत्तीची नोकर मंडळी त्यानें आपल्या पूर्ण कह्यांत ठेविली होती. मग त्याला एक बायको आपल्या ताब्यांत ठेवायला कठीण झालें असतें काय? परंतु त्याच्या हट्टी स्वभावानें त्याच्या सर्व सुखाचा खेळ खंडोबा केलेला होता. आपल्या हातून झालेली चुकी हर घडीला आपल्या डोळ्यापुढें असतांना ती सुधारण्याचा कांहीं एक प्रयत्न न करितां दुःखांत काळ कंठीत असलेल्या कित्येक व्यक्ति आज आपल्या समाजांत दृष्टीस पडतात याचें कारण जर

कांहीं असेल तर तें फक्त तिचा किंवा त्याचा हट्टीपणा हेंच होय !

रघुनाथाच्या संसाराचा असा खेळखंडोबा होण्यास त्याचा हट्टीपणा जरी कारण असला तरी त्याच्या हट्टीपणाला मूर्त स्वरूप देण्याला आपला पोरवयांतील हूडपणाच कारण आहे, हें गणपतराव आणि श्रीधरपंत जाणून होते. लहानपणीं भलत्याच गोष्टी त्याच्या मनांत भरवून दिल्या, त्याचा हा परिणाम बिचारा रघुनाथ आज भोगीत आहे; त्यामुळेंच तो सुखाला आंचवला असून संसाराचा संन्याशी बनला आहे, वगैरे विचार मनांत आल्यावर गणपतराव आणि श्रीधरपंत स्वतःला फार दुषणें लावून घेत असत. ही झालेली चुकी कशी सुधारावी, आणि रघुनाथाला संसारी बनवून कसा सुखी करावा, याचा ते दोघे नेहमीं विचार करीत असत. शेवटीं दोघांच्या विचारानें आणि मनुताईच्या अनुमतीनें त्यांनीं एक बेत ठरविला. गणपतरावांचें कुटुंब पहिल्या बाळंतपणाकरितां आपल्या माहेरीं भोरला जाणार होतें. ती भोरला गेल्यानंतर गणपतरावानें आपल्या राहत्या घराची डागडुगी करण्याचें ठरविलें होतें. कॉन्ट्राक्टचा धंदा घरचा असल्यामुळें तुळ्या फळ्या इत्यादि लाकूडसामान त्यानें बरेंच संग्रह करून ठेवलें होतें. शिवाय मजूरहि घरचेच होते. त्यांतून गेल्या कॉन्ट्राक्टमध्यें स्वारीला चांगला फायदा झाला होता. तेव्हां यंदा घरावर एक मजला देण्याचा त्यानें विचार केला होता. ह्या एका विचारांत आतां दुसराहि एक हेतु साध्य करून घेण्याचा त्यानें बेत ठरविला. तो बेत असा—गणपतरावाची धाकटी मेहुणी दुर्गा नांवाची होती. यंदा तिला चौदावें वर्ष लागलें होतें. कांहीं कारणामुळें अद्यापि तिचें कुठेंहि जुळलें नव्हतें. मुलगी स्वरूपानें सुंदर असून बांध्यानें चांगली निटस होती. ती दोन वर्षांपूर्वी आली असतां मनुताईनें तिला पाहिलें होतें. आपली बायको बाळंत होऊन परत येतांना तिच्या बरोबर मेव्हुणीला आपल्या घरीं आणण्याचा गणपतरावानें विचार केला होता. ती आली म्हणजे घराची डागडुगी चालू आहे, ह्या सबबीवर रघुनाथाच्या घरीं बिऱ्हाड करावयाचें म्हणजे दुर्गा वरचेवर रघुनाथाच्या दृष्टीस पडूं लागेल आणि मग हळुहळू त्याचें मन वळवून लग्नाची गोष्ट काढायची असा त्या सर्वांनीं संगनमतानें बेत ठरविला. परंतु ईश्वरी योगायोग तसा होता काय ?

---

खरोखरीच कादंबरीनें तें गूढ ठेवलें होतें ! स्वतः मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाहीं ' हा तिनें पुढें मांडलेला सिद्धांत कुणालाहि नाकबूल करतां येईना. इतकीं वर्षें पारखें झालेलें पतिप्रेम संपादन करण्याकरितां आपण काय करणार आहोंत, याबद्दल तिनें प्रत्यक्ष आपल्या आईलाहि कांहीं सांगितलें नव्हतें. मग शांताबाईला ती कोठून सांगणार ? तिनें पुष्कळ प्रकारें कादंबरीला विचारून पाहिलें. परंतु कादंबरीला आपण काय करणार आहोंत, हेंच तिला सांगतां येईना. आणि खरें पाहिलें तर तें तसेंच गूढ होतें. तिचा सर्व विश्वास वडील माणसांनीं दिलेल्या आशीर्वादावर होता. आपण सुखी होणार हा तिचा विश्वास होता. आणि त्याबद्दल तिनें आपला सर्व भार परमेश्वरावर टाकला होता. जशी परिस्थिति उत्पन्न होईल, तसें वागायचें असा निश्चय ठरवूनच ती निघाली होती. भवितव्य काय आहे, हें कळणें कुणाला शक्य नाहीं, तथापि आपला भावी काळ खात्रीनें सुखाचाच जाणार अशी आशा हृदयाशीं बाळगून कादंबरीनें हें पाऊल टाकलें होतें. ती स्वतः प्रयत्न करण्याकरितां येथून सासरीं जाणार आहे असें कळल्यावर रावबहादुरांनींहि तिला शक्य ती मदत करण्याचें अभिवचन दिलें.

" तुम्ही हें काम स्वतः आपल्या शिरावर घेतलें आहे, ह्याबद्दल मला मोठा आनंद झाला आहे. " रात्रीं भोजनोत्तर सर्व मंडळी गप्पागोष्टी करीत असतांना रावबहादुर आमच्या कथानायिकेला म्हणाले. " शिवाय तुमच्या ह्या बदललेल्या ' कादंबरी ' नांवानें फारच बहार केली आहे. डॉक्टर कादंबरी ह्या नांवानें प्रत्यक्ष तुमच्या पतिराजांनाहि तुमची ओळख पटायची नाहीं. आज इतकीं वर्षें झालीं. तुमची समक्ष ओळख तर बुडालीच असेल, त्यांतून तुमच्यांत कितीतरी फरक झालेला आहे. तेव्हां त्या दृष्टीनें विचार केला असतां तुम्हाला स्वतंत्र रीतीनें स्वतः प्रयत्न करायला पुष्कळ अवसर सांपडणार आहे. आतां हा तुम्ही जो प्रयत्न करणार आहां तो कोणत्या दिशेनें करणार हें मला कळेल तर मीहि तुम्हाला शक्य ती मदत करीन. बडोद्याचे कारभारी माझे स्नेही आहेत. त्यांना जर पत्र दिलें तर ते तुमची उत्तमपैकीं व्यवस्था करतील. "

" होय; अशा प्रकारच्या पत्राची मलाहि आवश्यकता आहे. आपण जर असं मला पत्र द्याल तर माझं बरंचसं कार्य होईल. मात्र मी कोण आणि काय ह्याची बिलकुल वाच्यता होतां उपयोगी नाहीं. फक्त डॉक्टर कादंबरी ह्या नांवानेंच मला लोकांनीं ओळखावें आणि ह्याच नांवानें माझी तेथें प्रसिद्धी व्हावी, अशी माझी

इच्छा आहे. कांकीं मी जरी आतां जाऊन सासूबाईंच्या पुढें उभी राहिलें, तरी त्या मला ओळखतील कीं नाहीं, ह्याची शंकाच आहे."

"पण तुम्ही तेथें जाऊन प्रॅक्टीस सुरू करणार काय ?"

"नाहीं पैसे मिळविण्याकरितां प्रॅक्टीस करणार नाहीं. फक्त धर्मार्थ काम करणार."

अशा रीतीनें बराच वेळ त्यांच्या गोष्टी चालल्यावर कादंबरीनें दुसऱ्या दिवशीं निघण्याचा ठरविलेला विचार मंडळींना कळविला. वसंतरावानें सांगलीपर्यंत तिच्याबरोबर जाऊन तिची सर्व व्यवस्था लावून देण्याचें पत्करलें. कादंबरीची ती तेथें शेवटची रात्र असल्यामुळें त्या रात्रीं बराच वेळपर्यंत मंडळी बोलत बसली होती.

ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं कादंबरी हरीला घेऊन सांगलीस जाण्याकरितां निघाली. तिच्या बरोबर औषधी सामानाच्या पेट्या वगैरे बरेंच सामान असल्यामुळें तें मागून पाठविण्याचें ठरलें होतें, फक्त निवडक औषधांच्या बाटल्या आणि इतर कांहीं सामान कादंबरीनें आपल्या बरोबर घेतलें होतें. कऱ्हाडच्या स्टेशनपर्यंत त्यांचा प्रवास रावबहादुरांच्या गाडींतूनच झाला.

प्रथम रेल्वेनें न जातां मुक्काम करीत करीत सांगलीला जावें, असा कादंबरीचा विचार होता. परंतु ऐनवेळीं तो विचार बदलून रेल्वेनें प्रवास करण्याचें तिनें ठरविलें. 'हिनें ठरविलें' म्हणण्यापेक्षां तिला एक प्रकारची स्फूर्ति झाली असेंच म्हटलें पाहिजे. असें लिहिण्याचें कारण रेल्वेनें प्रवास करण्यांत एक चमत्कारिक योगायोग जुळून आला. ईश्वरी अगाध लिलेचें कौतुक वाटतें याचेंहि कारण हे असेच चमत्कारिक योगायोग जुळून येतात, हे होय ! ज्या गाडीनें कादंबरी सांगलीला जावयास निघाली होती त्याच गाडींत गण्याबापूचें कुटुंब होतें. गेल्या प्रकरणांत उल्लेख केल्याप्रमाणें गणपतरावानें आपलें कुटुंब माहेरीं म्हणजे साताऱ्यास बाळंतपणाकरितां पाठविलें होतें. परंतु तेथें अकल्पित रीतीनें कांहीं अडचणी आल्यामुळें गणपतरावास तिला बाळंतपणाकरितां घरींच घेऊन येणें भाग पडलें. त्याप्रमाणें तो स्वतः तिला त्या गाडीनें परत घेऊन येत होता. साताऱ्यास रेल्वे गाडींत बसेपर्यंत त्याची बायको ठीक होती. परंतु शहरापासून रेल्वे स्टेशनपर्यंतचा मोटारींतील प्रवास ती पूर्ण मासाची असल्यामुळें तिला सहन झाला नाहीं. गाडींत बसतांच तिच्या पोटांत कळा येऊं लागल्या. दोन चार स्टेशनें जाईपर्यंत तिनें त्या कळा कशाबशा सहन केल्या. परंतु उत्तरोत्तर पोटांतील गडबड असह्य होतांच तिचा जीव घाबरूं लागला.

शेवटीं तिनें आपल्या पतीला स्वतःचें दुःख सांगितलेंच ! गणपतराव तर अगदीं विचारांत पडला. अशा प्रवासांत काय करावें हेंच त्याला सुचेना. गाडींतून प्रवास करतांना बाळंत झालेल्या स्त्रियांच्या कित्येक गोष्टी त्यानें पूर्वीं ऐकल्या होत्या. व एक दोन प्रसंगहि त्यानें पाहिले होते. त्या स्त्रियांचे कसे हाल झाले याचें चित्र आतां त्याच्या दृष्टीपुढें उभें राहतांच, तोच प्रसंग आतां आपल्या बायकोवर आला आहे हें पाहून त्याची भीतीनें गाळण उडाली. मधल्याच एखाद्या स्टेशनवर तिला उतरावें; तर तेंहि अशक्यच ! कारण लहान स्टेशनावर काय सोयी असणार ? ‘ थोडी कळ सोस, आतां सांगली येईल, ’ असा तो आपल्या कुटुंबाला वरचेवर धीर देत होता. डब्यांत असलेलीं इतर माणसेंहि तिला धीराच्या गोष्टी सांगत होतीं. परंतु स्वतः बाळंतपणाच्या वेदना सहन करीत असलेल्या त्या बिचारीला कोठून धीर निघणार ? शेवटीं कऱ्हाडच्या स्टेशनावर गाडी उभी राहिली. कादंबरी आणि वसंतराव दुसऱ्या वर्गाच्या डब्यांत जाऊन बसले. हरी जवळ थोडेसें सामान घेऊन बाजूच्या म्हणजे तिसऱ्या वर्गाच्या डब्यांत जाऊन बसला. त्याच डब्यांत गणपतराव आणि त्यांचें कुटुंब होतें. थोड्याच वेळांत आपल्या पलीकडे बसलेल्या बाईला कांहीं तरी जबरदस्त दुःख होत आहे, हें तिच्या हाल-चालीवरून हरीच्या लक्षांत आलें, त्यानें बाजूला बसलेल्या इतर उतारूजवळ चौकशी केली. परंतु ‘ त्या पोराला काय सांगायचें आहे,’ ह्या समजुतीवर कोणी बोललें नाहीं. इतक्या अवधींत गाडीहि चालू झाली. हरि मोठा चौकस मुलगा असल्यामुळें थोड्या वेळांतच त्यानें तर्कानें सर्व गोष्टी जाणल्या. आणि गणपत-रावाच्या जवळ येऊन तो म्हणाला, “ ह्या बाईना कांहींतरी दुःख झालं आहे. त्यांना काय होतं, तें जरी मला कळण्यासारखं नसलं तरी शेजारच्या दुसऱ्या वर्गाच्या डब्यांत प्रख्यात डॉक्टर कादंबरी बसल्या आहेत. त्या कांही तरी इलाज करतील अशी माझी खात्री आहे. ”

‘ बुडत्याला काडीचा आधार ’ असें म्हणतात तें अगदीं खरें आहे. शेजारच्या डब्यांत कोणी डॉक्टरीण आहे असें त्या मुलानें सांगतांच गणपतरावाला स्वर्ग हातीं आल्यासारखा आनंद झाला. त्या डॉक्टरीणबाई कोण, कोठल्या, कुठें जाणार वगैरे कांहींसुद्धां चौकशी न करितां एकदम उठून त्यानें खिडकींतून बाजूच्या डब्यांत पाहिलें आणि ‘ डॉक्टरीणबाई ’ अहो डॉक्टरीणबाई ’ अशा हांका मारण्यास सुरवात केली. जणूं काय डॉक्टरीणबाई त्यांच्या हांकेबरोबर गाडी वेगांत असतांहि खिडकींतूनच आंत येतील !

शेजारच्या डब्यांतून कोणी तरी हांक मारीत आहे हे कादंबरीनें ऐकलें. वसंतरावानें चटकन् उठून खिडकींतून पाहिलें आणि विचारलें, " आपण कोणाला हांका मारतां ? "

" तेथें डॉक्टरीणबाई आहेत ना ? माझी बायको–माझी बायको—"

" असे घाबरूं नका ! आतां पुढल्या स्टेशनवर गाडी उभी राहतांच डॉक्टरीणबाई तेथें येतील. पण तुमच्या बायकोला काय झालं आहे ? " वसंतरावानें विचारलें.

" ती–ती गरोदर आहे. पोटांत भयंकर कळा येतात. मोठा प्रसंग आला आहे !' सुदैवानें इतक्यांत पुढलें स्टेशन आलें. कादंबरी आपली औषधाची ब्याग घेऊन त्या डब्यांत आली. तिनें गणपतरावाच्या बायकोला तपासून पहात असतां ' कुठें जावयाचें आहे ? ' असें गणपतरावाला विचारलें. ' त्यांना सांगलीला जावयाचें आहे. ' असें कळतांच तिला एक प्रकारचा आनंद झाला. आपल्या कार्याला सुरवात होईल, अशी तिला कल्पना नव्हती, परंतु योगायोग म्हणतात तो हा ! ईश्वरी लीलेचें कौतुक करायचें तेंहि इतक्याच करितां ! गणपतराव हा आमच्या कथानायकाचा म्हणजे रघुनाथाचा मित्र ! त्यांनें कोणत्या गोष्टी करावयाच्या योजल्या होत्या, हें वाचकांना माहीत आहेच. परंतु हा योगायोग जुळून यावयाचा होता म्हणूनच रेल्वेनें प्रवास करण्याची कादंबरीला एकाएकी स्फूर्ति झाली. आणि हीच ईश्वरी योजना !

सांगली गांठेपर्यंत वेळ निघावा म्हणून कादंबरीनें कांहीं औषध योजना केली. तात्काळ त्या औषधापासून तिला बरें वाटलें. परंतु प्रसुतीची वेळच जवळ जवळ येत चालली तेथें औषध तरी काय करणार ? शेवटीं बुधगांवच्या स्टेशन जवळ येतांच तेथें ' वेटिंग रूम आहे काय ? ' अशी तिनें चौकशी केली. तेव्हां तिच्या विचारण्याचा मतलब गणपतरावाच्या लक्षांत येऊन ते म्हणाले, ' तेथें ' वेटिंगरूम ' आहे. पण तेथें कांहींसुद्धां व्यवस्था होणार नाहीं. कारण थोड्या दिवसांपूर्वीं माझा कॉन्ट्राक्टचा कांहीं माल आला होता त्यावरून ह्या स्टेशनवर थोडी भानगड झाली आहे. त्यापेक्षां स्टेशनजवळ एक धर्मशाळा आहे. तेथें वाटेल तशी मला व्यवस्था करतां येईल. '

" ठीक आहे. मग स्टेशनवर उतरून तुम्ही म्हणता त्या धर्मशाळेतच जाऊं ! कारण सांगलीपर्यंत तुमच्या बायकोला मजल गांठतां येईल असें नाहीं मला वाटत !"

गणपतरावानें त्या धर्मशाळेंत जाण्याचें ठरविलें. कादंबरी त्याच स्टेशनवर उत-

रली आणि अत्यंत जपून तिनें गणपतरावाच्या बायकोला त्या धर्मशाळेंत आणलें. तेथेंच ती थोड्या वेळानें सुखरूप बाळंत झाली. आपणाला मुलगा झाला असें कळतांच गणपतरावाला किती तरी आनंद झाला. त्यानें पुनः पुनः कादंबरीचे तिच्या श्रमाबद्दल उपकार मानले. तो म्हणाला, " काय माझ्या बायकोचं भाग्य म्हणून तुम्ही आमच्याच गाडींत होतां. नाहीं तर मी एकट्यानं काय केलं असतं! डब्यांतच जर ती बाळंत झाली असती तर माझे आणि तिचे हाल कुत्रा देखील खाता ना!–बरं पण आतां पुढं काय ? हिला आतां इथून हालवितां येणार नाहीं काय ? "

" इतक्यांत तर शक्य नाहीं. निदान आजचा दिवस इथंच राहूं द्या. ही धर्मशाळा आहे तरी येथील सोई बऱ्या आहेत."

" आपणास कुठं जावयाचं होतं ? आमच्याकरितां आपण इथं उतरलां आणि आमच्या कुटुंबाची संकटांतून मुक्तता केली, हे आपले आम्हांवर अगणित उपकार आहेत. हे उपकार फेडतां येणं मला शक्य नाहीं. तथापि—"

" आपण तो विचारहि मनांत आणूं नका. मलाहि सांगलीलाच जावयाचं आहे. इथून सुद्धां मला जातां येईल. "

" सांगलीला कुणाकडे जाणार ? "

" तेथील कारभाऱ्यांकडे. मी आतां तेथेंच जाणार आहें. तरी उद्यां सकाळीं मुद्दाम येऊन आपल्या कुटुंबाला पाहीन आणि मग तिला येथून नेण्याबद्दल काय तें ठरवूं! तुमची जर येथें कांहीं गैर सोयी होण्यासारखी असेल तर तसें सांगा. मजजवळ हा मुलगा आहे. ह्या मुलाला पाहिजे असल्यास तुमच्याजवळ ठेवतें."

" छे! छे! आतां हें माझं गांवच आहे. मीं इथें वाटेल ती व्यवस्था करून घेईन. इथं जवळच बुधगांव मिल आहे. तेथला कारकून माझा स्नेही आहे. त्याच्या कुटुंबाला मी इथं सोबतीकरितां बोलावून घेऊन येतों. "

आतां गणपतरावाला किती तरी धीर आला. गाडींत बायकोची स्थिति पाहून जो अगदीं गडबडून गेला होता, तोच आतां मोठ्या अभिमानानें गोष्टी बोलूं लागला परंतु आपण कुणाबरोबर बोलत आहों याची त्याला कांहींतरी कल्पना होती काय ? डॉक्टर कादंबरी हीच आपल्या मित्राची बायको, अशी शंका घेण्याला त्याला कांहीं जागा होती काय ? कोठून असणार ? त्यानें आमच्या कथानायिकेला पाहिलें नव्हतें असें नाहीं ! रघुनाथाच्या लग्नांत त्यानें तिला पाहिलें होतें, पण त्या वेळची 'कमू' आणि आतां ही 'डॉक्टर कादंबरी' ह्या एकाच व्यक्तींत कितीतरी

फरक पडलेला होता. तसेंच गणपतराव–ज्याच्या कुटुंबाची आपण सुटका केली, ते आपल्या पतिराजांचे स्नेही आहेत, अशी कल्पना कादंबरीलाहि शिवली नाहीं. तिनेंही गणपतरावांना पाहिलें नव्हतें असें नाहीं. पण त्या वेळीं ' गणपतराव गण्या-बापू ' होते, आतां त्यांच्यांत किती तरी फरक झालेला होता. परंतु कांहींहि असो; हा योगायोग असा चमत्कारिक रीतीनें जुळून येऊन कादंबरीच्या कार्याची सांग-लींत येतांच मुहूर्तमेढ रोविली गेली खरी !

वसंतरावानें दोन टांगे करून आमची मंडळी सांगलीला गेली. टांगा चालत असतां वसंतराव मधून मधून कांहीं गोष्टी करीत होता. परंतु त्याकडे कादंबरीचें लक्ष नव्हतें. आपण सासरच्या गांवांत आलों, ह्या कल्पनेनें तिच्या मनांत अननुभूत तरंग उद्भवूं लागले. आज किती तरी वर्षांनीं ती सांगलीला आली होती. परंतु आपण नुकतेंच आठ पंधरा दिवसांपूर्वी येथें आलों होतों, असेंच तिला वाटूं लागलें. तिला त्या सडका आणि बाजूच्या इमारती ओळखीच्या भासूं लागल्या. सांगली शहरांतून टांगा जावूं लागतांच एका विवक्षित घराकडे तिचें लक्ष होतें. आपण आपलें घर खात्रीनें ओळखून काढूं असें तिला वाटत होतें. तिचें मन उत्कंठित होऊं लागलें. तिच्या मनाची ही चलबिचल झालेली स्थिति पाहून वसंतरावानें विचारलें, " कमळाबाई. लग्नानंतर तुम्हीं कितीदां सासरीं आलां होतां ! "

" आलें होतें दोनदां ? "

" प्रत्येक वेळीं किती दिवस राहिलां होतां ? "

" एकदां होतें दोन दिवस. पण दुसऱ्यांदा आलें त्यावेळीं न राहतां रात्रींच मला बाबांनीं परत नेलें.

" त्यानंतर ह्या आतां पुनः सांगलीला येत अहांत ना ?—पण ह्या गोष्टीला झालीं किती वर्षे ? "

" कितीतरी वर्षे झालीं ! मी त्यावेळीं पुण्यांत इंग्रजी चौथी यत्ता शिकत होतें. तेथून आम्ही बाबांची बदली झाली म्हणून मुंबईस गेलों. पुढें माझी परीक्षा झाली. नंतर मी ' ग्रान्ड मेडिकल ' मध्यें जाऊं लागलें. तो अभ्यास पूर्ण केल्या-वर विलायतेला गेलें. आतां तुम्हींच करा हिशेब, म्हणजे झालें. "

" अबब्ब ! इतक्या वर्षांनीं इथली ओळख तुम्हांला कशी राहणार ? मी पुण्यांत इतकीं वर्षे काढलीं ना ?—पण दोन चार रस्त्यांशिवाय जास्त रस्त्यांची मला ओळख सुद्धां राहिली नाहीं. "

" तें खरं पण हें माझं सासरचं शहर आहे. येथें माझं घर आहे हें आपण

विसरतां वसंतराव ! घार आकाशांत किती उंच आणि लांब भराऱ्या मारीत असते, याची आपणास कल्पनाहि होणार नाहीं. तिचं घरटं कुठल्यातरी एखाद्या झाडाच्या फांदीवर असतें. अशीं झाडं किती तरी हारीनें असतांना घार नेमकी त्याच झाडावर कशी येते, यांतील गूढ आपण लक्षांत घ्या म्हणजे इतकीं वर्षं झालीं असलीं तरी मी माझें घर ओळखून काढीन किंवा नाहीं हा प्रश्न आपणास सोडवितां येईल. पण इतकं कशाला ? तो पहा तो समोर दिसूं लागला, तोच आमचा वाडा ! तें घर पहा–ती माडी मी कधींहि विसरणार नाहीं बरं वसंतराव !"

खरोखरीच तो वाडा रघुनाथाचा होता. कादंबरीनें अगदीं बरोबर तो ओळखून काढला.

## १२........ डॉक्टर कादंबरी

" ह्या मंडळींनीं तर जीव अगदीं नकोसा करून टाकला आहे ! उठ पाय येतात इथं !–चला, उठा, आतां डॉक्टरीण बाईसाहेब कुणालाही पाहणार नाहींत. औषधाचा पैसा घेत नाहींत म्हणून त्यांच्यावर ही तुमची सक्ति वाटतं! पांच मिनिटं तरी विश्रांति घेऊं द्याल कीं, नाहीं त्यांना ? उठा-आतां संध्याकाळीं या !"

" नका–नका मी तुमच्या पायां पडतें. पण मला बाईसाहेबांना भेटूं द्या हो ! माझी आई मरायला पडली आहे हो ! "

" मग मेली तर काय झालं ?—हो दूर–मला दरवाजा बंद करूं दे ! "

तो मनुष्य दरवाजा बंद करूं लागला. इतक्यांत डॉक्टर कादंबरी बाहेर आली. दरवाजा बंद होत असतां बाहेर रस्त्यावर बरीच गर्दी असलेली तिच्या दृष्टीस पडली. तेव्हां तिनें विचारलें, " काय रे महादू, दरवाजा कां बंद करतोस ? आणि ती बाहेर गर्दी कशाची ? मंडळी औषधाकरितां आली आहेत काय ?

" होय–नाहीं बाईसाहेब ! " महादु गोंधळून म्हणाला, " उगाच दरवाजावर गर्दी करून त्रास देतात, म्हणून दरवाजा बंद करतों. "

" पण ती मंडळी कां आली आहेत ? "

" बाईसाहेब माझ्याकडे पहा हो ! " दरवाजांत उभी असलेली मुलगी करुण स्वरानें म्हणाली, " मी तुमच्या पायां पडतें. मला बाहेर लोटूं नका. माझी आई घरीं मरत पडली आहे.

" ये आंत ये महादू, दरवाजा उघड आणि त्या सर्व मंडळीला आंत येऊं दे !"

" पण बाईसाहेब, तुम्हाला उगाच त्रास मात्र होईल. ह्या मंडळींना काय ? वाटेल तेव्हां येऊन असं दरवाजावर रडत राहतील ! "

" महादू, उगाच कोणी रडत येईल का ? अरे, ज्याचं दुःख त्याला !—बरं मुली, काय होतं तुझ्या आईला ? सांग पाहूं ? "

" काय सांगूं !—माझी आई—माझी आई मरत आहे हो ! "

" बरं—बरं मी येतें तुझ्याबरोबर आणि पाहतें तुझ्या आईला ! गप्प—रडूं नकोस. होईल तुझी आई बरी बरं ! "

सांगलींत येऊन कादंबरीला जवळ जवळ एक महिना झाला. आतां ' डॉक्टर कादंबरी ' हें नांव सांगलीच्या कोनाकोपऱ्यांत झालें. पहिले चार आठ दिवस कारभाऱ्याकडे पाहुणचार घेतल्यावर गणपतरावानें एक स्वतंत्र घर पाहिलें आणि तेथें कादंबरीची नीट व्यवस्था लावून दिली. पुढें हळूं हळूं तिचें नांव शहरांत पसरूं लागलें. विलायतेंत पास होऊन आलेली एक मुंबईची बाई गोरगरिबांना फुकट औषध देते. ही दवंडी प्रथम गणपतरावानें सर्व शहरांत पिटली मग रोग्यांना काय दुष्काळ ! प्रकरणाच्या सुरवातीला दिलेल्या वृत्तांतावरून कादंबरीनें तेथें उघडलेला धर्माचा दवाखाना कसा चालला होता, याची कल्पना वाचकांना सहज होण्यासारखी आहे. श्रीमंतापासून गरीबापर्यंत तिच्या नांवाचा बोलबाला होऊं लागला. आपला इतक्या लवकर सांगलींत जम बसलेला पाहून कादंबरीलाहि अत्यंत समाधान होऊं लागलें. प्रत्येक दिवशीं रोग्यांची संख्या वाढूं लागल्यामुळं तिला श्रमहि अधिक होऊं लागले तरी तिचा आनंद वाढतच होता. पंतहि आपल्या प्रत्येक पत्रांत तिला उत्तेजन देत होते. गांवांत चार मंडळी एकत्र जमली म्हणजे डॉक्टर कादंबरीचें नांव निघालें नाहीं, असें होतच नसे. बड्या बड्या मंडळीकडूनहि तिला आमंत्रणें येऊं लागलीं. अशा मोठ्या मंडळीकडे ती सहसा स्त्री रोगी असल्याशिवाय जात नसे आणि त्यांच्याकडून ती फीचे औषधाचे पैसे घेत असे. डॉक्टर कादंबरीमुळें आपल्या स्त्रियांची मोठी गैरसोय दूर झाली असेंच आतां प्रत्येकाला वाटूं लागलें. सुदैवेंकरून तिच्या हाताला यशहि तसेंच होतें.

एक महिना झाला, अद्यापि कादंबरीला आपल्या पतिराजाचें दर्शन झालें नाहीं. रोग्यांकडे जातांना ती कैकवेळां आपल्या घरावरून गेली परंतु तेथें तिला कोणीहि दिसलें नाहीं. त्या घरावरून जातांना तिच्या मनांत कोणकोणत्या विचारांचें काहूर माजलें असेल बरें ! आंत जाऊन सासुबाईंची भेट घ्यावी, आपली ओळख पटवावी आणि पतीचें दर्शन घ्यावें, असा विचार तिच्या मनांत कितीदां तरी आला.

परंतु त्या वाड्यांत जाण्याचा तिला धीरच होत नसे. कांहीं तरी निमित्त काढून हरीला तेथें पाठवावें आणि शोध घ्यावा, असेंहि तिला वाटे. परंतु पुनः तिचा विचार बदले. शेवटीं एका महिन्यानंतर तिला आपल्या घरची हकीकत अगदीं सहजासहजीं कळली. एके दिवशीं दोन प्रहरीं गणपतरावांची बायको सरस्वती आपल्या एक महिन्याच्या अर्भकाला घेऊन कादंबरीच्या भेटीकरितां आली. आपणावर डॉक्टरीणबाईंचे किती उपकार आहेत, हें ती विसरली नव्हती. तिला पाहून कादंबरीलाहि आनंद झाला. मुलाला तिनें आपल्या मांडीवर घेतलें आणि त्याचें नांव विचारून झाल्यावर त्यांच्या इतर गोष्टी सुरू झाल्या. सांगलींत आल्यापासून कादंबरीला इतक्या मोकळ्या मनानें अद्यापि वागतांच आलें नाहीं. ती रोग्यांना तपासण्याकरितां म्हणून पुष्कळांच्या—श्रीमंत गरिबांच्या घरीं जात होती. तेथें ती मिळून मिसळून वागण्याचा प्रयत्नहि करी. परंतु 'मोठ्या डॉक्टरीणबाई' म्हणून प्रत्येक घरची मंडळी तिच्या बरोबर फार आदबीनें वागत असे. विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें तिला तशींच जपून मिळत असत. परंतु आज तिच्याकडे आलेल्या सरस्वतीची गोष्ट तशी नव्हती. सांगलींत येतांच पहिली ओळख तिची झाली असल्यामुळें त्यांतून तो प्रसंगहि तसाच असल्यामुळें सरस्वती तिच्याबरोबर अगदीं मनमोकळें करून बोलत होती.

" तुम्ही आज आलां म्हणून मला आनंद झाला. माझी तशी अद्यापि कुणाची विशेष ओळख झाली नाहीं. रोग्यांना पाहण्याकरितां मी पुष्कळ ठिकाणीं जातें. पण तेथें काय ? रोग्यांना पहावं, आपलं काम करावं आणि यावं ! नाहीं म्हणायला दोनचारदां कारभाऱ्यांच्याकडे गेलें होतें."

" मी परवां तेथेंच आपला शोध घेण्याकरितां घरांत सांगितलं. तेव्हां 'तूं स्वतः मुलाला घेऊन डॉक्टरीणबाईसाहेबांना भेट, असं सांगणं झालं. पण थोरामोठ्यांच्या घरीं जावं कसं ? असा मला विचार पडला."

" कां बरं इतका विचार पडण्याचं काय कारण ? थोरामोठ्यांच्या घरच्या माणसांना कांहीं विशेष शिंगं असतात कीं काय ? "

" असतात म्हटलीं तर असतात आणि नसतात म्हटलीं तर नसतातहि ! आतां हेंच पहा, तुम्हीं इतक्या मोठ्या विलायतेंत गेलेल्या पण माझ्याशीं बसलां आहांत कीं नाहीं मोकळ्या मनानं बोलत ! पण आमच्या येथल्या बड्या घरच्या बायका आपल्याच तोऱ्यांत आणि डौलांत ! म्हणून मी आलें नाहीं. पण काल तुम्हांला मी गाडींतून जातांना पाहिलें."

" कुठून पाहिलें ? मग त्याच वेळीं कां नाहीं हांक मारली ?

" हांक कशी मारायची तुम्हांला डॉक्टरीणबाई ? अहो आम्हीं यत्किंचित् माणसं ? आपल्या पायरीनें राहावं हें चांगलं !"

" मग तुम्हीं राहतां कुठं ? इथं जवळच राहतां वाटतं ?"

" आम्हीं राहतों तिकडे पांजरपोळाजवळ. पण सध्यां आमच्या घराचं काम चाललं आहे म्हणून इकडे हरिपुरकरांच्या वाड्यांत आलों आहोंत."

हरिपुरकरांचें नांव निघतांच कादंबरी एकदम चमकली. तिनें चटकन् विचारलें, " कोणाच्या वाड्यांत ?"

" रघुनाथराव हरिपुरकरांच्या वाड्यांत. त्यांचा आणि आमच्या घरचा अगदीं बाळपणापासून मित्रपणा आहे."

ज्या नांवाचा इतकीं वर्षें कादंबरीला निदिध्यास लागला होता, तें आज नांव तिच्या कानीं पडलें. क्षणभर ती त्या ध्वनींत गुंग झाली. तिनें किंचित् काळ आपले डोळे मिटून घेतले.

" भावोजी सध्यां सांगलींत रहात नाहींत. ते आणि त्यांची आई हरिपुरांत राहतात. तेथें त्यांनीं नवीन बाग तयार केला आहे, त्यामुळें बहुधा ते तेथेंच असतात."

" त्याच्या घरीं कोण कोण मंडळी आहेत !"

" ते आणि त्यांची आई. फक्त दोनच ! तशी नोकरचाकर मंडळी पुष्कळच आहे पण मुख्य अशी तीं दोनच !

" आणि त्यांचीं बायकामुलं ? "

" छे ! बायकोच नाहीं मग मुलं कुठून असणार ?"

" बायको नाहीं ?—कां बरं लग्नच केलं नाहीं वाटतं ?"

" लग्न केलं पण बायकोचं आणि त्याचं पटत नाहीं, म्हणून त्यांनीं तिला टाकलं आहे."

" असं काय ? मग त्यांची बायको वाईट स्वभावाची असली पाहिजे."

" तें नाहीं मला माहित ! मीं एकदां तिच्याविषयीं घरांत विचारलं होतं पण तिकडून काय सांगणं झालं तें आतां माझ्या ध्यानांत नाहीं."

" बरं मग पुनः कधीं तरी विचारून मला सांगा. सांगाल ना ? पण काय हो सरस्वतीबाई, त्यांनीं बायकोला टाकलं आहे मग दुसरं लग्न कां नाहीं केलं ?"

" छे ! लग्नाचं नांवच काढूं देत नाहींत. आमच्या घरांतून किती प्रयत्न

झाले. पण कांहीं नाहीं ! भावोजी लग्नच करीत नाहींत."

"मग मला वाटतं, त्यांना बाहेरचा नाद असावा."

"छे ! छे ! भलतंच कांहीं तरी ! भावोजीसारख्या पवित्र वर्तनाचीं माणसं मिळणं कठीण ! कोण त्यांना नावं ठेवील !"

कादंबरीनें इतक्या आतुरतेनें चालविलेली चौकशी ह्या शेवटच्या उत्तरानें एकदम थांबवली.

ओघाओघानें प्रश्न विचारले आणि त्या प्रश्नांचीं उत्तरेंहि सरळ मिळालीं. त्या उत्तरापासून कादंबरीला प्रथम आनंद झाला परंतु क्षणभरानें तिचा आनंद पार मावळला. आजपर्यंत कधीं स्वप्नांत सुद्धां तिला पतीच्या वर्तनाविषयीं शंका आली नाहीं. तिनें आतांपर्यंत पतीच्या वर्तनाबद्दल कुणाजवळ एका शब्दानेंहि चौकशी केली नव्हती. कारण ती स्वतः निर्मळ होती. तिचा आचार, विचार आणि व्यवहारहि निर्मळ होता. स्वतःप्रमाणेंच ती पतीला समजत होती. आज नाहीं, उद्यां आपले खडतर दिवस संपून आपलें आणि पतीचें मीलन होणार ही तिची खात्री होती. बाळपणांत आईकडून मिळालेल्या शिक्षणांत ती हेंच शिकली होती, प्रत्येक साध्वी स्त्रीच्या चरित्रांतून तिनें हेंच सार काढून तें आपल्या अंतःकरणांत सांटवून ठेवलें होतें. 'सावित्री, दमयंती, सीता, द्रौपदी इत्यादि अनेक आर्य स्त्रियांनीं भोगलेलीं दुःखें हीं त्यांच्या पुढल्या सुखाची तपश्चर्या' असें सुमतीबाईनें तिच्या मनावर बिंबविलें होतें. आणि आपलीहि ही तपश्चर्या अखेर आपणास सुखच दाखवील याबद्दल तिला केव्हांहि शंका आली नव्हती. अशा रितीनें तिच्या मनाची पूर्ण खात्री असतांना आपल्या पतीच्या वर्तनाविषयीं शंकेचे प्रश्न आपण कसे विचारले हेंच तिला कळेना. ती दुःखित मनानें विचारलेल्या प्रश्नांचा विचार करीत स्तब्ध बसली असतां सरस्वती म्हणाली, "डॉक्टरीणसाहेब रघुनाथरावांना मीच चांगलं म्हणतें असं नाहीं. तर सर्व सांगली त्यांचे गुण गातात. त्यांचं आणि त्यांच्या बायकोचं कां बिनसलं हेंच कुणाला कळत नाहीं. लोक नानाप्रकारच्या शंकाकुशंका काढतात. वास्तविक ते खरोखरीच सर्व गोष्टींनीं दैववान्—भाग्यवान आहेत पण ह्या बायकोच्या बाबतींत ईश्वरानें त्यांना असं दुःखी कां केलं, हें कोडं आम्हाला उकलत नाहीं."

"यांत कोडं कसलं ! ही ईश्वराच्या घरची एक कसोटी आहे."

"असली कसली मेली ही कसोटी ! तुम्ही जर एकदां रघुनाथरावांना स्वतः पहाल तर तुम्हीहि म्हणाल कीं, ही ईश्वराच्या घरची कसोटी नसून हा त्याच्या

हातून मोठा अन्याय होत आहे. ”

“ इतके जर ते चांगले आहेत, तर मग त्यांनीं आपल्या बायकोला कां टाकलं ? ती कदाचित् वाईट असली तरी त्यांनीं तिला चांगलं करणं हें त्याचं कर्तव्य आहे. असा त्यांनीं कधीं प्रयत्न केला होता काय ? ”

“ तें नाहीं मला माहित. पण आमच्या घरांतून असा प्रयत्न केला होता. ”

“ मग काय झालं ? ”

“ कांहीं नाहीं. ”

“ कांहीं नाहीं ?—मोठं आश्चर्य आहे. प्रयत्न करून ती वळत नाहीं तर ती बायको तरी कशी आहे ? मला जर तिचं नांव गांव पत्ता कळेल तर मी करीन पुनः एकदां प्रयत्न ! ”

“ खरंच, तुम्हीं जर मनावर घ्याल तर खात्रीनें हें होईल. मी उद्यां घरांत विचारून सर्व कांहीं माहिती तुम्हांला देतें. तुमच्या तरी प्रयत्नाला यश येऊं द्या ! ”

सरस्वतीचें हें भाषण ऐकून कादंबरीला कौतुक वाटलें. तिनें हांसत उत्तर दिलें. “ माझ्यावर हें काम सोंपवा मग पहा मला खात्रीनं यश येतं कीं नाहीं तें ! ”

सरस्वती आमच्या नायिकेच्या मुखाकडे पहात राहिली. तिच्या शब्दावर सरस्वतीचा विश्वास होता. एका महिन्यापूर्वींच ती स्वतः कादंबरीच्या हातानेंच संकटमुक्त झाली होती. त्यावेळेपासून तिच्या मनांत कादंबरीविषयीं आदर पूज्यभाव आणि विश्वास उत्पन्न झाला होता. ह्या तिच्या पूर्वींच्या विश्वासाला ह्या आतांच्या कादंबरीच्या भाषणानें व्यापकता आली. रघुनाथरावांचें आणि त्यांच्या पत्नीचें ऐक्य व्हावें म्हणून आजवर इतके प्रयत्न होऊन यश आलें नाहीं, तथापि कादंबरीबाईच्या प्रयत्नाला खात्रीनें यश येईल अशी तिची मनोदेवता तिला सांगूं लागली. अशा रीतीनें ती आपल्या विचारांत मग्न अशी कादंबरीकडे पहात असतां कादंबरी सस्मित उठली आणि म्हणाली, “ सरस्वतीबाई, तुम्ही अशा बुचकळ्यांत कां पडलां ? माझ्या प्रयत्नाला यश येणार नाहीं असं का तुम्हाला वाटतं ? अहो, प्रयत्न केल्यावर काय होणार नाहीं ? मी आजवर जे जे प्रयत्न केले, त्या सर्वांत मला यश आलं आहे. मी म्हणतें, तुमच्या यजमानांनीं जर खरोखरीच मनापासून चिकाटीचा प्रयत्न केला असता तर त्यांना यश येऊन तुम्ही आणि मी जशा आज प्रेमानं गोष्टी बोलत बसलों आहों, तशाच तुम्ही त्यांच्या बरोबर आज बोलत बसतां असतां ! ”

" पण आमच्या रघुनाथराव भावोजींच्या बायकोचा स्वभाव कसा असेल तो कोण जाणे ! त्या अशा बोलत बसतील कीं आपल्याच तोऱ्यांत राहतील, हें तरी कुणी सांगावं ? "

" कुणी कशाला ?—मी सांगतें. त्यांचा स्वभाव थेट माझ्यासारखा आहे. मी अशी आज तुमच्याबरोबर बोलत बसलें आहें तशी—अगदीं तशीच ती तुमच्याशीं वागेल ! "

" कशावरून सांगतां तुम्ही डॉक्टरीणसाहेब ? "

" कशावरून सांगतां म्हणजे मी " डॉक्टर कादंबरी " हें तुम्ही विसरतां वाटतं ! आम्हांला माणसांची तशीच त्यांच्या सर्व रोगांची परीक्षा करतां येते. मी आतां काय म्हणतें याची नीट आठवण ठेवा; कारण पुढें मागें मी ह्या सर्व भाषणाची आपणास ओळख देणार आहें बरं ! " असें हांसत हांसत म्हणत कादंबरी उठली आणि मुलाच्या हातांत पांच रुपये घालून तिनें सरस्वतीला कुंकू लावलें. रोगी येण्याचा वेळ होत आला म्हणून तिनें आटोपतें घेतलें. नाहींतर कादंबरी तिच्याबरोबर बराच वेळ गप्पा गोष्टी करीत बसली असती. कारण शांताबाईचें घर सोडल्यापासून इतक्या दिवसांत आजच तिला किंचित् मन मोकळें करून बोलायला सांपडलें. सरस्वतीला कुंकू लावून झाल्यावर आमची नायिका म्हणाली, " मग आतां मला तुमच्या वहिनींची माहिती केंव्हां द्याल ? "

" घरांत विचारून उद्यां सर्व माहिती सांगतें. "

" तुम्हांला नाहीं का कांहीं माहिती ?—तुम्ही तिला पाहिलं तरी आहे का ?"

" नाहीं. मी कुठून पहाणार ? त्या कशा—काळ्या कीं गोऱ्या याची मला कल्पनाहि नाहीं. "

" पाहिल्या नाहींत ?—सरस्वतीबाई असं कसं होईल ? अहो तुम्ही त्यांना पाहिलं आहे; आणि आतां पाहतांहि अहांत ! "

" पाहिल्या आहेत ?— आणि आतांहि पहातें आहें ? " गोंधळलेल्या स्वरांत सरस्वती म्हणाली.

" हो—पहात अहांत ! पण तुमची त्यांची ' वहिनी म्हणून ओळख झालेली नाहीं. परंतु त्या अगदीं तुमच्याजवळ आहेत. " ह्या कादंबरीच्या भाषणानें ती ज्यास्तच गोंधळांत पडली.

" खरंच कां त्या इथं आहेत ?—मग आमच्या घरांत कसं नाहीं कळलं ?—खरंच का डॉक्टरीणसाहेब, त्या इथं आहेत ? तुम्ही ओळखतां का त्यांना ? "

" हो, अगदीं चांगली ओळखतें ! ती आणि मी अगदीं एक–जीवाभावाच्य एक आहोत, "

" मग माझी करून द्याल का ओळख ?–केव्हां ? "

" तुम्ही सांगाल तेव्हां !–उद्यां देखील करीन. "

सरस्वती आपल्या मुलाला घेऊन गेल्यावर कादंबरी बराच वेळ स्वतःशीं हांसत होती. तिला आतां एकप्रकारचा हुरूप वाटूं लागला. मध्यंतरी सरस्वतीबरोबर बोलतांना तिला किंचित् उदासिनता आली होती. परंतु ती उदासीनता आतां जाऊन तिचें मन प्रफुल्लित झालें. आपणाकडे आज एक नवीन कामगिरी आली आहे, असें तिला वाटूं लागलें. हळुहळू तिचें मन उचंबळून येऊं लागलें. आणि त्या आनंदाच्या लहरींत आपणाकडे आलेल्या कामगिरीच्या सिध्यर्थ आपणास काम करावें लागणार याचाहि ती विचार करूं लागली. त्या दिवशीं संध्याकाळीं रोगी तपासण्याचें काम तिनें कितीतरी लौकर आटोपलें. शिवाय दोनतीन ठिकाणीं ती गरीब रोगी पाहण्याकरितां गेली होती, तेथें तिनें नेहमींपेक्षां सढळ हातानें पैशांची मदत केली, तिच्याप्रमाणें हरी देखील आज आनंदांत होता. त्याला आज मुंबईहून त्याच्या धाकट्या भावाकडून एकंदर सविस्तर हकीगतीचें पत्र आलें होतें. त्या पत्रांतील खुशालीच्या बातमीनें त्याचेंहि मन आनंदांत होतें. तो आतां डॉक्टर-कादंबरीचा एक हुशार कंपौंडर बनला होता. दवाखान्याचें काम आटोपून तो आपला अभ्यासहि फार हुशारीनें करीत असे. आपणहि पुढें डॉक्टर व्हावें, अशी इच्छा अलीकडे त्याच्या मनांत उद्भवूं लागली होती. आणि 'तुला मी तूं शिकलास तर डॉक्टर करीन !' असें आमच्या नायिकेनें त्याला आश्वासनहि दिलें होतें.

संध्याकाळी दवाखान्यांतील सर्व काम संपल्यावर कादंबरी स्वस्थ चित्तानें बाहेरच्या सोप्यांत विचार करीत ईझिचेअरवर बसली होती. एका बाजूला हरी आपल्या धाकट्या भावाला पत्र लिहित बसला होता. घरांत आचारी स्वयंपाक करण्याच्या गडबडींत गुंतला होता. आणि इतर नोकरचाकर आपल्या उद्योगांत होते. परंतु कादंबरीचें लक्ष कुणाकडेहि नव्हतें. नाहींतर ती अशी स्वस्थ केव्हांही बसायची नाहीं, सदासर्वदा ती कोणत्यातरी कामांत गुंतलेली असे. आजपर्यंत 'कसें होईल ?' 'काय होईल ?' इ० भावी स्थितीचा विचार करण्याचा तिला प्रसंगच आला नव्हता. हें आमचें लिहिणें वाचकांना चमत्कारिक वाटण्यासारखें आहे, परंतु खरोखरीच वस्तुस्थिति तशी होती. विलायतेंत जाऊन ती मोठी परीक्षा देऊन आली त्या पूर्वी किंवा इतर बाबतींत तिच्या मनांत भावी गोष्टीविषयीं कधींहि

विचार आले नाहींत, अगर तिनें कधीं विचारच केला नाहीं हें संभवनीय तरी आहे काय ! जगांत विचाररहीत कोण आहे ? विचार करणें हा मनुष्यस्वभाव असतां आमच्या कथानायिकेला हा निसर्गाचा नियम लागू नव्हता, ही गोष्ट कोण खरी मानील ? कादंबरीच्या मनांत विचार येत नव्हते असें नाहीं. परंतु तिच्या विचारांची मर्यादा फारच अल्पावधीची असे. " आपण विलायतेंत जाणार, तेथें काय होईल ? " असा विचार तिच्या मनांत उद्भवतो न उद्भवतो तों " आपण अभ्यास करणार आणि पास होणार ! " असें मनाकडून झटकन् उत्तर मिळतांच तो विचार तिच्या मनांतून पार नाहींसा होई. पतिविषयीं कैकवेळां तिच्या मनांत विचार आले. परंतु आजीच्या आणि मातापितरांच्या सांगण्यावर तिचा दृढ विश्वास असल्यामुळें ' आपण अखेर सुखी होणार ' ह्या विश्वासावर पतिविषयक भावी स्थितीचे विचार तिच्या मनांत फार वेळ टिकतच नसत. परंतु आजच्या विचाराला मात्र तिला लौकर उत्तर मिळेना. आपणाकडे येणारी कामगिरी आपण कशी पार पाडावी, याबद्दल बराच वेळ विचार केल्यावर उद्यां आपण कोण याची सरस्वती-बाईला ओळख द्यावयाची असें जें तिनें ठरविलें होतें तो विचार आतां तिला पसंत पडेना. शेवटीं जेवण होत असतां तिचा एक विचार कायम झाला. आतांपर्यंत आपण प्रसंगानुसार वर्तन करीत आलों, त्याचप्रमाणें काळावर विश्वास ठेवून तो जसे जसे प्रसंग आणील तसतसेंच वागावयाचें असें तिनें ठरविलें.

जेवण झाल्यावर कादंबरी दिवाणखान्यांत आली तेथें गणपतराव ऊर्फ गण्या-बापूची स्वारी एका खुर्चीवर बसलेली तिच्या दृष्टीस पडली. त्याबरोबर गणपतराव उठून हांसत हांसत म्हणाले, " आज इतके दिवस मीं आपल्या भेटीला ' येईन ' म्हणतों पण कामाच्या गर्दींत कांहीं वेळ मिळाला नाहीं. "

" कामाच्या गर्दींत वेळ मिळाला नाहीं, ही गोष्ट खरी असो कीं खोटी असो; पण ' गरज सरो आणि वैद्य मरो !' ही म्हण मात्र खरी आहे यांत शंका नाहीं."

" असें नका म्हणूं डॉक्टरीणसाहेब ! आपले आम्हांवर झालेले महद् उपकार आम्ही केव्हांहि विसरणार नाहीं. "

" मग काय त्या उपकाराची आठवण ठेऊन आलां आहांत कां आज ! कीं सरस्वतीबाईनीं कांहीं सांगितलं आहे म्हणून आलां आहांत ! "

" होय तिनं सांगितलं म्हणून आलों आहें. आमच्या रघुनाथरावांची बायको इथं आली आहे आणि ती कुठं आहे हें तुम्हांला माहिती आहे, असं तिनं सांगि-तलं तें विचारण्याकरितां आलों आहें. "

" पण तुम्ही तिला ओळखतां कां ? "

" हो "

" काय ?–तुम्ही तिला ओळखतां म्हणतां ? "

" हो ओळखतों तर ! "

" मग मोठंच आश्चर्य आहे म्हणायचं ! ती तुमच्या कितिदां तरी दृष्टीस पडली मग तुम्ही ओळखलं नाहीं कसं तिला ? "

' माझ्या दृष्टीस पडली म्हणतां ?–केव्हां ?–छे ! असं कधींच व्हायचं नाहीं."

" व्हायचं नाहीं कसं ?– होतच आहे. ! पण तुम्ही तिला केव्हां पाहिलं होतं, !

" लग्नांत ! रघुनाथरावाचं पुण्यांत लग्न झालं, त्या वेळीं ! "

" पण त्या गोष्टीला आतां कितीतरी वर्षें झालीं. पण काय हो गणपतराव, हा असा नवरा-बायकोंत बेबनाव होण्याचं कारण तरी काय ? तुम्हाला सर्व कांहीं माहिती असेलच ! "

गणपतरावानें प्रथमपासून सर्व हकीकत थोडक्यांत सांगून आपण रघुनाथाचें मन वळविण्याकरितां किती प्रयत्न केले, त्याच्या आईनें—मनुताईनें किती दुःख सहन केलें वगैरे सर्व वृत्तांत सांगून झाल्यावर गणपतराव म्हणाले, " जयरामपंत आतां कुठें आहेत, तें देखील आम्हाला माहिती नाहीं. मी दोनदां मुंबईत गेलों होतों तेव्हां मनुताईच्या सांगण्यावरून त्यांचा पुष्कळ शोध केला. पण मला कांहीं पत्ता मिळाला नाहीं. रघुनाथ तर त्यांचें नांव काढूं देत नाहीं. "

" मग तुम्ही प्रयत्न करून काय होणार ? हा विरोध बायकोकडून नसून त्यांच्याकडून आहे. मग नवराबायकोची एकी व्हावी कशी ! "

" तेंच तर आम्हांला कळत नाहीं ना ? बायको शिकली सवरलेली आहे ह्या गोष्टीची दहशत वाटून त्यानें तिचें नांव टाकलें. पण तुमच्यासारख्यांनीं जर प्रयत्न केले तर मात्र कांहीं सांगतां येत नाहीं. "

" आम्ही काय करणार ! हे प्रयत्न त्या बायकोनेंच केले पाहिजेत. "

" म्हणून म्हणतों कीं, ती इथं कुठं आहे तें सांगा, मग आपण योगायोग जुळ-वून आणून त्या दोघांची भेट करवून देऊं आणि मग काय होईल तें पाहूं ! "

" असं म्हणतां?—ठीक आहे. तर मग तुम्ही त्यांना माझ्याकडे घेऊन या. मी त्यांची इथंच भेट करवून देतें. पण ते इथं येतील का ? "

" हो. न यायला काय झालं ? आठ चार दिवसांनीं तो सांगलींत येत असतो. शिवाय तुमच्याबद्दल माझ्या आणि त्याच्या ऱ्याच गोष्टी झाल्या आहेत. मजवर

प्रसंग आला असतां आपण मला कसं संकटमुक्त केलं ती सर्व हकीकत मी त्याला सांगितली आहे. तुम्हांला एकदां भेटण्याबद्दलहि तो म्हणाला आहे. आणि मनुताईनाहि तुम्हाला दाखवायची आहे."

" मी मोठ्या आनंदानें त्यांना पाहीन. पण ते हल्ली हरिपुरांतच का राहतात?"

" तेथें त्यान नवान मळा आणि बागाईत केली आहे. मळ्यांत नवीन मोठी विहीर खणली आहे. रोज दोन मोटी सारख्या चालू आहेत. तुम्ही येत असाल तर चला आपण एकदां संध्याकाळीं फिरत तेथें जावूं! फारच रमणीय बाग केली आहे. मीं उद्यां तेथें जाणार आहे. तेव्हां पाहिजे तर तुम्ही येणार म्हणून सर्व व्यवस्था करून ठेवतों."

" मी येऊं म्हणतां?—पण नको! कामाशिवाय किंवा त्यांनीं बोलविल्याशिवाय जाणं चांगलं नाहीं."

" मग उद्यांच गोष्ट काढून मनुताईना पाहण्याच्या निमित्तानं मी तुम्हाला घेऊन जाण्याकरितां येतों."

" असं कांहीं तरी निमित्त काढा मग माझी तयारी आहे."

निमित्याची इच्छा करतांच तें निमित्य पुढें आलें! एक मनुष्य घाबऱ्या घाबऱ्या आंत आला आणि म्हणाला, "गणपतराव चला, घरीं चला. मालक संध्याकाळीं विहीरींत पडले. त्यांचं कपाळ फुटलं आहे, हात दुखावला आहे. त्यांना आतांच गाडींत घालून वाड्यांत आणलं आहे. तुम्ही इथं अहांत असं कळतांच मी धांवत आलों, ताईनीं डॉक्टर कादंबरीसाहेबांना घेऊन यायला सांगितलं आहे. चला लवकर चला—"

---

## १३........ अपघात

कोणाच्या तरी सुदैवानें आणि कोणाच्या तरी दुर्दैवानें म्हणा रघुनाथाला तो अपघात झाला. कादंबरीची तपश्चर्या संपली म्हणून तो अपघात झाला काय? पतिला अपघात होऊन डॉक्टर ह्या नात्यानें जाऊन आपणास आपल्या देवाची सेवा करण्याचा प्रसंग येईल, असें तिच्या स्वप्नीं तरी होतें काय? खरोखरीच हा कादंबरींत वर्णन करण्यासारखा डॉक्टर कादंबरीच्या आयुष्यांतील अत्यंत चिरस्मरणीय असा प्रसंग होता. मग तुम्ही ह्या प्रसंगाला कादंबरीचें चातुर्य म्हणा किंवा कादबरींत असे प्रसंग हटकून येतात, त्यांपैकींच हा एक प्रसंग आहे, असें म्हणा!

आज चालू असलेल्या बागेंतील मोटीला नवीन खरेदी केलेली बैलांची जोडी जुंपली होती. नोकरांना ते बैल आटोपेनात्! कामाचा सराव होईपर्यंत नवीन बैल असेच त्रास द्यावयाचे! बैल नोकरांना आवरत नाहीं असें पाहून रघुनाथ स्वतः आसूड घेऊन बैलांना पुढें मागें हाकूं लागला. एखाद्यावेळीं बैल झपाट्यानें मोट भरून ओढीत, तर दुसऱ्यावेळीं मागें येतांना खुंटासारखे उभे राहत. अशा पांच दहा मोटी भरल्या. पुढली मोट पाण्यानें भरली. विहिरींत अर्धीअधिक मोट वर येईपर्यंत बैल सरळ चालले. आणि एकाएकीं अडून उभे राहिले. रघुनाथानें आसूडाचा प्रयोग सुरू केला. पांच सहा फटके खाईपर्यंत बैल जागेवरून हालले नाहींत. तेव्हां रागावून रघुनाथानें मोटेच्या मधल्या दोराला हिसडा देऊन आसूड उडविला. फटका वर्मी बसतांच दोन्ही बैल वेगाचा हिसडा देऊन पळूं लागले. त्याबरोबर मधला दोर ताडकन् तुटला. आणि लगेच दुसराहि दोर ताडकन् तुटून भरलेली मोट पुनः विहिरींत पडली. परंतु हिसडा देण्याकरितां रघुनाथानें त्या दोराला धरलें असल्यामुळें मोटेनें त्या दोराबरोबर रघुनाथालाहि आंत ओढलें. पहिल्याप्रथम विहिरीवरील चौकटीच्या गडगडीवर तो आपटला आणि तेथून खालीं विहिरींत पडला. तात्काळ नोकरचाकरांची आरडाओरड आणि धांवपळ सुरू झाली. भडाभड नोकरांनीं विहिरींत उड्या टाकल्या. रघुनाथ बेशुद्धच होता. त्याच्या कपाळाला जबरदस्त जखम झाली होती. डावा हात कोंपरांतील सांध्यांत उखळलां होता. त्याला वर काढलें, तेंव्हां तो नखशिखान्त रक्तानें भिजलेला होता नोकरांनीं त्याला तसेंच उचलून घरीं आणलें. आणि गांवांतील परांजपे वैद्यांना बोलावून आणलें. बिचाऱ्या मनुताईच्या तोंडचें पाणी पळालें. नोकरांनीं त्याला उचलून घरांत आणलें, त्यावेळीं तो भयानक देखावा पाहून बिचारी मनुताई पटकन् धरणीवर पडली! मुलाचें बरें वाईट झालें, असेंच तिला वाटलें. परंतु वैद्यानें तिला बराच धीर दिला. रघुनाथाला शुद्धीवर आणण्याचे बरेच प्रयत्न झाले. परंतु त्याची हालचाल दिसेना. शेवटीं वाड्यांतून इंग्रजी डॉक्टर बोलाविला पाहिजे असें त्याला सांगावें लागलें. परंतु मनुष्य इतक्या लांब जावून तो परत येईपर्यंत रघुनाथरावालाच सांगलींत न्यावें म्हणजे अर्ध्या वेळाची बचत होईल, असें मनुताईनें सुचविल्यावरून त्याला गाडींत घालून सांगलींत आणलें. तोंपर्यंत बरीच रात्र झाली. त्यावेळीं त्यांच्या घरांत गणपतराव आणि त्याचें नुकतेंच बाळंत झालेलें कुटुंब—सरस्वतीबाई रहात होती. त्या दिवशीं दुपारीं ती आमच्या कथानायिकेला भेटण्याकरितां गेली होती, तो सर्व वृत्तांत गेल्या प्रकरणांत येऊन गेला आहे. सायं-

काळीं गणपतराव घरीं आल्यावर तिनें सर्व गोष्टी त्याच्या कानावर घातल्या. तेव्हां मोठ्या तांतडीनें जेऊन गणपतराव आमच्या कथानायिकेकडे गेला. तोच थोड्या वेळानें रघुनाथरावाला घेऊन मंडळी आली. गणपतराव नुकतेच डॉक्टर कादंबरीकडे गेले आहेत असें कळतांच मनुताईनें तेथें नोकर पाठविला.

नोकरानें सांगितलेला निरोप ऐकून कादंबरीला काय वाटलें ? तिच्या मनाला वेदना झाल्या ! परंतु लगेच ती गंभीर स्वरांत म्हणाली, "चला माझी तयारी आहे. तुम्ही कांहीं तरी निमित्य काढून मला तेथें नेणार होतां; तें हें एक निमित्य आहे." पण प्रथम मी कल्पना केली होती, त्यापेक्षां मात्र हें निमित्य फार भयंकर आहे." असें म्हणून कादंबरीनें आपल्या शस्त्रास्त्रांची पेटी, औषधांची ब्याग आणि इतर साहित्य घेऊन येण्यास हरीला सांगितलें. 'टांगा आणूं काय ?' म्हणून गणपतरावानें विचारलें परंतु जवळच जावयाचें असल्यामुळें कादंबरी 'नको' म्हणाली. ती बाहेरून जरी अगदीं शान्त आणि गंभीर दिसत होती तरी तिच्या अंतःकरणांत किती विलक्षण गडबड उडाली होती, याची कल्पना फक्त तिच्या मनालाच करतां येण्यासारखी होती.

रघुनाथाला विहिरींतील अपघात होऊन जवळजवळ दोन तास होऊन गेले होते. अद्यापि तो शुद्धीवर आला नव्हता. वैद्यानें आपल्या बटव्यांतील बऱ्याच औषधींचा उपयोग केला होता. परंतु गूण दिसेना तेव्हां तोहि इतराप्रमाणें मोठ्या आतुरतेनें डॉक्टरच्या येण्याची वाट पहात होता. मनुताई तर कुलदेवतेला नवस करून जणूं काय त्या नवसांचा सेतू बांधून त्यांवरून कुलदेवतेला बोलावीत होती. शेवटीं गणपतराव कादंबरीसह इतर मंडळी आली. वाड्यांतून आंत शिरतांच आमच्या कथानायिकेला काय वाटलें असेल ? ह्यापूर्वी ती लग्न झाल्यानंतर फक्त दोनदांच वाड्यांत आली होती. आणि आज इतक्या वर्षांनीं ती तिसऱ्यांदा वाड्यांत येत होती. परंतु वाड्यांतील प्रत्येक कोनाकोपरा तिच्या स्मरणांत होता. आणि असें प्रत्येक कोनाकोपऱ्याचें तिला स्मरण राहिलें यांत नवल तें काय ? ती त्या घराची मालकीण, देवता आणि गृहलक्ष्मीच होती. थोड्या वेळानें सर्व मंडळी वर आली. खोलींत पाय टाकतांच कादंबरीच्या अंगावर अननुभूत असे शहारे उत्पन्न झाले; ते शहारे भीतीचे होते, सुखाचे होते, दुःखाचे होते, कीं कोणत्या भावनेचे होते, हें आम्हांला सांगतां येत नाहीं. तिनें खोलींत प्रवेश करतांच तिला मागच्या एका गोष्टीचें एकदम स्मरण झालें. ज्या दिवशीं ती गोष्ट घडली आणि जो दिवस संसारीजनांनीं नूतन विवाहित पतिपत्नीचा आयुष्यांतील अत्यंत सुखाचा

असें म्हटलें आहे, आणि तोच दिवस आमच्या कथानायिकेला अत्यंत दुःखाचा गेला, त्याची एकदम आठवण झाली. कारण त्याच खोलींत बिछान्यावर बसून घडवंचीवर नवनितांतील नलदमयंती आख्यान वाचीत ती पतीची मार्गप्रतीक्षा करीत होती. तो दिवस ती कधीं तरी विसरेल काय ? मध्यरात्रीच्या सुमारास रघुनाथ दोनतीनदां दरवाजा ढकलून आंत आला आणि मुकाट्यानें अंगावर पांघरूण घेऊन निजला हें त्यावेळीं कादंबरीनें पाहिलेलें चित्र अगदीं हुबेहुब तिला खोलींत पाय टाकतांच आतां दिसलें. रघुनाथरावाला बिछान्यावर निजविलें होतें. उशाजवळ मनुताई अश्रू गाळीत बसली होती. वैद्यहि एका बाजूला बटवा सोडून बसले होते. मनुताई गडबडीनें उठून बाजूला कोपऱ्यांत झाली. कादंबरीला तें कितीतरी चमत्कारिक आणि अवघड वाटलें. कादंबरी ही कोण आहे, हें कळलें असतां मनुताई उठली असती काय ? आपल्या मुलाला बरें करण्याकरितां आलेल्या ह्या डॉक्टर कादंबरीबाई आहेत, हें जाणून ती उठली. आपलें सासुसुनेचें नातें आहे, याची तिला कल्पनाहि नव्हती. आणि ही कल्पना नसल्यामुळेंच आपल्या सासूबाई उठल्या, हें जरी कादंबरीच्या लक्षांत आलें तरी तिनें अत्यंत विनय-भावानें तिला नमस्कार केला. गणपतराव मागें होते, त्यांना आणि वैद्यबुवांनाहि हा कादंबरीचा नमस्कार पाहून जरा चमत्कारिक वाटलें, तथापि त्यांच्या मनांत आमच्या कथानायिकेविषयीं तो नमस्कार आदर उत्पन्न करण्यास कारण झाला. तात्काळ गणपतरावानें कोपऱ्यांतील खुर्ची पुढें केली, परंतु कादंबरी त्या खुर्चीवर न बसतां खालीं जाजमावर बसली. तिची छाती धड्धड् उडूं लागली, तिच्या कपाळावर घर्मबिंदु चमकूं लागले. हात थरथर कांपूं लागले. तथापि रघुनाथाच्या निस्तेज आणि कपाळावर झालेल्या जखमेंतील रक्तानें भेसूर दिसणाऱ्या चेहऱ्याकडे तिची दृष्टी स्थीर झाली. ज्या मूर्तीच्या दर्शनाकरितां आजवर तिनें इतकी तपश्चर्या केली, त्याची पूर्तता आज झाली ! परंतु कादंबरी ! तुझ्या तपश्चर्येचें फळ केव्हां मिळेल ?

" डॉक्टरीणबाईसाहेब ! माझा रघू बरा होईल ना ? " आर्तस्वरांत विचारलेले मनुताईचे शब्द कानीं पडतांच कादंबरी आपल्या पतिमुखदर्शन समाधींतून जागी झाली. सासुबाईचे ते शब्द तिच्या अंतःकरणाला पीळ पाडीत गेले. तिनें उत्तरा-ऐवजीं पतीच्या कपाळाला हात लावला. त्या स्पर्शाबरोबर विद्युत् उत्पन्न होऊन तिला नखशिखान्त थरथरविणारा धक्का बसला. असें कां व्हावें ? ह्यापूर्वी तिनें कैक रोग्यांना हात लावला होता, कैक असाध्य रोग्यांच्या निराश झालेल्या आते-

ष्टांना धीराचे शब्द सांगितले होते परंतु आज आपल्या सासूला धीराचा शब्द सांगण्याकरितां तिचें तोंडच उघडेना ! हा प्रभाव कशाचा !—आज प्रथमच तिला पतीच्या शरिराचा स्पर्श झाला !

एखादा गाढ झोंपी गेलेला मनुष्य तोंडावर पाणी शिंपडतांच जसा खडबडून जागा होतो, तशी कादंबरी झटकन् जागी झाली. कर्तव्याची आठवण होतांच तिनें लगबगीनें ब्याग पुढें ओढली आणि आपल्या औषधोपायाला सुरवात केली. दहा मिनिटांच्या आंत हरीच्या मदतीनें तिनें जखम धुवून पुसून नीट बांधली. नंतर रघुनाथरावाला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न सुरू केला. दोन तीन तास वैद्याला जें साधलें नाहीं तेंच कादंबरीनें दोन तीन मिनिटांत साधलें ! रघुनाथरावानें एक दीर्घ श्वास सोडून आपल्या शरिराची हालचाल केली. थोड्या वेळानें 'आ-ई-ई—! ' असा अस्पष्ट शब्द त्याच्या मुखांतून बाहेर पडला.

" रघू बाळ कसं वाटतं तुला ? " आईचें अंतःकरण तें !—अगदीं जवळ येऊन मनुताईनें पहिला प्रश्न विचाला.

क्षणभरानें पुनः रघुनाथराव हाल चाल करूं लागला. आतां तो शुद्धीवर येऊं लागला. कांहीं वेळानें उजवा हात हळूच हलवीत " आयाई-हा हात-आई-! " असे दोन तीन शब्द त्याच्या मुखांतून बाहेर पडले. तात्काळ कादंबरीनें त्या हाताकडे पाहिलें तों तो हात सुजलेला तिच्या दृष्टीस पडला. तिनें सर्व हाताची परीक्षा केली. हात कुठें दुखावला आहे हें लक्षांत येतांच आपल्या ब्यागमधून साहित्य बाहेर काढून तिनें हरीच्या साह्यानें हाताला उलट हिसका दिला. त्याबरोबर ' कडकडून ' हाड वाजून उखळलेला सांधा पूर्ववत् जागीं जाऊन बसला. परंतु हिसक्याबरोबर रघुनाथरावानें मोठ्यानें किंकाळी फोडली !

आणखी कांहीं जखमा किंवा हाडांना दुखापत वगैरे कांहीं झालें आहे किंवा काय याची नीट तपासणी करून मनाचें समाधान झाल्यावर कादंबरीनें पोटांत देण्याच्या औषधांची योजना केली. आणि स्वतः औषध तयार करून तिनें रघुनाथरावाला एक डोस दिला.

" डॉक्टरीण साहेब ! आतां तुम्हांला रघुनाथाविषयीं काय वाटतं ? " पुढें होऊन गणपतरावानें हळूच विचारलें.

" कांहीं काळजी करूं नका ! त्यांच्या जीविताला काडीचाहि धक्का नाहीं. ह्या अपघातामुळें कांहीं जास्त काळ बिछान्यावर पडून रहावें लागेल त्याला मात्र इलाज नाहीं. " असें म्हणून कादंबरीनें रोग्याची नाडी आपल्या हातांत धरली. आतां

रघुनाथरावाला ताप चढूं लागला होता. परंतु त्या तापाबद्दल तिला कांहींच काळजी वाटली नाहीं. नाडी पाहून झाल्यावर दुसरी कोणत्या औषधाची योजना करावयाची तें हरीला सांगून दवाखान्यांतून औषध तयार करून आणण्याकरितां पाठविलें.

नऊ वाजून गेले. पतीच्या उशाजवळ बसून कादंबरी मननपूर्वक शान्त चित्तानें पतीमुखावलोकन करीत होती. त्या अमृताचें पान आतां तिनें आकंठ चालविलें होतें. हा अमृतविधि तिला किती तरी वर्षांनीं आज अशा विलक्षण रीतीनें अकल्पित सांपडला होता. थोड्या वेळानें हरि औषध घेऊन आला. आतां डाक्टरीणसाहेब आपल्या घरीं जातील असें गणपतरावाला वाटलें परंतु कादंबरीची कांहींच हालचाल दिसेना. ती इतका वेळ कधींहि कोणत्या रोग्याजवळ बसली नव्हती. त्यामुळें हरीच्या मनांत निराळेच विचारतरंग उद्भवूं लागले. अपघात भयंकर प्रमाणांत होऊन रोग्याची कठीणावस्था असेल म्हणूनच डॉक्टर कादंबरी इतका वेळ रोग्याच्या उशाजवळ बसून राहिली आहे, असें त्याला वाटलें. परंतु कादंबरी इतर रोग्यापेक्षां ह्या रोग्याबरोबर कर्तव्यानें किती निकट बांधलेली आहे, याची त्या अजाण मुलाला काय कल्पना! आणखी एक तास लोटला. कादंबरी अद्यापि स्तब्धच बसली होती. बाजूला बसलेल्या मनुताईला किंवा गणपतरावाला बोलण्याचा धीरच होत नव्हता. आतां पुढें काय करावयाचें तें कादंबरीनें मनांत ठरवून ठेवलें होतें. आतां त्या गोष्टीची अंमलबजावणी कशी करावी याचा विचार करीत कादंबरी बाजूला वळून गणपतरावाला म्हणाली, "तुम्ही जेवलांत का? नसल्यास जा. मी इंथं बसली आहे. आतां थोड्या वेळांनीं ते जागे झाल्यावर दूध द्यावं लागेल. तें देऊन मग औषध देईन. आपण इकडची आतां काळजी करूं नका. जा—जेवण वगैरे उरकून या."

सरस्वती दोनचारदां डोकावून गेलीच होती. त्यांचें जेवण वगैरे झाल्यानंतर ही मंडळी अगांतुक आल्यामुळें तिला मनुताईकरितां पुनः स्वयंपाक करावा लागला होता. आतां ती वर आली होती, ती मनुताईला जेवणाकरितां बोलाविण्याकरितांच आली होती. इतक्यांत कादंबरीनेंहि जेवणाचीच गोष्ट काढली, तेव्हां मनुताई म्हणाली, "सरस्वती, दूधाचें भांडें वर घेऊन ये आणि मला वाढ मी येतें."

थोड्या वेळानें सरस्वती दूध घेऊन वर आली. तिच्या बरोबर मनुताई जेवणाकरितां खालीं गेली. थोड्या वेळानें कादंबरीहि उठली, तें पाहून गणपतराव म्हणाला, "काय पाहिजे तुम्हांला?"

" मला खालीं जावयाचें आहे. सरस्वतीबाई बरोबर थोडं काम आहे."

" मला सांगा—तुम्ही कशाला श्रम घेतां ?"

" नाहीं–मलाच गेलं पाहिजे. मी आतां पुनः वर येतें. तोंपर्यंत तुम्हीं इकडेच बसून रहा." असें म्हणून कादंबरी उठली. तिला रस्ता दाखविण्याकरितां गणपतराव पुढें होऊं लागला, तेव्हां ती म्हणाली, " तुम्ही नका येऊं. मला ठाऊक आहे."

कादंबरी खालीं आली आणि स्वयंपाक घराच्या दरवाजाजवळ उभी राहिली, अद्यापि मनुताई पाटावर बसली नव्हती. ती वस्त्र बदलीत सरस्वतीला अपघाताची हकीकत सांगत होती. कादंबरीला पाहतांच तिची गडबड उडाली. ती घाई-घाईनें पुढें आली. सरस्वती दरवाजाच्या बाजूलाच उभी होती. तिनें विचारलें, " काय डॉक्टरीण साहेब, काय पाहिजे !"

" मला थोडं खासगी बोलायचं आहे. तुम्ही जरा बाहेर जा—"

सरस्वती तिच्या तोंडाकडे पहात राहिली. परंतु कादंबरीनें पुनः तेंच सांगतांच ती मुकाट्यानें बाहेर गेली. तेव्हां कादंबरीनें दरवाजा बंद करून घेतला. ही काय करीत आहे, याचा मनुताईला कांहींच उमज पडेना. ती गोंधळल्या सारखी झाली परंतु तिकडे लक्ष न देतां कादंबरीनें खालीं वांकून मनुताईच्या चरणाचें वंदन केलें. त्या बरोबर " हें–हें–काय ! डॉक्टरीणबाई साहेब, हें काय भलतंच ? अहो मीच तुमच्या पाया पडायचं तें हें काय उलटं !"

" मला आपण ओळखलं नाहीं का ?"

" ओळखलं नाहीं कसं ? अहो तुम्ही मोठ्या इलायतेंतून जाऊन आलेल्या डॉक्टरीण साहेब ? काय माझं आणि रघूचं भाग्य म्हणून तुम्ही इकडे आलां—"

" नाहीं—तुम्ही अजून मला अद्यापि ओळखलं नाहीं !—तासूबाई, तुम्ही ह्या अभागी कमूला विसरलां काय ?"

" काय—काय ? कमू !—खरंच !-देवा, काय मी ऐकतें ?-होय माझी कमूच ! अहाहा !" असें म्हणून मनुताईनें झटकन् तिला आपणाजवळ ओढून आपल्या हृदयाशीं आवळून धरलें. आईच्या अंतःकरणासारखेंच हें दुसरें अंतःकरण मिळतांच कादंबरीनें तिकडे आपलें डोकें टेकलें ! मनुताईच्या नेत्रांत सारखे अश्रू वाहूं लागले. क्षणभरानें ती म्हणाली, " कमू किती मोठी झालीस गं !–आई कशी आहे; वहिनी कशी आहे, जयरामदादा कसा आहे ?"

" सर्व अगदीं खुशाल आहेत."

" पण आज इतके दिवस तूं सांगलींत आहेस मग कां बरं आली नाहींस ? आम्हीं आज किती दिवस तुझं नांव ऐकतों. "

" मी कां आलें नाहीं !—माझा इकडून तिरस्कार करणं होतं ना ?—पण आतां मी कोण हें मात्र तुम्ही कळूं देऊं नका. नाहींतर माझा हातीतोंडी आलेला घास जाईल. अगदीं ह्या कानाची गोष्ट त्या कानाला कळूं देऊं नका !—तिकडचा राग, तिरस्कार सर्व कांहीं मी दूर करीन पण तुम्ही मला मदत करा—"

" करीन बरं बये ! तुला मी वाटेल ती मदत करीन. पण माझा रघु बरा होईल ना ? "

" ती काळजी मला आहे. पण सरस्वतीबाईला सुद्धां कांहीं कळूं देऊं नका !—आतां मी वर जातें—"

" पण दोन घांस खा—"

" नको–जेऊनच आलें. मला आतां कांहीं काळ अगदीं परक्याप्रमाणेंच लेखा–माझ्या ह्या प्रयत्नाला यश येऊं द्या. "

" येईल बरं बये ! तुला यशच येईल ! "

" कादंबरी पुनः वर आली. थोड्या वेळानें मनुताईहि वर आली. तिला आज जेवणच गेलें नाहीं. मुलावर ओढवलेल्या प्रसंगामुळें तिची छाती दडपलेलीच होती, परंतु कादंबरीची ही अकल्पित भेट होतांच आनंदानें तिचें पोट खरोखरीच भरलें ! ती पानावर बसली खरी पण आनंदाच्या विचारांत गुंतलेल्या मनाला घांस घेण्याची आठवणच होईना ! ती तशीच पानावरून उठली. प्रसंगाकडे लक्ष देऊन ' नाई, तुम्ही आज एक घांसहि खाल्ला नाहीं ? ' असें विचारण्याचें सरस्वतीला धैर्य झालें नाहीं.

मध्यरात्रीच्या सुमारास रघुनाथराव जागा झाला. तो आतां ' आई–ई ! ' आई–ई ! ' करूं लागला त्याच्या सर्वांगाला, जखमेला आणि हाताला होत असलेल्या असह्य वेदना त्याला सहन होईनाशा झाल्या. तशांतून त्यानें कादंबरीकडे पाहून ' ह्या कोण ? ' असें गणपतरावाला विचारलें.

" ह्या डॉक्टर कादंबरी ! आज ह्या होत्या म्हणूनच तूं आमच्य हातीं लागलास ! "

रघुनाथानें कांहीं उत्तर दिलें नाहीं. फक्त कृतज्ञ दृष्टीनें तिच्याकडे पाहिलें आणि पुनः डोळे मिटून घेतले. कादंबरीनें दुधाचा पेला भरून त्याच्या जवळ नेला तेंव्ह गणपतरावानें त्याला हांक मारिली, दूध पाहतांच तें पिण्याकरितां रघुनाथ उठण्याच

प्रयत्न करूं लागला, तेव्हां कादंबरी म्हणाली, " नाहीं—नाहीं ! उठायचं नाहीं ! आतां अगदीं उठायचं नाहीं ! "

अधिकाराच्या स्वरांत कादंबरी बोलली खरी, परंतु क्षणभरानें ' आपण पतीबरोबर बोललों ! ' असें लक्षांत येतांच तिची छाती एकदम धडधडली !—वैदिक विधीनें पतिपत्नि म्हणून मारलेल्या ह्या ग्रंथींत अशी कोणती अजब जादू भरलेली आहे कीं, त्या स्मृतीची नुसती जाणीवहि तिच्या किंवा त्याच्या अंतःकरणांत अशी विलक्षण खळबळ उडवून टाकते !—एखाद्या लहान आज्ञाधारक मुलाप्रमाणें रघुनाथरावानें न उठतां कादंबरीनें दूध पाजलें तसें घेतलें. आतां त्याचा ताप किंचित् उतरला होता. परंतु वेदना मात्र बिलकूल कमी झाल्या नव्हत्या. शेवटीं त्यानें कादंबरीला तसें बोलूनहि दाखविलें.

" आपलें सर्वांग ठेंचून निघालें आहे, त्याला तसेंच ह्या हाताला आणि कपाळावरील जखमेला किती वेदना होत असतील, याची मला पूर्ण कल्पना होते. मलाहि तितक्याच वेदना होताहेत, पण काय करणार ? सहन करण्यापलीकडे दुसरा उपाय नाहीं, आतांच आपण दूध घेतलं आहे, तर थोडा वेळ थांबून मी आपणांस झोंप येण्याचं औषध देतें. शान्त झोंप मिळाली कीं आपोआप वेदना कमी होतील. " ह्या कादंबरीच्या भाषणानें रघुनाथरावाची समजूत पटली काय ? तो अगदीं शान्त झालेला दिसूं लागला. त्याच्या वेदनाहि कमी झाल्या. औषधांवाचून ह्या असह्य वेदना कशा कमी झाल्या ! हा कादंबरीच्या मधुर, मंजुळ आणि मनोवेधक वाणीचा प्रभाव ! ' खरोखरीच ह्या डॉक्टरीणबाई अत्यंत कोमल हृदयाच्या आहेत ' अशी त्याची लवकरच खात्री झाली. कारण तो सावध असतांना त्याच्या शुश्रूषेकरितां तिनें जें जें केलें, त्या प्रत्येक कृतींत आस्था आणि प्रेमळपणा होता हें त्याच्या तेव्हांच लक्षांत येऊन चुकलें. ह्या उपजत गुणावरूनच रोग्याच्या शुश्रूषेकरितां स्त्री जातीची निवड केली आहे. तरी इतर स्त्रियांत आणि कादंबरींत किती तरी फरक दिसून येत होता. पतिपत्निचा संबंध तिला प्रत्येक कृति किती आस्थेनें, प्रेमानें आणि आतांपर्यंत मिळविलेल्या ज्ञानाचा कीस काढून करावयास लावीत होता. थोड्या वेळानें कादंबरीनें पुनः विचारलें, " आपणास स्वाभाविकरित्या झोंप आली तर उत्तमच नाहीं तर मग औषध देतें. "

नाहीं—मला झोंप येत नाहीं. आणि ह्या कळाहि सहन होत नाहींत. "

तात्काळ कादंबरीनें औषध तयार केलें आणि तें दिलं. दहा पांच मिनिटांतच रघुनाथरावाला गुंगी येऊन झोंप येऊं लागली. बाजूला बसलेल्या गणपतरावाला

आपली झोंप आवरेना, सर्व दिवस कामानें थकल्यामुळें त्याला विश्रांतीची अत्यंत जरूरी होती परंतु डॉक्टर कादंबरी रोग्याजवळ डोळयांत तेल घालून बसली असल्यामुळें शरमेमुळें त्याला उठतां येईना! किंवा तिला 'आतां फार रात्र झाली, तुम्ही घरीं जा. रघुनाथ आतां पुष्कळ बरा आहे' असें सांगण्याचेंहि धैर्य होईना. बिचारी मनुताई तर काय? प्रत्यक्ष आईच! ती जागत बसली यांत काय नवल? हरि एका कोपऱ्यांत दोन्हीं मांड्यांत डोकें खुपसून स्वस्थ झोंप घेत होता. खरी शुश्रूषा आमची कथानायिकाच करीत होती. शेवटीं डुलक्या घेत असलेल्या गणपतरावाला कादंबरी म्हणाली, "गणपतराव, तुम्ही जाऊन आतां स्वस्थ झोंपा. मी आहें इथं बसलेली!–जा तुम्ही!"

"पण तुम्ही तरी किती वेळ बसाल?"

"माझं कामच आहे. रोग्याला आराम देण्याकरितां–त्याला आरोग्य देण्याकरितां ना तुम्ही मला इकडे घेऊन आलां अहांत? मग मजबद्दल कां तुम्ही काळजी करतां? आणि ताई तुम्हीहि थोडा वेळ पडा!"

कादंबरीशिवाय इतर सर्वांना पहाटेची तास दोन तासाची झोंप मिळली. परंतु तिला मात्र बिलकुल झोंप मिळाली नाहीं. पतिमुखावलोकनांत तिची दृष्टि गुंतल्यामुळें झोंपेकरितां डोळे मिटण्याची तिला आठवणहि झाली नाहीं. इतरांना रात्रीं झालेलें जाग्रण दुसऱ्या दिवशीं चांगलें जाणवलें. परंतु कादंबरीला रात्रीं जाग्रण झालेंच नाहीं असें वाटलें. सकाळीं सात वाजण्याच्या सुमारास रघुनाथराव जागा झाला. रात्रीच्या औषधानें त्याला शांत झोंप लागली खरी परंतु आतां त्याचें डोकें जड झालें होतें. सर्वांगाच्या वेदना पुष्कळ कमी झाल्या होत्या.

"तुम्ही अद्याप इथेंच अहांत काय? सर्व रात्र तुम्ही इथंच बसून होतां काय? तुम्हीं झोंपला नाहीं काय?" रघुनाथरावानें कृतज्ञबुद्धीनें तिला विचारलें. परंतु कादंबरीनें त्यांच्या प्रश्नांना उत्तर न देतां म्हटलें "आपणाला आतां बरं वाटतं ना? रात्रीसारख्या वेदना होत नाहींत ना? मी आतां आपणाकरितां तोंड धुण्याकरितां पाणी घेऊन येतें. आपण बिलकुल उठूं नका. तोंड धुवून थोडं दूध घ्या. मग मी आपल्या जखमेचं 'ड्रेसिंग' करतें, आणि जातें. माझे दुसरे पेशन्ट माझी वाट पहात असतील." कादंबरीनें इतकीं वाक्यें एकामागून एक उच्चारिलीं परंतु तिनें एकदांसुद्धां रघुनाथाच्या मुखाकडे वर मान करून पाहिलें नाहीं. तिला आतां त्यांच्यापुढें उभें राहून बोलण्याचें धैर्य होईना. हें असें कां?— इंग्लंडांत असतांना ती बड्या बड्या लोकांपुढें निर्भय चित्तानें उभी राहिली

होती–मन मोकळें करून बोलली होती; कित्येक पंडितांच्या बरोबर तिनें वादविवादहि केला होता; तसेंच विलायतेहून परत येत असतां ब्यारिस्टरासारख्या कायदेपंडिताला वादांत निरुत्तरहि केलें होतें. पण आज साधारण हिशोबी शिकलेल्या एका व्यक्तीपुढें तिला उभें राहण्याचें किंवा बोलण्याचें धैर्य होत नव्हतें याचा अर्थ काय ? वास्तविक पाहिलें असतां ती व्यक्ति हातांत आसूड घेऊन मोटेचे बैल हांकणारी होती. आणि कादंबरी विलायतेंत जाऊन अति उच्च शिक्षण मिळविलेली खरोखरीच एक पंडिता होती. तिच्याइतकें शिक्षण मिळविलेल्या, विलायतेची हवा खावून आलेल्या आमच्यांतील सुशिक्षितवर्गानें रघुनाथरावाला 'मोट हांक्या' 'शेतांत—मळयांत राबणारा एक शेतकरी' असें तुच्छतेनें लेखिलें असतें. मग आमच्या नायिकेनें त्याला तसें कां लेखिलें नाहीं ? तो तिचा पति होता म्हणून काय ?—पण आमच्या समाजांत 'टफ' करायला शिकलेल्या बायका त्या तुटपुंज्या शिक्षणाच्या घमेंडींत स्वपतीला कःपदार्थ लेखून चहाचा कप उचलायला कशा लावतात, तें पाहिलें म्हणजे कोणीहि आमच्या 'कादंबरी'ची कींवच करील यांत शंका नाहीं. आमच्या कथानायिकेच्या शिक्षणापुढें रघुनाथाचें शिक्षण काय होतें ? परंतु त्या शिक्षणाचा तिला यत्किंचितहि अभिमान नव्हता. आपणाला पति 'मोट हांक्या' आहे; हें आतां जरी तिला कळलें होतें, तरी त्याच्या विषयींचा तिच्या मनांतील आदर कमी न होतां, उलट आतां तो किती तरी पटीनें वाढला होता. याचें कारण काय बरें असेल ?—तिचें शील बनलेलें होतें.

## १४...... रोग्याची शुश्रूषा कीं पतीची सेवा ?

"डॉक्टरीणसाहेब, आतां बुवा आपणाला अगदीं कंटाळा आला आहे. मी आतां खरोखरीच चांगला बरा झालों आहें. आज दहा दिवस झाले, तुम्ही आणखी किती दिवस मला असं बिछान्यावर निजवून ठेवाल ? ही माझ्या डोक्यांतील जखम होईल चार आठ दिवसांत साफ बरी !—हा माझा मोडका हात मात्र मला आणखी कांहीं दिवस गळयांत अडकवून ठेवावा लागेल खरा पण त्याची मला विशेष काळजी वाटत नाहीं."

"मग आपणाला काळजी वाटते कशाची ? "

"काळजी इतकीच वाटते कीं, आपण माझ्याबद्दल फार काळजी वाहतां."

"रोग्याची काळजी वाहणं हें माझं कर्तव्यच आहे."

" होय. पण इतर डॉक्टर थोडीच अशी काळजी वाहतात ? बोलाविलं तर येतात, औषध देतात आणि लगेच चालते होतात. मग तो रोगी जगो कीं मरो ! पण तुम्ही तर रोग्याकरितां रात्रंदिवस काळजी वाहतां—"

" त्याचं कारण आहे. जे डॉक्टर आहेत त्यांनीं रोग्यांची तितकीच काळजी वाहिली पाहिजे. पण मी डॉक्टरीण आहें. मला मी वाहतें तितकी काळजी वाहिली पाहिजे. मी स्त्री आहें आणि काळजी वाहणें स्त्रियांचा स्वभावधर्म आहे. तुमची जर बायको असती तर तिनें अशीच काळजी वाहिली असती."

" शंका आहे—त्याबद्दल मात्र शंका आहे ! "

" हें तुम्ही कशावरून सांगतां ? तुम्ही कधीं त्याबद्दल अनुभव घेतला आहे काय ? "

" अनुभव घ्यायलाच नको ! ती शिकलेली आणि मी हा असा आडमुठा ! तिच्या सारख्या शिकलेल्या जरतारी शालीच्या बायकोला मजसारखा नवरा म्हणजे आडमुठा घाबळीचा कांठ कसा शोभेल ? "

" अगदीं काव्यमय उदाहरण घेऊन सांगतां ? पण सगळ्याच बायका कांहीं अर्ध्या हळकुंडानें पिंवळ्या होणाऱ्या नसतात. प्रत्येक गोष्टींत अपवाद हा असतोच असतो ! "

" अपवाद असतो ही गोष्ट मला मान्य आहे. पण बायकांच्या बाबतींत मात्र अपवाद नसतो. पुण्यास कोणी प्रोफेसर आहेत. त्यांचं द्वितीय कुटुंब जरा कुठं ' री री ' करायला शिकलं आहे. पण त्या एवढ्या मोठ्या प्रोफेसरसाहेबांला कस्पटाप्रमाणें ती वागविते. मी तर असला प्रकार एक क्षणहि सहन करणार नाहीं. आणि म्हणूनच मी आपल्या बायकोपासून दूर आहें. "

" पण तुमचं कुटुंब असं शिकलेलं तरी किती आहे ? "

" तें कांहीं मला माहिती नाहीं. आणि मी त्याची चौकशीहि केली नाहीं. ज्या वाटेला आपणास जावयाचें नाहीं असें ठरलं, त्या वाटेची व्यर्थ उठाठेव आपणास पाहिजे कशाला ? "

" तुम्ही हा आपल्या मनाचा अगदीं भलताच ग्रह करून घेतला आहे. सर्वच शिकलेल्या बायका अशा वागतात हें मत खास चुकीचें आहे. आज दहा दिवस तुमचा माझा परिचय झाला आहे. मीहि शिकलेली आहे. विलायतेला जाऊन आलेली आहे, मजविषयीं आपलं मत काय आहे ? अगदीं प्रांजलपणान सांगा ?"

" तुम्ही एक देवता आहांत खऱ्या ! आणि पूर्ण शिक्षणानें तुमच्या मनाची

संस्कृति झालेली आहे. आणि ह्या दुसऱ्या बायका जरा कुठं 'री री' करायला येऊं लागलं कीं, बेडकीसारख्या पटकन् फुगतात. त्यांना स्वर्ग दोनच बोटं उरतो!"

"तुमची बायकोहि अशीच आहे, असं तुम्ही स्वतःचं मत करून घेतलं, त्याला काय काय कारणं झालीं, तीं आपण मला सांगाल काय?"

"कारणं काय सांगायचीं? लग्नांत आम्ही पुण्यांत गेलों होतों. त्यावेळीं त्या पुण्याच्या मुलींचा चवचालपणा माझ्या चांगला प्रत्ययाला आला. आमच्या मामांच्या शेजारीं एक सुधारक गृहस्थ रहात होते. त्यांची मुलगी—काय बरं तिचं नांव?—छे! आतां नाहीं माझ्या लक्षांत! पण तिचा भाऊ यशवंतराव म्हणून होता. चांगला कॉलेजांत जाऊन पास झालेला होता. त्याचे सर्व प्रताप मला माहित आहेत. इकडे येऊन स्वारी दिग्विज लावून गेली होती. त्या बहिण-भावंडाचें वर्तन मी माझ्या लग्नांत पाहिलें तोच कित्ता आमच्या बायकोचा!"

आपल्या सुखाचा खेळखंडोबा करण्यास कारण काय झालें, तें आज कादंबरीला कळलें. ह्या वरील संवादावरून कादंबरीनें रघुनाथरावाला इतक्या थोड्या दिवसाच्या सहवासांत किती मोकळ्या मनानें वागावयास लाविलें, हें वाचकांच्या लक्षांत येईल. ती दिवसांतून दोनदां आपल्या डॉक्टरीपेषा प्रमाणें येत असे. पहिल्या दिवसापासून तिनें वागण्यांत इतका प्रेमळ आणि मोकळेपणा ठेवला होता कीं तिला यावयास जरा उशीर झाला तर रघुनाथरावाला तेवढ्या पुरतं चुकल्या चुकल्या सारखें होई. अलीकडे रघुनाथरावाच्या जखमेचें ड्रेसिंग आटोपून जातां जातां मनुताईजवळ—आपल्या सासूजवळ तास अर्धातास एकांतांत ती बोलत बसे. अद्यापि तिनें रघुनाथरावाला उठण्याची परवानगी दिली नव्हती. वास्तविक आंत हिंडण्याफिरण्या इतकी त्याच्या अंगीं शक्ति आली होती. परंतु तो हिंडूं फिरूं लागतांच आपणास वरचेवर येण्यास निमित्य राहणार नाहीं, अशी तिला भीति होती. ती रोज कांहींना कांहीं विषय काढून रघुनाथरावाबरोबर तास तास बोलत असे. आज बोलतां बोलतां तिला किती तरी माहिती मिळाली. आपल्या पतीचा आपणाविषयीं असा ग्रह होण्याचें कारण आतां तिला कळलें. ती त्यावरच विचार करूं लागली. पुण्यास असतांना शांता आणि यशवंत आपल्या वडिलांच्या सुधारकीच्या राज्यांत कशीं बेफामपणानें वागत होतीं, हें तिला चांगलें माहीत होतें. त्यांच्या वर्तनावरूनच आपल्या पतीनें असा ग्रह केला आहे, तो आतां आपणास दूर केला पाहिजे म्हणून तिनें तेव्हांच कंबर बांधिली. ती कांहीं बोलत नाहीं असें पाहून रघुनाथराव म्हणाला, "मी बायकांबद्दल बोललों म्हणून तुम्हाला वाईट वाटलं काय?"

" मला यांत वाईट वाटण्याचं कारणच नाहीं. कारण कांहीं बायका तुम्ही म्हणतां तशा दोषी आहेत, हें मलाहि मान्य आहे. पण तुमच्या बायकोच्या बाबतींत खरी वस्तुस्थिति काय आहे, हें तुम्हाला निश्चयात्मक—अगदीं तुमची खात्री झाली आहे, असं कांहीं कळलं आहे का ? " तो कांहीं बोलत नाहीं, असें पाहून कादंबरी पुढें म्हणाली, " तसं कांहीं तुम्हांला सांगतां येत नाहीं, मग मी म्हणतें कीं, तुमची बायको खरोखरीच चांगली आहे. तुम्हीच तिला स्वतःचा चांगुलपणा दाखविण्याची संधि दिली नाहीं—खरंना ? पण आतां असं समजा कीं, तिनें स्वतः होऊन हरप्रयत्नानें जर आपला चांगुलपणा तुमच्या नजरेस आणून दिला; इतकंच नव्हे तर तुमची सर्वतोपरी खात्री पटवून दिली तर तुम्ही तिच्याशीं कसे वागाल ? आपलीं पूर्वींचीं मतं कायम ठेवाल काय ?—"

रघुनाथरावानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. फक्त हासण्यावर ती अंगचटीला आलेली गोष्ट घालविण्याचा प्रयत्न केला. कादंबरीनेंही ती गोष्ट तितक्यावरच ठेविली. आपण आज पुष्कळ कार्य केलें आहे—स्वतःबद्दल पुष्कळ जमिनी तयार करून ठेविली आहे. अशी तिची खात्री झाली. त्या दिवशीं ती घरीं परत येतांच घडलेल्या साद्यंत हकीकतीचें पत्र तिनें वडिलांना लिहिलें. रघुनाथरावाला अपघात झाल्यापासून रोजच्या हकीकतीचं पत्र ती घरीं लिहीतच असे. परंतु स्वसुखाच्या कार्याबद्दल चालविलेल्या प्रयत्नाबद्दल तिनें अद्यापि आपल्या वडिलांना कांहींच कळविलें नव्हतें. परंतु आज तिला खात्रीलायक आशा दिसूं लागतांच तिनें प्रत्येक बारीक सारीक गोष्टहि वडिलांच्या पत्रांत लिहिली. पंतांकडून तिला योग्य अशींच उत्तरें येत होतीं परंतु आजच्या पत्रांत त्यांनींहि उत्तेजनपर उत्तर लिहिलें. " तुझ्या कर्तृत्वशक्तीबद्दल आतां कुणालाच शंका घेण्याचें कारण नाहीं."—त्यांनीं आपल्या उत्तरांत लिहिलें होतें—" तुझं पत्र घरांत आईला वाचून दाखविलें. म्हातारीला किती तरी आनंद झाला. तुझ्याकडे तिचा 'जीव कीं प्राण' लागून राहिला आहे. ती म्हातारी इतकीं वर्षें जगली आहे. याचें कारण फक्त तिला तुझें सुख पाहणें आहे. आणि खात्री आहे कीं, ती तुझें संसारसुख पाहील. मग आनंदानें इथली यात्रा संपवील. तूं दोन्ही बाजूंनीं कर्तव्य म्हणून बांधली गेली आहेस, आजारी ह्या दृष्टीनें विचार केला तरी रघुनाथाची शुश्रूषा करणें, तूं डॉक्टर म्हणून तुझें कर्तव्य आहे. आणि पति ह्या दृष्टीनें त्याची सेवा करणें हेंहि तुझें कर्तव्यच आहे. ह्या दोन्ही कर्तव्यांचीं फळें तुला मिळणार आहेत, ही गोष्ट अगदीं निर्विवाद आहे. फक्त तो दिवस अद्यापि किती लांब

आहे हें आतांच सांगतां येणें शक्य नाहीं. परंतु तो दिवस लवकरच उगवणार आहे, ही पूर्ण खात्री ठेव. आणि आपला प्रयत्न चालू ठेव. ईश्वर न्यायी आहे; हें केव्हांहि विसरूं नकोस. त्याच्यावर पूर्ण विश्वास ठेव म्हणजे तूं सुखी होशील!"

त्या दिवशीं सायंकाळीं कादंबरीला दोन नवीन रोग्यांकडे जावें लागल्यामुळें रघुनाथरावाकडे येण्यास तिला बराच उशीर झाला. परंतु तितकाहि उशीर त्याला असह्य झाला. वास्तविक रोगी ह्या दृष्टीनें पाहतां कादंबरीला दिवसांतून दोन वेळ त्याला पाहाण्याची आतां कांहीं आवश्यकता नव्हती. त्याच्या जखमेचें ड्रेसिंग वगैरे ती सकाळीं एकदांच स्वतः करीत असे. परंतु पंतांनीं पत्रांत लिहिल्याप्रमाणें ती सकाळीं रोगी म्हणून त्यांची शुश्रूषा करी आणि पतीची कांहीं तरी आपल्या हातून सेवा व्हावी म्हणून ती सायंकाळीं येत असे. आज ती येण्यापूर्वीं रघुनाथरावा-जवळ त्याचे मित्र—गणपतराव आणि श्रीधरपंत बसले होते. मनुताई मधून मधून डोकावून जात होती. 'डॉक्टरीणसाहेब अजून कशा आल्या नाहींत?' असें राहून राहून दोनचारदां रघुनाथरावानें विचारलें तेव्हां हांसत गणपतरावाकडे पहात श्रीधर म्हणाला, "अगदीं डॉक्टरीणबाईचा ध्यास लागला आहे ना रघुनाथ? मी मघांपासून पाहतों आहें, तुझं कांहीं आमच्या बोलण्याकडे लक्ष नाहीं. सर्व लक्ष वाड्याच्या दरवाज्याकडे लागलं आहे. तूं इतका स्त्रीद्वेष्टा पण ह्या डॉक्टरीण-बाईनें तुला कशी काय मोहिनी घातली कोण जाणे!"

"श्रीधर, थट्टा पुरे झाली! तूं काय बोलतोस याचा कांहीं विचार!" किंचित् रागानेंच रघुनाथराव म्हणाला.

"पण कायरे गणपती, ह्या डॉक्टरीणबाईचं लग्न झालं असेल काय?" रघु-नाथाच्या भाषणाकडे दुर्लक्ष करून श्रीधर म्हणाला.

"तसं कांहीं दिसत नाहीं. आणि लग्न झालं नसलं तरी त्यांत कांहीं विशेष नाहीं. अलीकडे लग्न न करण्याची ही एक फ्याशनच पडली आहे. मुंबईंत ह्या डॉक्टरणीसारख्या आणखी आहेत दुसऱ्या डॉक्टरणी! खुशाल दवाखाना काढून कमवितात. मी एकदां आमच्या हिला चौकशी करायला सांगणार आहें पण रघुनाथ, तुझा पुढें काय विचार ठरला? डॉक्टरीणबाई निरिच्छ असल्या तरी त्यांनीं आतांपर्यंत तुझ्याकरितां घेतलेले अविश्रांत श्रम तूं फुकट घेऊं नयेस अशी माझी इच्छा आहे. कायरे श्रीधर, तुझं काय मत आहे?" गणपतरावानें ही सूचना ह्या पूर्वीं दोनचारदां केली होती. तो स्वतः बायकोच्या बाळंतपणाच्या वेळीं कादंबरीच्या उपकारांत दडपला होता, त्या उपकाराची फेड कशी करावी ह्या विचारांत तो

होताच; आतां रघुनाथरावामुळें ही एक संधि आली होती, तेव्हां आपणांकडून नाहीं, तरी रघुनाथाकडून डॉ. कादंबरीची चांगली संभावना करावी ह्या स्वार्थी उद्देशानेंच त्यानें ही सूचना पुढें आणिली होती.

"कांहीं तरी केलं पाहिजे असं मलाहि वाटतं" रघुनाथ क्षणभरानें म्हणाला. इतक्यांत हरि तेथें आला. आज डॉक्टर कादंबरीला कां वेळ झाला हें पाहण्याकरितां तो आला होता. त्याला पाहतांच गणपतरावानें विचारलें, "कां हरि, तुझ्या डॉक्टरीणसाहेब कुठें आहेत ? आज रोग्यांची गर्दी फार आहे वाटतं ?"

"होय. जरा नेहमीपेक्षां आज जास्त गर्दी होती. आज डॉक्टरीणसाहेब दवाखान्यांतील पेशन्ट आटोपून व्हिजिटला लवकर बाहेर पडल्या. बराच उशीर झाला, त्या इकडे आल्या असतील म्हणून मी चौकशी करण्याकरितां आलों."

"आम्ही त्यांचीच वाट पाहतों आहें. पण कायरे हरि, तुझ्या डॉक्टरीण साहेबांचं लग्न वगैरे झालं आहे का ? कीं अद्यापि त्या अविवाहित आहेत ?" श्रीधरपंतानें विचारलें.

"त्यांचं लग्न झालं आहे."

"मग त्यांचा नवरा कुठें असतो ?"

"ते नाहीं मला माहिती. पण त्यांचें आणि नवऱ्याचें ठीक नाहीं असं वाटतं!"

इतक्यांत डॉक्टर कादंबरी वाड्यांतून आंत येतांना दिसली. अर्थात् हरीजवळ त्या मंडळींनीं चालविलेली चौकशी बंद झाली. कादंबरी वर येतांना मनुताईनें तिची विचारपूस केली. सासुसुनेची ही अगदीं चोरटी भाषा होत असे. थोड्या वेळानें ती वर आली. हरि कां आला होता, हें त्याला विचारून झाल्यावर तिनें रघुनाथरावाची चौकशी केली. तेव्हां श्रीधर मध्येंच म्हणाला, "काय हो डॉक्टरीण साहेब, तुमचं आणि तुमच्या पतीचें ठीक नाहीं, हें खरें का ?"

हा एकाएकीं विचारलेला प्रश्न ऐकून कादंबरी एकदम चपापली ! आपलें सर्व गुप्तरहस्य बाहेर पडलें कीं काय अशी तिला भीति पडली. तिनें प्रथम रघुनाथरावाच्या मुखाकडे पाहिलें. परंतु त्या ठिकाणीं बोध होण्यासारखें तिला कांहीं एक चिन्ह दिसलें नाहीं. तिला उत्तरच देतां येईना. तिनें सर्वांकडे पुनः पाहिलें हरीकडे तिची दृष्टि फिरतांच तो गडबडला. आपण ह्या मंडळींना आपल्या हितकर्तीची ही खासगी गोष्ट सांगितली, हें चांगलें केलें नाहीं, असें वाटून त्याचें मन त्याला खावूं लागलें. तो कांपत कांपत आपला अपराध कबूल करीत म्हणाला,

"मी त्यांना सांगितलं—मला विचारलं—"

" काय विचारलं ? " कादंबरीनें चटकन् विचारलें.

" कांहीं नाहीं—विचारलं आपलं लग्न झालं का ! " हरीवर कादंबरीनें रागावूं नये म्हणून गणपतरावानें मध्येंच उत्तर दिलें.

" अस्सं काय !—मग हरीनें काय सांगितलें ? "

" आपलं आणि आपल्या पतीचं ठीक नाहीं म्हणून ! "

" होय—ठीक नव्हतं पण आतां—ह्या घटकेला ठीक आहे. पण काय सांगावं ?—आणि इकडेहि असाच कांहींसा प्रकार आहे, असं मीहि ऐकलं होतं म्हणून मी सकाळीं चौकशी करीत होतें." किंचित् हास्य करीत रघुनाथरावाकडे पहात कादंबरी म्हणाली.

" तुमचे पतिराज हल्लीं कुठं असतात ? "

" आपल्या घरीं ! "

" मग तुम्हांला कधीं भेटत नाहींत का ? "

" नाहीं. मीच जात असतें त्यांच्याकडे."

" पण हें असं कसं उलटं ?"

" जगच उलटं चाललं आहे. तेथें काय करायचं ! "

" चाललं आहे खरं उलट !—आमच्या रघुनाथरावांचं आणि त्यांच्या कुटुं-बाचं ठीक नाहीं, पण तुमच्या आणि रघुनाथरावाच्या बाबतींत पुष्कळ फरक आहे. रघुनाथराव तर बायकोचं नांव काढूं देत नाहीं; तेव्हां त्यांची एकी व्हावी कशी ! पण तुमच्या दोघांत एकी होण्याचा संभव तरी आहे. कारण तुम्ही त्यांच्या घरीं जातां म्हणतां ! "

" जातें—अलीकडेच जाऊं लागलें आहे. पाहूं या आतां ह्यापुढें विधिलेखन काय असेल तें खरें ! "

" पण काय हो डॉक्टरीणबाई, तुम्ही इतक्या शिकलेल्या आणि तुमच्यांत हा असा प्रकार कसा झाला ? मोठं आश्चर्य आहे ! "

" अहो मी शिकलेली म्हणूनच हा प्रकार झाला ! "

" खरं कीं काय ? मग आमच्या रघुनाथरावानें बायकोचं नांव टाकायलाहि तेंच कारण आहे. कां रघुनाथराव, खरं ना ? " गणपतरावानें मुद्दाम खोंचून विचारलें.

" तुम्हाला गोष्टी बोलायला दुसरा विषयच नाहीं काय ? " किंचित् ओशाळून विषय बदलण्याच्या उद्देशानें रघुनाथराव म्हणाला.

" पण मी म्हणतों तें खरं ना ? " पुनः गणपतरावानें विचारलें.

" खरं असलं तरी शिक्षणाशिक्षणांत फार तफावत आहे. डॉक्टरीणसाहेबांचं शिक्षण पूर्ण होऊन त्या आपलं खरंखुरं कर्तव्य ओळखीत आहेत. अर्धवट शिक्षणानें धांगडधिंगा घालणाऱ्या बायका कुणीकडे आणि ह्यांच्यासारख्या निरभिमानी कर्तव्यनिष्ठ बायका कुणीकडे ! "

" मी कर्तव्यनिष्ठ असून उपयोग काय ? माझं खरं कर्तव्य म्हणजे पतिसेवा ! आतां डॉक्टरीण झालें म्हणून रोग्यांची शुश्रूषा करतें ती तुम्ही पहातच अहांत. पण पतिसेवा कुठं घडते ? आम्हां स्त्रियांना पतीची सांवली हाच मोक्ष आहे ! "

---

## १५ ....... तपश्चर्येचें फळ

त्या रात्रीं रघुनाथरावाला स्वस्थ झोंप आलीच नाहीं. त्याला अपघात होऊन कादंबरीचा आणि त्याचा परिचय झाला. सहवासानें स्वभाव ओळख झाली आणि सान्निध्यानें प्रेमोद्भव झाला. परंतु मनाचीं हीं नाजुक स्थित्यंतरें त्याच्या लक्षांत आलीं नाहींत. कादंबरीला यावयाला किंचित् वेळ झाला म्हणजे त्याच्या मनाची चलबिचल होत असे. ह्या गोष्टीच्या मुळाशीं त्याच्या अंतःकरणांत प्रेमाचा उदय झाला होता हेंच होतें. परंतु त्या गोष्टीची त्याला अद्यापि जाणीव झाली नव्हती. आज त्याच्या मनाला तळमळ लागली; झोंप घेण्याचा त्यानें पुष्कळ प्रयत्न केला; परंतु नाना प्रकारचे विचार त्याला झोंप येऊं देईनात. कादंबरीचें लग्न झालेलें आहे हें त्याला कळतांच त्याच्या मनाला ही एक प्रकारची उद्विग्नता उत्पन्न झाली. आजपर्यंत त्याच्या मनांत असे कोणतेच नाजुक विचार आले नव्हते. परस्त्रियांत मिळून मिसळून वागण्याचा किंवा त्यांच्या सहवासाचा त्याला कधींहि प्रसंग आला नव्हता आणि त्यामुळें त्या बाजूचे त्याला विचारच नव्हते परंतु कादंबरीच्या गोड सहवासानें त्याच्या मनावर गुप्त छाप बसवून एक प्रकारचा आनंद उत्पन्न केला होता; तो आनंद आज नाहींसा झाला. आपल्या मनाची अशी स्थिति कां झाली ह्याचें कारण त्याच्या लक्षांत येईना.

कादंबरी परस्त्री आहे, असें कळल्यामुळें त्याच्या मनाला उद्विग्नता आली. ह्या त्याच्या मनाच्या भावनेंत त्यानें कादंबरीचा अभिलाष धरला होता काय ?–नाहीं. त्याच्या मनाची इतकी नीच प्रवृत्ति झालेली नव्हती, हें खास ! फक्त कादंबरी

ही परस्त्री असल्यामुळें तिच्या सहवासाची आपण इच्छा करणें हें पाप आहे. असे विचार येऊनच त्याच्या मनाची ही अशी स्थिति झाली होती. पहिल्या विचारांची तीव्रता कमी होतांच 'कादंबरीचें आणि तिच्या पतीचें ठीक नाहीं,' याबद्दल त्याच्या मनांत विचार आला. त्याबरोबर तिचा पति त्याच्या मनांतून खाडकन् उतरला. कादंबरीसारख्या सुशिक्षित, प्रेमळ आणि पतीसेवातत्पर स्त्रीचा अव्हेर करणारा मनुष्य मूर्ख आणि गांवढळ असला पाहिजे असें त्याला वाटलें. आपणास जर अशी बायको मिळाली असती तर स्वर्गसुखाची कल्पना करण्याकरितां पुराणें धुंडाळण्याची आवश्यकताच पडली नसती, असे अनेक विचार त्याच्या मनांत येऊं जाऊं लागले. शेवटीं त्याच्या विचारांचा ओघ बदलत चालला. आपल्या आजारीपणांत तिनें रात्रंदिवस इतके अविश्रांत श्रम केले, त्या उपकाराबद्दल उतराई होण्याकरितां आपणास कांहीं तरी केलें पाहिजे, आणि तें काय केलें पाहिजे याचा विचार करतां करतां पहाटेच्या सुमारास त्याला झोंप लागली.

दुसऱ्या दिवशीं नेहमींप्रमाणें कादंबरी आली. आज तिच्याकडे पाहतांच रघुनाथरावाच्या मनांत एक प्रकारचा आदर उत्पन्न झाला. रात्रीचे सर्व विचार आतां त्याच्या मनांतून जाऊन 'डॉक्टरीणबाई ह्या आदरणीय आहेत' असें त्याचें दृढ मत बनलें. कादंबरीनें त्याची जखम वगैरे पाहून हास्यवदन करून म्हटलें "आपण माझ्या फार मागें लागलां होतां म्हणून मी आजपासून आपणास उठण्याची आणि फिरण्याची परवानगी देतें. आतां ह्या जखमेवर दिवसांतून एक दोनदां ही डबींत दिलेली पावडर लावीत जा. जखम बांधून ठेवण्याची आतां जरूरी नाहीं. हात मात्र चार दिवस गळ्यांत अडकवून ठेवावा लागेल. आतां मला नेहमीं प्रमाणें येण्याची आवश्यकता राहिली नाहीं. दोन चार दिवसांनीं एकदां येऊन मी आपला हात पाहून जाईन." इतकें बोलून कादंबरीनें किंचित् तीक्ष्ण दृष्टीनें रघुनाथरावाच्या चर्येकडे पाहिलें. तिच्या शेवटच्या वाक्यानें त्याची मुद्रा एकदम पडली. मुखावर दुःखाची छटा स्पष्ट दिसूं लागली. तें पाहून कादंबरीनें किंचित् धिटाईनें विचारलें, "आपणाला वाईट कां वाटलं ? मी प्रथम समजलें होतें कीं, आपणास उठण्याबसण्याची आणि बाहेर हिंडण्याफिरण्याची मी परवानगी देतांच अतिशय आनंद होईल. तुम्ही उद्योगप्रिय माणसं ! शेतांत, बागेंत, मळ्यांत स्वतः जातीनें खपणारीं माणसं अशीं एकाच जागीं डांबून ठेवणं म्हणजे त्यांना शिक्षा दिल्यासारखीच असते, खरं ना ?"

"असें तर खरंच !—पण—पण—आपण संध्याकाळीं नाहीं का येणार ?"

" आतां संध्याकाळीं माझं कांहीं काम नाहीं पण माझ्या येण्यापासून तुम्हाला जर आनंद होत असेल, तर मी येईन. पेशन्टच्या आनंदाकरितां आम्हाला फार जपावं लागतं. त्यांतून मी मोठ्या आनंदानं येत जाईन. कारण आपणासारख्यांची ही अपघाताची केस माझ्या हातून बरी झाली आहे. "

" आपले किती तरी माझ्यावर उपकार आहेत. खरोखरीच त्या अपघातांत मी मरायचाच ! पण तुम्हीं संध्याकाळीं याल ना ?"

" पण तुम्हीं संध्याकाळीं याल ना ?" हें रघुनाथरावानें तिसऱ्यांदा विचारलेलें ऐकून तिला हंसूं आलें. भावी गोष्टीची जी भूमिका आपणास तयार करावयाची होती, ती भूमिका आतां तयार झाली, अशी तिची खात्री झाली. ती 'होय, येईन' असें उत्तर देणार इतक्यांत मनुताई आंत आली. आणि तिनें विचारलें, " अहो डॉक्टरीणबाई, आतां आमचा रघू बरा झाला. आतां मला केव्हां औषध देतां तें सांगा ? इतके दिवस त्याच्या गडबडींत माझं दुखणं पळालं होतं पण आतां पुनः हातापायाचे सांधे दुखूं लागले !"

" आई, तुला औषध सुरू करायचं म्हणतेस—" मध्येच रघुनाथराव कादंबरीकडे पहात म्हणाला, " पण डॉक्टरीणबाई कुठं येणार आहेत आतां आपणाकडे ? त्या रोज रोज सकाळसंध्याकाळ यायला कंटाळल्या आहेत—कां असंच ना ?"

" मी कंटाळलें नाहीं. पण आपली जखमच माझ्या ड्रेसिंगला कंटाळून लवकर बरी झाली. ती जर बरी झाली नसती, तर मला यावंच लागलं असतं !"

" जखम बरी झाली तरी हा माझा मोडका हात आहे ना ?"

" मग मी रोज यावं अशी आपली इच्छा आहे तर !—बरं—येत जाईन ! इतर पेशन्ट आटोपल्यावर घरीं बसायचं तें इकडे येत जाईन !" असें बोलून कादंबरीनें पुनः एकदां तीक्ष्ण दृष्टीनें रघुनाथरावाकडे पाहिलें. तिला वाटलें होतें तसेंच झालें ! तिच्या पहिल्या भाषणानें रघुनाथरावाच्या चर्येवर आलेली उदासिनता जाऊन आतां त्याची चर्या प्रफुल्ल दिसूं लागली. कादंबरीलाहि समाधान झालें. ती पुढं म्हणाली, " ताई तुम्हांला सांध्याकरितां औषध सुरू करायचं आहे ना ?—चला, मी तुम्हाला आतां खालीं तपासतें." असें म्हणून ती उठली, तिच्यामागून मनुताईहि उठली. त्या दोघी जिना उतरत असतां गणपतराव आणि श्रीधरपंत आले.

" डॉक्टरीणसाहेब, कां आज लवकरच निघालां ?" गणपतरावानें विचारलें.

" नाहीं—लवकर नाहीं. आज ताईंना तपासून औषध सुरू करावयाचं आहे." असें म्हणून त्या दोघी खालीं आल्या. कादंबरीनें मनुताईला कसोशीनें तपासलें. तिला संधिवाताचें दुखणें होतें. त्या रोगावर योग्य ती औषधयोजना करून झाल्यावर कादंबरी म्हणाली, "आतां मी येणार नाहीं असं म्हटलं, त्याबरोबर मन अगदीं खट्टू झालं !"

" कां नाहीं होणार ?—पण कमू, तूं आतां ओळख कां नाहीं देत ? मला नाहीं वाटत आतां रघु तुझ्याबरोबर पहिल्यासारखा वागेल म्हणून ? मी कालच तुझ्याबद्दल गोष्टी निघाल्या असतां 'तूं कोण ?' हें सांगणार होतें. पण पुनः विचार केला कीं, तुझ्याकडूनच तें झालं पाहिजे."

" बरं केलंत. अशी घाई करून उपयोग नाहीं. मी बाबांना पत्र लिहून इकडे बोलविणार आहे. ते आले म्हणजे सर्व कांहीं ठीक जुळेल."

इतक्यांत रघुनाथराव आणि त्याचे मित्र खालीं आले. आज इतक्या दिवसांनीं रघुनाथ चालूं लागल्यामुळें त्याला अडखळल्यासारखें वाटत होतें. त्याच्याकडे पाहून कादंबरी म्हणाली, " मी आजपासून उठण्याची व हिंडण्याफिरण्याची परवानगी दिली आहे. पण एकदम जास्त मेहनत घेऊं नका. नाहींतर जाल मळ्यावर !"

" छे ! कसला आला आहे मळा ?—हा एक जिना उतरलों तों कसंसंच वाटूं लागलं ! पण आईची परीक्षा केली का ? काय वाटतं तिच्याविषयीं तुम्हाला ?"

" कांहीं विशेष नाहीं. थोडे दिवस औषध घेतलं कीं साफ बऱ्या होतील, पण आतां हें स्वयंपाकाचं काम नाहीं त्यांच्या उपयोगी ! त्यांनीं विश्रांतीच घेतली पाहिजे. त्यांना संधिवाताचं दुखणं लागलं आहे. त्यांतून त्यांचं वयहि नाहीं कां होत आलं ?"

" मग उद्यांपासून घरांत आचारी ठेवतों: मी केव्हांच आईला सांगितलं होतं पण ती कुठं ऐकते ?"

" आचारी कशाला ? तुमचं हक्काचं माणूस असून आचारी कशाला ?"

" हक्काचं माणूस कोण ?—सून कां ?" मनुताईनेंहि मुद्दामच विचारलें.

दुसरं कोण ? अशा अडल्या वेळीं तुम्ही सुनेला नाहीं बोलविणार तर मग तिचा काय उपयोग ?"

" हो खरंच ! सुनेला बोलवा आणि पहा मजा ! उलट तिला चहाचे कप नेऊन देतां देतां आईला नको प्राण होईल !" रघुनाथराव म्हणाला.

" पण मला नाहीं कधीं तुमच्या आईनें चहा आणून दिला तो! मीच कधीं लागला तर खालीं येऊन घेतें. खरं ना हो ? "

" तुमची गोष्ट निराळी आहे डॉक्टरीणबाई! पण तें जाऊं द्या. मी तुम्हाला आतां एक विनंति करणार आहें. येत्या रविवारीं आमच्या घरीं आपण जेवायला यावं अशी आमची सर्वांची इच्छा आहे—कां ? विचारांत कां पडलां ? आमच्या घरीं जेवायला कांहीं हरकत आहे कीं काय ? "

" हरकत कसली ?—पण हा जेवणाचा आग्रह कशाकरितां ? "

" मग येणार ना ? रविवारीं तुमचं सर्व दवाखान्याचं काम आटोपल्यावर या."

" ह्या रविवारीं साधेल किंवा नाहीं तें मला आतांच सांगतां येणार नाहीं, पण पुढल्या रविवारीं मीं आनंदानें येऊं शकेन. पुढल्या रविवारीं आलें तर कांहीं हरकत नाहीं ना ? "

" हरकत कसली ! पण याल ना जरूर ? "

" येईन पण सकाळच्या जेवणाचा बेत नका ठेऊं ! सकाळीं मला पेशन्ट पुष्कळ असतात. संध्याकाळचा बेत कराल तर बरं पडेल. दोन घटका स्वस्थ चित्तानें बसतां तरी येईल. "

" ठीक आहे. "

मध्यें एक रविवार टाकून पुढल्या रविवारीं जेवणाचा बेत ठरला, ही मध्यंतरीं आठ दिवसांची जास्त अवधी मिळाली, ही गोष्ट चांगली झाली, असें रघुनाथरावाला मनापासून वाटलें. कारण त्या तिघां मित्रांनीं बहुमतानें असें ठरविलें होतें कीं, एक हजार रुपयेपर्यंत सुंदर हिरा विकत घेऊन त्याची आंगठी करायची आणि ती आंगठी आमच्या कथानायिकेला तिनें केलेल्या अविश्रान्त श्रमाबद्दल बक्षिस द्यावयाची. प्रथम दिवस थोडे असल्यामुळें हिरा घेऊन त्याची आंगठी सांगलींत करायची असा त्यांनीं बेत केला होता. पण आतां आठ दिवसांची मुदत ज्यास्त मिळतांच गणपतरावानें मुंबईत जाऊन तेथें उत्तम हिरा घ्यावा व तेथेंच सुंदर आंगठी तयार करून आणावी, असें ठरलें. त्याप्रमाणें रात्रीच्या गाडीनें गणपतराव मुंबईस जाण्याकरितां निघालाहि! आठ दिवसांची अवधी मिळाली म्हणून, रघुनाथरावाप्रमाणें आमच्या कादंबरीलाहि आनंद झाला. तिनें पुष्कळशा गोष्टी एकाच वेळीं करायच्या ठरविल्या होत्या. कॅसेल साहेबांच्या मडमेनें म्हटल्याप्रमाणें तिनें आपल्या नांवाप्रमाणें सर्व गोष्टी काव्यमय घडून याव्या अशी योजना केली आणि याप्रमाणें सर्व गोष्टी घडतील अशी तिला खात्रीहि वाटूं लागली होती.

रघुनाथराव आणि त्याचे मित्र रविवारीं जेवणाचा दिवस नक्की करून पुनः वर गेल्यावर मनुताई म्हणाली, " कमू, आतां पुढें कसं काय करायचं ? दादाला तूं पत्र लिहून इथं बोलविणार आहेस कां ? पण दादा इथं आल्यावर पुनः जर कां रघूनें डोक्यांत राख घालून पहिल्या सारखं कांहीं केलं तर मग काय करायचं ? मागं असाच दादा आला होता. त्यावेळीं रघू मुकाट्यानें उठून चालता झाला तो दादा जाईपर्यंत परत घरीं आला नाहीं. "

" आतां मात्र तसं होऊं द्यावयाचं नाहीं. शनिवारीं पत्र येऊन बाबा इथं रविवारीं दुपारीं ऐन वेळेवर येतील अशीच मी योजना करणार आहे, तुम्हीं अगदीं काळजी करूं नका. जुळल्यास मी भोरचे रावबहादुर जोशी यांनाहि बोलविणार आहे. "

" पहाग बाई, आतांपर्यंत सर्व कांहीं ठीक जुळत आलं आहे. नाहीं तर थोडक्यासाठीं सर्वच कांहीं फिसकटायचं ! त्यापेक्षां आतांच खरं खुरं सांगून टाकावं आणि गोडींत जुळलं आहे तसंच गोडींत ह्या सर्वांचा शेवट करावा, असं मला वाटतं ! "

कादंबरीनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. फक्त ती हांसली ! पुढें काय करायचें तें तिनें यंत्राप्रमाणें ठरविलें होतें. घरीं येतांच तिनें वडिलांना एक सविस्तर पत्र लिहिलें. आणि त्याचप्रमाणें दुसरें पत्र रावबहादुरांना लिहिलें. दोन्ही पत्रांत आपण योजलेला सर्व बेत लिहून त्यांच्या उत्तराची वाट पहात ती बसली. तिसऱ्या दिवशीं दोन्ही उत्तरें आलीं. जयरामपंतांच्या उत्तरांत त्यांनीं लिहिलं होतं कीं, ' तुझी योजना मला पसंत आहे.' तुझं पत्र आईला वाचून दाखवितांच तिला जो आनंद झाला तो पत्रांत लिहितां येत नाहीं. ' शेवटीं तुझ्या बयेचा सुखाचा दिवस उगवला ! ' म्हणून म्हातारीला अत्यानंद झाला आहे. तो तुझा सुखाचा दिवस पहावा अशी म्हातारीची फार फार इच्छा आहे, म्हणून मी तिला आणि तुझ्या आईलाहि बरोबर घेऊन येण्याचें ठरविलें आहे. आपल्या मुलीच्या भेटीला आई जितकी उत्सुक झाली आहे तितकाच मी ताईला पाहण्याकरितां उत्सुक झालों आहे. रावबहादुरांना मी आतांच लिहिलं आहे. तेहि येतील अशी माझी खात्री आहे. ' हें वडिलांचें पत्र वाचून कादंबरीला आनंद झालाच परंतु रावबहादुराचें उत्तर वाचून त्या आनंदांत भर पडली. त्यांनीं आपल्या पत्रांत लिहिलें होतें, ' आपण जुळवून आणलेला हा बेत खरोखरीच एखाद्या कादंबरींत घेण्यासारखा आहे. प्रत्येकाच्या आयुष्यांत असे प्रसंग येतात पण आपण मात्र हा काव्यमय

प्रसंग जुळवून आणीत अहांत; याबद्दलच आम्हाला कौतुक वाटत आहे. आपलें पत्र वाचून सुनबाईहि येण्याविषयीं मागें लागली आहे. तेव्हां तिलाहि बरोबर आणण्याचा माझा बेत आहे.'

रावबहादुरांच्या पत्रांत शांताहि येणार असें वाचून कादंबरीला फारच आनंद झाला. पत्रें वाचून ती कितीदां स्वतःशीं हांसली. रविवारीं एक मोठी मौज उडणार आहे, ह्या आनंदाच्या विचारांत गर्क झाली होती, सर्व मंडळी येऊन खुद्द रघुनाथरावाच्या घरींच उतरण्याचें ठरविलें होतें. परंतु कादंबरीनें योजलेल्या कांहीं विशिष्ट गोष्टी होईपर्यंत जयरामपंतांनीं किंवा रावबहादुरांनीं कादंबरीची ओळख आहे असें दाखवायचें नाहीं, अशी त्यांनीं योजना केली होती. पुढें दोन दिवसांनीं गणपतराव मुंबईहून परत आला. त्यानें आणलेली आंगठी रघुनाथाला पसंत पडली. कादंबरी रोज सकाळ संध्याकाळ आपल्या पेशन्टकडे जात असे. गणपतराव मुद्दाम मुंबईस आंगठी आणण्याकरितां गेला होता, ही गोष्ट मनुताई-कडून तिला कळली होती. परंतु त्याबद्दल ती कांहींच बोलली नाहीं. होतां होतां शनिवार उजाडला. कादंबरीनें योजिल्याप्रमाणें पुनः जयरामपंताचें आणि राव-बहादुरांचें पत्र आलें. पोष्टमनबरोबर तिनें पूर्वींच ठरवून ठेवलें होतें त्याप्रमाणें पोष्टमन पत्र देऊन जाऊं लागतांना ती म्हणाली, " मी आतां तेथें जातें. तुम्ही थोड्या वेळानें तेथें या आणि मी जवळ असतांना हें पत्र त्यांना द्या."

रघुनाथरावांकडे येतांच कादंबरी मुद्दाम खालींच बसली, मनुताई तेथेंच होती आणि रघुनाथरावाचे मित्रहि त्यावेळीं आलेले होते. कारण दुसऱ्या दिवशीं त्यांनीं ठरविल्याप्रमाणें जेवणाचा बेत होता, त्याबद्दलचा विचार करण्याकरितां ती मंडळीं आज तेथें आली होती. थोड्या वेळानें पोष्टाचा शिपाई आला आणि त्यानें रघुनाथरावाच्या हातांत त्याच्या नांवाचें पत्र दिलें. पत्र फोडून वाचीपर्यंत कादंबरी कांहीं बोलली नाहीं. सर्वजण रघुनाथरावाच्या मुखाकडे पहात होते. पत्र अर्धें वाचून झालें नाहीं, तोंच रघुनाथरावाची चर्या काळी पडली. त्याची मुद्रा काळवंडलेली आणि एकदम त्रासिक दिसूं लागली. तें पाहून बाजूला उभा असलेला गणपतराव किंचित वांकून त्या पत्रांतील मजकुराकडे पाहूं लागला. पत्राच्या शेवटीं सही दृष्टिस पडतांच तो एकदम म्हणाला, " काय जयरामपंतांचं —म्हणजे तुझ्या सासऱ्याचं का हें पत्र ? " असें म्हणत त्यानें रघुनाथरावाच्या हातांतील पत्र घेतलें. ह्या अनपेक्षित पत्रामुळें रघुनाथरावाची स्थिति अत्यंत चम-त्कारिक झाली. आज इतक्या वर्षांनीं तें पत्र आणि त्यांतील विलक्षण मजकूर

वाचून त्याला कांहीं सुचेना तें पत्र आपल्या सासऱ्याकडून आलेलें आहे, असें जर पूर्वीच कळायला कांहीं मार्ग असता तर त्यानें तें पत्र न घेतां तसेंच परत केलें असतें. परंतु तसें समजायला कांहीं मार्गच नव्हता. त्यामुळें पत्र फोडल्यावर तें पत्र कुणाचें हें त्याला कळलें. बरें, इतकेंहि करून आतां कितीहि डोकें फिरविलें तरी पत्रांत लिहिल्याप्रमाणें होणाऱ्या गोष्टी टाळतां येणेंहि त्याला शक्य नव्हतें. असा तो विलक्षण रीतीनें पेंचांत सांपडला होता. तो विचारांत गढून गेला आहे असें पाहून मनुताईनें विचारलें, "काय—असं काय त्या पत्रांत आहे ?—गणू, वाच तरी तें पत्र एकदां !"

गणपतरावानें तत्काळ पत्र वाचण्यास सुरवात केली—

'सप्रेम अनेक आशीर्वाद विशेष, आपणास एक अत्यंत भयंकर अपघात होऊन आपल्या प्राणावरी संकट टळलें, अशी बातमी आम्हाला थोड्या दिवसांपूर्वी कळली. अत्यंत वाईट वाटलें आणि मनस्वी चिंता लागली. परंतु उपयोग काय ? आपण आपलें नातें झुगारून दिलें आहे, तेव्हां आम्हांला स्वस्थ बसण्यापलीकडे कांहींच करतां येणें शक्य नव्हतें. पत्र लिहावें, तर आपण आमचीं पत्रें जशींच्या तशीं परत करतां, तेव्हां पत्र लिहूनहि कांहीं उपयोग होईल असें वाटेना. आपल्या प्रकृतिबद्दल बाहेरून जितकी चौकशी करतां येणें शक्य होतें, तितकी करीत होतों. पण आतां अनायासें समक्ष भेटीचा योग जुळून येत आहे. भोरचे रावबहादुर जोशी यांचें आणि माझें स्वतःचें सांगलीचे कारभारी यांच्या बरोबर कांहीं खासगी काम आहे. त्याकरितां रविवारीं आम्हीं सर्व मंडळी सांगलीला येणार आहोंत. आम्ही प्रथम कारभाऱ्याकडेच उतरण्याचा विचार ठरविला होता. परंतु प्रत्यक्ष माझी बहिण तेथें असतांना आणि त्यांतून तुमचें आमचें नवीन नातें जुळलें असतांना मी दुसऱ्या ठिकाणीं उतरण्यास जाणें लौकिकदृष्टया वाईट असून जनापवादालाहि कारण आहे. तुमचें आमचें बरें नाहीं, ही गोष्ट निदान रावबहादुरांना तरी कळूं नये, अशी माझी इच्छा आहे. करितां फक्त लौकिकासाठीं मी रावबहादुरांसह रविवारीं आपणाकडे उतरण्याकरितां येणार आहें. दुपारीं काम होतांच रात्रीं आम्ही परत निघूं. आपण फक्त घरीं असण्याचें करावें, म्हणजे त्या थोर गृहस्थांना आनंद होईल. अनायासें ताईचीहि फार वर्षांनीं भेट होईल. कळावें हे आशीर्वाद.

आपला शुभहितचिंतक,

**जयरामपंत.**

**सूचना**—ज्या विषयाचा आपणास तिट्कारा आला आहे, तो विषय म्हणजे आमची मुलगी व आपली पत्नि हिच्याबद्दल ह्या भेटींत एक शब्दहि निघणार नाहीं ही खात्री ठेवा.

पत्र वाचून झाल्यावर बराच वेळ कोणीहि बोलले नाहीं. प्रत्येकजण आपापल्या विचारांत मग्न झालेला दिसत होता. रविवार म्हणजे उद्यां! त्यांतून डॉक्टर कादंबरीला जेवण देण्याचा आणि बक्षीस देण्याचा समारंभ करण्याचें ठरविलेलं! अशा वेळीं जयरामपंत, त्यांची मंडळी तसेंच रावबहादुर आणि त्यांची मंडळी अगांतुकीनें येण्याचें पत्र ऐनवेळीं येतें. तेव्हां रघुनाथराव गोंधळून गेला यांत नवल नाहीं. सासरेबुवा येणार आहेत, तेव्हां आपण घरीं न राहतां हरिपुरांत जावें आणि त्यांना टाळावें, तर घरीं जेवणाचा समारंभ! अशा चमत्कारिक कैचींत सांपडल्यामुळें काय करावें हेंच त्याला सुचेना. सासरे एकटे येणार असते तर असो पण त्यांच्याबरोबर रावबहादुरासारखे एक बडे गृहस्थ येणार आहेत; आणि त्यानीं पत्रांत मुद्दाम लिहिलें आहे तरी आपल्या बायकोविषयीं मागच्या गोष्टी निघणार असेंहि त्याला वाटूं लागलें. निदान डॉक्टरीणबाई समक्ष तरी आपल्या बायको-बद्दल गोष्टी निघूं नयेत, अशी त्याची इच्छा होती. परंतु इच्छा असून उपयोग काय? ह्या गोष्टी कशा टळाव्या याबद्दल एकहि विचार किंवा युक्ति त्याला सांपडेना! त्याच्या मनांत कोणत्या विचारांचें काहूर उडालें आहे, हें प्रत्येकानें जाणलें. परंतु कोणीहि बोललें नाहीं. शेवटीं कादंबरी म्हणाली, "पत्र वाचून आपण असे स्तब्ध कां झालां? आपले श्वशूर उद्यां येणार म्हणून पत्र आलं आहे म्हणून आपण इतके का विचारांत पडलां अहांत! उद्यां अनायासें माझ्या प्रीत्यर्थ का होईना, तुमच्या घरीं जेवणाचा समारंभ होणार आहे, तेव्हां त्यांत ह्या पाहुणे मंडळींचाहि समावेश होत आहे ही आनंदाची गोष्ट आहे. आतां ती मंडळी बरीच आहे तेव्हां मंडळीकरितां स्वयंपाकाचा रगडा पडणार आहे, ही गोष्ट खरी! ताई तर ह्या अशा आजारी! येऊन जाऊन ह्या गणपतरावांचें कुटुंब—एकट्या सरस्वतीबाई काय करणार? त्यांतून त्यांच्याजवळ आहे लहान मूल!—खरंच! ह्या दृष्टीनें विचार केला म्हणजे गोंधळल्यासारखी स्थिति होणं साहजिक आहे. पण आपण कांहीं काळजी करूं नका! मी आहे ना? कोणत्याच गोष्टीचं मी आपणांस न्यून पडूं देणार नाहीं. माझा ब्राह्मण मी उद्यां सकाळीं इथं पाठवून देतें. शिवाय मीहि पेशन्ट आटोपून लवकरच इकडे येतें. मी आणि सरस्वतीबाई मदतीला असल्या-वर होईल नाहीं ताई?" असें तिनें मुद्दाम मनुताईला हांसत विचारलें.

" होईल. पण—"

" आतां पण आणि परंतु कशाला ? आपण आतां एका गांवची मंडळी ! पाहुणेमंडळी येणार म्हणून अब्रू जावूं द्यावयाची कीं काय ? त्यांतून माझीहि परीक्षा होईल. मी इतकी शिकलेली, विलायतेंत जाऊन आलेली, मला गृहकृत्यांत कितपत माहिती आहे, हेंहि जगाला कळेल. कारण माझ्यासारख्या शिकलेल्या बायकांवर पुष्कळ जणांचा आक्षेप आहे. आम्ही बायका जरा कुठ 'री री' करायला शिकलों कीं चढून जाऊन तात्काळ पुरुषांच्या डोक्यावर मिरी वाटूं लागतों. आम्हाला स्वयंपाकाकरितां आचारी लागतो, रोज फिरायला गेल्याशिवाय चालत नाहीं, नवरा म्हणजे एक नोकर अशी आमची कल्पना होते वगैरे वगैरे बरेच आमच्यावर आक्षेप आहेत. ही गोष्ट झाली, थोडं शिकलेल्या बायकांची! पण मी तर काय विलायत पाहिलेली ! अर्थात् माझ्या संबंधानें किती तरी जनापवाद असले पाहिजेत ! तेव्हां म्हणतें, ही अनायासें संधि आली आहे. त्यांतून तुमच्या श्वशूर महाराजांबरोबर कोणी रावबहादूर येणार आहेत. तेव्हां त्यांना तरी कळूं द्या—मग काय ठरलं ना ताई ? "

" तुमच्या पुढं मी काय बोलूं ! इतक्या थोड्या दिवसांच्या परिचयांत तुम्हीं इतका घरोबा दाखविला असाच कायम ठेवा म्हणजे झालं ! " मनुताईचीं आणि कादंबरीचीं अगदीं ठरलेलीं प्रश्नोत्तरें होत होतीं. कादंबरी दोन अर्थानं बोलत होती, हें त्यावेळीं मनुताइ शिवाय इतरांच्या कसें लक्षांत येणार ? ती पुढं म्हणाली, " घरोबा कायम ठेवा म्हणून काय सांगतां ताइ ? अहो ! हें घरच मुळीं माझं आहे. तुम्ही माझ्या आहांत, हेहि माझे आहेत आणि सर्व कांहीं माझंच आहे बरं ! " इतकें बोलून कादंबरी हंसूं लागली. ही केवळ थट्टा आहे असें रघुनाथरावाबरोबर त्याच्या मित्रमंडळींना वाटलें. कादंबरीचा स्वभाव प्रेमळ आणि थट्टेखोर असल्यामुळें ती असें बोलली, अशी सर्वांची समजूत झाली. पण त्या थट्टेच्या भाषणांत किती व्यापक आणि गूढ सत्य भरलं होतें, याची त्यांना कोठून कल्पना होणार ? तरी देखील रघुनाथराव शेवटीं म्हणाला, " डॉक्टरीणसाहेब, कुणाचं अडतं पाहूं नये, हा आपल्या मनाचा थोरपणा आहे. पण उद्यां तुमच्या करितां मुद्दाम आम्ही जेवणाचा समारंभ करणार आणि तुम्हीच जर स्वयंपाकाची सिद्धता करूं लागलां तर—"

"उलट यजमानाचा मान—नव्हे यजमानणीचा मान मजकडे येऊन तुम्ही पाहुणे व्हाल, असंच ना ? मग त्यांत काय ! असा उलट सुलट अपूर्व समारंभ तरी केव्हां व्हावा ?—कायहो गणपतराव, असंच ना ? "

छे ! आमच्या कथानायिकेपुढें कोणीच बोलायला टिकेना ! रघुनाथरावाल 'नाहीं'हि म्हणतां येईना. कीं 'हो'हि म्हणतां येईना. कादंबरीनें मात्र त्याच्य गोंधळलेल्या स्थितीकडे लक्षच दिलें नाहीं. ती पुढें म्हणाली, "बरं तर ताई, आतां हें सर्व ठरलं ! उद्यांच्या स्वयंपाकाचं काम मी स्वतः करणार ! आतां तुम्ही उद्य माझ्याकरितां काय काय करणार होतां तें सांगा म्हणजे मी पाहुण्याकरितां उद्यां काय काय करीन तें सांगतें. मला किती प्रकारचीं पक्वान्नें करतां येतात तीं तरी पहा ! पण ह्या गोष्टी पुरुषांना सांगून काय उपयोग ! आपणाला काय करायचं तें ठरवून उद्यां करूं आणि पुरुषांच्या पानांवर वाढूं म्हणजे झालं !"

शेवटीं शेवटीं रघुनाथरावाला कादंबरीच्या भाषणाचं कौतुक वाटूं लागलें ! ही इतकी विलायतेला जाऊन आलेली डॉक्टरीण, हिला इतक्या गोष्टी करतां येणें शक्य आहे काय ? अशीहि त्याला शंका आली. परंतु त्याच्या सर्व शंकांचें निरसन आतां लवकरच होणार होतें. त्या दिवशीं कादंबरी घरीं आल्यावर किती वेळपर्यंत स्वतःशीं विचार करीत बसली होती. आपण मनांत योजलेल्या गोष्टी किती लवकर आणि सहजासहजीं साधल्या, याचें तिला राहून राहून आश्चर्य वाटे. ती विचार करीत असतां कितीदां तरी स्वतःशीं हांसली. आपण हा जुळवून आणलेला बेत यशस्वी रीतीनें पार पडल्यावर आज आपण विनोदांत बोललेल्या प्रत्येक शब्दाचा खरा अर्थ मागून लक्षांत येतांच 'तिकडच्या' मनाला काय वाटेल ? याचा ती विचार करूं लागली. ह्या सर्व गोष्टी मुद्दाम जुळविलेल्या होत्या, हें कळल्यावर 'तिकडच्या' मनाला आनंदच होईल, असें तिची मनोदेवता तिला सांगूं लागली. त्या रात्रीं तिला सर्व स्वप्नें भावी गोष्टीविषयींच पडलीं. त्या स्वप्नामुळें ती कितीदां आपल्या शय्येवरून उठून बसली. पडलेल्या स्वप्नाचा थोडा वेळ विचार करून ती पुनः निजे, तों थोड्या वेळानें पुनः एखादें स्वप्न पडावें. अशा रीतीनें पहाट होईपर्यंत तिनें किती तरी स्वप्नें पाहिलीं. आजपासून आपल्या स्थितींत एक अपूर्व स्थित्यंतर होणार अशी तिची पूर्णपणें खात्री झाली.

सकाळीं उठतांच तिनें आपले सर्व विधि लवकर आटोपून घेतले. हरीवर दवाखान्याची व्यवस्था सोंपवून आचारी आणि इतर नोकर यांना मनुताईकडे पाठवून दिले. आणि ज्या गरीब रोग्यांना ती घरीं जाऊन पहात असे, त्यांच्याकडे जाण्याकरितां ती निघाली. परंतु दरवाजावर असलेली रोग्यांची गर्दी तिला पुढें जाऊं देईल तेव्हां ना ? सर्व जातीचे आणि सर्व दर्जाचे रोगी अलीकडे तिला फार हैराण करूं लागले होते. तिच्या हाताला ईश्वरानें गुण दिला होता, त्याला रोगी

तरी काय करतील! तिच्या नांवाचा बोलबाला होतांच सरकारी दवाखान्यांतील रोग्यांची संख्या कितीतरी पटीनें कमी झाली होती. त्यांतून अलीकडे कोल्हापूर, सातारा, वाई इत्यादि दूरदूरच्या ठिकाणाहून रोगी तिच्याकडे येऊं लागले होते. ह्या दूरच्या रोग्यांना उतरण्याची अत्यंत गैरसोई होते, हें तिच्या लक्षांत आलें होतें. त्यांच्याकरितां आपगांस कांहींतरी व्यवस्था केली पाहिजे, असेहि विचार तिच्या मनांत घोळत होते. परंतु मध्यंतरीं रघुनाथरावाच्या अपघातामुळें तिला इतर गोष्टींचा विचार करायला वेळच मिळाला नाहीं. तथापि पुढें काय गोष्टी करायच्या ह्या तिनें पूर्वीच ठरवून ठेविल्या होत्या.

आजच्या इतक्या उल्हासानें आणि तांतडीनें कादंबरीनें आपला नित्यक्रम पूर्वी कधींहि आटोपला नव्हता. दरवाजावर इतक्या रोग्यांची गर्दी झाली होती, पण तिनें हां हां म्हणतां त्या सर्वांना औषध योजना करून दिली. आणि विशेष जरूरीच्या रोग्यांना तिनें तपासलें. नऊ वाजण्याच्या सुमारास सर्व काम आटोपून ती रघुनाथरावाच्या घरीं आली. तिनें पाठविलेला आचारी मनुताईच्या सांगण्याप्रमाणें आपल्या उद्योगाला लागला होता. कादंबरीनें प्रथम वर जाऊन रघुनाथरावाला तपासलें. त्याच्या जखमेवर मलमपट्टी वगैरे करावयाची ती केली आणि उठतांना ती हांसत हांसत म्हणाली, "आतां मी खालीं जाऊन गृहिणीच्या गृहकृत्याला लागतें. इतका वेळ मी डॉक्टरीण होतें, पण आतां मी गृहिणी झालें आहे!— पण तुमचा चेहरा असा उतरलेला का? तुमचे श्वशूर येणार ही गोष्ट तुम्हांला पसंत पडली नाहीं असं दिसतं! पण त्याबद्दल तुम्ही का वाईट वाटून घेतां? तुम्ही न बोलवितां ते येतात, आणि बरोबर बडे बडे गृहस्थ घेऊन येतात, ह्या त्यांच्या अगांतुकीबद्दल मी त्यांची कशी खोड जिरविते ती पहा!"

रघुनाथरावाला आज अगदीं भांबावून गेल्यासारखें झालें होतें. आज आपण कोणत्या गोष्टी करायच्या ठरविल्या होत्या, आणि अशा प्रसंगीं आपणाला नको तीच मंडळी कशी अगांतुकी करणार, याबद्दल त्याच्या मनांत सारखे विचार चालू होते. तो घटकेंत खालीं, तर घटकेंत वर अशा एकसारख्या येरझारा घालीत होता. एकदोनदां त्यानें स्वयंपाकघरांत डोकावून पाहिलें. डॉक्टरीणबाई स्वतः पोळ्या लाटण्याकरितां बसलेल्या पाहून त्याला कितीतरी आश्चर्य वाटलें. इतकी शिकलेली बाई हें काम इतक्या आवडीनें करतांना पाहून त्याला अत्यंत अचंबा वाटला! तो स्वयंपाकघराच्या दरवाजावर दोनदां येऊन गेला परंतु कादंबरी कांहीं बोलली नाहीं. परंतु रघुनाथरावाची जेव्हां तिसरी खेप झाली, तेव्हां ती म्हाणाली, "हें

पहा, तुम्ही वरचेवर जर आमच्या ह्या राज्यांत डोकावून पाहूं लागलां तर तें आमच्या पसंत पडणार नाहीं. हें आमचें शिकलेल्या स्त्रियांचें राज्य आहे. आणि आमचे हुकूम फार कडक आहेत. आतां पुनः जर आमच्या राज्यांत अशी टेहळणी केलीत तर आम्ही सर्वजणी बाहेर उठून जाऊं आणि तुम्हां पुरुषांना हें पुरणाच्या पोळया लाटण्याचें काम करावें लागेल हें लक्षांत ठेवा!"

मनुताई आणि बाजूला पुरण काढीत असलेली सरस्वती हा कादंबरीचा विनोद ऐकून हसूं लागल्या. रघुनाथरावहि हांसत हांसत बाहेर गेला. थोड्या वेळानें गणपतराव आणि श्रीधरपंत आले. त्यांनाहि कादंबरीचें स्वयंपाकघरांतील राज्य पाहून रघुनाथरावाप्रमाणेंच आश्चर्य वाटलें. परंतु दवाखान्यांतील काम आटोपून हरी जेव्हां आला आणि आपल्या डॉक्टरीणबाईसाहेबांना स्वयंपाक करतांना त्यानें पाहिलें तेव्हां तो तर अगदीं थक्क होऊन गेला. प्रत्यक्ष आपल्या घरीं देखील कादंबरीला त्यानें असें काम करतांना पाहिलें नाहीं, तेव्हां त्याला का आश्चर्य वाटूं नये? इतर इतके पेशन्ट असतांना ह्या घराकडे डॉक्टरीणसाहेबांचा इतका ओढा कां हें कांहींच त्याच्या लक्षांत येईना!

अकरा वाजण्याच्या सुमारास वाड्याजवळ एकामागून एक असे चार टांगे येऊन उभे राहिले, रघुनाथरावाच्या मनांत नव्हतें तरी औपचाराकरितां त्याला पुढें होणें भाग पडलें. सर्व मंडळी आंत आली. रघुनाथरावाला पाहून म्हातारी आजी म्हणाली, "अरे रघू, केवढा वाढलास हा! बरा आहेस ना आतां?—काय ईश्वराची कृपा म्हणून तुझ्या जिवावरचा प्रसंग टळला!—पण मनु कुठं आहे?" तोंच मनुताई पुढें आली. मायालेकी कडकडून भेटल्या! आज कितीतरी वर्षांनीं त्यांची भेट झाली. कादंबरी मागेंच उभी होती. तिलाहि कडकडून भेटण्यास सुमतीबाई उत्सुक झालेली दिसत होती. पण त्यांच्या भेटीचा प्रवेश अद्यापि पुढें होता. कादंबरीची ओळख द्यावयाची नाहीं, ह्या त्यांनीं सजविलेल्या नाटकाबद्दल पंत, रावबहादुर आणि वसंतराव यांना कांहीं विशेष वाटलें नाहीं. पण म्हातारी आजी, सुमतीबाई आणि शांताबाई यांना मात्र अत्यंत अवघड वाटलें. कादंबरीला पाहून बायका कांहीं गोंधळ करतील म्हणून वाटेंत येतांना पंत पुनः पुनः त्यांना बजावीत होते. कारण मुलीच्या भावी सुखाकरितां त्यांना तसें वागणें भागच होतें.

सर्व मंडळी आल्यावर खुशालीच्या प्रश्नांचीं उत्तरें होत असतां मुद्दाम कादंबरीकडे पाहून रावबहादुरांनीं विचारलें, "ह्या कोण? आमची आणि ह्यांची नाहीं ओळख करून दिली?"

" ह्या डॉक्टरीणबाई ! विलायतेहून एम्. डी. ची परीक्षा पास होऊन आल्या आहेत." गणपतराव त्या मंडळीबरोबर बोलत होता. रघुनाथराव फक्त एका बाजूला स्वस्थ बसला होता. मंडळींची उठबस करण्याचें सर्व काम आज गणपतरावाकडे सोंपविलें होतें. " यांचे आमच्यावर फार उपकार आहेत. माझ्या कुटुंबाला ऐनप्रसंगीं अगदीं मृत्यूच्या दाढेंतून काढलं तसंच रघुनाथरावालाहि ह्या अपघातांतून त्यांनींच वाचविलं !"

" डॉक्टरीणसाहेब इकडेच राहतात वाटतं ?" पुनः रावबहादुरानीं प्रश्न केला. परंतु आपणाविषयीं त्यांनीं इतक्यांतच जास्त चौकशी करूं नये अशी कादंबरीची इच्छा होती.

" नाहीं. त्या इथं रहात नाहींत. परंतु ह्या रघुनाथाच्या अपघातापसून त्यांचा आमचा लोभ जमला आहे. त्या आम्हांला अगदीं घरांतल्यासारख्या वाटतात. इतक्या शिकलेल्या आहेत पण त्यांचा स्वभाव इतका मनमिळाऊ आहे—"

" गणपतराव, तुम्ही किनई एखाद्याची स्तुति करूं लागला कीं अशी करतां—" मध्येंच कादंबरी म्हणाली.

" यांत स्तुति कसली डॉक्टरीणसाहेब ? वास्तविक पाहिलं असतां आजचा प्रसंग कोणाकरितां ? पण तुम्ही आज घरांतल्या यजमानालाहि पाहुणे बनविले आहे !"

" म्हणजे ?—आजचा प्रसंग काय होता ?— कांहीं विशेष आहे कीं काय ? —का गणपतराव, बोलत कां नाहीं ? रघुनाथरावाकडे काय पाहतां ! ते तर आमच्याशीं बोलत नाहींत. आणि तुम्ही इतका वेळ बोलत होतां तों इतक्यांत बोलायचे बंद झालां, हें काय ?"

" तसं कांहीं नाहीं ! आज आम्ही डॉक्टरीणसाहेबांना मुद्दाम जेवणाकरितां बोलाविलं होतं."

" वाः ! मग काय आज तुमच्याकडे भोजनसमारंभ आहे तर ! ठीक, ठीक ! आम्हीहि अगदीं ऐनवेळींच आलों म्हणायचें !"

" होय पण तुम्ही आल्यामुळें आमचा समारंभ राहिला एका बाजूला आणि तुमच्या करितांच हा समारंभ करावा लागला. आणि अगांतुक पाहुण्याकरितां आज स्वयंपाक-घरांतलें सर्व काम स्वतः डॉक्टरीणसाहेबांनींच केलं आहे."

" मग तर मोठी बहार आहे म्हणायची ! डॉक्टरीण साहेब विलायतेहून जाऊन आलेल्या आहेत, तेव्हां आज आमच्या ताटांत त्यांनीं केलेलीं विलायती पक्वान्नं पडणार म्हणायचीं !"

सर्व मंडळी हंसली. कादंबरी आणि इतर मंडळी अगदीं गप्प होती. थोड्या वेळानें रघुनाथरावानें मनुताईंच्या सुचनेवरून मंडळींना स्नानाकरितां उठण्यास सांगितलें. सर्वांच्या आधीं रावबहादुर उठले. ते बडे पाहुणे म्हणून रघुनाथराव स्वतः त्यांची व्यवस्था करण्यासाठीं गेला. त्याच्या मागून श्रीधरपंत आणि गणपतरावहि इतर व्यवस्थेकरितां उठले, तेव्हां मात्र कादंबरीला आपल्या मंडळीबरोबर उघड बोलण्यास अवसर सांपडला. थोड्या अवधींत त्यांचीं प्रश्नोत्तरें होऊन पुनः कादंबरी पुढल्या तयारीकरितां झटकन् खालीं आली. इकडे स्नान करीत बोलतां बोलतां रावबहादुरांनीं विचारलें. "ह्या एवढ्या मोठ्या डॉक्टरीणबाई तुमच्या घरांत अगदीं आपलेपणानें वावरूं लागल्या हें मोठें आश्चर्य आहे. अहो आमच्या इकडे काय कीं मुंबईत काय, एखाद्या रोग्याला पाहण्याकरितां ह्यांना बोलवायचं म्हणजे प्रथम वीस रुपये बाजूला काढून ठेवावे लागतात. तुम्हाला ह्या अपघातांत बराच खर्च झाला असेल नाहीं ?—माझ्या मतें कमींत कमीं तीन साडे तीन हजार रुपये अगदीं सहज चटणीसारखे उडाले असतील नाहीं ?"

"छेः ! खरं सांगायचं म्हणजे एक पचाहि खर्च झाला नाहीं."

"म्हणजे ! हें कसं काय ? त्यांनीं व्हिजिटचा चार्ज केला नाहीं म्हणतां ?—आणि औषधाबद्दल कांहीं घेतलं नाहीं ? मोठं आश्चर्य आहे ?"

"अगदीं एक पै घेतली नाहीं, पण त्याबद्दल मी अन्य व्यवस्था केली आहे. आज डॉक्टरीणबाईंना जेवणाकरितां बोलाविलं याचं कारण हेंच होतं. त्यांचे उपकार तरी कशाला ? म्हणून एक हजार रुपयांपर्यंत मी हिऱ्याची आंगठी मुंबईहून आणविली आहे, आणि ती आज त्यांना देण्याचा विचार आहे. कसं काय ? ही माझी योजना आपणाला कशी काय पसंत आहे ?"

"वाः ! उत्तम ! अगदीं मन पसंत आहे ! पण हा समारंभ केव्हां करणार ? आम्ही असतांना झाला तर आम्हालाहि मोठा आनंद होईल !"

"केव्हां करावा ? जेवण वगैरे झाल्यावर मग करावा, अशी माझी इच्छा आहे. आपलं काय मत आहे ?"

"छेः ! असं नका करूं. त्या विलायतेहून जाऊन आलेल्या आहेत. तेव्हां त्या पद्धतीप्रमाणें म्हणजे प्रथम हा 'अर्पण समारंभ' करून मग जेवण."

"बरं तसं करूं ! पूर्वी काय आणि मागून काय ? केव्हांहि केला तरी एकच !"

"मग लवकर सर्वांचीं स्नानं आटोपून आपण सर्वजण दिवाणखान्यांत जमूं काय समजलां ?

त्याप्रमाणेंच ठरलें. रावबहादुरांनीं स्नान करून वर येतांच पंतांना ती गोष्ट सांगितली. त्यांनाहि तेंच पाहिजे होतें. कादंबरी कोण, हें, केव्हां उघड होतें असेंच सर्वांना झालें होतें. सर्वांचीं स्नानें होऊन मंडळी वर आल्यावर 'पानें वाढावयाचीं काय ?' असें विचारण्याकरितां कादंबरी मुद्दाम वर आली. तेव्हां रघुनाथरावाकडे पाहून रावबहादूर म्हणाले, "काय हो रघुनाथराव, आपलं ठरल्याप्रमाणें सुरवात करतां ना ?"

सुरवात करायची परंतु ती कशी करावी ? हा रघुनारावाला प्रश्न पडला. त्यावेळीं सर्व मंडळी तेथें जमली होती. घरांतील नोकर चाकर आणि आज पाहुणे मंडळी यावयाची असल्यामुळें वाड्यांतील आणि मळ्यावरील नोकरमाणसं बोलाविलीं, तीं सर्व तेथेंच होतीं. आपल्या दयाळु मालकाला अपघाताच्या भयंकर दुखण्यांतून डॉक्टरीणबाईनीं उठविलें, म्हणून सर्व नोकर मंडळीच्या मनांत तिच्याविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न झालेली होती. त्यांतून त्या मंडळीपैकीं बऱ्याच जणांच्या कुटुंबांतील माणसांना कादंबरीचें धर्मार्थ औषध चालू होतें, त्यामुळें तिच्या विषयीं सर्वत्रांना फार मोठा आदर वाटत होता. अशी ही सर्व मंडळी त्या वेळीं एकत्र जमली होती. त्यांतून बाजूला स्वशूर आणि त्यांची मंडळी बसलेली, तेव्हां इतक्या मंडळीसमोर काय बोलावें व सुरवात कशी करावी, हेंच रघुनाथरावाला सुचेना ! त्यानें एक दोनदां बाजूला असलेल्या गणपतराव आणि श्रीधर पंत यांच्याकडे पाहिलं. परंतु त्यांचीहि गोंधळलेलीच स्थिति झाली होती. तें पाहून रावबहादुर म्हणाले "रघुनाथराव, आज तुम्ही जुळवून आणलेला प्रसंग मोठा गंभीर आहे. तेव्हां ह्या प्रसंगाची सुरवात माझ्यासारख्या वृद्ध माणसानें केलेली जास्त चांगली ! डॉक्टर कादंबरी यांचें पूर्व चरित्र मला इतक्यांत जें कळलें त्यावरून त्या कोण हें मी ओळखलं आहे. माझ्या परमस्नेह्याची ती मुलगीच आहे. त्या परमस्नेह्याचें नांव आपणास लवकरच कळेल. स्नेह्याची मुलगी तेव्हां अर्थात् ती माझीच मुलगी आहे, असं मी समजतों. आपण आपल्याच मुलीचा गौरव काय करायचा असें कोणी विचारील. तर त्याला एकच उत्तर आहे. गुणांचा गौरव करणें—मग तो लहानाच्या ठिकाणीं दिसो अगर मोठ्यांच्या ठिकाणीं दिसो, त्या गुणांचा गौरव करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. रघुनाथराव हेहि आमच्या परमस्नेह्याचे जांवई आहेत. त्यांना भयंकर अपघात झाला असतां डॉक्टर कादबरीनें अविश्रांत श्रम केले आणि त्यांना पुनर्जन्म दिला त्या उपकारांबद्दल रघुनाथराव स्वतःच त्यांचा गौरव करणार आहेत. पण डॉक्टर कादंबरीबाईंना इतकीच विनंती

करावयाची आहे कीं, त्यांनीं हा परोपकार असाच चालू ठेवावा. आणि पुढें मागें एखादी हॉस्पिटल सारखी परोपकारी संस्था काढण्याचा त्यांचा विचार ठरल्यास मी आणि माझे मित्र जयरामपंत हे त्या संस्थेचे हितचिंतक आश्रयदाते आहोंत हें त्यांनीं लक्षांत ठेवावें. ”

रावबहादुराचें भाषण संपतांच कादंबरी म्हणाली, “ माझ्याकडून कोणती एक गोष्ट झाली, त्याबद्दल रावबहादुरांनीं माझा गौरव केला, तशा गौरवाला मी पात्र नाहीं. आणि त्या केलेल्या गोष्टीबद्दल माझा कोणीहि गौरव करूं नये, अशी माझी इच्छा आहे. कारण ती गोष्ट करण्यांत मी माझें कर्तव्य केलें आहे. परंतु पुढेंमागें मी जर एखादी परोपकारी संस्था काढली, तर त्याबद्दल रावबहादुर यांनीं दाखविलेल्या सहानुभूतिबद्दल मात्र मी त्यांची अत्यंत आभारी आहें. ” इतकें बोलून कादंबरी गप्प राहिली. आतां रघुनाथरावाला बोलण्याचा प्रसंग आला. त्याच्या हातांत आंगठी होती. ती आंगठी तो आतां कादंबरीला देणार होता. परंतु ती देण्यापूर्वी काय बोलावें हेंच त्याला सुचेना. इतका वेळ जयरामपंत असल्यामुळें तो अगदीं स्तब्ध होता. शेवटीं थोड्या वेळानें तो उभा राहिला परंतु त्याचे पाय लटपटूं लागले. आजपर्यंत चार मंडळींत बोलण्याचा त्याला कधींच प्रसंग नव्हता. त्यामुळें त्याची अशी स्थिति झाली. परंतु आतां बोलल्याशिवाय गत्यंतर नाहीं, असें पाहून मनाचा मोठा हिय्या करून तो म्हणाला, “ डॉक्टर कादंबरीबाई यांचे माझ्यावर फार उपकार झाले आहेत. ‘ मी कांहीं जास्त केलं नाहीं, फक्त कर्तव्य केलं’ असें त्या म्हणतात, हा त्यांचा थोरपणा आहे. उच्च शिक्षणाचं त्यांच्या हातून चीज होत आहे. याबद्दल कुणालाहि आनंदच होईल. माझ्या अपघातामुळें त्यांची ओळख होऊन ह्या थोड्या दिवसांत त्यांनीं आपल्या प्रेमळ मनमिळाऊ आणि थोर मनानें आमच्याशीं जो लोभ जुळविला आहे, त्यामुळें त्या आमच्याच पैकीं आहेत असें आम्हाला वाटूं लागलं आहे. त्यांनीं माझ्या दुखण्यांत जे अविश्रान्त श्रम केले, त्याचा मोबदला देण्यास मी असमर्थ आहें. इतके त्यांचे माझ्यावर उपकार आहेत. त्या उपकारांची फेड म्हणून नव्हे तर आमची एक आठवण म्हणून मी ही एक लहानशी वस्तु त्यांना देत आहें, त्या वस्तूचा स्वीकार करतील अशी मला पूर्ण आशा आहे. ” असें म्हणून रघुनाथरावानें हिऱ्याची आंगठी कादंबरीपुढें केली. तिनें ती आंगठी हातांत घेतली. आणि क्षणभर त्या आंगठीकडे पहात ती म्हणाली, “ मी केलेल्या अविश्रान्त श्रमाचा मोबदला देण्यास किंवा केलेल्या उपकारांची फेड करण्यास आपण असमर्थ अहांत. पण आपली

आठवण रहावी अशी जर आपली मनापासून इच्छा असेल, तर ही आंगठी देण्यापेक्षां मी होऊनच एक गोष्ट आपणाकडे मागतें, तेवढी आपण मला द्या. ”

रघुनाथराव क्षणभर विचारांत पडला. कादंबरी काय मागणार याची गणपतरावाला व श्रीधरपंतालाहि कांहीं कल्पना होईना. ते तिघेहि एकमेकांकडे पाहूं लागले. इतकी बहुमोल आंगठी देत असतां ती न घेतां डॉक्टरीणबाई कोणती वस्तु मागणार हें त्यांच्या लक्षांत येईना! परंतु इतरांच्या मात्र ती गोष्ट लक्षांत आली.

“ आपण विचारांत पडलां त्यावरून माझी मागणी फार मोठी—ह्या हिऱ्याच्या आंगठीपेक्षांहि आर्थिक दृष्टीनें ज्यास्त असेल, अशी शंका येऊन आपण विचारांत पडलां असाल तर तशी शंका घेण्याचें कारण नाहीं. आपण ‘ हो ’ म्हणा म्हणजे मी माझी मागणी करतें. ”

“ रघुनाथराव,”—रावबहादुर म्हणाले, “ आपण असे विचारांत कां पडलां? डॉक्टर कादंबरीनें सर्व उघड सांगितलं आहे. आणि आपणहि त्यांच्या अविश्रान्त श्रमाबद्दल, उपकाराबद्दल स्वतः कबूल करीत आहांत, मग त्यांच्या मागणीला ‘ हो ’ कां म्हणत नाहीं? वास्तविक तुम्ही मोठ्या आनंदानें ‘ मागा—मोठ्या आनंदानें देईन ’ असंच सांगितलं पाहिजे. ”

इतका वेळ आपण ‘ हो ’ म्हणण्यास विलंब लावला म्हणून रघुनाथराव थोडा खजील झाला. परंतु आतां उठून तो झटकन म्हणाला, “ मागा—आपण वाटेल तें मागा. मला देण्यासारखं असेल, तर मी मोठ्या आनंदानें देईन. ”

“ माझं मागणं दुसरं तिसरं कांहीं नाहीं—फक्त ह्या चरणांची अखंड सेवा आणि आश्रय मला पाहिजे ! ” असें म्हणून कादंबरीनें चटकन् रघुनाथरावाचे पाय धरले !

सर्वांना अत्यंत आश्चर्य वाटलें ! पंताबरोबर आलेल्या सर्व मंडळींना हा असा कांहीं तरी प्रकार होणार, हें जरी पूर्वीं माहित होतें, तरीहि कादंबरीनें आपल्या पतीचे चरण धरतांच त्यांच्या—प्रत्येकाच्या नेत्रांत खळकन् आनंदाश्रु आले! प्रत्येकाला तो प्रसंग कितीतरी गंभीर वाटला. वास्तविक पाहतां खरोखरीच तो प्रसंग जरी नाटकी होता, तरी देखील त्या प्रसंगांत प्रत्येकाचें अंतःकरण हालवून सोडण्याचें सामर्थ्य होतें. प्रत्येकाचें अंतःकरण क्षणमात्र थरारलें ! रघुनाथराव तर एखाद्या पुतळ्यासारखा आश्चर्यानें स्तब्ध झाला ! थोड्या वेळानें रावबहादुर म्हणाले, “ रघुनाथराव, ही आमच्या परम स्नेह्यांची—जयरामपंताची मुलगी कमू—आपली नावडती बायको सीता आणि आतां आपल्या अलौकिक गुणांनीं

कर्तव्य म्हणून तुम्हाला उपकारबद्ध करणारी डॉक्टर कादंबरी आहे! असे आश्चर्य-चकित होऊं नका. आपल्या चरणाची सेवा घडावी आणि आपल्या चरणाचा अखंड आश्रय मिळावा, म्हणून तिनें इतकीं वर्षें खडूतर तपश्चर्या केली, तिचं फळ तिला द्या—तिचा स्वीकार करा आणि आम्हां सर्वांना आनंदी करा!"

रघुनाथरावानें झटकन कादंबरीला वर उठविलें. दोघांच्या दृष्टीचें मीलन झालें. आणि त्या नेत्रमीलनांत कादंबरीला तिनें केलेल्या खडूतर तपश्चर्येचें फळ मिळालें!

---

## १६........ कथानकाचा शेवट.

तो आनंद अवर्णनीय होता. यक्षिणीनें कांडी फिरवून झालेल्या चमत्काराविषयीं इतकें आश्चर्य वाटलें नसतें, इतकें आश्चर्य रघुनाथरावाला वाटलें. 'एम. डी.' इतकें उच्च शिक्षण घेतलेली, सुस्वरूपवान, प्रेमळ, कनवाळु आणि गृहकामांतही इतकी तरबेज अशी डॉक्टर कादंबरी जिला आपण 'देवते' इतकी पूज्य मानिली आणि जिला तिच्या पतीनें टाकल्याबद्दल त्याची आपण मूर्खांत गणना केली, ती आपलीच बायको आहे, ह्या गोष्टीवर प्रथम त्याचा विश्वासच बसेना! परंतु दृष्टी-मीलनानें त्याची तात्काळ खात्री पटली. तो तसाच पंतांच्या जवळ गेला आणि हात जोडून म्हणाला, "मामा, मला क्षमा करा. तसंच मामी—आजी, तुम्हीहि मला मनापासून क्षमा करा. आजपर्यंत मी मूर्खासारखा वागलों—"

"झालं तें झालं! आतां सुखानें आणि एकमतानें वागा म्हणजे झालें! आम्ही आज जे मुद्दाम आलों ते इतक्याच करितां!"

"म्हणजे? तुम्ही एवढ्याकरितां का इकडे आला होतां?" असें म्हणून रघुनाथराव सर्वांकडे आश्चर्यानें पाहूं लागला. तेव्हां सर्व मंडळी मोठ्यानें हंसूं लागली. नंतर रावबहादुरांनीं थोडक्यांत सर्व प्रकार सांगितला आणि शेवटीं ते म्हणाले," हें दिसायला जरी कृत्रिम नाटक झालें, तरी यांत सर्व खरेपणा आहे. योगायोग जुळून येऊन तुमच्या अपघातांत कादंबरीला आपल्या गुणांची परीक्षा देण्याची संधि मिळाली. आणि त्या परिक्षेचा आज हा असा गोड शेवट झाला!—चला आतां कादंबरीनें स्वतः केलेल्या गोड पोळया खाऊन ह्या सर्वांचा अखेरहि गोड करूं!—उठा—"

गृहलक्ष्मीच ती! कादंबरीनें स्वतः केलेला स्वयंपाक स्वतःच वाढला. खरोख-रीच त्या जेवणाला एक अपूर्व चव आली होती. मोठ्या आनंदानें गप्पागोष्टी करीत

मंडळींचें जेवण झालें. आतां प्रत्येकाला मागें पडलेल्या गूढ कोड्यांची उत्तरें भराभर मिळत गेलीं. जेवतांना प्रत्येकाच्या मनांत हेच विचार चालले होते ' तुम्ही आपला गैरसमज करून घेतला आहे. तुमची बायको खरोखरीच चांगली आहे. पण तिला आपले गुण दाखविण्याची तुम्हीं संधि दिली नाहीं, ' ' तिनें स्वतः सर्वतोपरी तुमची खात्री पटवून दिली तर तुम्हीं तिचा स्वीकार कराल किंवा नाहीं ? ' हीं कादंबरीनें विनोदाच्या वादविवादांत उच्चारलेलीं वाक्यें आतां रघुनाथरावाला आठवूं लागलीं. आणि आनंदानें त्याचें अंतःकरण उचंबळून येऊं लागलें. तसेंच पहिल्या भेटीच्या वेळीं कादंबरीनें उच्चारलेलीं कित्येक मार्मिक वाक्यें आतां सरस्वतीला आणि गणपतरावालाहि आठवूं लागलीं. त्याचप्रमाणें हरीलाहि आपल्या डॉक्टरीणबाईचा सर्व ओढा रघुनाथरावाकडे कां होता, हें आतां कळलें.

" कां सरस्वतीबाई, तुमच्या वहिनी तुमच्या बरोबर तोऱ्यांत वागतात कीं कशा वागतात म्हणून तुम्हांला मोठी काळजी पडली होती ना? कादंबरीनें हांसत विचारलें.

" आमच्या वहिनी कशाहि वागल्या तरी त्या विलायतेंतून जाऊन आलेल्या आहेत, हें कुठं तुम्हांला माहित आहे ? "

" तुमच्या वहिनी विलायतेंतून जाऊन आल्या पण त्यांना शिंगं फुटलेलीं कांहीं दिसत नाहींत. " मध्येंच रावबहादुर म्हणाले, " चांगली परिस्थिति अनुकूल झाली असतां पुन्हां इतका द्राविडी प्राणायाम करून संसार सुखाकरितां आपलें स्वातंत्र्य गमावून मात्र बसल्या खरं ना ? "

यांत मी स्वातंत्र्य गमावलं नसून उलट कमावलं आहे, हें कुठं तुमच्या लक्षांत येत ! " कादंबरीनें मोठ्या अभिमानानें उत्तर दिलें.

" मग असं कां ? आपल्या समाजांत तुमच्या सारख्याच शिकलेल्या कित्येक विलायतेलाहि जाऊन आलेल्या लग्न न करितां अविवाहित राहण्याचा निश्चय करून बसल्या आहेत, त्याचा अर्थ काय ?

" याचा अर्थ इतकाच कीं, अशा स्त्रियांना प्राप्त झालेल्या उच्च शिक्षणाला कोणत्या मापानें मोजावयाचें आणि कोणत्या तागड्यानें तोलावयचें हेंच गूढ कळलेलं नसतं, हेंच खरं ! नाहींतर ' स्त्रीस्वातंत्र्य आणि स्त्रीहक्क ' म्हणजे काय, हें त्यांना कळलें असतं ! " कादंबरीनें उत्तर दिलें.

रघुनाथरावानें त्या सर्व मंडळींना आणखी चार दिवस मोठ्या आग्रहानें राहून घेतलें. त्यांचा प्रत्येक दिवस मोठ्या आनंदांत आणि सुखांत गेला.

---

# उपसंहार

आपल्या नातीच्या—कमूच्या लग्नापूर्वी 'माझ्या कमूचें लग्न करून टाक;' आतां 'घडीचाहि भरवंसा' नाहीं. माझ्या डोळ्यांदेखत एकदां पोरीचं लग्न होऊं दे म्हणून जी म्हातारी पंतांच्या मागें लागली होती, तीच वृद्धा आज दीड तप झालें तरी होती तशीच टुणटुणीत होती. मध्यंतरीं पतीनें टाकल्यामुळें कमलिनीचा सौख्यरवि काळ्या ढगांनीं पूर्ण व्यापलेला होता, तरी तो ढग आज नाहीं उद्यां दूर होऊन तो सौख्यरवि पुनः आपल्या पूर्ण प्रकाशानें प्रकाशमान होणार, अशी म्हातारीची पूर्ण खात्री होती. 'माझी बाळ अखंड सुख भोगील!' हा म्हाताऱ्या माणसानें अंतःकरणपूर्वक दिलेली आशीर्वाद खोटा कसा होईल! एवढ्याच करितां आपल्या मुलाबाळांविषयीं वडील माणसांनीं नेहमीं सदिच्छा प्रदर्शित करीत असाव. प्रत्येक मातेचें आपल्या मुलावर किती प्रेम असतें, तें येथें नव्यानें सांगण्याची जरूरी नाहीं. आपल्या मुलांचें कल्याण व्हावें अशीच तिची नेहमीं इच्छा असते. तथापि क्वचित् प्रसंगीं कांहीं चमत्कारिक मासले आपल्या दृष्टीस पडतात. एखाद्या खोडकर मुलानें आपल्या आईच्या नकळत कांहीं खाल्लें किंवा कांहीं सांडलें अगर असाच एखादा आईचा अपराध केला तर ती रागारागानें 'मेल्या तुझ्या तोंडाला आग लागली ती!' 'तुझे हात जळले ते!' अशा प्रकारचे शब्दप्रहार करीत असते. तसेंच एखादा खुळसर मुलगा असला म्हणजे घरांतील मंडळी त्याची अगदीं हेळसांड करित असते, आणि बाहेरच्या मंडळीचा तो एक थट्टेचा विषय बनलेला असतो. परंतु हा प्रकार अत्यंत वाईट आहे.' त्याचप्रमाणें एखाद्या मुलीकडून कांहीं अपराध झाल्यास 'रांडे, तुझं तळपट होवो' अशीहि आईच्या किंवा वडील माणसांच्या तोंडचीं मुक्ताफळें ऐकूं येतात. परंतु हा प्रकार मुलांमुलींच्या पुढील आयुष्यक्रमांत किती घातक होतो, याचा कधीं कोणी विचार करतो काय? आमच्या पाहण्यांत अशीं कित्येक उदाहरणें आहेत. एका खोडकर मुलाला त्याची आई, त्या मुलाच्या लहानसहान अपराधावरून नेहमीं 'तुझे हात पेटले—जळले—मोडले—!' असें कांहीं तरी वाईट म्हणत असे. पुढें थोड्याच दिवसांत दिव्याचा अपघात होऊन तो मुलगा भाजला आणि त्याचे हात खरोखरीच जळले! सदरहुप्रमाणें एका मुलीला तिची चुलती थोड्याशा शुल्लक कारणावरूनहि 'रांडे—!' म्हणून रागें भरत असे. पुढं त्या मुलीचें लग्न होऊन सहा दिवस झाले नाहींत तों खरोखरीच तिला

वैधव्य आलें ! ह्या गोष्टी अशा अनिष्ट घडून यायला कारण दैवयोग असेंहि कोणी म्हणेल ! परंतु आमच्या मतानें हा सर्व प्रकार वाचेचाच आहे. इतक्याचकरितां 'आपली वाचा शुद्ध ठेवा !' अशी आपणास शास्त्राज्ञा आहे. ह्या लहानशा आज्ञेंत किती खोल अर्थ भरलेला आहे, हें प्रस्तुत कादंबरींत गृहशिक्षणाचें जें महत्त्व वर्णन केलें आहे, त्यावरून सहज लक्षांत येईल !

लग्न झाल्यापासून सीतेची—कमलिनी ऊर्फ डॉक्टर कादंबरीची जी 'सीताशुद्धि' चालली होती, त्या शुद्धींत ती पूर्ण विजयी होऊन शेवटीं खरी 'रघुनाथा' ची ती सीता झाली. तिला आतां दोन मुलें झालीं असून त्यांच्या म्हाताऱ्या पणजीनें त्यांचीं नांवें 'लहु' आणि 'कुश' अशीं ठेविलीं. सीतेनें आपल्या गृहराज्याचें सर्व काम आपल्या हातीं घेतलें असून आपल्या सासूला—मनुताईला तिनें जुलमानें विश्रांति घ्यावयास लावलें. 'अग सीते ! तूं तुझा दवाखाना पाहशील, ह्या मुलांना सांभाळशील कीं हा घरचा सकाळ संध्याकाळचा पसारा आटोपशील ?" असें मनुताईनें वरचेवर म्हणावें. रघुनाथरावानें आपल्या घरची नोकरचाकरांची संख्या वाढविली होती. तरी देखील गृहप्रपंचाचीं मुख्य कामें सीतीनें केव्हांहि अंगावेगळीं केलीं नाहींत. आपला धर्मार्थ दवाखाना, गृहकृत्यें आणि मुलांची जोपासना इतक्या गोष्टी करूनहि तिला गांवांतील रोग्यांना किंवा बाळंतपणांत अडलेल्या बायांना पाहण्याकरितां रात्रीं अपरात्रीं सुद्धां जावें लागे. सर्व शहरांत आणि आजुबाजूच्या टापूंत तिची अत्यंत चहा झालेली होती. गरीबगुरीब तर तिला देवतेप्रमाणें समजत असत. अशा रीतीनें सर्व दिवसांत तिला बिलकूल वेळ मिळत नसे. तरी त्यांतल्या त्यांत ती शेतकी सुधारण्यासंबंधीं इंग्रजी पुस्तकांचें वाचन करी. आणि वाचलेल्या विषयाचें सार ती मोठ्या प्रेमानें आणि भक्तीनें रघुनाथरावाला समजावून सांगत असे. एकदां रात्रीं ती पतिपत्नी अशा रीतीनें शेतकीच्या विषयावर बोलत असतां रघुनाथराव म्हणाला, " हें पहा, अलीकडे तूं फार काम करूं लागली आहेस ! अशानें तुझ्या शरिरावर परिणामहि व्हायचा !"

" पण मी स्वतः डॉक्टरीण आहे. हें आपण विसरलां वाटतं !"

" विसरेन कसा ?—तुम्ही नुसत्या डॉक्टरीण नाहीं तर विलायतेच्या डॉक्टर कादंबरी एम. डी. आहांत ! "

" आणि तुम्ही ! " गालांतल्या गालांत हांसत सीतेनें विचारलें.

" आम्ही आपले मराठी सहा यत्ता शिकलेले नांगरधरे शेतकरी !"

" मग तुमची एवढी मोठी शिकलेली बायको तुमच्या डोक्यावर मिरी कशी नाहीं वाटीत ! "

" अग मिरी देखील वाटल्या असत्या ! पण बरोब्बर एक तप मी माझ्या देवतेची तपश्चर्या चालविली होती ना ? "

अशा रीतीनें तें कुटुंब आपल्या आजीच्या आशीर्वादानें सुखांत होतें. जयराम-पंतांनीं नुकतेंच पेन्शन घेतलें असून ते आपल्या वृद्ध मातेला घेऊन तिच्या इच्छे-प्रमाणें काशीयात्रेला जाण्याच्या विचारात आहेत. त्यांनीं आश्रयाला ठेविलेली राधाबाई आणि तिचीं तिन मुलें हरि, नारायण आणि कृष्ण विद्यार्जन करीत असून सुखांत आहेत. हरि आतां ग्रॅन्ट मेडिकल कॉलेजांत जाऊं लागला आहे. त्यानेंहि पुढें डॉक्टर झाल्यावर आपल्या मुलीप्रमाणेंच लोकसेवा करावी, अशी पंतांची इच्छा असून त्याप्रमाणेंच त्यांनीं पुढली सर्व व्यवस्था करून ठेविली आहे.

स्त्रीशिक्षणाबरोबर गृहशिक्षणाची किती आवश्यकता आहे, हें सप्रमाण दाख-विण्याकरितां प्रस्तुत साध्या कथानकांत घेतलेलीं तीन मुख्य पात्रें—कमलिनी शांता आणि यशवंत यथामति रंगवून आतां ही कादंबरी मी येथें समाप्त करीत आहें.

**समाप्त**